शास्त्रमिदं चाग्र्यं मोक्षशास्त्रं तथोत्तमम् १० चतुराश्रमधर्माणामाचारस्थितिसाधनम्। प्रोक्तमेतन्महाभाग वेदव्यासेन धीमता ११ तथा तात कृतं ह्येतद्व्यासेनोदारकर्मणा। यथा व्याप्तं महाशास्त्रं विरोधैर्नाभिभूयते १२ व्यासवाक्यजलौघेन कुतर्कतरुहारिणा। वेदशैलावतीर्णेन नीरजस्का मही कृता १३ कलशब्दमहाहंसं महाख्यानपराम्बुजम्। कथाविस्तीर्णसलिलं कार्ष्णं वेदमहाह्रदम् १४ तदिदं भारताख्यानं बह्वर्थं श्रुतिविस्तरम्। तत्त्वतो ज्ञातुकामोऽहं भगवंस्त्वामुपस्थितः १५ कस्मान्मानुषतां प्राप्तो निर्गुणोऽपि जनार्दनः। वासुदेवो जगत्सृतिस्थितिसंयमकारणम् १६ कस्माच पाण्डुपुत्राणामेका सा द्रुपदात्मजा। पञ्चानां महिषी कृष्णा अत्र नः संशयो महान् १७ भेषजं ब्रह्महत्याया बलदेवो महाबलः। तीर्थयात्राप्रसङ्गेन कस्माच्चक्रे हलायुधः १८ कथं च द्रौपदेयास्तेऽकृतदारा महारथाः। पाण्डुनाथा महात्मानो वधमापुरनाथवत् १९ एतत्सर्वं विस्तरतो ममाख्यातुमिहार्हसि। भवन्तो मूढबुद्धीनामवबोधकराः सदा २० इति तस्य वचः श्रुत्वा मार्कण्डेयो महामुनिः। दशाष्टदोषरहितो वक्तुं समुपचक्रमे २१ मार्कण्डेय उवाच ॥ क्रियाकालोऽयमस्माकं संप्राप्तो मुनिसत्तम। विस्तरे चापि वक्तव्ये नैष कालः प्रशस्यते २२ ये तु वक्ष्यन्ति वक्ष्येऽथ तानहं जैमिने तव।

---

परस्पर संबद्ध असलेल्या धर्मार्थकाममोक्षांचें ह्यांत वेगळें वेगळें सविस्तर वर्णन केलेलें आहे ९. हे महाभाग, बुद्धिमान् वेदव्यासांनीं कथिलेलें हें आख्यान ह्मणजे श्रेष्ठ धर्मशास्त्र, उत्कृष्ट अर्थशास्त्र, उत्तम कामशास्त्र व सर्वोत्कृष्ट मोक्षशास्त्र असून चार आश्रमांचे जे धर्म ते व आचार कायम रहाण्याचें साधन होय १०,११. या मार्कंडेयमुने, मोठीं मोठीं कर्में करणाऱ्या व्यासांनीं विरोध न येतील अशाच रीतीनें हें मोठें व्यापक शास्त्र केलेलें आहे १२. वेदरूप पर्वतापासून वहात येणाऱ्या आणि कुतर्करूप वृक्ष हरण करणाऱ्या व्यासवाक्यरूप जलप्रवाहानें पृथ्वी निर्मल करून टाकिली आहे १३. हें व्यासोक्त वेदरूप सरोवर उत्कृष्ट शब्दरूप महाहंसांनीं, महाख्यानरूप उत्कृष्ट कमलांनीं व कथारूप प्रचंड उदकानीं युक्त आहे १४. हे भगवन्, अनेक अर्थांनीं भरलेलें आणि श्रुतीच्या सविस्तर अर्थांनीं युक्त असलेलें हें भारताख्यान खरें खरें समजून घेण्याकरितां मी आपणाकडे आलों आहें १५. निर्गुण व जगताच्या उत्पत्तिस्थितिलयांचें कारण असलेला जनार्दन वासुदेव मनुष्य कां झाला? १६ आणि पांच पांडवांची पट्टराणी ती द्रुपदकन्या कृष्णा एकच कशी झाली? ह्याविषयीं आह्मांस मोठा संशय आहे १७. त्याचप्रमाणें महाबलाढ्य हलायुध बलदेवानें तीर्थयात्राप्रसंगानें ब्रह्महत्येची निष्कृति कां केली? १८ आणि ते महात्मे व महारथी अविवाहित द्रौपदीपुत्र, पांडवांसारखे नाथ असतांना अनाथाप्रमाणें कसे मारले गेले? १९. हें सर्व आपण मला सविस्तर कथन करा. मंदमति लोकांना आपण सर्वदा ज्ञान करून देणार आहां" २०. हें जैमिनीचें भाषण ऐकून अष्टादशदोषरहित महर्षि मार्कंडेयांनीं बोलण्याला आरंभ केला २१. ते ह्मणाले " हे मुनिश्रेष्ठ, आमची ही स्नानसंध्येची वेळ झाली आहे आणि तुझ्या प्रश्नांचीं उत्तरें तर सविस्तर देणें योग्य आहे. तस्मात्,

तथा च नष्टसन्देहं त्वां करिष्यन्ति पक्षिणः २३ पिङ्गाक्षश्च विबोधश्च सुपुत्रः सुमुखस्तथा । द्रोणपुत्राः खगश्रेष्ठास्तत्त्वज्ञाः शास्त्रचिन्तकाः २४ वेदशास्त्रार्थविज्ञाने येषामव्याहता मतिः । विन्ध्यकन्दरमध्यस्थांस्तानुपास्य च पृच्छ च २५ एवमुक्तस्तदा तेन मार्कण्डेयेन धीमता । प्रत्युवाच महर्षिस्तं विस्मयोत्फुल्ललोचनः २६ जैमिनिरुवाच ॥ अत्यद्भुतमिदं ब्रह्मन्पक्षिवागिव मानुषी । यत्पक्षिणस्ते विज्ञानमापुरत्यन्तदुर्लभम् २७ तिर्यग्योन्यां यदि भवस्तेषां ज्ञानं कुतोऽभवत् । कथं च द्रोणतनयाः प्रोच्यन्ते ते पतत्रिणः २८ कश्च द्रोणः प्रविख्यातो यस्य पुत्रचतुष्टयम् । जातं गुणवतां तेषां धर्मज्ञानं महात्मनाम् २९ मार्कण्डेय उवाच ॥ शृणुष्वावहितो भूत्वा यद्वृत्तं नन्दने पुरा । शक्रस्याप्सरसां चैव नारदस्य च संगमे ३० नारदो नन्दनेऽपश्यत्सुरस्त्रीगणमध्यगम् । शक्रं सुराधिराजानं तन्मुखासक्तलोचनम् ३१ स तेनर्षिवरिष्ठेन दृष्टमात्रः शचीपतिः । समुत्तस्थौ स्वकं चास्मै ददावासनमादरात् ३२ तं दृष्ट्वा बलवृत्रघ्नमुत्थितं त्रिदशाङ्गनाः । प्रणेमुस्ताश्च देवर्षिं विनयावनताः स्थिताः ३३ ताभिरभ्यर्चितः सोऽथ उपविष्टे शतक्रतौ । यथार्हं कृतसंभाषः कथाश्चक्रे मनोरमाः ३४ ततः कथान्तरे शक्रस्तमुवाच महामुनिम् । शक्र उवाच ॥ देह्याज्ञां नृत्यतामासां तव याऽभिमतेति वै ३५ रम्भा वा कर्कशा

---

ही वेळ प्रशस्त नाहीं २२. तथापि हे जैमिने, ह्या प्रश्नांचीं उत्तरें तुला सांगण्यास जे समर्थ आहेत ते मी तुला आज सांगतो. पक्षी तुझा संदेह नाहींसा करतील २३. पिंगाक्ष, विबोध, सुपुत्र, व सुमुख हे द्रोणपुत्र पक्ष्यांमध्यें श्रेष्ठ असून तत्ववेत्ते व शास्त्रचिंतक आहेत २४. वेद व शास्त्र ह्यांचा अर्थ जाणण्यामध्यें त्यांची मति अकुंठित आहे व विंध्याद्रीच्या गुहेमध्यें त्यांचें वास्तव्य आहे. ह्यास्तव, त्यांच्याकडे जा आणि विचार" २५. असें त्या विचारी मार्कंडेयांनीं सांगितलें असतां विस्मयानें नेत्र प्रफुल्लित होऊन ते ऋषिश्रेष्ठ २६ जैमिनि ह्मणाले "ते पक्षी असतांना त्यांना अत्यंत दुर्लभ ज्ञान प्राप्त झालें आणि मनुष्यासारखी वाणी त्यांना प्राप्त झाली हें अति अद्भुत आहे २७. तिर्यग्योनीमध्यें उत्पत्ति असतांना त्यांना ज्ञान कसें झालें? त्या पक्ष्यांना द्रोणपुत्र ही संज्ञा कशी प्राप्त झाली? २८. चार पुत्रांचा पिता असलेला हा द्रोण कोण? व त्या गुणी महात्म्यांना धर्मज्ञान कसें प्राप्त झालें?" २९. मार्कंडेय ह्मणतातः— इंद्र, अप्सरा व नारद ह्यांची एकत्र भेट झाली असतांना पूर्वी नंदनवनांत जें घडलें आहे तें तूं एकाग्रचित्तानें श्रवण कर ३०. एकदां नंदनवनांत वेश्यांच्या समुदायामध्यें देवराज इंद्र त्यांच्या मुखाकडेच दृष्टि देऊन बसल्याचें नारदांनीं अवलोकन केलें ३१; त्या श्रेष्ठ ऋषीनें इंद्राला अवलोकन करितांक्षणीं इंद्र उठला आणि आपलें आसन त्यानें नारदांना दिलें ३२. तो इंद्र उठल्याचें पाहून अप्सरांनीं त्या देवर्षीला प्रणाम केला; आणि विनयानें नम्र होऊन त्या उभ्या राहिल्या ३३. त्यांनीं मान दिल्यानंतर व इंद्र बसल्यानंतर योग्यतेप्रमाणें प्रश्नोत्तरें झाल्यावर ते नारदमुनि मनोहर कथा सांगूं लागले असतां ३४ इंद्र मध्यंतरीं त्या महर्षींना ह्मणाला "आपण आज्ञा करा, ह्मणजे रंभा, कर्कशा, उर्वशी, तिलोत्तमा, घृताची व मेनका ह्यांपैकीं आपणाला

वाथ उर्वश्यथ तिलोत्तमा। घृताची मेनका वापि यत्र वा भवतो रुचिः ३६ एतच्छ्रुत्वा द्विजश्रेष्ठो वाचं शक्रस्य नारदः। विचिन्त्याप्सरसः प्राह विनयावनताः स्थिताः ३७ युष्माकमिह सर्वासां रूपौदार्यगुणाधिकाम्। आत्मानं मन्यते या तु सा नृत्यतु ममाग्रतः ३८ गुणरूपविहीनायाः सिद्धिर्नाट्यस्य नास्ति वै। चारुविन्यासवन्नृत्यं नृत्यमन्यद्विडम्बनम् ३९. मार्कण्डेय उवाच॥ तद्वाक्यसमकालं च एकैकास्ता नतास्ततः। अहं गुणाधिका न त्वं न त्वं चान्याब्रवीदिदम् ४० तासां संभ्रममालोक्य भगवान्पाकशासनः। पृच्छ्यतां मुनिरित्याह वक्ता यां वो गुणाधिकाम् ४१ शक्रच्छन्दानुयाताभिः पृष्टस्ताभिः स नारदः। प्रोवाच यत्तदा वाक्यं जैमिने तन्निबोध मे ४२ तपस्यन्तं नगेन्द्रस्थं या वः क्षोभयते बलात्। दुर्वाससं मुनिश्रेष्ठं तां वो मन्ये गुणाधिकाम् ४३ मार्कण्डेय उवाच। तस्य तद्वचनं श्रुत्वा सर्वा वेपितकन्धराः। अशक्यमेतदस्माकमिति ताश्चक्रिरे कथाः ४४ तत्राप्सरा वपुर्नाम मुनिक्षोभणगर्विता। प्रत्युवाचागमिष्यामि यत्रासौ संस्थितो मुनिः ४५ अद्य तं देहयन्तारं प्रयुक्तेन्द्रियवाजिनम्। स्मरशस्त्रगलद्रश्मिं करिष्यामि कुसारथिम् ४६ ब्रह्मा जनार्दनो वापि यदि वा नीललोहितः। तमप्यद्य करिष्यामि कामबाणक्षतान्तरम् ४७ इत्युक्त्वा प्रजगामाथ प्रालेयाद्रिं वपुस्तदा। मुनेस्तपःप्रभावेण प्रशान्तश्वापदाश्रमम् ४८ सा पुंस्कोकिलमाधुर्या यत्रास्ते स महामुनिः।

---

जी अभिमत असेल ती नृत्य करील " ३५,३६. हें इंद्राचें भाषण ऐकून व विचार करून, विनयानें नम्र होऊन उभ्या असलेल्या अप्सरांना द्विजश्रेष्ठ ह्मणाले ३७ " तुह्मां सर्वांमध्यें रूप व गुण ह्यांत जी स्वतःला अधिक समजत असेल तिनें माझ्या पुढें नृत्य करावें ३८. कारण, गुणहीन व रूपहीन स्त्रीच्या नृत्याचें फल नाहीं. मनोहर स्त्रीचेंच नृत्य खरें नृत्य असून इतर नृत्य हें विडंबन होय " ३९. मार्कंडेय ह्मणतातः—नारदाच्या मुखांतून हे शब्द निघाले नाहींत तोंच नम्र झालेल्या अप्सरांपैकीं प्रत्येकजण मी गुणांनीं अधिक आहें, तूं नाहींस, असें एकीमेकीला ह्मणूं लागली ४०. हा त्यांचा गोंधळ पाहून भगवान् इंद्र त्यांना ह्मणाला " नारदमुनींना विचारा, ह्मणजे *तुह्मांमध्यें गुणांनीं अधिक कोण हें ते सांगतील* " ४१. इंद्राच्या इच्छेप्रमाणें वागणाऱ्या त्या अप्सरांनीं प्रश्न केल्यावर हे जैमिने, नारदांनीं जें सांगितलें तें ऐक ४२. नारद ह्मणाले " पर्वतावर तपश्चर्या करीत बसलेल्या मुनिश्रेष्ठ दुर्वासाला जी आपल्या सामर्थ्यानें क्षोभ उत्पन्न करील ती मी तुमच्यांत गुणांनीं अधिक समजेन " ४३. मार्कंडेय ह्मणतातः—तें *त्यांचें भाषण* ऐकून सर्व अप्सरांनीं माना हालविल्या आणि हें आह्मांला अशक्य आहे असें त्या ह्मणाल्या ४४. परंतु, मुनींना क्षोभ उत्पन्न करण्यासंबंधानें गर्व वाहणारी एक वपुनामक अप्सरा ह्मणाली "*त्या मुनीकडे मी* जातें ४५. देहरूप सारथ्यानें आणि इंद्रियरूप अश्वांनीं युक्त असलेल्या त्या मुनिरूप रथाला मी, स्मररूप शस्त्रानें रश्मि तोडून, कुंठित करीन ४६. ब्रह्मा, विष्णु अथवा महेश्वर जरी असला तरी कामबाणांनीं मी त्याच्या मनाला आज जखम करीन", ४७. असें बोलून ती वपु, मुनीच्या तपःसाम-

क्रोशमात्रं स्थिता तस्मादगायत वराप्सराः ४९ तद्गीतध्वनिमाकर्ण्य मुनिर्विस्मितमानसः । जगाम तत्र यत्रास्ते सा बाला रुचिरानना ५० तां दृष्ट्वा चारुसर्वाङ्गीं मुनिः संस्तभ्य मानसम् । क्षोभणायागतां ज्ञात्वा कोपामर्षसमन्वितः ५१ उवाचेदं ततो वाक्यं महर्षिस्तां महातपाः ५२ यस्माद्दुःखार्जितस्येह तपसो विघ्नकारणात् । आगतासि मदोन्मत्ते मम दुःखाय खेचरि ५३ तस्मात्सुपर्णगोत्रे त्वं मत्कोपकलुषीकृता । जन्म प्राप्स्यसि दुष्प्रज्ञे यावद्वर्षाणि षोडश ५४ निजरूपं परित्यज्य पक्षिणी रूपधारिणी । चत्वारस्ते च तनया जनिष्यन्तेऽधमाप्सरः ५५ अप्राप्य तेषु च प्रीतिं शस्त्रपूता पुनर्दिवि । वासमाप्स्यसि वक्तव्यं नोत्तरं ते कथंचन ५६ इति वचनमसह्यं कोपसंरक्तदृष्टिश्चलकटकवलयां तां मानिनीं भावयित्वा । तरलतरतरङ्गां गां परित्यज्य विप्रः प्रथितगुणगणौघां संप्रयातः खगङ्गाम् ५७ इति मार्कण्डेयपुराणे वपुशापकथनं नाम प्रथमोऽध्यायः ॥ १ ॥

मार्कण्डेय उवाच ॥ अरिष्टनेमिपुत्रोऽभूद्गरुडो नाम पक्षिराट् । गरुडस्याभवत्पुत्रः संपातिरिति विश्रुतः १ तस्याप्यासीत्सुतः शूरः सुपार्श्वो वायुविक्रमः । सुपार्श्वतनयः कुन्तिः कुन्तिपुत्रः प्रलोलुपः २ तस्यापि तनयावास्तां कङ्कः कन्धर एव च ३ कङ्कः कैलासशिखरे विद्युद्रूपेति

---

ध्यानें ज्यावरील आश्रमांतील श्वापदें शांत झालेलीं आहेत अशा प्रालेयपर्वतावर गेली ४८ आणि कोकिलपक्ष्याप्रमाणें जिचा ध्वनि मधुर आहे अशी ती श्रेष्ठ अप्सरा त्या महर्षीपासून एका कोसावर उभी राहून गायन करूं लागली असतां ४९, तिच्या गायनाचा स्वर ऐकून मुनि मनामध्यें विस्मित झाले आणि ती सुमुखी बाला जिकडे होती तिकडे गेले ५०. त्या सर्वांगसुंदरीला पाहून मुनींनीं मनाचें संयमन केलें आणि क्षोभ उत्पन्न करण्याकरितां ती आल्याचें जाणून क्रुद्ध झालेले ५१ ते महातपस्वी महर्षि ह्मणाले ५२ "हे मदोन्मत्त अप्सरे, ज्याअर्थीं कष्टानें संपादन केलेल्या तपाला विघ्न आणून मला दुःख देण्याकरितां तूं आली आहेस ५३ त्याअर्थीं, हे मूढे, माझ्या क्रोधानें ग्रस्त झालेली तूं सोळा वर्षेंपर्यंत गरुडकुलामध्यें जन्मास येशील ५४. सारांश, स्वतः-च्या रूपाचा त्याग करून तूं प्रत्यक्ष पक्षिणी होशील आणि, हे अधम अप्सरे, तुला चार पुत्र होतील ५५. परंतु, त्यांच्या ठिकाणीं तुझें प्रेम उत्पन्न न होतां तूं शस्त्रानें वध पावून पुनरपि स्वर्गांत वास्तव्य करशील. ह्या माझ्या भाषणावर तूं कांहींएक उत्तर देऊं नको ५६. कोपानें नेत्र ज्यांचे लाल झालेले आहेत असे ते दुर्वासमुनि, (कांपरें भरल्यामुळें) जिचीं हस्तभूषणें हालूं व वाजूं लागलीं आहेत अशा त्या गर्विष्ठ अप्स-रेला ह्याप्रमाणें असह्य भाषण करून व भूमीचा त्याग करून अति चंचल लाटांनीं आणि प्रसिद्ध गुणसमुदायांनीं युक्त असलेल्या आकाशगंगेप्रत गेले ५७. ह्याप्रमाणें मार्कंडेयपुराणांतील वपुशापकथननामक पहिला अध्याय समाप्त झाला ॥ १ ॥

मार्कंडेय ह्मणतातः—पक्षिराज गरुड अरिष्टनेमीचा पुत्र असून संपाती १ हा त्याचा पुत्र होय. त्याचा पुत्र शूर व वायुतुल्य पराक्रमी सुपार्श्व, सुपार्श्वाचा पुत्र कुंति, कुंतीचा पुत्र प्रलोलुप २ आणि कंक व कंधर हे दोन त्या प्रलोलुपाचे पुत्र ३. कैलास-

विद्युतम् । ददर्शाम्बुजपत्राक्षं राक्षसं धनदानुगम् ४ आपानासक्तममलस्रग्दामाम्बरधारिणम् । भार्यासहायमासीनं शिलापट्टेऽमले शुभे ५ तद्दृष्टमात्रं कङ्केन रक्षः कोपसमन्वितः । प्रोवाच कस्मादायातस्त्वमितोऽण्डजाधम ६ स्त्रीसंनिकर्षे तिष्ठन्तं कस्मान्मामुपसर्पसि । नैष धर्मः सुबुद्धीनां मिथो निष्पाद्यवस्तुषु ७ कङ्क उवाच ॥ साधारणोऽयं शैलेन्द्रो यथा तव तथा मम । अन्येषां चैव जन्तूनां ममता भवतोऽत्र का । मार्कण्डेय उवाच ८ ब्रुवाणमित्थं खड्गेन कङ्कं चिच्छेद राक्षसः । क्षरत्क्षतजबीभत्सं विस्फुरन्तमचेतनम् ९ कङ्कं विनिहतं श्रुत्वा कन्धरः क्रोधमूर्च्छितः । विद्युद्रूपवधायाशु मनश्चक्रेऽण्डजेश्वरः १० स गत्वा शैलशिखरं कङ्को यत्र हतः स्थितः । तस्य संकलनं चक्रे भ्रातुर्ज्येष्ठस्य खेचरः । कोपामर्षविवृत्ताक्षो नागेन्द्र इव निःश्वसन् ११ जगामाथ स यत्रास्ते भ्रातृहा तस्य राक्षसः । पक्षवातेन महता चालयन्भूधरान्वरान् १२ वेगात्पयोदजालानि विक्षिपन्क्षतजेक्षणः । क्षणात्क्षयितशत्रुः स पक्षाभ्यां क्रान्तभूधरः १३ पानासक्तमतिं तत्र तं ददर्श निशाचरम् । आताम्रवक्त्रनयनं हेमपर्यङ्कमाश्रितम् १४ स्रग्दामापूरितशिरं हरिचन्दनभूषितम् । केतकीपत्रगर्भाभैर्दन्तैर्घोरतराननम् १५ वामोरुमाश्रितां चास्य ददर्शायतलोचनाम् । पत्नीं मदनिकां नाम पुंस्कोकिलकल-

---

पर्वताच्या शिखरावर विद्युद्रूप ह्मणून प्रसिद्ध असलेला एक कमलनयन कुबेरसेवक राक्षस कंकाच्या दृष्टीं पडला ४. तो उज्ज्वल माला व वस्त्रें धारण करून भार्येसह एका निर्मल व शुभ शिळेवर मद्यपान करीत बसला होता ५. कंकानें राक्षसाला पहातांक्षणीं राक्षस क्रुद्ध होऊन त्याला ह्मणाला "हे अधमपक्ष्या, तूं येथें कां? ६. अरे, स्त्रीसंनिध असलेल्या माझ्याजवळ तूं कां येत आहेस? एकांतांत गोष्टी चालल्या असतांना तेथें जाणें हा विचारी लोकांचा धर्म नव्हे" ७. कंक ह्मणतो:--ह्या पर्वतावर तुझा, माझा व इतर प्राण्यांचा हक्क सारखाच असतांना तुझीच येथें मालकी कशावरून? ८. मार्कंडेय ह्मणतात:— ह्याप्रमाणें बोलत असलेल्या त्या कंकाला खड्गाच्या योगानें त्या राक्षसानें तोडिलें. तेव्हां त्याच्या शरीरांतून भयंकर रक्त वाहूं लागलें व तो तडफडत मेला ९. परंतु, कंक मारला गेल्याचें ऐकून पक्षिराज कंधर क्रुद्ध झाला आणि विद्युद्रूपाला मारण्याचें त्यानें मनांत आणिलें १०. नंतर पर्वतशिखरावर जेथें कंक मरून पडला होता तेथें तो गेला आणि त्यानें त्या ज्येष्ठ भ्रात्याचा देह एकत्र करून त्याचें और्ध्वदेहिक केलें; क्रोधानें त्याचे डोळे फिरून गेले ११; त्याच्या भ्रात्याला मारणारा राक्षस जिकडे होता तिकडे तो निघाला; पंखांच्या प्रचंड वायूनें तो मोठेमोठे वृक्ष कंपित करूं लागला १२. वेगाच्या योगानें तो मेघसमुदायही इकडे तिकडे ढकलूं लागला; एकाक्षणामध्यें शत्रूचा वध करणारा तो पक्षी पंखांच्या योगानें पर्वत ओलांडून गेला १३; आणि तेथें मद्यपान करीत बसलेला तो राक्षस त्यानें अवलोकन केला. त्याचें मुख व नेत्र आरक्तवर्ण असून सुवर्णमंचकावर तो बसलेला होता १४. त्याची शिखा पुष्पांच्या गजऱ्यांनीं भरून गेलेली होती; चंदनानें तो भूषित झालेला होता; आणि केवड्याच्या पानांच्या अंतर्भागाप्रमाणें असलेल्या दातांनीं त्याची

स्वनाम् १६ ततो रोषपरीतात्मा कन्धरः कन्दरस्थितम् । तमुवाच सुदुष्टात्मन्नेहि युध्यस्व वै मया १७ यस्माज्ज्येष्ठो मम भ्राता विश्वस्तो घातितस्त्वया । तस्मात्त्वां मत्सकाशं नयिष्ये यमसादनम् १८ विश्वस्तघातिनां लोका ये च स्त्रीबालघातिनाम् । यास्यसे निरयान्सर्वांस्त्वमत्र मया हतः १९ मार्कण्डेय उवाच ॥ इत्येवं पतगेन्द्रेण प्रोक्तं स्त्रीसंनिधौ तदा । रक्षः क्रोधसमाविष्टं प्रत्युवाच पक्षिणम् २० यदि ते निहतो भ्राता पौरुषं तद्धि दर्शितम् । त्वामप्यद्य हनिष्येऽहं खड्गेनानेन खेचर २१ तिष्ठ क्षणं नात्र जीवन्पतगाधम यास्यसि । इत्युक्त्वाञ्जनपुञ्जाभं विमलं खड्गमाददे २२ ततः पतगराजस्य यथाविषभटस्य च । समत्र युद्धमतुलं यथा गरुडशक्रयोः २३ ततः स राक्षसः क्रोधात्खड्गमाविध्य वेगवत् । चिक्षेप पतगेन्द्राय निर्वाणाङ्गारवर्चसम् २४ पतगेन्द्रश्च तं खड्गं किंचिद्दुत्प्लुत्य भूतलात् । वक्त्रेण जग्राह तदा गरुडः पन्नगं यथा २५ वक्त्रपादतलैर्भङ्क्त्वा चक्रे क्षोभमथाण्डजः । तस्मिन्भग्ने ततः खड्गे बाहुयुद्धमवर्तत २६ ततः पतगराजेन वक्षस्याक्रम्य राक्षसः । हस्तपादकरैराशु शिरसा च वियोजितः २७ तस्मिन्विनिहते सा स्त्री खगं शरणमभ्यगात् । किंचित्संजातसंत्रासा प्राह भार्या भवामि ते २८ तामादाय खगश्रेष्ठः स्वकं गृहमगात्पुनः । गत्वा स निष्कृतिं भ्रातुर्विद्युद्रूपनि-

---

मुद्रा फारच भयंकर दिसत होती १५. नंतर कोकिळपक्ष्याप्रमाणें मंजुळ शब्द करणारी व दीर्घ नेत्रांनीं युक्त असलेली त्याची मदनिकानामक पत्नी त्याच्या वामांकावर बसलेली त्यानें अवलोकन केली १६. तेव्हां कंधर अतिशय क्रुद्ध झाला आणि गुहेंत बसलेल्या त्या राक्षसाला ह्मणाला " हे दुरात्म्या, चल, माझ्याशीं युद्ध कर १७. ज्याअर्थी तूं माझा ज्येष्ठ भ्राता विश्वस्त असतांना मारिला आहेस त्याअर्थी मत्त झालेल्या तुला मी यमसदनीं पोंचवितों १८. माझ्या हातून तुझा वध झाला ह्मणजे तूं, विश्वासघातकी, स्त्रीघातकी व बालघातकी ह्यांना प्राप्त होणाऱ्या प्रत्येक नरकामध्यें वास्तव्य करशील १९. मार्कंडेय ह्मणतात:—ह्याप्रमाणें पक्षिराजानें स्त्रीसंनिध भाषण केलें असतां राक्षस क्रुद्ध होऊन त्याला ह्मणाला २० "हे पक्ष्या, तुझा भ्राता मारण्यांत मीं पराक्रम दर्शविला आहे आणि तुझाही आज ह्या खड्गानें वध मी करणार आहें २१. हे वा अमपक्ष्या, क्षणभर थांब, तूं येथून जिवंत जाणार नाहींस." असें बोलून त्यानें काजळराशीप्रमाणें कृष्णवर्ण असलेला निर्मल खड्ग हातांत घेतला २२ व नंतर इंद्रगरुडांप्रमाणें पक्षिराज व राक्षसराज ह्यांमध्यें अतुल युद्ध सुरू झालें २३. तदनंतर त्या राक्षसानें क्रोधानें खड्ग गरगर फिरविला व कोळशाप्रमाणें काळा असलेला तो भारला खड्ग त्यानें त्या पक्ष्यावर वेगानें टाकिला २४. परंतु, भूत लावरून किंचित् उड्डाण करून पक्षिराजानें तो खड्ग भुजंग धारण करणाऱ्या गरुडाप्रमाणें तोंडांत धरिला २५; चोंचीनें व पायांनीं त्याचे तुकडे करून तो पक्षी क्षुब्ध झाला आणि ह्याप्रमाणें तो खड्ग भग्न झाल्यावर बाहुयुद्ध सुरू झालें २६. तेव्हां पक्षिराज राक्षसाच्या छातीवर बसला आणि मस्तकासह त्यानें त्याचे हातपाय तोडिले २७. ह्याप्रमाणें त्या राक्षसाचा वध झाल्यावर त्याची ती स्त्री पक्ष्याला शरण गेली आणि किंचित् भयभीत

सह्यः । धातुर्विधातुस्त्वथ वैश्वदेविकाः श्रुतिप्रयुक्ता विविधास्तु सत्क्रियाः ६६ ॥ १२३ ॥
इति मार्कण्डेयपुराणे चटकोत्पत्तिकथनं नाम द्वितीयोऽध्यायः ॥ २ ॥

मार्कण्डेय उवाच ॥ अहन्यहनि विप्रेन्द्र स तेषां मुनिसत्तमः । चकाराहारपयसा तथा गुप्त्या च पोषणम् १ मासमात्रेण जग्मुस्ते भानोः स्यन्दनवर्त्मनि । कौतूहलविलोलाक्षैर्दृष्टा मुनिकुमारकैः २ दृष्ट्वा महीं सनगरां साम्भोनिधिसरिद्वराम् । रथचक्रप्रमाणां ते पुनराश्रममागताः ३ श्रमक्रान्तान्तरात्मानो महात्मानो वियोनिजाः । ज्ञानं च प्रकटीभूतं तत्र तेषां प्रभावतः ४ ऋषेः शिष्यानुकम्पार्थं वदतो धर्मनिश्चयम् । कृत्वा प्रदक्षिणं सर्वे चरणावभ्यवादयन् ५ ऊचुश्च मरणाद्घोरान्मोक्षिताः स्मस्त्वया मुने । आवासभक्ष्यपयसां त्वं नो दाता पिता गुरुः ६ गर्भस्थानां मृता माता पित्रा नैवापि पालिताः । त्वया नो जीवितं दत्तं शिशवो येन रक्षिताः ७ क्षितावक्षततेजास्त्वं कृमीणामिव शुष्यताम् । गजघण्टां समुत्पाट्य कृतवान्दुःखरेचनम् ८ कथं वर्द्धेयुरबलाः स्वस्थान्द्रक्ष्याम्यहं कदा । कदा भूमेर्द्रुमं प्राप्तान्द्रक्ष्ये वृक्षान्तरं गतान् ९ कदा मे सहजा कान्तिः पांसुना नाशमेष्यति । एषां पक्षानिलोत्थेन मत्समीपविचारिणाम् १० इति

ह्यांना उद्देशून नानाप्रकारच्या कर्में केलीं ६६. ( १२३ ) ह्याप्रमाणें मार्कंडेयपुराणांतील चटकोत्पत्तिकथननामक दुसरा अध्याय समाप्त झाला ॥ २ ॥

मार्कंडेय ह्मणतातः— हे विप्रश्रेष्ठ, त्या मुनिश्रेष्ठ शमीकांनीं त्या पिलांना दूध पाजून त्यांचें पालन पोषण केलें. १ एक महिना झाल्यानंतर ते आकाशामध्यें उड्डाण करूं लागले असतां विस्मयचकित दृष्टीनें मुनिकुमार त्यांच्याकडे पाहूं लागले २; नगरें, समुद्र व महानद्या ह्यांनीं युक्त असलेली जी पृथ्वी ती रथचक्राएवढी दिसूं लागल्यानंतर ते महात्मे पक्षी थकून आल्यामुळें पुनरपि आश्रमांत येऊं लागले व त्या ठिकाणीं त्यांना स्वप्रभावामुळेंच ज्ञान प्रकट होऊं लागलें ३,४. एकदा शिष्यांवर दया करण्याकरितां शमीकऋषि धर्मनिर्णय सांगूं लागले असतां ते सर्वही पक्षी प्रदक्षिणापूर्वक त्यांच्या चरणाला वंदन करून त्यांना ५ ह्मणाले " हे मुने, घोर मरणापासून आपण आह्मांला मुक्त केलें आहे आणि वसतिस्थान, भक्ष्य व दूध देणारे तुह्मी असल्यामुळें आमचे पिते व गुरु आपणच आहां ६. आह्मी गर्भाशयामध्यें असतांनाच माता मेली व पित्यानेंही आमचें पालन केलें नाहीं; परंतु, बाल्यपणीं आपण आमचें रक्षण केल्यामुळें आह्मांला जीवदानच आपण दिलें आहे ७. कारण, हे महातेजस्वी मुने, भूमीवर आह्मी कृमीप्रमाणें झुरत असतांना गजघंटा उपटून आपण आमच्या दुःखाचें निरसन केलें आहे ८. " हे बलहीन पक्षी कसे मोठे होतील, मी ह्यांना आकाशांत उडतांना केव्हां पाहीन, भूमीवरून झाडावर व ह्या झाडावरून त्या झाडावर गेलेले हे मला केव्हां दिसतील ? ९ आणि माझ्या समीप संचार करणाऱ्या ह्यांच्या पक्षवायूनें धूळ उडून मी मलीन केव्हां होईन " १०.

चिन्तयता तात भवता प्रतिपालिताः । ते सांप्रतं प्रबुद्धाः स्मः प्रबुद्धाः करवाम किम् ११ इत्युषिर्वचनं तेषां श्रुत्वा संस्कारवत्स्फुटम् । शिष्यैः परिवृतः सर्वैः सह पुत्रेण शृङ्गिणा १२ कौतूहलपरो भूत्वा रोमाञ्चपटसंवृतः । उवाच तत्वतो ब्रूत प्रवृत्तेः कारणं गिरः १३ कस्य शापादियं प्राप्ता भवद्भिर्विक्रिया परा । रूपस्य वचसश्चैव तन्मे वक्तुमिहार्हथ १४ पक्षिण ऊचुः॥ विपुलस्वानिति ख्यातः प्रागासीन्मुनिसत्तमः। तस्य पुत्रद्वयं जज्ञे सुकृषस्तुम्बुरुस्तथा १५ सुकृषस्य वयं पुत्राश्चत्वारः संयतात्मनः । तस्यर्षेर्विनयाचारभक्तिनम्राः सदैव हि १६ तपश्चरणशक्तस्य शास्यमानेन्द्रियस्य च । यथाभिमतमस्माभिस्तदा तस्योपपादितम् १७ समित्पुष्पादिकं सर्वं यच्चैवाभ्यवहारिकम् । एवं तत्राथ वसतां तस्यास्माकं च कानने १८ आजगाम महावर्ष्मा भग्नपक्षो जरान्वितः। आताम्रनेत्रः स्रस्तात्मा पक्षी भूत्वा सुरेश्वरः १९ सत्यशौचक्षमाचारमतीवोदारमानसम् । जिज्ञासुस्तमृषिश्रेष्ठमस्मच्छापभवाय च २० पक्ष्युवाच ॥ द्विजेन्द्र मां क्षुधाविष्टं परित्रातुमिहार्हसि । भक्षणार्थी महाभाग गतिर्भव ममातुला २१ विन्ध्यस्य शिखरे तिष्ठन्पक्षिपत्रैरितेन वै । पतितोऽस्मि महाभाग श्वसनेनातिरंहसा २२ सोऽहं मोहसमाविष्टो

असे चिंतन करीत करीत, हे तात, आपण ज्यांचें रक्षण केलें ते आम्ही सांप्रत वाटलों ?.सून आम्हांला समजूं लागलें आहे; तस्मात्, आतां आम्ही काय करावें ? " ११. हें त्यांचें सुसंस्कृत व स्पष्ट भाषण ऐकून शृंगिसंज्ञक पुत्र व सर्व शिष्य ह्यांनीं युक्त असलेल्या त्या ऋषींना १२ विस्मय होऊन त्यांच्या शरीरावर रोमांच उठले आणि ते ह्मणाले " वाणी प्राप्त होण्याचें खरें कारण सांगा १३. रूप आणि भाषण ह्यांमध्यें असलेला हा अत्यंत विरोध कोणाच्या शापामुळें प्राप्त झाला आहे हें तुह्मी मला सांगा " १४. पक्षी ह्मणतातः— पूर्वी विपुलस्वान् ह्मणून विख्यात असलेले एक श्रेष्ठ मुनि होते; त्यांना सुकृष व तुंबुरु असे दोन पुत्र झाले १५. त्या जितेंद्रिय सुकृष मुनींचे आम्ही चार पुत्र. आम्ही विनय, आचार व भक्ति ह्यांच्या योगानें त्यांच्यांशीं सर्वदां नम्रपणानें वागत होतों १६. तपश्चर्या करण्याविषयीं समर्थ आणि इंद्रियांचें संयमन करणाऱ्या त्या ऋषीकडे आम्ही समिधा, पुष्पें इत्यादिक आणि भोजनसंबंधी सर्व वस्तु इच्छेप्रमाणें आणीत होतों. ह्याप्रमाणें ते व आम्ही तेथें वनांत रहात असतांना १७, १८ पक्ष भग्न झालेल्या, वृद्ध, धिप्पाड, आरक्तवर्ण नेत्रांनीं युक्त व थकलेल्या पक्ष्याचें रूप घेऊन इंद्र–१९ सत्य, शौच, क्षमा, आचार व अत्यंत उदार बुद्धि ह्यांनीं युक्त असलेल्या त्या श्रेष्ठ ऋषीची परीक्षा करण्याकरितां आणि आह्मांला शाप होण्याकरितां–तेथें आला २०. पक्षी ह्मणतोः— हे द्विजश्रेष्ठ, हे महाभाग, मज क्षुधिताचें तूं रक्षण कर. मी अन्नार्थी आहें; तूं माझा अतुल आश्रय हो २१. हे महाभाग, विन्ध्याचलाच्या शिखरावर असतांना पक्ष्यांच्या पंखांनीं सुटलेल्या अतिवेगवान् वायूनें

भूमौ, सप्ताहमस्मृतिः । स्थितस्तथाष्टमेनाह्ना चेतनां प्राप्तवानहम् २३ प्राप्तचेताः क्षुधाविष्टो भवन्तं शरणं गतः । भक्ष्यार्थी विगतानन्दो दूयमानेन चेतसा २४ तत्कुरुष्वामलमते मत्त्राणायाचलां मतिम् । प्रयच्छ भक्ष्यं विप्रर्षे प्राणयात्राक्षमं मम २५ स एवमुक्तः प्रोवाच तमिन्द्रं पक्षिरूपिणम् । प्राणसन्धारणार्थाय दास्ये भक्ष्यं तवेप्सितम् २६ इत्युक्त्वा पुनरप्येनमपृच्छत्स द्विजोत्तमः । आहारः कस्तवार्थाय उपकल्प्यो भवेन्मया । स चाह नरमांसेन तृप्तिर्भवति मे परा २७ ऋषिरुवाच ॥ कौमारं ते व्यतिक्रान्तमतीतं यौवनं च ते । वयसः परिणामस्ते वर्तते नूनमण्डज २८ यस्मिन्नराणां सर्वेषामशेषेच्छा निवर्तते । स कस्माद्वृद्धभावेऽपि सुनृशंसात्मको भवान् २९ क्व मानुषस्य पिशितं क्व वयश्चरमं तव । सर्वथा दुष्टभावानां प्रशमो नोपपद्यते ३० अथ वा किं ममैतेन प्रोक्तेनास्ति प्रयोजनम् । प्रतिश्रुत्य सदा देयमिति नो भावितं मनः ३१ इत्युक्त्वा तं स विप्रेन्द्रस्तथेति कृतनिश्चयः । शीघ्रमस्मान्समाहूय गुणतोऽभिप्रशस्य च ३२ उवाच क्षुब्धहृदयो मुनिर्वाक्यं सुनिष्ठुरम् । विनयावनतान्सर्वान्भक्तियुक्तान्कृताञ्जलीन् ३३ कृतात्मानो द्विजश्रेष्ठ ऋणैर्युक्ता मया सह । जातं श्रेष्ठमपत्यं

---

मी खालीं पडलों २२. सात दिवस मूर्च्छित व स्मृतिहीन बनून मी भूमीवर पडलों असतां आठव्या दिवशीं शुद्धीवर आलों २३ आणि शुद्धीवर येऊन क्षुधाक्रांत झाल्यामुळें मी आनंदरहित अनाथी पक्षी मनामध्यें दुःखित होऊन तुला शरण आलों आहें २४. ह्यास्तव, हे निर्मल मतीनें युक्त विप्रर्षे, माझ्या रक्षणाविषयीं पक्का निश्चय करून माझा जीव जगण्यास योग्य असें भक्ष्य तूं मला दे २५. ह्यावर तो ऋषि त्या पक्षिरूप इंद्राला ह्मणाला " प्राणरक्षणाकरितां मी तुला हवें असेल तें भक्ष्य देईन " २६. इतकें बोलून त्या द्विजश्रेष्ठानें पुनरपि त्याला " तुझ्याकरितां मी कोणत्या आहाराची तयारी केली पाहिजे ? " असें विचारिलें असतां " नरमांसानें माझी उत्कृष्ट तृप्ति होते " असें त्यानें उत्तर दिलें २७. ऋषि ह्मणतोः—हे पक्ष्या, कुमारावस्था व यौवन संपून खरोखर तूं अतां वृद्धावस्थेंत आहेस २८. ह्या अवस्थेंत सर्वही नरांची सर्व इच्छा निवृत्त होत असतांना वृद्धावस्थेंतही तुझें मन दुष्ट कसें राहिलें ? २९. अरे, नरमांस कोणीकडे व तुझें शेवटचें वय कोणीकडे ? तात्पर्य, दुरात्म्याचे ठिकाणीं शांति मुळींच संभवनीय नसते ३०. अथवा मीं हें बोलण्याचें कारण काय ? कबूल केल्यावर केव्हांही दिलेंच पाहिजे; हा आमच्या मनाचा निश्चय आहे ३१. इतकें बोलून त्या विप्रश्रेष्ठानें ' ठीक आहे ' ह्मणून निश्चय केला आणि आह्मांला सत्वर बोलावून व आमच्या गुणांची प्रशंसा करून ३२ अंतःकरणामध्यें क्षुब्ध झालेला तो मुनि आह्मी सर्वही हात जोडून भक्तिपूर्वक विनयानें नम्र होऊन राहिलों असतां अति निष्ठुर भाषण आमच्याशीं करूं लागला ३३. ( तो ह्मणाला ) हे जितेंद्रिय द्विजश्रेष्ठहो, तुह्मी माझ्यासह ऋणांतून मुक्त झाला आहां; कारण, हे द्विजहो,

यो यूयं मम यथा द्विजाः ३४ गुरुः पूज्यो यदि मतो भवतां परमः पिता । ततः कुरुत मे वाक्यं निर्व्यलीकेन चेतसा ३५ तद्वाक्यसमकालं च प्रोक्तमस्माभिरादृतैः । यद्वक्ष्यति भवांस्तद्वै कृतमेवावधार्यताम् ३६ ऋषिरुवाच ॥ मामेव शरणं प्राप्तो विहङ्गः क्षुत्तृषान्वितः । युष्मन्मांसेन येनास्य क्षणं तृप्तिर्भवेत वै ३७ तृष्णाक्षयश्च रक्तेन तथा शीघ्रं विधीयताम् । ततो वयं प्रव्यथिताः प्रकम्पोद्भूतसाध्वसाः । कष्टं कष्टमिति प्रोच्य नैतत्कर्मेति चाब्रुवन् ३८ कथं परशरीरस्य हेतोर्देहं स्वकं बुधः । विनाशयेद्घातयेद्वा यथा ह्यात्मा तथा सुतः ३९ पितृदेवमनुष्याणां यान्युक्तानि ऋणानि वै । तान्यपाकुरुते पुत्रो न शरीरप्रदः सुतः ४० तस्मान्नैतत्करिष्यामो नो चीर्णं यत्पुरातनैः । जीवन्भद्राण्यवाप्नोति जीवन्पुण्यं करोति च ४१ मृतस्य देहनाशश्च धर्माद्युपरतिस्तथा । आत्मानं सर्वतो रक्ष्यमाहुर्धर्मविदो जनाः ४२ इत्थं श्रुत्वा वचोऽस्माकं मुनिः क्रोधादिव ज्वलन् । प्रोवाच पुनरप्यस्मान्निर्दहन्निव लोचनैः ४३ प्रतिज्ञातं वचो मह्यं यस्मान्नैतत्करिष्यथ । तस्मान्मच्छापनिर्दग्धास्तिर्यग्योनौ प्रयास्यथ ४४ एवमुक्त्वा तदा सोऽस्मांस्तं विहङ्गमभ्यभाषत । अन्त्येष्टिमात्मनः कृत्वा शास्त्रतश्चौर्ध्वदैहिकम् ४५ भक्षयस्व

---

तुह्मी जसे मला अपत्य आहात तसें तुह्मांलाही श्रेष्ठ अपत्य प्राप्त झालें आहे ३४. ह्यास्तव, तुह्मांला पिता व श्रेष्ठ गुरु जर पूज्य असेल तर शुद्धमनानें तुह्मी माझें ह्मणणें शेवटास न्या " ३५. हे शब्द त्याच्या मुखांतून निघाले नाहींत तोंच आह्मी " जें आपण सांगाल तें सिद्धीस गेलें ह्मणूनच समजा " असें आदरपूर्वक उत्तर दिलें ३६. ऋषि ह्मणाला:—क्षुधाक्रांत व तृषाक्रांत झालेला हा पक्षी मला शरण आला आहे, आणि तुमच्या मांसानें क्षणभर ह्याला तृप्ति होणार असून ३७ तुमच्या रक्तानें ह्याची तहानही भागणार आहे. ह्यास्तव, तशी व्यवस्था सत्वर करा. हें ऐकून आह्मी दुःखित झालों, कांपरें भरून आह्मांला भय उत्पन्न झालें आणि अरेरे ! असे उद्गार काढून आह्मी ह्मणालों " हें कर्म योग्य नव्हे ३८. अहो, दुसऱ्याच्या शरीराकरितां प्राज्ञ पुरुष स्वकीय देहाचा कसा बरें नाश करील अथवा करवील ! जसा आत्मा तसाच पुत्र होय ३९. पितर, देव व मानव ह्यांच्या ऋणांचें निरसन करणें हें पुत्राचें कर्तव्य होय. दुसऱ्याकरितां स्वतःचें शरीर देणें हें पुत्राचें कर्तव्य नव्हे ४०. तस्मात् प्राचीन लोकांनीं न केलेलें हें कृत्य आह्मी करणार नाहीं. प्राणी जिवंत राहिल्यास चांगले दिवस पाहतो व पुण्यकर्मेंही त्याच्या हातून घडण्याचा संभव असतो ४१; परंतु, मृताच्या देहाचाच नाश होत असल्यामुळें धर्मादिकांचीही समाप्तिच होत असते. शिवाय सर्व प्रकारें आत्म्याचें रक्षण करावें, असें धर्मवेत्त्या लोकांचें ह्मणणेंही आहे " ४२. असें आमचें भाषण ऐकून मुनि क्रोधानें जसा कांहीं पेटूं लागला आणि नेत्रांनीं दग्ध करीत करीतच कीं काय आह्मांला पुनरपि ह्मणाला ४३ " मला दिलेलें वचन त्याअर्थी तुह्मी शेवटास नेत नाहीं त्याअर्थी तुह्मी माझ्या शापानें दग्ध होऊन तिर्यग्यो-

सन्निभक्ष्यो मामत्र द्विजसत्तम । आहारार्थकृतमेतत्ते मयादेहमिहात्मनः ४६ एतावदेव विप्रस्य ब्राह्मणत्वं प्रचक्ष्यते । यावत्सत्यं समालम्ब्य स्वसत्यपरिपालनम् ४७ न यज्ञैर्दक्षिणावद्भिस्तत्पुण्यं प्राप्यते महत् । कर्मणान्येन वा विप्रैर्यत्सत्यपरिपालनात् ४८ इत्युक्तवचनं श्रुत्वा सोऽन्तर्विस्मयनिर्भरः । प्रत्युवाच मुनिं शक्रः पक्षिरूपधरस्तदा ४९ योगमास्थाय विप्रेन्द्र त्यजेदं स्वं कलेवरम् । जीवजन्तुं हि विप्रेन्द्र न भक्षामि कदाचन ५० तस्य तद्वचनं श्रुत्वा योगयुक्तोऽभवन्मुनिः । तं तस्य निश्चयं ज्ञात्वा शक्रोऽभ्याह स्वदेहभृत् ५१ भो भो विप्रेन्द्र बुध्यस्व बुद्ध्या योग्यं हितात्मक । जिज्ञासार्थं मयाद्य ते अपराधः कृतोऽनघ ५२ तं क्षमस्वानघमते का चेच्छा क्रियतां तव । पालनात्सत्यवाक्यस्य प्रीतिर्मे परमा त्वयि ५३ अद्यप्रभृति ते ज्ञानमैन्द्रं प्रादुर्भविष्यति । तपस्यथ तथा धर्मे न ते विघ्नो भविष्यति ५४ इत्युक्त्वा तु गते शक्रे पिता कोपसमन्वितः । प्रणम्य शिरसास्माभिरिदमुक्तो महामुनिः ५५ क्षम्यतां मरणात्तात त्वमस्माकं महामते । क्षन्तुमर्हसि दीनानां जीवितप्रियता हि नः ५६ त्वगस्थिमांससंघाते पूयशोणितपूरिते । कर्तव्या न रतिर्यत्र तत्रास्माकमियं रतिः ५७ श्रूयतां च महाभाग यथा लोको विमुह्यति । कामक्रोधादिभिर्दोषैरवशः प्रव-

---

र्तीनिर्ये जा" ४४. असें आह्मांला सांगून आणि स्वतःची अंत्येष्टि व और्ध्वदेहिक यथाशास्त्र करून ते त्या पक्ष्याला ह्मणाले ४५ "हे द्विजश्रेष्ट, तूं आतां स्वस्थपणें भक्ष्य कर. मी आपला देहच तुझ्या आहाराकरितां तयार केला आहे ४६. हे पक्षिश्रेष्ठा, स्वसत्यरक्षण हेंच विप्राचें ब्राह्मणत्व होय ४७. सत्यरक्षणानें मिळणारें मोठें पुण्य दक्षिणायुक्त यज्ञांनीं अथवा इतर कर्मांनीं विप्रांना प्राप्त होत नाहीं" ४८. हें ऋषिवचन ऐकून तो पक्षिरूपधारी इंद्र मनांत अतिशय विस्मित होऊन त्या मुनीला ह्मणाला ४९ "हे विप्रश्रेष्ट, समाधि लावून तूं ह्या स्वशरीराचा त्याग कर. हे विप्रश्रेष्ट, मी जिवंत प्राणी कधींही खात नाहीं" ५०. तें त्याचें वचन ऐकून मुनि समाधि लावूं लागला. तेव्हां त्याचा तो निश्चय जाणून इंद्र स्वकीय रूप घेऊन त्याला ह्मणाला ५१ "हे विप्रेंद्र, हे सविद्व, माझ्या ह्मणण्याचा बुद्धिपूर्वक विचार करा. हे निष्पाप, आपली परीक्षा पहाण्याकरितां माझ्या हातून हा अपराध घडला आहे ५२. ह्याकरितां, हे निर्मलमते, आपण क्षमा करा; आपली काय इच्छा आहे ती सांगा. सत्यरक्षणामुळें मी आपल्यावर अति संतुष्ट झालों आहे ५३. आजपासून आपणांला इंद्राप्रमाणें ज्ञान प्राप्त होईल, आणि आपल्या तपाला व धर्माचरणाला विघ्न येणार नाहीं" ५४. असें बोलून इंद्र गेल्यावर क्रुद्ध पित्याला आह्मीं मस्तकानें प्रणाम केला व त्या महामुनीला आह्मीं ह्मटलें ५५ "हे महाविचारी तात, देहमुला भिणाऱ्या आह्मां दीनांची आपण क्षमा करा. आह्मांला जीवित प्रिय आहे ५६. त्वचा, अस्थि व मांस ह्यांचा समुदाय असलेलें आणि पुवानें व रक्तानें भरलेलें जें शरीर प्रेमाला पात्र नाहीं त्याचे ठिकाणीं हें आमचें प्रेम आहे ५७. हे महासत्त्व, कामक्रोधादि दोषरूप प्रबल शत्रूंमुळें लोकांना कसा मोह पडतो हें आपण

कारिभिः ५८ प्रज्ञाप्राकारसंयुक्तमस्थिस्थूणं परं महत् । चर्मभित्तिमहारोधं मांसशोणितलेपनम् ५९ नवद्वारं महायासं सर्वतः स्नायुवेष्टितम् । नृपश्च पुरुषस्तत्र चेतनावानवस्थितः ६० मन्त्रिणौ तस्य बुद्धिश्च मनश्चैव विरोधिनौ । यतेते वैरनाशाय तावुभावितरेतरम् ६१ नृपस्य तस्य चत्वारो नाशमिच्छन्ति विद्विषः । कामः क्रोधस्तथा लोभो मोहश्चान्यस्तथा रिपुः ६२ यदा तु स नृपस्तानि द्वाराण्यावृत्य तिष्ठति । तदा स्वस्थबलश्चैव निरातङ्कश्च जायते ६३ जातानुरागो भवति शत्रुभिर्नाभिभूयते ६४ यदा तु सर्वद्वाराणि विवृतानि स मुञ्चति । रागो नाम तदा शत्रुर्नेत्रादिद्वारमृच्छति ६५ सर्वव्यापी महाकामः पञ्चद्वारप्रवेशनः । तस्यानुमार्गं विशति तद्वै घोरं रिपुत्रयम् ६६ प्रविश्याथ स वै तत्र द्वारैरिन्द्रियसंज्ञकैः । रागः संश्लेषमायाति मनसा च सहेतरैः ६७ इन्द्रियाणि मनश्चैव वशे कृत्वा दुरासदः । द्वाराणि च वशे कृत्वा प्राकारं नाशयत्यथ ६८ मनस्तस्याश्रितं दृष्ट्वा बुद्धिर्नश्यति तत्क्षणात् । अमात्यरहितस्तत्र पौरवर्गोज्झितस्तथा ६९ रिपुभिर्लब्धविवरः स नृपो नाशमृच्छति । एवं रागस्तथा मोहो लोभः क्रोधस्तथैव च ७० प्रवर्तन्ते दुरात्मानो मनुष्यस्मृतिनाशकाः। रागात्क्रोधः प्रभवति क्रोधाल्लोभोऽभिजायते ७१ लोभाद्भवति संमोहः संमोहात्स्मृतिविभ्रमः । स्मृतिभ्रंशाद्बुद्धिनाशो बुद्धिनाशा-

ऐका ५८. प्रज्ञारूप तट, अस्थिरूप स्तंभ, चर्मरूप भिंती, रक्तमांसरूप गिलावा, इंद्रियरूप नवद्वारें आणि सर्वबाजूंनीं असलेलें स्नायुरूप वेष्टनें ह्यांनीं युक्त असलेल्या ह्या मोठ्या प्रचंड नगरामध्यें चेतनायुक्त पुरुषरूप राजा रहात असतो५९, ६०. मन व बुद्धि हे त्याचे परस्पर विरोधी दोन मंत्री आहेत; व ते वैरामुळें परस्परांच्या नाशाचा यत्न करीत असतात ६१. काम, क्रोध, लोभ व मोह हे चार द्वेष्टे शत्रु त्या राजाचा नाश इच्छीत असतात ६२. तो राजा जेव्हां तीं द्वारें लावून असतो तेव्हां त्याची शक्ति चांगली असून तो निरोगी असतो ६३. त्याच्यावर प्रजेचें प्रेम जडतें व शत्रूंच्या हातून त्याचा पराभव होत नाहीं ६४. परंतु, तो जेव्हां सर्व द्वारें उघडीं टाकितो तेव्हां काम हा शत्रु नेत्रादि द्वारानें आंत शिरतो ६५. तो सर्वव्यापी व महाविस्तृत काम ज्ञानेंद्रियरूप पांच द्वारांनीं नगरांत प्रवेश करूं लागतो व त्याच्या मागोमाग ते भयंकर तीन शत्रु जात असतात ६६. इंद्रियसंज्ञक द्वारांनीं आंत प्रविष्ट झाल्यानंतर मन व इतर इंद्रियें ह्यांच्यांशीं कामाचा संबंध जडतो ६७ आणि तो अजिंक्य काम मनासह इंद्रियांना जिंकून व द्वारें ताब्यांत ठेवून प्रज्ञारूप कोटाचा नाश करितो ६८. मनानें त्या कामाचा आश्रय केल्याचें पाहून बुद्धि तत्क्षणीं नाहींशी होते, आणि ह्याप्रमाणें अमात्यांनीं व पौर जनांनीं त्याग केला असतां ६९ शत्रूंना छिद्र सांपडून त्या राजाचा नाश होतो. सारांश, काम, क्रोध, लोभ, मोह ७० हे दुष्ट व मनुष्यस्मृतिनाशक शत्रु ह्याप्रमाणें प्रवृत्त होत असतात. कामापासून क्रोध, क्रोधापासून लोभ ७१, लोभापासून मोह, मोहापासून स्मृतिभ्रंश, स्मृतिभ्रंशापासून बुद्धिनाश व बुद्धिनाशापासून पुरुषाचा नाश

त्पणस्यति ७२ एवं प्रणष्टबुद्धीनां रागलोभानुवर्तिनाम्। जीविते च सलोभानां प्रसादं कुरु सत्तम ७३ योऽयं शापो भगवता दत्तः स न भवेत्तथा। न तामसीं गतिं कष्टां व्रजेम मुनिसत्तम ७४ ऋषिरुवाच॥ यन्मयोक्तं न तन्मिथ्या भविष्यति कदाचन। न मे वागनृतं प्राह यावदद्येति पुत्रकाः ७५ दैवमात्रं परं मन्ये धिक्पौरुषमनर्थकम्। अकार्यं कारितो येन बलादहमचिन्तितम् ७६ यस्माच्च युष्माभिरहं प्रणिपत्य प्रसादितः। तस्मात्तिर्यक्त्वमापन्नाः परं ज्ञानमवाप्स्यथ ७७ ज्ञानदर्शितमार्गाश्च निर्धूतक्लेशकल्मषाः। मत्प्रसादादसन्दिग्धाः परां सिद्धिमवाप्स्यथ ७८ एवं शप्ताः स्म भगवन्पित्रा दैववशा-त्पुरा। ततः कालेन महता योन्यन्तरमुपागताः ७९ जाताश्च रणमध्ये वै भवता परि-पालिताः। वयमित्थं द्विजश्रेष्ठ खगत्वं समुपागताः ८० नास्त्यसाविह संसारे यो न दिष्टेन बाध्यते। सर्वेषामेव जन्तूनां दैवाधीनं हि चेष्टितम् ८१ मार्कण्डेय उवाच॥ इति तेषां वचः श्रुत्वा शमीको भगवान्मुनिः। प्रत्युवाच महाभागः समीपस्थायिनो द्विजान् ८२ पूर्वमेव मया प्रोक्तं भवतां सन्निधाविदम्। सामान्यपक्षिणो नैते केऽप्येते द्विजसत्तमाः। ये युद्धेऽपि न संप्राप्ताः पञ्चत्वमतिमानुषे ८३ ततः प्रीतिमता तेन तेऽनुज्ञाता महात्मना। जग्मुः शिखरिणां श्रेष्ठं विन्ध्यं द्रुमलतायुतम् ८४ यावदद्य

होत असतो ७२. तस्मात्, हे सज्जनश्रेष्ठ, काम व लोभ ह्याच्या अधीन होऊन बुद्धिहीन बनलेल्या व जीविताविषयीं लोभ धरणाऱ्या आह्मांवर आपण कृपा करा ७३. हे मुनिश्रेष्ठ, आपण दिलेला हा शाप अमलांत येऊं नये व आह्मांला दुःखकारक तामसयोनि प्राप्त होऊं नये" ७४ ऋषि ह्मणतोः— पुत्र हो, आजपर्यंत माझ्या वाणीनें असत्य भाषण झालें नसल्यामुळें मीं ह्मटलेलें कधींही मिथ्या होणार नाहीं ७५. अरेरे! धिक्कार असो त्या व्यर्थ पौरुषाला! मी केवल दैव श्रेष्ठ समजत आहें. कारण, मनांत नसलेलेंही अकार्य त्या दैवानें माझ्या कडून बळजबरीनें करविलें आहे ७६. आतां ज्याअर्थी तुह्मी प्रणिपात करून मला प्रसन्न केलें आहे त्याअर्थी तिर्यग्योनींत उत्पत्ति होऊनही तुह्मांला उत्कृष्ट ज्ञान प्राप्त होईल ७७. स्वतःसिद्ध ज्ञानानेंच तुह्मांला मार्ग समजतील, अविद्यादि क्लेश व पातकें ह्यांपासून तुह्मी अलिप्त रहाल, आणि संदेहरहित होऊन माझ्या प्रसादानें तुह्मांला उत्कृष्ट सिद्धि प्राप्त होईल ७८. हे भगवन्, ह्याप्रमाणें पूर्वी दुर्दैवानुळें आह्मांला पित्याचा शाप झाल्यावर बराच काल लोटल्यानंतर आह्मी पक्षियोनीमध्यें गेलों ७९. रणांमध्यें जन्मास आलों आणि आपण आमचें रक्षण केलें. सारांश, हे द्विजश्रेष्ठ, आह्मी ह्याप्रमाणें पक्षी झालों ८०. तात्पर्य, दैवाच्या तडाक्यांत न सांपडणारा पुरुष ह्या जगतामध्यें कोणीही नाहीं. प्रत्येक प्राण्याची हालचाल दैवाधीन आहे ८१. मार्कंडेय ह्मणतातः— हें त्यांचें ह्मणणें ऐकून महाशय भगवान् शमीकमुनि समीप असलेल्या द्विजांना ह्मणाले ८२. "हे द्विजश्रेष्ठ हो, हे सामान्य पक्षी नसून कोणी तरी मोठे आहेत; हें मीं पूर्वीच तुमच्या जवळ बोललों होतों. कारण, अमानुष युद्धांतही हे जिवंत

स्थितास्तस्मिन्नचले धर्मपक्षिणः । तपःस्वाध्यायनिरताः समाधौ कृतनिश्चयाः ८५ इति मुनिवरलब्धसत्क्रियास्ते मुनितनया विहगत्वमभ्युपेताः। गिरिवरगहनेऽतिपुण्यतोये यतमनसो निवसन्ति विन्ध्यपृष्ठे ८६ ॥ २०९॥ इति श्रीमार्कण्डेयपुराणे विन्ध्यप्राप्तिकथनं नाम तृतीयोऽध्यायः ॥ ३ ॥

मार्कण्डेय उवाच । एवं ते द्रोणतनयाः पक्षिणो ज्ञानिनोऽभवन् । वसन्ति ब्राधके विन्ध्ये तानुपास्व च पृच्छ च १ इत्युपर्वचनं श्रुत्वा मार्कण्डेयस्य जैमिनिः । जगाम. विन्ध्यशिखरं यत्र ते धर्मपक्षिणः २ तच्चगासन्नभूतश्च शुश्राव पठतां ध्वनिम् । श्रुत्वा च विस्मयाविष्टश्चिन्तयामास जैमिनिः। स्थानसौष्ठवसंपन्नं जितश्वासमविभ्रमम्। विस्पष्टमपदोषं च पठ्यते द्विजसत्तमैः ४ वियोनिमपि संप्राप्तानेतान्मुनिकुमारकान् । चित्रमेतदहं मन्ये न जहाति सरस्वती ५ बन्धुवर्गस्तथा मित्रं यच्चेष्टमपरं गृहे । सकलं गच्छति तत्सर्वं न जहाति सरस्वती ६ इति संचिन्तयन्नेव विवेश गिरिकन्दरम् । प्रविश्य च ददर्शासौ शिलापट्टगतान्द्विजान् ७ पठतस्तान्समालोक्य मुखदोषविवर्जितान् । सोऽथ शोकेन हर्षेण सर्वानेवाभ्यभाषत ८ स्वस्त्यस्तु वो द्विजश्रेष्ठा जैमिनिं मां

---

राहिले आहेत ८३. तदनंतर त्यांच्यावर प्रेम करणाऱ्या त्या महात्म्या शमीक ऋषींनी अनुज्ञा दिल्यावर वृक्ष आणि लता ह्यांनीं भरलेल्या पर्वतश्रेष्ठ विंध्याचलावर ते पक्षी गेले ८४. तप व वेदाध्ययन ह्यांविषयीं तत्पर राहून समाधीविषयीं निश्चय करून राहिलेले ते धर्मपक्षी अद्यापि त्या पर्वतावर आहेत ८५. ह्याप्रमाणें मुनिश्रेष्ठ शमीकांनीं उत्तम रीतीनें पालनपोषण केल्यावर पक्षी झालेले ते मुनिपुत्र अति पवित्र उदकानें युक्त असलेल्या विंध्याचलावरील अरण्यांत मनःसंयमन करून राहूं लागले ८६. ( २०९ ) ह्याप्रमाणें श्रीमार्कंडेयपुराणांतील धर्मपक्ष्यांना विंध्यप्राप्ति एतद्विपयक तिसरा अध्याय समाप्त झाला ॥ ३ ॥

मार्कंडेय ह्मणतातः---ह्याप्रमाणे ते द्रोणपुत्र पक्षी ज्ञानी झाले असून विंध्याचलावर रहात आहेत. ह्यास्तव, त्यांच्याकडे जा, आणि त्यांना विचार १. हें मार्कंडेयमुनींचें भाषण ऐकून जैमिनि विंध्यपर्वताच्या शिखरावर त्या धर्मपक्ष्यांकडे गेले २. तेव्हां त्या पर्वतासमीप गेल्यावर ह्मणणाऱ्यांचा ध्वनि त्यांच्या कानांवर आला आणि ते जैमिनि विस्मित होऊन आपल्याशीं विचार करूं लागले ३ "हे श्रेष्ठ पक्षी निर्दोष, स्पष्ट, न भ्रमतां व मध्यंतरीं श्वास न सोडतां वेदपठन करीत आहेत; आणि ज्या स्थानाच्या वर्णाचा उच्चार जसा व्हावयाचा तसा ते उत्कृष्ट रीतीनें करीत आहेत ४. मनुष्यांहून अन्ययोनींत जन्मास आलेल्या ह्या मुनिपुत्रांना सरस्वती सोडीत नाहीं हें मला आश्चर्य वाटत आहे ५. बंधुवर्ग, मित्र व गृहामध्यें आणखीही जें कांहीं इष्ट असतें तें असें सर्व सोडून प्राणी जात असतो; परंतु, ह्यांना सरस्वती सोडीत नाहीं " ६. असा विचार करीत करीत ते पर्वताच्या गुहेमध्यें शिरले असतां शिळेवर बसलेले पक्षी त्यांनीं अवलोकन केले ७ आणि

निबोधत । व्यासशिष्यमनुप्राप्तं भवतां दर्शनोत्सुकम् ९ मन्युर्न खलु कर्तव्यो यत्पित्रातीवमन्युना । शप्ताः खगत्वमापन्नाः सर्वथा दिष्टमेव तत् १० स्फीतद्रव्ये कुले केचिज्जाताः किल मनस्विनः । द्रव्यनाशे द्विजेन्द्रास्ते शबरेण समान्विताः ११ दत्त्वा याचन्ति पुरुषा हत्वा वध्यन्ति चापरे । पातयित्वा च पात्यन्ते त एव तपसः क्षयात् १२ एतद्दृष्टं सुबहुशो विपरीतं तथा मया । भावाभावसमुच्छेदैरजस्रं व्याकुलं जगत् १३ इति संचिन्त्य मनसा न शोकं कर्तुमर्हथ । ज्ञानस्य फलमेतावच्छोकहर्षैरधृष्यता १४ ततस्ते जैमिनिं सर्वे पाद्यार्घ्याभ्यामपूजयन् । अनामयं च पप्रच्छुः प्रणिपत्य महामुनिम् १५ अथोचुः खगमाः सर्वे व्यासशिष्यं तपोनिधिम् । सुखोपविष्टं विश्रान्तं पक्षानिलहृतश्रमम् १६ पक्षिण ऊचुः॥ अद्य नः सफलं जन्म जीवितं च सुजीवितम् । यत्पश्यामः सुरैर्वन्द्यं तव पादाम्बुजद्वयम् १७ पितृकोपाग्निरद्भूतो यो नो देहेषु वर्तते । सोऽद्य शान्तिं गतो विप्र युष्मद्दर्शनवारिणा १८ कच्चित्ते कुशलं ब्रह्मन्नाश्रमे मृगपक्षिषु । वृक्षेष्वथ लतागुल्मत्वक्सारतृणजातिषु १९ अथ वा नैतदुक्तं हि सम्यगस्माभिरादृतैः । भवता संगमो येषां

---

मुखदोषरहित वेदपठण करीत असलेल्या त्या पक्ष्यांना पाहून दुःखानें व हर्षानें ते जैमिनि त्या सर्वांनाच ह्मणाले ८ " हे द्विजश्रेष्ठहो, तुमचें कल्याण असो, मी व्यासशिष्य जैमिनि तुमच्या दर्शनाकारितां उत्सुक होऊन येथें आलों आहें ९. पित्यानें अति क्रुद्ध होऊन शाप दिल्यामुळें तुह्मी पक्षी झाला ह्यावद्दल खेद करूं नका, तो सर्व दैवाचा प्रकार आहे १०. धनधान्यसमृद्ध कुळामध्यें उत्पन्न झालेल्या कांहीं विवेकी लोकांचें सांत्वन, हे पक्षिश्रेष्ठहो, द्रव्यनाश झाल्यामुळें शबराला करावें लागलें आहे ११. दान दिल्यानंतरही पुरुषांना याचना करण्याची पाळी येत असते. दुसऱ्यांचा वध करूनही स्वतःचा वध होण्याचा प्रसंग येत असतो आणि ज्यांनीं इतरांना स्थानभ्रष्ट केलेलें असतें त्यांनाच तप संपल्यानंतर स्थानभ्रष्ट होण्याची वेळ येते १२. असा उलट प्रकार मी अनेक वेळां पाहिला आहे. सारांश, ह्या जगतामध्यें उत्पत्ति, नाश व हानि इत्यादिकांचा घडामोड एकसारखी चाललेली आहे १३. असें मनांत आणून तुह्मी खेद करूं नका. शोकहर्षांच्या अधीन न होणें हेंच ज्ञानफळ होय " १४. ह्यावर त्या सर्वही पक्ष्यांनीं पाद्यानें व अर्घ्यानें जैमिनींचें पूजन केलें; आणि त्या महर्षीला प्रणाम करून त्यांना कुशलप्रश्न केला १५. नंतर ते तपोनिधि व्यासशिष्य विश्रांति घेऊन स्वस्थ बसले असतां आणि पंखांच्या वाऱ्यानें त्यांचे श्रम नाहींसे झाले असतां सर्वही पक्षी त्यांना ह्मणाले १६ "आज आपल्या देववंद्य चरणकमलांचें दर्शन झाल्यामुळें आमचें जीवित व जन्म ह्यांचें साफल्य झालें आहे १७. हे विप्र, पितृकोपापासून उत्पन्न झालेला जो अग्नि आमच्या देहामध्यें आहे तो आज आपल्या दर्शनरूप उदकानें शांत झाला आहे १८. हे ब्रह्मन्, आपल्या आश्रमांतील मृग, पक्षी, वृक्ष, लता गुल्में व त्वचेपेक्षां ज्यांच्यांत दुसरें सार नाहीं अशा तृणजाति कुशल आहेतना ? १९.

तेषामकुशलं कुतः २० प्रसादं च कुरुध्वात्र युष्मागमनकारणम् । देवानामिव संसर्गो भवतोऽभ्युदयो महान् । केनाप्यस्मद्भाग्यगुरुणा आनीतो दृष्टिगोचरम् २१ जैमिनिरुवाच ॥ श्रूयतां द्विजशार्दूलाः कारणं येन कन्दरम् । विन्ध्यस्येहागतो रम्यं रेवावारिकणोक्षितम् २२ संदेहान्भारते शास्त्रे तान्प्रष्टुं गतवानहम् । मार्कण्डेयं महात्मानं पूर्वं भृगुकुलोद्वहम् २३ तदमं पृष्टवान्प्राप्य संदेहान्भारतं प्रति २४ स च पृष्टो मया प्राह सन्ति विन्ध्ये महाचले । द्रोणपुत्रा महात्मानस्ते वक्ष्यन्त्यर्थविस्तरम् २५ तद्वाक्यचोदितश्चेममागतोऽहं महागिरिम् । तच्छृणुध्वमशेषेण श्रुत्वा व्याख्यातुमर्हथ २६ पक्षिण ऊचुः ॥ विषये सति वक्ष्यामो निर्विशङ्कः शृणुष्व तत् । कथं तन्न वदिष्यामो यदस्मद्बुद्धिगोचरम् २७ चतुर्ष्वपि हि वेदेषु धर्मशास्त्रेषु चैव हि । समस्तेषु तथाङ्गेषु यच्चान्यद्वेदसंमितम् २८ एतेषु गोचरोऽस्माकं बुद्धेर्ब्राह्मणसत्तम । प्रतिज्ञां तु समावोढुं तथापि न हि शक्नुमः २९ तस्माद्वदस्व विश्रब्धं सन्दिग्धं यदि भारते । वक्ष्यामस्तव धर्मज्ञ न चेन्मोहो भविष्यति ३० जैमिनिरुवाच ॥ सन्दिग्धानीह वस्तूनि भारतं प्रति यानि मे । शृणुध्वममलास्तानि श्रुत्वा व्याख्यातुमर्हथ ३१ कस्मान्मानुषतां प्राप्तो निर्गुणोऽपि जनार्दनः । वासुदेवोऽखिलाधारः सर्वकारणकारणम् ३२ कस्माच्च पाण्डुपुत्राणामेका सा द्रुपदात्मजा । पञ्चानां महिषी

---

अथवा आमचा हा आदरपूर्वक प्रश्न बरोबरच नाहीं. कारण, ज्यांचा तुमच्याशीं समागम आहे त्यांचें अकुशल असणार कोठून ? २०. कृपा करून आपण येण्याचें कारण सांगा, आपला संसर्ग देवांप्रमाणें मोठया अभ्युदयाचें कारण आहे. आमच्या कांहीं तरी महाभाग्यामुळें आह्मांला आपलें दर्शन घडलें आहे २१. जैमिनि ह्मणतातः— हे द्विजश्रेष्ठहो, नर्मदेच्या उदकबिंदूंनीं सिंचित झालेल्या ह्या, विंध्यपर्वताच्या रम्य गुहेमध्यें मी येण्याचें कारण आपण ऐका २२. भारतशास्त्रांतील शंका विचारण्याकरितां मी पूर्वी भृगुकुलश्रेष्ठ महात्म्या मार्कंडेयमुनींकडे गेलों होतों २३, २४. परंतु, मीं प्रश्न केल्यानंतर ते ह्मणाले "विंध्याचलावर असलेले महात्मे द्रोणपुत्र तुला हें सविस्तर सांगतील २५. अशी त्यांची आज्ञा झाल्यामुळें मी ह्या महापर्वतावर आलों आहें. ह्यास्तव, आपण माझ्या सर्व शंका ऐकून घेऊन त्यांचें उत्तर द्या २६. पक्षी ह्मणतातः— आह्मांला ठाऊक असल्यास आह्मी सांगूं; व आपण तें संदेह न धरितां ऐका. आह्मांला जें माहित असेल तें आह्मी कसें बरें सांगणार नाहीं! २७. हे विप्रश्रेष्ठ, चार वेद, सर्व धर्मशास्त्रें, अंगें व इतरही वेदतुल्य ग्रंथ ह्यांतील विषय आह्मांला माहित आहेत. तथापि प्रतिज्ञा मात्र आमच्या हातून होणार नाहीं २८, २९. तस्मात्, भारतांत जें संदिग्ध असेल तें आपण खुशाल विचारा. हे धर्मज्ञ, मोह न होईल तर आह्मी आपणाला याचें उत्तर देऊं ३०. जैमिनि ह्मणतातः— हे निर्मल, भारतांत ज्या गोष्टींसंबंधानें मला संदेह आहे त्या ऐकून घेऊन तुह्मी उत्तर द्या ३१. सर्व कारणांचेंही कारणव सर्वाधार असा जनार्दन वासुदेव

कृष्णा स्मशानव संशयः ३३ भेषजं ब्रह्महत्याया बलदेवो महाबलः । तीर्थयात्राप्रसङ्गेन कस्माच्चक्रे हलायुधः ३४ कथं च द्रौपदेयास्तेऽकृतदारा महारथाः । पाण्डुनाथा महात्मानो वधमापुरनाथवत् ३५ एतत्सर्वं कथ्यतां मे सन्दिग्धं भारतं प्रति । कृतार्थोऽहं सुखं येन गच्छेयं निजमाश्रमम् ३६ पक्षिण ऊचुः ॥ नमस्कृत्य सुरेशाय विष्णवे प्रभविष्णवे । पुरुषायाप्रमेयाय शाश्वतायाव्ययाय च ३७ चतुर्व्यूहात्मने तस्मै त्रिगुणायागुणाय च । वरिष्ठाय गरिष्ठाय वरेण्यायामृताय च ३८ यस्मादणुतरं नास्ति यस्मान्नास्ति बृहत्तरम् । येन विश्वमिदं व्याप्तमजेन जगदादिना ३९ आविर्भावतिरोभावदृष्टादृष्टविलक्षणम् । वदन्ति यत्सृष्टमिदं तथैवान्ते च संहृतम् ४० ब्रह्मणे चादिदेवाय नमस्कृत्य समाधिना । ऋक्सामान्युद्गिरन्वक्त्रैर्यः पुनाति जगत्त्रयम् ४१ प्रणिपत्य तथैशानमेकबाणविनिर्जितैः । यस्यासुरगणैर्यज्ञा विलुप्यन्ते न यज्विनाम् ४२ प्रवक्ष्यामो मतं कृत्स्नं व्यासस्याद्भुतकर्मणः । येन भारतमुद्दिश्य धर्माद्याः प्रकटीकृताः ४३ आपो नारा इति प्रोक्ता मुनिभिस्तत्त्वदर्शिभिः । अयनं तस्य ताः पूर्वं तेन नारायणः स्मृतः ४४ स देवो भगवान्सर्वव्याप्य नारायणो विभुः । चतुर्धा संस्थितो ब्रह्मन्सगुणो निर्गुणस्तथा ४५ एका मूर्ति-

---

निर्गुण असूनही मनुष्य कसा झाला ? ३२ आणि त्याचप्रमाणें एकच द्रुपदकन्या कृष्णा पांच पांडवांची पट्टराणी कशी झाली ? ह्याविषयीं मला फारच मोठा संशय आहे ३३. त्याचप्रमाणें हलायुध व महाबलाढ्य बलदेवानें ब्रह्महत्येची निष्कृति तीर्थयात्रेनें कशी केली ? ३४ आणि ते अविवाहित व महारथी महात्मे द्रौपदीपुत्र, पांडव नाथ असतांना अनाथाप्रमाणें कसे मारले गेले ? ३५. हे भारतासंबंधानें माझे सर्व संदेह तुम्ही नाहींसे करा. म्हणजे मी कृतार्थ होऊन सुखानें आश्रमाप्रत जाईन ३६. पक्षी म्हणतात : — सुरेश, विष्णु, प्रभविष्णु, पुरुष, अप्रमेय, शाश्वत, अव्यय, चतुर्व्यूहात्मा, त्रिगुण, निर्गुण, वरिष्ट, गरिष्ठ, वरेण्य व अमृत अशा परमेश्वराला नमस्कार करून ३७, ३८, म्हणजे ज्याच्याहून स्थूल अथवा सूक्ष्म कांहीं एक नाहीं; ज्या जगत्कारण व जन्मरहित परमात्म्यानें हें सर्व विश्व व्यापिलें आहे ३९; प्रकटीभवन, तिरोभवन, दृष्ट व अदृष्ट इत्यादि विशेष लक्षणांनीं युक्त असलेल्या ह्या जगताची उत्पत्ति व संहार जो करितो असें म्हणतात त्या परमात्म्याला नमस्कार करून ४० ऋक्, साम इत्यादि वेदांचा मुखानें उच्चार करीत करीत जो त्रैलोक्य पवित्र करीत असतो त्या आदिदेव ब्रह्मदेवाला स्वस्थांतःकरणपूर्वक नमस्कार करून ४१ ; आणि ज्याच्या एका बाणानें असुरगण जिंकिले गेल्यामुळें यज्ञकर्त्यांचे यज्ञ लुप्त होत नाहींत त्या शंकराला प्रणाम करून ४२ ; ज्यानें भारतामध्यें धर्मादि पुरुषार्थ प्रकट केले आहेत त्या अद्भुत कृति करणाऱ्या व्यासाचें सर्व मत आम्ही कथन करूं ४३. तत्त्ववेत्ते मुनि नरसमुदायांना आप असें म्हणतात. हे आपल्या परमात्म्याचे प्रथम निवासस्थान असल्यामुळें त्याला नारायण असें म्हणतात ४४. हे ब्रह्मन् , सगुण, निर्गुण, विभु,

रनिर्देश्या शुक्लां पश्यन्ति तां बुधाः। ज्वालामालोपरुद्धाङ्गी निष्ठा सा योगिनां परा ४६ दूरस्था चान्तिकस्था च विज्ञेया सा गुणातिगा । वासुदेवाभिधानोऽसौ निर्ममत्वेन दृश्यते ४७ रूपवर्णादयस्तस्या न भावाः कल्पनामयाः । अस्त्येव सा सदा शुद्धा सुप्रतिष्ठैकरूपिणी ४८ द्वितीया पृथिवीं मूर्ध्ना शेषाख्या धारयत्यधः । तामसी सा समाख्याता तिर्यक्त्वं समुपाश्रिता ४९ तृतीया कर्म कुरुते प्रजापालनतत्परा । सत्त्वोद्रिक्ता तु सा ज्ञेया धर्मसंस्थानकारिणी ५० चतुर्थी जलमध्यस्था शेते पन्नगतल्पगा । रजस्तस्या गुणः सर्गं सा करोति सदैव हि ५१ या तृतीया हरेर्मूर्तिः प्रजापालनतत्परा । सा तु धर्मव्यवस्थानं करोति नियतं भुवि ५२ प्रोद्धूतानसुरान्हन्ति धर्मविच्छित्तिकारिणः । पाति देवान्सतश्चान्यान्धर्मरक्षापरायणान् ५३ यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति जैमिने । अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजत्यसौ ५४ भूत्वा पुरा वराहेण तुण्डेनापो निरस्य च । एकया दंष्ट्रयोत्खाता नलिनीव वसुन्धरा ५५ कृत्वा नृसिंहरूपं च हिरण्यकशिपुर्हतः । विप्रचित्तिमुखाश्चान्ये दानवा विनिपातिताः । वामनादींस्तथैवान्यान्न संख्यातुमिहोत्सहे । अवतारांश्च तस्येह माथुरः सांप्रतं त्वयम् ५७ इति सा सात्त्विकी मूर्तिर-

भगवान् व देव असा तो नारायण चार रूपांनीं राहिलेला आहे ४५. त्याचें एक अनिर्वचनीय रूप आहे. तें शुक्लरूप ज्ञानी अवलोकन करीत असतात. ज्वालासमुदायांनीं व्याप्त असलेलें तें रूप योगिजनांचा मुख्य आश्रय होय ४६. तें निर्गुण रूप दूर असून जवळही आहे व वासुदेव हें त्याला नांव आहे. हें माझें अशी बुद्धि नाहींशी झाली ह्मणजे त्या रूपाचें दर्शन होत असतें ४७. रूप, वर्ण, इत्यादि काल्पनिक प्रकार त्या स्वरूपाचे ठिकाणीं मुळींच नसून तें सर्वदांच शुद्ध, आधारभूत व कधींही न बदलणारें असेंच आहे ४८. त्याची दुसरी शेषसंज्ञक मूर्ति अधोभागीं असून मस्तकानें पृथ्वी धारण करीत आहे; तिर्यग्योनीचें अवलंबन केलेल्या त्या मूर्तीला तामसी असें ह्मणतात ४९. तिसरी मूर्ति प्रजापालनाविषयीं तत्पर असून कर्म करीत असते. ती धर्मस्थापना करणारी मूर्ति सात्विक समजावी ५०. त्याची चवथी मूर्ति उदकांमध्यें शेषशायीवर शयन करीत असते; ती रजोगुणी असून सर्वदां सृष्टि करीत असते ५१. हरीची जी तिसरी मूर्ति प्रजारक्षणाविषयीं दक्ष असते ती भूमीवर नियमानें धर्मव्यवस्था करीत असते ५२. धर्मोच्छेद करणाऱ्या प्रबल असुरांचा ती वध करिते व धर्मरक्षक देवांचें व इतर सज्जनांचें ती पालन करिते ५३. त्याचप्रमाणें, हे जैमिने, जेव्हां धर्माची ग्लानि होऊन अधर्माचा पगडा बसतो तेव्हां ही मूर्ति अवतार धारण करते ५४. पूर्वी ह्याच मूर्तीनें वराह होऊन व मुखानें उदकाचें निरसन करून एका दातानें पृथ्वी कमलिनीप्रमाणें समुद्रांतून वर काढिली ५५. नृसिंहरूप घेऊन हिरण्यकशिपु व विप्रचित्तिप्रभृति इतर दानव ह्यांचा तिनें वध केला ५६. हिचे वामनप्रभृति इतर अवतार असंख्य आहेत आणि सांप्रत हा कृष्णावतार चाललेला आहे ५७. ह्याप्रमाणें ती सात्त्विक

वतारान्करोति वै । प्रद्युम्नेति च सा ख्याता रक्षाकर्मण्यवस्थिता ९८ देवत्वेऽथ मनुष्यत्वे तिर्यग्योनौ च संस्थिता । गृह्णाति तत्स्वभावं च वासुदेवेच्छया सदा ९९ इत्येतत्ते समाख्यातं कृतकृत्योऽपि यत्प्रभुः । मानुषत्वं गतो विष्णुः शृणुष्वास्योत्तरं पुनः ६० ॥ २६९ ॥ इति मार्कण्डेयपुराणे चतुर्व्यूहावतारश्चतुर्थोऽध्यायः ॥ ४ ॥

पक्षिण ऊचुः ॥ त्वष्टृपुत्रे हते पूर्वं ब्रह्महत्याभिभूतस्य तेजसः । ब्रह्महत्याभिभूतस्य परा हानिरजायत १ तद्धर्मं प्रविवेशाथ शक्रतेजोऽपचारतः । निस्तेजाश्चाभवच्छक्रो धर्मे तेजसि निर्गते २ ततः पुत्रं हतं श्रुत्वा त्वष्टा क्रुद्धः प्रजापतिः । अवलुञ्च्य जटामेकामिदं वचनमब्रवीत् ३ अद्य पश्यन्तु मे वीर्यं त्रयो लोकाः सदेवताः । स च पश्यतु दुर्बुद्धिर्ब्रह्मा पाकशासनः ४ स्वकर्माभिरतो येन मत्सुतो विनिपातितः । इत्युक्त्वा कोपरक्ताक्षो जटामग्नौ जुहाव ताम् ५ ततो वृत्रः समुत्तस्थौ ज्वालामाली महासुरः । महाकायो महादंष्ट्रो भिन्नाञ्जनचयप्रभः ६ इन्द्रशत्रुरमेयात्मा त्वष्टृतेजोपबृंहितः । अहन्यहनि सोऽवर्दत्विषुपातं महाबलः ७ वधाय चात्मनो दृष्ट्वा वृत्रं शक्रो महासुरम् । प्रेषयामास सप्तर्षीन्सन्धिमिच्छन्भयातुरः । सख्यं चक्रुस्ततस्तस्य वृत्रेण समयांस्तथा । ऋषयः प्रीतिमनसः सर्वभूतहिते रताः ९ समयस्थितिमुल्लंघ्य यदा शक्रेण घातितः । वृत्रो हत्याभिभू-

---

मूर्ति अवतार धारण करीत असते. प्रद्युम्न ह्मणून ती प्रसिद्ध आहे व रक्षणाविषयीं तत्पर आहे ९८. देव, मनुष्य व तिर्यग्योनि ह्यांमध्यें ती वासुदेवाच्या इच्छेनें अवतार धारण करीत असते ९९. प्रभु विष्णु कृतकृत्य असूनही मनुष्य कां झाला ह्याचें उत्तर असें तुह्मांला सांगितलें. आतां पुनरपि ह्याचें उत्तर ऐका ६०. (२६९) ह्याप्रमाणें मार्कंडेयपुराणांतील चतुर्व्यूहावतारनामक चवथा अध्याय समाप्त झाला॥४॥

पक्षी ह्मणतात:— विश्वरूपाचा पूर्वी वध झाल्यामुळें ब्रह्महत्येनें ग्रस्त झालेल्या इंद्राचें तेज नाहींसें झालें १. ब्रह्मवधामुळें इंद्राचें तेज धर्मामध्यें प्रविष्ट झालें व त्यामुळें इंद्र निस्तेज झाला २. नंतर पुत्राचा वध झाल्याचें ऐकून प्रजापति त्वष्टा क्रुद्ध झाला आणि एक जटा उपटून ह्मणाला ३ " देवांसह त्रैलोक्याला आणि त्या दुष्ट व ब्रह्मघातकी इंद्राला माझें वीर्य दृष्टीं पडेल ४. इंद्रानें माझ्या स्वकर्मनिष्ठ पुत्राचा वध केला आहे. " असें बोलून क्रोधानें लाल डोळे झालेल्या त्या त्वष्ट्यानें त्या जटेचा अग्नीमध्यें होम केला ५. तेव्हां तेजःपुंज, धिप्पाड, कज्जलराशितुल्य आणि मोठ्या दाढांनीं युक्त असा महादैत्य वृत्र उत्पन्न झाला ६. तो अतर्क्यस्वरूप महाबलढ्य इंद्रशत्रु त्वष्ट्याच्या तेजानें युक्त होऊन प्रतिदिवशीं बाणाच्या टप्याइतका वाढूं लागला ७. महादैत्य वृत्र आपल्या वधाकरितां उत्पन्न झाल्याचें पाहून इंद्रानें भयभीत होऊन तह करण्याकरितां सप्तर्षींना त्याच्याकडे पाठविलें ८. तेव्हां प्राणिमात्राच्या हिताविषयीं तत्पर असलेले ऋषि प्रसन्न झाले व त्यांनीं कांहीं अटींवर इंद्राचें वृत्राशीं सख्य केलें ९. परंतु अटी मोडून जेव्हां इंद्रानें वृत्रवध केला, तेव्हां ब्रह्महत्येनें ग्रस्त झालेला तो

तस्य तदा बलमशीर्यत १० तच्छक्रदेहविभ्रष्टं बलं मारुतमाविशत् । सर्वव्यापिनमव्यक्तं बलस्यैवाधिदैवतम् ११ अहल्यां च यदा शक्रो गौतमं रूपमास्थितः । धर्षयामास देवेन्द्रस्तदा रूपमहीयत १२ अङ्गप्रत्यङ्गलावण्यं यदतीव मनोरमम् । विहाय दुष्टं देवेन्द्रं नासत्यावगमत्ततः १३ धर्मेण तेजसा त्यक्तं बलहीनमरूपिणम् । ज्ञात्वा सुरेशं दैतेयास्तज्जये चक्रुरुद्यमम् १४ राज्ञामुद्रिक्तवीर्याणां देवेन्द्रविजिगीषवः । कुलेष्वतिबला दैत्या अजायन्त महामुने १५ कस्यचित्त्वथ कालस्य धरणी भारपीडिता । जगाम मेरुशिखरं सदो यत्र दिवौकसाम् १६ तेषां सा कथयामास भूरिभारावपीडिता । दनुजात्मजदैत्योत्थं खेदकारणमात्मनः १७ एते भवद्भिरसुरा निहताः पृथुलौजसः । ते सर्वे मानुषे लोके जाता गेहेषु भूभृताम् १८ अक्षौहिण्यो हि बहुलास्तद्भाराती व्रजाम्यधः । तथा कुरुध्वं त्रिदशा यथा शान्तिर्भवेन्मम १९ पक्षिण ऊचुः ॥ तेजोभागैस्ततो देवा अवतेरुर्दिवो महीम् । प्रजानामुपकारार्थं भूभारहरणाय च २० यदिन्द्रदेहजं तेजस्तन्मुमोच स्वयं वृषः । कुन्त्यां जातो महातेजास्ततो राजा युधिष्ठिरः २१ बलं मुमोच पवनस्ततो भीमो व्यजायत । शक्रवीर्यार्धतश्चैव जज्ञे पार्थो धनञ्जयः २२ उत्पन्नौ यमजौ माद्र्यां शक्ररूपौ महाद्युती । पञ्चधा भगवानित्थमवतीर्णः शतक्रतुः २३ तस्योत्पन्ना महाभागा

---

निर्बळ झाला १०. इंद्राच्या देहापासून भ्रष्ट झालेलें बळ सर्वव्यापी, अव्यक्त व बळाधिदैवत वायूमध्यें प्रविष्ट झालें ११. गौतमरूप घेऊन इंद्रानें अहल्येशीं समागम केला असतां त्याचें रूप नाहींसें झालें १२. ह्मणजे शरीराच्या मुख्य व गौण अवयवांचे ठिकाणीं जी अतिमनोहर कांति होती ती दुष्ट इंद्राचा त्याग करून अश्विनीकुमारांकडे गेली १३. धर्म, तेज, बळ व रूप ह्यांनीं इंद्र वियुक्त झाल्याचें जाणून दैत्य त्याच्या पराजयाविषयीं यत्न करूं लागले १४; आणि हे महर्षे, ते इंद्रपराजयेच्छु अतिबलाढ्य दैत्य महावीर्यवान् राजांचे कुलामध्यें जन्मास आले १५. एकदां भारानें भूमि पीडित होऊन मेरुपर्वताच्या शिखरावर देवांच्या निवासस्थानाकडे गेली १६; आणि प्रचंड भारानें पीडित झालेल्या त्या भूमीनें दैत्यदानवजन्य स्वकीय दुःखाचें कारण त्यांना कथन केलें १७. ( ती ह्मणाली ) तुह्मी ज्या महाबलाढ्य असुरांचा वध केला ते सर्व मनुष्यलोकीं राजकुलांत अवतीर्ण झाले आहेत १८; त्यांच्या पुष्कळ अक्षौहिणी आहेत व त्यांच्या भारानें मी खालीं जात आहें. ह्यास्तव हे देवहो, मला शान्ति प्राप्त होईल अशी व्यवस्था करा " १९. पक्षी ह्मणतातः—नंतर भूभारहरण व प्रजेवर उपकार करण्याकरितां देव आपापल्या तेजाच्या अंशानें भूमीवर अवतीर्ण झाले २०. इंद्रदेहांतील जें तेज होतें तें धर्मानें स्वतः सोडिलें व त्याच्यापासून महातेजस्वी कुंतीपुत्र युधिष्ठिर उत्पन्न झाला २१. इंद्राचें बळ वायूनें सोडिलें व त्यापासून भीम उत्पन्न झाला, इंद्राच्या अर्ध्या वीर्यापासून अर्जुन उत्पन्न झाला २२; आणि अश्विनीकुमारांचे ठिकाणीं जी इंद्राची कांति गेलेली होती तिच्या योगानें माद्रीचे

पत्नी कृष्णा हुताशनात् २४यत्रैकस्यैकस्य सा पत्नी कृष्णा नान्यस्य कस्यचित् । योगीश्वराः शरीराणि कुर्वन्ति बहुलान्यपि २५ पञ्चानामेकपत्नीत्वमित्येतत्कथितं तव । श्रूयतां बलदेवोऽपि यथा यातः सरस्वतीम् २६ (२९२) इति मार्कण्डेयपुराणे इन्द्रविक्रियानाम पञ्चमोऽध्यायः ॥५॥

पक्षिण ऊचुः । रामः पार्थे परां प्रीतिं ज्ञात्वा कृष्णस्य लाङ्गली । चिन्तयामास बहुधा किं कृतं सुकृतं भवेत् १ कृष्णेन हि विना नाहं यास्ये दुर्योधनान्तिकम् । पाण्डवान्वा समाश्रित्य कथं दुर्योधनं नृपम् २ जामातरं तथा शिष्यं घातयिष्ये नरेश्वरम् । तस्मान्न पार्थं यास्यामि नापि दुर्योधनं नृपम् ३ तीर्थेष्वाप्लावयिष्यामि तावदात्मानमात्मना । कुरूणां पाण्डवानां च यावदन्ताय कल्पते ४ इत्यामन्त्र्य हृषीकेशं पार्थदुर्योधनावपि । जगाम द्वारकां शौरिः स्वसैन्यपरिवारितः ५ गत्वा द्वारवतीं रामो हृष्टपुष्टजनाकुलाम् । श्वोगन्तव्येषु तीर्थेषु पपौ पानं हलायुधः ६ पीतपानो जगामाथ रैवतोद्यानमृद्धिमत् । हस्ते गृहीत्वा सुमदां रेवतीमप्सरोपमाम् ७ स्त्रीकदम्बकमध्यस्थो ययौ मत्तः पदा स्खलन् । ददर्श च वनं वीरो रमणीयमनुत्तमम् ८ सर्वर्तुफलपुष्पाढ्यं शाखामृगगणाकुलम् । पुण्यं पद्मवनोपेतं सपल्वलमहावनम् ९ स शृण्वन्प्रीतिजननान्वल्गून्मदकलाञ्छुभान् । श्रोत्ररम्यान्सुमधुराञ्छब्दान्खगमुखे-

---

ठिकाणीं महातेजस्वी नकुलसहदेव उत्पन्न झाले. ह्याप्रमाणें भगवान् इंद्र पांच रूपांनीं अवतीर्ण झाला २३. महाभाग्यवती इंद्रपत्नी अग्नीपासून कृष्णा ह्या नांवानें अवतीर्ण झाली २४. ती कृष्णा एका इंद्राचीच पत्नी असून दुसरी कोणाचीही नाहीं. योगीश्वर पुष्कळ शरीरें धारण करीत असतात ( त्याचप्रमाणें एकच इंद्र पांच पांडवांच्या रूपानें अवतीर्ण झालेला होता ) २५. पांच पांडवांची एक पत्नी कशी हें आपणांला कथन केलें. आतां बलराम हा सरस्वतीला कसा गेला हें ऐका २६. (२९६) ह्याप्रमाणें मार्कंडेयपुराणांतील इंद्रविक्रियानामक पांचवा अध्याय समाप्त झाला ॥५॥

पक्षी ह्मणतातः—अर्जुनावर कृष्णाचें अत्यंत प्रेम पाहून हलायुध बलराम मनामध्यें नानाप्रकारानें विचार करूं लागला १. "काय केलें असतां बरें होईल? मी कृष्णाला सोडून दुर्योधनाकडे जाणार नाहीं. पांडवांना मिळून दुर्योधन राजाचा तरी २ मीं वध कसा करावा? तो जामात, शिष्य व प्रजाधिपति आहे. तस्मात् मी धर्माकडेही जात नाहीं व दुर्योधन राजाकडेही जात नाहीं ३. युद्धानें कौरवपांडवांचा अंत होईपर्यंत मी तीर्थयात्रा करीत राहीन" ४. असा विचार करून बलरामानें कृष्ण, धर्म व दुर्योधन ह्यांचा निरोप घेतला आणि स्वसैन्यासह तो द्वारकेकडे निघाला ५. हृष्ट व पुष्ट जनांनीं भरलेल्या द्वारकेंत गेल्यावर तीर्थयात्रेस निघण्याचे पूर्व दिवशीं बलरामानें मद्यपान केलें ६; आणि अप्सरेप्रमाणें असलेल्या मदमत्त रेवतीचा हात धरून तो समृद्ध रैवतोपवनामध्यें गेला ७. स्त्रीसमुदायांत असलेला तो मत्त बलराम अडखळत अडखळत जाऊं लागला असतां अत्युत्कृष्ट रमणीय वन त्या वीराच्या दृष्टीं पडलें ८. त्या वनांत सर्व ऋतूंतील फळें व पुष्पें होतीं; वानरगणांनीं तें भरलें होतें; कमलवनानें आणि सरोवरयुक्त महावनानें तें पवित्र वन भरलेलें होतें ९.

रितान् १० सर्वर्तुफलभाराढ्यान्सर्वर्तुकुसुमोज्ज्वलान्। अपश्यत्पादपांस्तत्र विहंगैरुपनादितान् ११ आम्रानाम्रातकान्भव्यान्नारिकेलान्सतिन्दुकान्। आबिल्वकांस्तथा जीरान्दाडिमान्बीजपूरकान् १२ पनसाँल्लकुचान्मोचान्नीपांश्चातिमनोहरान्। पारावतांश्च कङ्कोलान्नलिनानम्लवेतसान् १३ भल्लातकानामलकांस्तिन्दुकांश्च महाफलान्। इंगुदान्करमर्दांश्च हरीतकविभीतकान् १४ एतानन्यांश्च स तरून्ददर्श यदुनन्दनः। तथैवाशोकपुन्नागकेतकीबकुलानथ १५ चम्पकान्सप्तपर्णांश्च कर्णिकारान्समालतीन्। पारिजातान्कोविदारान्मन्दारान्बदराँस्तथा १६ पाटलान्पुष्पितान्रम्यान्देवदारुद्रुमांस्तथा। सालांस्तालांस्तमालांश्च किंशुकान्वञ्जुलान्वरान् १७ चकोरैः शातपत्रैश्च भृङ्गराजैस्तथा शुकैः। कोकिलैः कलविङ्कैश्च हारीतैर्जीवजीवकैः १८ प्रियपुत्रैश्चातकैश्च तथान्यैर्विविधैः खगैः। श्रोत्ररम्यं सुमधुरं कूजद्भिश्चाप्यधिष्ठितम् १९ सरांसि च मनोज्ञानि प्रसन्नसलिलानि च। कुमुदैः पुण्डरीकैश्च तथा नीलोत्पलैः शुभैः २० कल्हारैः कमलैश्चापि आचितानि समन्ततः। कादम्बैश्चक्रवाकैश्च तथैव जलकुक्कुटैः २१ कारण्डवैः प्लवैर्हंसैः कूर्मैर्मद्गुभिरेव च। एभिश्चान्यैश्च कीर्णानि समन्ताज्जलचारिभिः २२ क्रमेणेत्थं वनं शौरिर्वीक्षमाणो मनोरमम्। जगामानुगतः स्त्रीभिर्लतागृहमनुत्तमम् २३ स ददर्श द्विजांस्तत्र वेदवेदाङ्गपारगान्। कौशिकान्भार्गवांश्चैव भरद्वाजान्सगौतमान् २४

---

जातां जातां कानाला रम्य, अतिमधुर, शुभ व आनंदकारक असे पक्ष्यांचे ध्वनि त्यानें ऐकिले १०. नंतर सर्व ऋतूंतील फलभारांनीं युक्त व सर्व ऋतूंतील पुष्पांनीं झळकणारे वृक्ष तेथें असून ते पक्ष्यांनीं नादित झालेले आहेत असें त्यानें पाहिलें ११. आम्र, भव्य आम्रतरु, नारळ, तिंदुक, बिल्वक, जीर, दाडिम, बीजपूरक १२, पनस, लकुच, मोच, अति मनोहर नीप, पारावत, कंकोल, नलिन, आम्लवेतस, १३, भल्लातक, आमलक मोठ्या फळांचे तिंदुक, इंगुद, करमर्द, हरीतक व बिभीतक १४, हे व इतरही वृक्ष त्या बलरामानें पाहिले. त्याचप्रमाणें अशोक, पुन्नाग, केतकी, बकुळ १५, चंपक, सप्तपर्ण, कर्णिकार, मालती, पारिजात, कोविदार, मंदार, बदर १६, प्रफुल्लित पाटल, रम्य देवदारु, साल, ताल, तमाल, पलाश व उत्कृष्ट वंजुल हे वृक्ष त्यानें पाहिले १७. चकोर, शातपत्र, भृंगराज, शुक, कोकिल, कलविंक, हारीत, जीवजीवक १८, प्रियपुत्र, चातक आणि श्रवणेंद्रियाला रम्य व अतिमधुर ध्वनि करणारे इतरही पक्षी त्या वनांत आहेत असें त्याच्या दृष्टीं पडलें १९. त्या वनांत निर्मळ उदकानें युक्त असलेलीं मनोहर सरोवरें—कुमुद, पुंडरीक, शुभ नीलोत्पल, कल्हार इत्यादि नाना प्रकारच्या कमलांनीं सभोंवतीं—व्याप्त झालेलीं होतीं आणि कादंब, चक्रवाक, जलकुक्कुट २०, २१, कारंडव, प्लव, हंस, कूर्म, व मद्गु ह्या व इतरही जलचर प्राण्यांनीं तीं सरोवरें व्याप्त होतीं २२. ह्याप्रमाणें तें मनोहर वन क्रमानें पहात पहात स्त्रियांसह असलेला बलराम अनुपम लतागृहांत गेला २३; तो तेथें कौशिक, भृगु, भरद्वाज, गौतम इत्यादि अनेक वंशांमध्यें उत्पन्न झालेले व वेदवेदांगपारंगत द्विजश्रेष्ठ मोठ्या मोठ्या कृष्णाजिनांवर,

विविधेषु च संमुनान्वेषु द्विजसत्तमान् । कथाश्रवणवहोत्काउपविष्टान्महरस्य च २५कृष्णाजिनोत्तरीयेषु कुशेषु च वृसीषु च । सूतं च तेषां मध्यस्थं कथयानं कथाः शुभाः २६ पौराणिकीः सुरर्षीणामाद्यानां चरिताश्रयाः । दृष्ट्वा रामं द्विजाः सर्वे मधुपानारुणेक्षणम् २७ मत्तोऽयमिति मन्वानाः समुत्तस्थुस्त्वरान्विताः । पूजयन्तो हलधरमृते तं सूतवंशजम्२८ ततः क्रोधसमाविष्टो हली सूतं महाबलः । निजघान निवृत्ताक्षः क्षोभितारोषदानवः २९ अध्यास्यति पदं ब्राह्मं तस्मिन्सूते निपातिते । निष्क्रान्तास्ते द्विजाः सर्वे वनात्कृष्णाजिनाम्बराः ३० अवधूतं तथात्मानं मन्यमानो हलायुधः। चिन्तयामास सुमहन्मया पापमिदं कृतम् ३१ ब्राह्मं स्थानं गतो ह्येष यत्सूतो विनिपातितः। तथा हीमे द्विजाः सर्वे मामवेक्ष्य विनिर्गताः ३२ शरीरस्य च मे गन्धो लोहस्येवासुखावहः। आत्मानं चावगच्छामि ब्रह्मघ्नमिव कुत्सितम्३३ धिगमर्षं तथा मद्यमतिपानमभीरुताम् । यैराविष्टेन सुमहन्मया पापमिदं कृतम् ३४ तत्क्षयार्थं चरिष्यामि व्रतं द्वादशवार्षिकम् । स्वकर्मख्यापनं कुर्वन्प्रायश्चित्तमनुत्तमम् ३५ अथ येयं समारब्धा तीर्थयात्रा मयाधुना । एतामेव प्रयास्यामि प्रतिलोमां सरस्वतीम् ३६ अतो जगाम रामोऽसौ प्रतिलोमां सरस्वतीम्। ततः परं श्रृणुष्वेमं पाण्डवेय-

---

दर्भासनांवर व चटयांवर कथा ऐकण्याकरितां उत्सुक होऊन बसल्याचें व त्याच्या मध्यभागीं आद्य देवर्षींचीं चरित्रें ज्यांत आहेत अशा पुराणांतील शुभ कथा सूत कथन करीत असल्याचें त्यानें अवलोकन केलें. मद्यपानानें नेत्र आरक्तवर्ण झालेल्या बलरामाला पहातांक्षणीं सर्वही द्विज २४,२५,२६,२७ हा मत्त झाला आहे असें समजून त्याचा संमान करण्याकरितां सत्वर उठले; परंतु, पौराणिक सूत उठला नाहीं २८. तेव्हां सर्व दानवांना ज्यानें क्षोभ उत्पन्न केला आहे व ज्याची दृष्टि फिरून गेलेली आहे अशा त्या महाबलाढ्य बलरामानें क्रुद्ध होऊन सूताचा वध केला २९. ह्याप्रमाणें त्या सूताचा वध होऊन तो ब्रह्मलोकीं गेला असतां कृष्णाजिन धारण करणारे ते सर्वही द्विज वनांतून बाहेर पडले ३०. ह्याप्रमाणें स्वतःचा अपमान झाल्याचें समजून बलराम मनामध्यें ह्मणाला " मीं हें फारच मोठें पातक केलें आहे ३१. कारण, मी सूताचा वध केला; हा सूत तर ब्रह्मपदीं जाऊन मिळाला आणि हे सर्व द्विजही माझ्याकडे पाहून चालते झाले ३२; इतकेंच नव्हे परंतु, माझ्या शरीराचा गंधही लोहगंधाप्रमाणें दुःखावह होऊं लागला आहे; आणि मी स्वतःला ब्रह्मघातक्याप्रमाणें निंद्य समजत आहें ३३. ज्याच्या अधीन झाल्यामुळें मीं हें महापातक केलें त्या क्रोधाला, अतिपानाला व शौर्याला धिक्कार असो; व त्याचप्रमाणें मलाही धिक्कार असो ३४. ह्यास्तव, स्वकीय पातक सांगत सांगत मी पापक्षयार्थ द्वादशवार्षिक व्रतरूप उत्कृष्ट प्रायश्चित्त करीन ३५. सांप्रत मीं जी ही तीर्थयात्रा आरंभिली आहे तीच शेवटास नेण्याकरितां मी प्रतिलोम असलेल्या सरस्वतीप्रत प्रथम जाऊन शेवटास नेईन. " ३६. असा विचार करून हा बलराम उलट ह्मणजे भूमीमध्यें वाहणाऱ्या सरस्व-

कथाश्रयम् ३७ (३३२) इति मार्कण्डेयपुराणे बलदेवब्रह्महत्याकथनं नाम षष्ठोऽध्यायः ६ ॥

धर्मपक्षिण ऊचुः । हरिश्चन्द्रेति राजर्षिरासीत्त्रेतायुगे पुरा । धर्मात्मा पृथिवीपालः प्रोल्लसत्कीर्तिरुत्तमः १ न दुर्भिक्षं न च व्याधिर्नाकालमरणं नृणाम् । नाधर्मरुचयः पौरास्तस्मिञ्छासति पार्थिवे २ बभूवुर्न तथोन्मत्ता धनवीर्यतपोमदैः । नाजायन्त स्त्रियश्चैव काश्चिदप्राप्तयौवनाः ३ स कदाचिन्महाबाहुररण्येऽनुसरन्मृगम् । शुश्राव शब्दमसकृत्त्रायस्वेति च योषिताम् ४ स विहाय मृगं राजा मा भैषीरित्यभाषत । मयि शासति दुर्मेधाः कोऽयमन्यायवृत्तिमान् ५ तत्क्रन्दितानुसारी च सर्वारम्भविघातकृत् । एतस्मिन्नन्तरे रौद्रो विघ्नराट् समचिन्तयत् ६ विश्वामित्रोऽयमतुलं तप आस्थाय वीर्यवान् । प्रागसिद्धा भवादीनां विद्याः साधयति व्रती ७ साध्यमानाः क्षमामौनचित्तसंयमिनाऽमुना । ता वै भयार्ताः क्रन्दन्ति कथं कार्यमिदं मया ८ तेजस्वी कौशिकश्रेष्ठो वयमस्य सुदुर्बलाः । क्रोशन्त्येतास्तथा भीता दुष्पारं प्रतिभाति मे ९ अथवाऽयं नृपः प्राप्तो मा भैरिति वदन्मुहुः । इममेव प्रविश्याशु साधयिष्ये यथेप्सितम् १० इति संचिन्त्य रौद्रेण विघ्नराजेन वै ततः । तेनाविष्टो नृपः कोपादिदं वचनमब्रवीत् ११ कोऽयं बध्नाति वस्त्रान्ते

नीची यात्रा करूं लागला. असो; आतां पांडवांच्या कथेला आधारभूत असलेला हा वृत्तांत आपण ऐका ३७. ( ३३२ ) याप्रमाणें मार्कंडेयपुराणांतील बलदेवब्रह्महत्याकथननामक सहावा अध्याय समाप्त झाला ॥ ६ ॥

धर्मपक्षी ह्मणतातः–पूर्वी त्रेतायुगामध्यें हरिश्चंद्र राजर्षि होऊन गेला. तो उत्कृष्ट भूपाल धर्मात्मा असून महाकीर्तिमान् होता १. त्या राजाच्या कारकीर्दीत. दुर्भिक्ष, व्याधि, अकालीं मृत्यु व प्रजेला अधर्माची आवड ह्यांचा अभाव होता २. धन, वीर्य, तप व मद ह्यांनीं लोक उन्मत्त होत नसत; आणि यौवनावस्था प्राप्त झाल्याशिवाय स्त्रिया गर्भिणी होत नसत ३. एकदां तो महापराक्रमी राजा अरण्यांत मृगया करीत असतांना "त्राहि त्राहि" असा स्त्रियांचा शब्द अनेक वेळां त्याच्या कानांवर आला ४. तेव्हां मृग सोडून तो राजा ह्मणाला " भिऊं नको, माझ्या कारकीर्दीत कोण हा दुष्ट अन्यायानें वागत आहे ! " ५. स्त्रियांच्या त्या ओरडण्याबरोबरच सर्वारंभ विघातक क्रूर विघ्नराजानें मनांत आणिलें ६. " हा वीर्यवान् व व्रतस्थ विश्वामित्र अतुल तप करून पूर्वी शिवादिकांनाही साध्य न झालेल्या विद्या प्राप्त करून घेत आहे ७; आणि क्षमा, मौन व मनःसंयमन ह्यांनीं युक्त असलेल्या ह्या विद्या साध्य करूं लागल्यामुळें त्या भयभीत होऊन आक्रोश करीत आहेत. तेव्हां येथें मी काय करूं कसें ! ८. हा श्रेष्ठ कुशिकवंशज विश्वामित्र तेजस्वी असून आह्मी अति-दुर्बळ आहों, असें समजून ह्या भयभीत झालेल्या विद्या आक्रोश करीत आहेत; आणि यांना निर्भय करणें मला दुर्घट दिसत आहे ९. अथवा " भिऊं नको " असें वारंवार ह्मणत ह्मणत हा राजा येथें आला आहे; तेव्हां याच्या शरीरांत प्रवेश करून मी इष्ट कार्य सिद्धीस नेतों " १०. असा विचार करून क्रूर विघ्नराज राजामध्यें प्रविष्ट झाला असता राजा क्रोधानें ह्मणाला ११ " बलरूप उष्ण तेजानें प्रदीप्त असलेला

पातयन् पापकृत्तरः। बद्धोऽङ्गतेजसा दीप्ते मयि पत्न्यामुपस्थिते १२ सोऽद्य मत्कार्मुकाक्षेपविदीपितदिगन्तरैः। शरैर्निर्भिन्नसर्वाङ्गो दीर्घनिद्रां प्रवेक्ष्यति १३ विश्वामित्रस्ततः क्रुद्धः श्रुत्वा तन्नृपतेर्वचः। क्रुद्धे चर्षिवरे तस्मिन्नेशुर्विद्याः क्षणेन ताः १४ स चापि राजा तं दृष्ट्वा विश्वामित्रं तपोनिधिम्। भीतः प्रावेपतात्यर्थं सहसाश्वत्थपर्णवत् १५ स दुरात्मन्निति यदा मुनिस्तिष्ठेति चाब्रवीत्। ततः स राजा विनयात्प्रणिपत्याभ्यभाषत १६ भगवन्नेष धर्मो मे नापराधो मम प्रभो। न क्रोद्धुमर्हसि मुने निजधर्मरतस्य मे १७ दातव्यं रक्षितव्यं च धर्मज्ञेन महीक्षिता। चापं चोद्यम्य योद्धव्यं धर्मशास्त्रानुसारतः १८ विश्वामित्र उवाच॥ दातव्यं कस्य के रक्ष्याः कैर्योद्धव्यं च ते नृप। क्षिप्रमेतत्समाचक्ष्व यद्यधर्मभयं तव १९ हरिश्चन्द्र उवाच॥ दातव्यं विप्रमुख्येभ्यो ये चान्ये कृशवृत्तयः। रक्ष्या भीताः सदा युद्धं कर्तव्यं परिपन्थिभिः २० विश्वामित्र उवाच॥ यदि राजा भवान्सम्यग्राजधर्ममवेक्षते। निर्वेष्टुकामो विप्रोऽहं दीयतामिष्टदक्षिणा २१ पक्षिण ऊचुः। एतद्राज्ञो वचः श्रुत्वा प्रहृष्टेनान्तरात्मना। पुनर्जातमिवात्मानं मेने प्राह च कौशिकम् २२ उच्यतां भगवन्यत्ते दातव्यमविशङ्कितम्। दत्तमित्येव तद्विद्धि यद्यपि स्यात्सुदुर्लभम् २३ हिरण्यं वा सुवर्णं वा पुत्रः पत्नी कलेवरम्। प्राणा राज्यं पुरं लक्ष्मीर्यदभिप्रेतमात्मनः २४ विश्वामित्र उवाच॥ राजन्प्रतिगृहीतोऽयं यस्ते दत्तः प्रतिग्रहः। प्रयच्छ

मी अधिपति सांनिध असतांना हा कोण पापी पुरुष पदरीं अग्नि बांधीत आहे? १२. माझ्या धनुष्यापासून सुटून दिशा प्रदीप्त करणाऱ्या बाणांनीं त्या पाप्याचें सर्व शरीर विदीर्ण होऊन तो आज मृत्युमुखीं पडेल " १३. नंतर राजाचें तें भाषण ऐकून विश्वामित्र क्रुद्ध झाला व तो ऋषिश्रेष्ठ क्रुद्ध होतांक्षणीं त्या विद्या नाहींशा झाल्या १४. त्या तपोनिधि विश्वामित्राला पाहून तो राजाही भिऊन गेला आणि पिंपळाच्या पानाप्रमाणें एकाएकीं अतिशय कांपूं लागला १५. नंतर " दुष्टा, थांब " असें जेव्हां मुनि म्हणाला तेव्हां विनयपूर्वक प्रणिपात करून तो राजा म्हणाला १६ " हे प्रभो, भगवन्, हा माझा धर्म आहे; माझा अपराध नाहीं. हे मुने, मज स्वधर्मनिष्ठावर रागावणें आपणांला योग्य नाहीं १७. कारण, धर्मवेत्त्या राजानें दान दिलें पाहिजे, रक्षण केलें पाहिजे आणि धनुष्य सज्ज करून धर्मशास्त्रानुसार युद्धही केलें पाहिजे " १८. विश्वामित्र म्हणतो:—हे राजा, तुझ्या दानास, रक्षणास व युद्धास पात्र कोण? याचें उत्तर, तुला धर्मभय असल्यास सत्वर दे १९. हरिश्चंद्र म्हणतो:—श्रेष्ठ विप्र व उपजीविकेचें साधन नसलेले इतरही विप्र दानास, भयभीत झालेले रक्षणास व शत्रु युद्धास पात्र होत २०. विश्वामित्र म्हणतो:—तूं राजा असून जर राजधर्म चांगल्या प्रकारें जाणत असशील तर मी विवाहेच्छु विप्र आहें; मला इष्ट दक्षिणा दे २१. पक्षी म्हणतात:—हें भाषण ऐकून राजा स्वतःचा पुनर्जन्म झाला असें समजला आणि प्रसन्न मनानें विश्वामित्राला म्हणाला २२ " हे भगवन्, आपणांला हवें असेल तें निःशंकपणें सांगा आणि तें जरी अत्यंत दुर्लभ असलें तरी दिलेंच असें समजा २३. रजत, सुवर्ण, पुत्र, कन्या, शरीर, प्राण, राज्य, नगर व लक्ष्मी ह्यांपैकीं जें आपणांला हवें असेल

निहतकण्टकम्। अवशिष्टमिदं ब्रह्मन्त्र देहत्रयं मम ३७ विश्वामित्र उवाच । तथापि खलु दातव्या त्वया मे यज्ञदक्षिणा । विशेषतो ब्राह्मणानां हन्त्यदत्तं प्रतिश्रुतम् ३८ यावत्तोषो राजसूये ब्राह्मणानां भवेन्नृप । तावदेव तु दातव्या दक्षिणा राजसूयिकी ३९ प्रतिश्रुत्य च दातव्यं योद्धव्यं चाततायिभिः। रक्षितव्यास्तथा चार्तास्त्वयैव प्राक्प्रतिश्रुतम् ४० हरिश्चन्द्र उवाच ॥ भगवन्साम्प्रतं नास्ति दास्ये कालक्रमेण ते। प्रसादं कुरु विप्रर्षे सद्भावमनुचिन्त्य च ४१ विश्वामित्र उवाच॥ किं प्रमाणो मया कालः प्रतीक्ष्यस्ते जनाधिप। शीघ्रमाचक्ष्व शापाग्नि-रन्यथा त्वां प्रधक्ष्यति ४२ हरिश्चन्द्र उवाच। मासेन तव विप्रर्षे प्रदास्ये दक्षिणाधनम्। साम्प्रतं नास्ति मे वित्तमनुज्ञां दातुमर्हसि ४३ विश्वामित्र उवाच। गच्छ गच्छ नृपश्रेष्ठ स्वधर्ममनुपालय। शिवश्च तेऽध्वा भवतु मा सन्तु परिपन्थिनः ४४ पक्षिण ऊचुः॥ अनुज्ञातः स गच्छेति जगाम वसुधाधिपः।पद्भ्यामनुचिता गन्तुमन्वगच्छत तं प्रिया ४५ तं सभार्यं नृपश्रेष्ठं निर्यान्तं ससुतं पुरात्। दृष्ट्वा प्रचुक्रुशुः पौरा राज्ञश्चैवानुयायिनः ४६ हा नाथ किं जहास्यस्मान्नित्यार्ति-परिपीडितान्। त्वं धर्मतत्परो राजन्पौरानुग्रहकृत्तथा ४७ नयास्मानपि राजर्षे यदि धर्ममवेक्षसे। मुहूर्तं तिष्ठ राजेन्द्र भवतो मुखपङ्कजम् ४८ पिबामो नेत्रभ्रमरैः कदा द्रक्ष्यामहे पुनः। यस्य प्रयातस्य पुरो यान्ति पृष्ठे च पार्थिवाः ४९ तस्यानुयाति भार्येयं गृहीत्वा बालकं सुतम्। यस्य

---

आपणांला देऊन आज माझ्यापाशीं हे तीन देह अवशिष्ट आहेत ३७. विश्वामित्र ह्मणतोः—तथापि, तूं मला यज्ञदक्षिणा दिलीच पाहिजे. विशेषतः ब्राह्मणांना कबूल केलेलें न दिल्यास स्वतःचा घात होतो ३८. हे राजा, जेवढ्यानें राजसूययागांत ब्राह्मणांचा संतोष होईल तेवढी राजसूयदक्षिणा दिलीच पाहिजे ३९. शिवाय कबूल केल्यावर देणें, आततायांशीं युद्ध करणें व आर्तांचें रक्षण करणें हें स्वकर्म ह्मणून तूंच पूर्वी प्रतिज्ञेनें सांगितलें आहेस ४०. हरिश्चंद्र ह्मणतोः—भगवन्, सांप्रत दक्षिणा नाहीं; मी आपणांला कालांतरानें देईन. हे ब्रह्मर्षे, माझें सत्यवर्तन लक्ष्यांत घेऊन आपण कृपा करा ४१. विश्वामित्र ह्मणतोः—हे राजा, मी किती वेळ तुझी वाट पहावी तें सत्वर सांग; नाहीं तर शापाग्नि तुला दग्ध करील ४२. हरिश्चंद्र ह्मणतोः—हे विप्रर्षे, आपणांला महिन्यानें दक्षिणा देईन. सांप्रत माझ्यापाशीं द्रव्य नाहीं; आपण मला अनुज्ञा द्या ४३. विश्वामित्र ह्मणतोः—हे नृपश्रेष्ठा, जा, जा आणि स्वधर्मानें वाग. मार्ग तुला सुखकारक होवो; व शत्रु नाहींसे होवोत ४४. पक्षी ह्मणतातः—जा, अशी अनुज्ञा झाली असतां राजा निघाला; व पायांनीं चालण्याची संवय नसलेली त्याची प्रियाही त्याच्या मागोमाग गेली ४५. तो नृपश्रेष्ठ स्त्रीपुत्रांसह नगरांतून जात असल्याचें पाहून राजाचे अनुयायी व पौरजन आक्रोश करूं लागले ४६. "हे नाथ, हे राजा, तूं स्वधर्मतत्पर व नागरिकांवर अनुग्रह करणारा असून आह्मांला कायमचे दुःखांत टाकून कां बरें जात आहेस ? ४७. हे राजर्षे, धर्माकडे लक्ष्य असेल तर तूं आह्मांलाही घेऊन जा. हे राजेंद्रा, क्षणभर थांब तरी ! ह्मणजे नेत्ररूप भ्रमरांनीं आह्मी तुझ्या मुखकमलाचें पान करूं. पुनरपि तुला आह्मी

प्रथमं तावद्दक्षिणां राजसूयिकीम् २५ राजोवाच ॥ ब्रह्मंस्तामपि दास्यामि दक्षिणां भवतो-ऽह्यहम्। व्रियतां द्विजशार्दूल यस्तवेष्टः प्रतिग्रहः २६ विश्वामित्र उवाच। ससागरां धरामेतां स-भूभृद्ग्रामपत्तनाम्। राज्यं च सकलं वीर रथाश्वगजसंकुलम् २७ कोष्ठागारं च कोशं च यच्चा-न्यद्विद्यते तव। विना भार्यां च पुत्रं च शरीरं च तवानघ २८ धर्मं च सर्वधर्मज्ञ यो यान्तमनु-गच्छति। बहुना वा किमुक्तेन सर्वमेतत्प्रदीयताम् २९ पक्षिण ऊचुः ॥ प्रहृष्टेनैव मनसा सोऽविकारमुखो नृपः। तस्यर्षेर्वचनं श्रुत्वा तथेत्याह कृताञ्जलिः ३० विश्वामित्र उवाच॥ सर्वस्वं यदि मे दत्तं राज्यमुर्वी बलं धनम्। प्रभुत्वं कस्य राजर्षे राज्यस्थे तापसे मयि ३१ हरि-श्चन्द्र उवाच। यस्मिन्नपि मया काले ब्रह्मन्दत्ता वसुन्धरा। तस्मिन्नपि भवान्स्वामी किमुताद्य महीपतिः ३२ विश्वामित्र उवाच। यदि राजंस्त्वया दत्ता मम सर्वा वसुन्धरा। यत्र मे विषये स्वाम्यं तस्मान्निष्क्रान्तुमर्हसि ३३ श्रोणीसूत्रादिसकलं मुक्त्वा भूषणसंग्रहम्। तरुवल्कल-माबध्य सहपत्न्या सुतेन च ३४ पक्षिण ऊचुः। तथेति चोक्त्वा कृत्वा च राजा गन्तुं प्रचक्रमे। स्वपत्न्या शैब्यया सार्धं बालकेनात्मजेन च ३५ व्रजतः स ततो रुद्ध्वा पन्थानं प्राह तं नृपम्। क यास्यसीत्यदत्त्वा मे दक्षिणां राजसूयिकीम् ३६ हरिश्चन्द्र उवाच। भगवन्राज्यमेतत्ते दत्तं

तें आपण सांगा २४. विश्वामित्र ह्मणतोः— हे राजा, तूं दिलेला हा प्रतिग्रह मीं स्वीकारिला आहे. परंतु, प्रथम तूं मला राजसूययागाची दक्षिणा दे २५. राजा ह्मणतोः— हे ब्रह्मन्, हे द्विजश्रेष्ठ; मी आपणांला तीही दक्षिणा देईन. आपणाला जो प्रतिग्रह इष्ट असेल तो मागा २६. विश्वामित्र ह्मणतोः— हे वीरा, पर्वत, गांव, शहरें व समुद्र ह्यांसह ही पृथ्वी; रथ, अश्व व गज ह्यांनीं भरलेलें सर्व राज्य २७; कोठी, खजिना, हे सर्व धर्मवेत्त्या, परलोकीं जाणाऱ्या प्राण्याबरोबर जाणारा धर्म आणि भार्या, पुत्र व स्वकीय शरीर ह्यांशिवाय जें कांहीं तुझ्यापाशीं असेल तें अथवा फार कशाला, सर्व कांहीं तूं मला दे २८,२९. पक्षी ह्मणतातः— त्या ऋषीचें भाषण ऐकूनही निर्विकार मुखानेंच युक्त असलेला तो राजा हात जोडून " ठीक आहे " असें प्रसन्न मनानेंच त्याला ह्मणाला ३०. विश्वामित्र ह्मणतोः— तूं जर मला राज्य, पृथ्वी, सैन्य व धन असें सर्वस्व दिलें आहेस तर मी तपस्वी राज्याधिकारी झालों असतांना येथें प्रभुत्व कोणत्या राजाचें असणार आहे ! ३१. हरिश्चंद्र ह्मणतोः—हे ब्रह्मन्, मीं जेव्हां पृथ्वी दिली तेव्हांच आपण स्वामी व भूपति झाला तेव्हां आतां शब्द पाहिजे कशाला ? ३२. विश्वामित्र ह्मणतोः—हे राजा, तूं जर मला सर्व पृथ्वी दिली आहेस तर त्या प्रदेशांत माझें साम्य आहे तेथून तूं निघून जा ३३. साखळी, करगोटा वगैरे सर्व भूषणें काढून टाकून आणि पत्नी व पुत्र ह्यांसह वृक्षवल्कलें नेसून तूं चालता हो ३४. पक्षी ह्मणतातः—नंतर "ठीक आहे" असें ह्मणून व तसें करून पत्नी व औरस पुत्र ह्यांसह राजा निघाला ३५. परंतु, जात असलेल्या त्या राजाचा मार्ग अडवून विश्वामित्र त्याला ह्मणाला " राजसूयदक्षिणा मला दिल्यावांचून तूं जाणार कोठें ! " ३६. हरिश्चंद्र ह्मणतोः— हें निष्कंटक राज्य

सुपापोऽयं लोकान्कान्समवाप्स्यति ६२ येनायं यज्वनां श्रेष्ठः स्वराज्यादवरोपितः। केन वा श्रद्धया पूतं सुतं सोमं महाध्वरे। पीत्वा वयं प्रयास्यामो मुदं मन्त्रपुरःसरम् ६३ पक्षिण ऊचुः॥ इति तेषां वचः श्रुत्वा कौशिकोऽतिरुषान्वितः। शशाप तान्मनुष्यत्वं सर्वे यूयमवाप्स्यथ ६४ प्रसादितश्च तैः प्राह पुनरेव महामुनिः। मानुषत्वेऽपि भवतां भवित्री नैव सन्ततिः ६५ न दारसंग्रहश्चैव भविता न च मत्सरः। कामक्रोधविनिर्मुक्ता भविष्यथ सुराः पुनः ६६ ततोऽवतेरुरंशैः स्वैर्देवास्ते कुरुवेश्मनि। द्रौपदीगर्भसम्भूताः पञ्च वै पाण्डुनन्दनाः ६७ एतस्मात्कारणात्ते च पाण्डवेया महारथाः। न दारसंग्रहं प्राप्ताः शापात्तस्य महामुनेः ६८ एतत्ते सर्वमाख्यातं पाण्डवेयकथाश्रयम्। प्रश्नं चतुष्टयं गीतं किमन्यच्छ्रोतुमिच्छसि ६९ (४०१) इति श्रीमार्कण्डेयपुराणे द्रौपदेयोत्पत्तिकथनं नाम सप्तमोऽध्यायः ॥ ७ ॥

जैमिनिरुवाच ॥ भवद्भिरिदमाख्यातं यथा प्रश्नमनुक्रमात्। महत्कौतूहलं मेऽस्ति हारिश्चन्द्रकथां प्रति १ अहो महात्मना तेन प्राप्तं कृच्छ्रमनुत्तमम्। कच्चित्सुखमनुप्राप्तं तादृगेव द्विजोत्तमाः २ पक्षिण ऊचुः ॥ विश्वामित्रवचः श्रुत्वा स राजा प्रययौ शनैः। शैव्ययानुगतो दुःखी भार्यया बालपुत्रया ३ स गत्वा वसुधापालो दिव्यां वाराणसीं पुरीम्। नैषा मनुष्यभोग्येति शूलपाणेः परिग्रहः ४ जगाम पद्भ्यां दुःखार्त्तः सह पत्न्यानुकूलया। पुरीं प्रविश्य ददर्श विश्वामि-

---

स्वराज्यापासून च्युत केलें त्या ह्या महापापी विश्वामित्राला कोणते लोक प्राप्त होतील बरें ? आतां कोणाच्या महायागामध्यें श्रद्धेनें काढिलेला पवित्र सोम समंत्रक पिऊन आह्मी आनंदित व्हावें बरें ? ६२,६३. पक्षी ह्मणतातः—हें त्यांचें भाषण ऐकून विश्वामित्र अति क्रुद्ध झाला; आणि 'तुह्मी सर्वही मनुष्य व्हाल' असा त्यांना त्यानें शाप दिला ६४. परंतु, त्यांनीं प्रसन्न करून घेतल्यावर पुनरपि तो महर्षि ह्मणाला "मनुष्ययोनींतही तुह्मांला संतति होणार नाहीं ६५, विवाहसंबंध घडणार नाहीं व तुमच्या ठिकाणीं मत्सरही रहाणार नाहीं. कामक्रोधांपासून अलिप्त राहून तुह्मी पुनरपि देव व्हाल" ६६. तदनंतर ते देव कुरुकुलांत स्वकीयांशांनीं अवतीर्ण होऊन द्रौपदीचे ठिकाणीं पांच पांडुपुत्र जन्मले ६७. असा त्या महर्षीचा शाप झाल्यामुळें महारथी पांच पांडुपुत्र अविवाहित राहिले ६८. पांडवांच्या कथेशीं संबंध असलेले हे सर्व चारी प्रश्न आह्मीं कथन केले. आतां दुसरें काय ऐकण्याची आपली इच्छा आहे ? ६९. (४०१) ह्याप्रमाणें श्रीमार्कंडेयपुराणांतील द्रौपदीपुत्रांच्या उत्पत्तीविषयीं सातवा अध्याय समाप्त झाला ॥७॥

जैमिनि ह्मणतातः—आपण हीं प्रश्नांचीं उत्तरें अनुक्रमें दिलीं; परंतु, हरिश्चंद्राख्यान ऐकण्यास मी उत्सुक आहें १. हे द्विजश्रेष्ठहो, त्या महात्म्याला प्राप्त झालेल्या अनुपम दुःखाप्रमाणें अनुपम सुख प्राप्त झालें होतें काय ? २. पक्षी ह्मणतातः—विश्वामित्राचें भाषण ऐकून तो दुःखी राजा हळूं हळूं चालला व त्याच्या मागोमाग बालपुत्रानें युक्त असलेली त्याची भार्या शैव्यकन्याही चालली ३. मार्ग उल्लंघन केल्यानंतर वाराणसी नगरी शंकरानें स्वीकारिली असल्यामुळें मनुष्यांची त्यांजवर मालकी नाहीं असें समजून तो भूपाल त्या दिव्य नगरीमध्यें ४ दुःखाकुल होऊन

भृत्याः प्रयान्तस्य यान्त्यग्रे कुञ्जरस्थिताः ५० स एष पद्भ्यां राजेन्द्रो हरिश्चन्द्रोऽद्य गच्छति । हा राजन्सुकुमारं ते सुभ्रु सुत्वक्सुनासम् ५१ पथि पांसुपरिक्लिष्टं मुखं कीदृग्भविष्यति । तिष्ठ तिष्ठ नृपश्रेष्ठ स्वधर्ममनुपालय ५२ आनृशंस्यं परो धर्मः क्षत्रियाणां विशेषतः । किं दारैः किं सुतैर्नाथ धनैर्धान्यैरथापि वा ५३ सर्वमेतत्परित्यज्य च्छायाभूता वयं तव । हा नाथ हा महाराज हा स्वामिन्किं जहासि नः ५४ यत्र त्वं तत्र हि वयं तत्सुखं यत्र वै भवान् । नगरं तद्भवान्यत्र स स्वर्गो यत्र नो नृपः ५५ इति पौरवचः श्रुत्वा राजा शोकपरिप्लुतः । अतिष्ठत्स तदा मार्गे तेषामेवानुकम्पया ५६ विश्वामित्रोऽपि तं दृष्ट्वा पौरवाक्याकुलीकृतम् । रोषामर्षविवृत्ताक्षः समागम्य वचोऽब्रवीत् ५७ धिक्त्वां दुष्टसमाचारमनृतं जिह्मभाषिणम् । मम राज्यं च दत्त्वा यः पुनः प्राक्रष्टुमिच्छसि ५८ इत्युक्तः परुषं तेन गच्छामीति स वेपथुः । ब्रुवन्नेवं ययौ शीघ्रमाकर्षन्दयितां करे ५९ कर्षतस्तां ततो भार्यां सुकुमारीं श्रमातुराम् । सहसा दण्डकाष्ठेन ताडयामास कौशिकः ६० तां तथा ताडितां दृष्ट्वा हरिश्चन्द्रो महीपतिः । गच्छामीत्याह दुःखार्तो नान्यत्किंचिदुदाहरत् ६१ अथ विश्वे तदा देवाः पञ्च प्राहुः कृपालवः । विश्वामित्रः

---

कशी पहाणार? जो निघाला असतां मागें पुढें राजे चालत असतात ४८, ४९ त्याच्याबरोबर अल्पवयी पुत्र घेऊन केवळ ही भार्या जात आहे. जो निघाला असतां सेवक गजारूढ होऊन पुढें जात असतात ५० तो हा हरिश्चंद्र राजेंद्र आज पायांनीं जात आहे. हे राजा, उत्कृष्ट भिंवया, त्वचा व नासिका ह्यांनीं युक्त असलेलें तुझें सुकुमार ५१ मुख मार्गामध्यें धुळीनें भरलें असतां कसें वरें होईल? हे नृपश्रेष्ठा, थांब, थांब, स्वधर्मानें वाग ५२. सुजनता हा विशेषतः क्षत्रियांचा मुख्य धर्म होय. हे नाथ, स्त्री, पुत्र, धन व धान्य ह्यांच्यांशीं आह्मांला काय कर्तव्य आहे? ५३. हें सर्व सोडून आह्मी छायेप्रमाणें तुझ्याबरोबर येणार. हे महाराज, हे नाथ, हे प्रभो, तूं आह्मांला कां सोडीत आहेस? ५४. जेथें तूं तेथें आह्मी; जिकडे तूं तिकडेच आह्मांला सुख; जेथें तूं तेंच आमचें नगर आणि जेथें आमचा राजा तोच स्वर्ग ५५. असें नागरिकांचें भाषण ऐकून राजा शोकाकुल झाला आणि त्यांचीच दया असल्यामुळें मार्गांत उभा राहिला ५६. परंतु, नागरिकांच्या भाषणानें राजा व्याकुळ झालेला पाहून विश्वामित्राचे नेत्र क्रोधानें चढून गेले व तेथें येऊन तो ह्मणाला ५७. "दुराचारी, असत्य व कपटयुक्त भाषण करणारा जो तूं त्या तुला धिक्कार असो. मला राज्य देऊन पुनरपि तें घेण्याची इच्छा करीत आहेस काय?" ५८. त्यानें असें कठोर भाषण केल्यावर राजा प्रियेला हातीं धरून 'जातों' असें ह्मणत ह्मणतच थरथर कांपत कांपत सत्वर निघाला ५९. ह्याप्रमाणें तो श्रमानें व्याकुळ झालेल्या आपल्या सुकुमार भार्येला ओढीत चालला असतां विश्वामित्रानें एकाएकीं तिला दंड मारिला ६०. ती त्याप्रमाणें ताडित झाल्याचें पाहून दुःखाकुल झालेला हरिश्चंद्र भूपति दुसरें कांहींएक न बोलतां 'जातों' एवढेंच ह्मणाला ६१. तेव्हां पांच कृपाळू विश्वेदेव ह्मणाले "ज्यानें यज्ञ करणाऱ्यामध्यें श्रेष्ठ असलेल्या ह्या राजाला

सुपापोऽयं लोकान्कान्समवाप्स्यति ६२ येनायं यज्वनां श्रेष्ठः स्वराज्यादवरोपितः। कस्य वा श्रद्धया पूतं सुतं सोमं महाध्वरे। पीत्वा वयं प्रयास्यामो मुदं मन्त्रपुरःसरम् ६३ पक्षिण ऊचुः॥ इति तेषां वचः श्रुत्वा कौशिकोऽतिरुषान्वितः। शशाप तान्मनुष्यत्वं सर्वे यूयमवाप्स्यथ ६४ प्रसादितश्च तैः प्राह पुनरेव महामुनिः। मानुषत्वेऽपि भवतां भवित्री नैव सन्ततिः ६५ न दारसंग्रहश्चैव भविता न च मत्सरः। कामक्रोधविनिर्मुक्ता भविष्यथ सुराः पुनः ६६ ततोऽवतेरुस्तेंऽशैः स्वैर्देवास्ते कुरुवेश्मनि। द्रौपदीगर्भसम्भूताः पञ्च वै पाण्डुनन्दनाः ६७ एतस्मात्कारणात्तस्य पाण्डवेया महारथाः। न दारसंग्रहं प्राप्ताः शापात्तस्य महामुनेः ६८ एतत्ते सर्वमाख्यातं पाण्डवेयकथाश्रयम्। प्रश्नं चतुष्टयं गीतं किमन्यच्छ्रोतुमिच्छसि ६९ (४०१) इति श्रीमार्कण्डेयपुराणे द्रौपदेयोत्पत्तिकथनं नाम सप्तमोऽध्यायः॥ ७॥

जैमिनिरुवाच॥ भवद्भिरिदमाख्यातं यथा प्रश्नमनुक्रमात्। महत्कौतूहलं मेऽस्ति हरिश्चन्द्रकथां प्रति १ अहो महात्मना तेन प्राप्तं कृच्छ्रमनुत्तमम्। कच्चित्सुखमनुप्राप्तं तादृगेव द्विजोत्तमाः २ पक्षिण ऊचुः॥ विश्वामित्रवचः श्रुत्वा स राजा प्रययौ शनैः। शैब्ययानुगतो दुःखी भार्यया बालपुत्रया ३ स गत्वा वसुधापालो दिव्यां वाराणसीं पुरीम्। नैषा मनुष्यभोग्येति शूलपाणेः परिग्रहः ४ जगाम पद्भ्यां दुःखार्तः सह पत्न्यानुकूलया। पुरीं प्रविश्य ददृशे विश्वामि-

---

स्वराज्यापासून च्युत केलें त्या ह्या महापापी विश्वामित्राला कोणते लोक प्राप्त होतील बरें ? आतां कोणाच्या महायागामध्यें श्रद्धेनें काढिलेला पवित्र सोम समंत्रक पिऊन आह्मी आनंदित व्हावें बरें ? ६२.६३. पक्षी ह्मणतातः—हें त्यांचें भाषण ऐकून विश्वामित्र अति क्रुद्ध झाला; आणि 'तुह्मी सर्वही मनुष्य व्हाल' असा त्यांना त्यानें शाप दिला ६४. परंतु, त्यांनीं प्रसन्न करून घेतल्यावर पुनरपि तो महर्षि ह्मणाला "मनुष्ययोनींतही तुह्मांला संतति होणार नाहीं ६५, विवाहसंबंध घडणार नाहीं व तुमच्या ठिकाणीं मत्सरही रहाणार नाहीं. कामक्रोधांपासून अलिप्त राहून तुह्मी पुनरपि देव व्हाल" ६६. तदनंतर ते देव कुरुकुलांत स्वकीयांशांनीं अवतीर्ण होऊन द्रौपदीचे ठिकाणीं पांच पांडुपुत्र जन्मले ६७. असा त्या महर्षीचा शाप झाल्यामुळें महारथी पांच पांडुपुत्र अविवाहित राहिले ६८. पांडवांच्या कथेशीं संबंद्ध असलेले हे सर्व चारी प्रश्न आह्मी कथन केले. आतां दुसरें काय ऐकण्याची आपली इच्छा आहे ? ६९. (४०१) ह्याप्रमाणें श्रीमार्कंडेयपुराणांतील द्रौपदीपुत्रांच्या उत्पत्तीविषयीं सातवा अध्याय समाप्त झाला ॥७॥

जैमिनि ह्मणतातः—आपण ह्या प्रश्नांचीं उत्तरें अनुक्रमें दिलीं; परंतु, हरिश्चंद्राख्यान ऐकण्यास मी उत्सुक आहें १. हे द्विजश्रेष्ठहो, त्या महात्म्याला प्राप्त झालेल्या अनुपम दुःखाप्रमाणें अनुपम सुख प्राप्त झालें होतें काय ? २. पक्षी ह्मणतातः—विश्वामित्राचें भाषण ऐकून तो दुःखी राजा हळूं हळूं चालला व त्याच्या मागोमाग बालपुत्रानें युक्त असलेली त्याची भार्या शैब्यसुताही चालली ३. मार्ग उल्लंघन केल्यानंतर वाराणसी नगरी शंकरानें स्वीकारिली असल्यामुळें मनुष्यांची त्यावर मालकी नाहीं असें समजून तो भूपाळ त्या दिव्य नगरीमध्यें ४ दुःखाकुल होऊन

ह्युपस्थितम् ५ तं दृष्ट्वा समनुप्राप्तं विनयावनतोऽभवत् । प्राह चैवाञ्जलिं कृत्वा हरिश्चन्द्रो महामुनिम् ६ इमे प्राणाः सुतश्चायमियं पत्नी मुने मम । येन ते कृत्यमस्त्याशु तद्गृहाणार्घ्यमुत्तमम् ७ यद्वान्यत्कार्यमस्माभिस्तदनुज्ञातुमर्हसि ८ विश्वामित्र उवाच । पूर्णः स मासो राजर्षे दीयतां मम दक्षिणा । राजसूयनिमित्तं हि स्मर्यते स्ववचो यदि ९ हरिश्चन्द्र उवाच । ब्रह्मन्नद्यैव संपूर्णो मासोऽम्लानतपोधन । तिष्ठत्येतद्दिनार्धं यत्तत्प्रतीक्षस्व मा चिरम् १० विश्वामित्र उवाच । एवमस्तु महाराज आगमिष्याम्यहं पुनः । शापं तव प्रदास्यामि न चेदद्य प्रदास्यसि ११ पक्षिण ऊचुः ॥ इत्युक्त्वा प्रययौ विप्रो राजा चाचिन्तयत्तदा । कथमस्मै प्रदास्यामि दक्षिणा या प्रतिश्रुता १२ कुतः पुष्टानि मित्राणि कुतोऽर्थः सांप्रतं मम । प्रतिग्रहः प्रदुष्टो मे नाहं यायामधः कथम् १३ किमु प्राणान्विमुञ्चामि कां दिशं याम्यकिञ्चनः । यदि नाशं गमिष्यामि अप्रदाय प्रतिश्रुतम् १४ ब्रह्मस्वहृत्कृमिः पापो भविष्याम्यधमाधमः । अथवा प्रेष्यतां यास्ये वरमेवात्मविक्रयः १५ पक्षिण ऊचुः ॥ राजानं व्याकुलं दीनं चिन्तयानमधोमुखम् । प्रत्युवाच तदा पत्नी बाष्पगद्गदया गिरा १६ त्यज चिन्तां महाराज स्वसत्यमनुपालय । श्मशानवद्वर्जनीयो नरः सत्यबहिष्कृतः १७ नातः परतरं धर्मं वदन्ति पुरुषस्य तु । यादृशं

---

पायांनींच मर्जीप्रमाणें ब्राह्मणाच्या पत्नीसह गेला. परंतु, नगरींत प्रवेश करितां-क्षणीं विश्वामित्रही तेथें आल्याचें त्यानें पाहिलें ५. तो आल्याचें पाहून हरिश्चंद्र विनयानें नम्र झाला व हात जोडून त्या महर्षीला ह्मणाला ६ " हे मुने, हे प्राण, हा पुत्र व ही माझी पत्नी ह्यांपैकीं ज्यानें आपलें कार्य होत असेल तें उत्कृष्ट द्रव्य आपण सत्वर उचला ७. अथवा आह्मीं दुसरें कांहीं करावें असें वाटत असल्यास तें करण्याची आज्ञा द्या " ८. विश्वामित्र ह्मणतो:—राजसूयसंबंधीं स्ववचन आठवत असल्यास मला दक्षिणा दे; तो महिना संपला ९. हरिश्चंद्र ह्मणतो:—हे ब्रह्मन् , हे तेजस्वी तपोधन, आजच महिना भरला; परंतु, हा अर्धा दिवस राहिला आहे तोंपर्यंत वाट पहा. फार वेळ थांबूं नका १०. विश्वामित्र ह्मणतो:—हे महाराज, मी पुनरपि येईन; आणि आज दक्षिणा न देशील तर शाप देईन ११. पक्षी ह्मणतात:—असें बोलून विप्र निघून गेला; परंतु, राजा विचार करूं लागला " कबूल केलेली दक्षिणा ह्याला द्यावी कशी ? १२. संपन्न मित्र कोठें आहेत आणि सांप्रत मला द्रव्य कोठून मिळणार ! प्रतिग्रह मला निषिद्ध आहे. तो घेतल्यानें मला अधःपात कसा प्राप्त होणार नाहीं ? १३ प्राणत्याग करूं किंवा काय ? मी द्रव्यहीन जाऊं तरी कोणत्या दिशेला ! कबूल केलेलें न देतां मेलों तर १४ ब्रह्मस्व हरण करणारा मी अधमाधम पापी कृमी होईन ! अथवा दास होणें बरें. कारण, स्वतःला विकून घेणें फार चांगलें " १५. पक्षी ह्मणतात:—खालीं मान घालून चिताक्रांत असलेला राजा व्याकुळ व दीन झाल्याचें पाहून पत्नीचा कंठ दाटून आला; आणि सद्गदित वाणीनें ती ह्मणाली १६ " महाराज, चिंता सोडा आणि सत्यरक्षण करा. कारण, सत्यपराङ्मुख पुरुष स्मशानाप्रमाणें वर्ज्य होय १७. हे पुरुषश्रेष्ठ, सत्यरक्षणापेक्षां पुरुषाला

गुरुत्वमाप्य स्वसत्यपरिपालनम् १८ अग्निहोत्रमधीतं वा दानाद्याश्चाखिलाः क्रियाः । भजन्ते तस्य वैफल्यं यस्य वाक्यमकारणम् १९ सत्यमत्यन्तमुदितं धर्मशास्त्रेषु धीमताम् । तारणायानृतं तद्वत्पातनायाकृतात्मनाम् २० सप्ताश्वमेधानाहृत्य राजसूयं च पार्थिवः । कृतिर्नाम च्युतः स्वर्गादसत्यवचनात्सकृत् २१ राजञ्जातमपत्यं मे इत्युक्त्वा प्ररुरोद ह । बाष्पाम्बुप्लुतनेत्रां तामुवाचेदं महीपतिः २२ हरिश्चन्द्र उवाच ॥ विमुञ्च भद्रे संतापमयं तिष्ठति बालकः । उच्यतां वक्तुकामासि यद्वा त्वं गजगामिनि २३ पत्न्युवाच ॥ राजञ्जातमपत्यं मे सतां पुत्रफलाः स्त्रियः । स मां प्रदाय वित्तेन देहि विप्राय दक्षिणाम् २४ पक्षिण ऊचुः । एतद्वाक्यमुपश्रुत्य ययौ मोहं महीपतिः । प्रतिलभ्य च संज्ञां स विललापातिदुःखितः २५ महद्दुःखमिदं भद्रे यत्त्वमेवं ब्रवीषि माम् । किं तव स्मितसंल्लापा मम पापस्य विस्मृताः २६ हा हा कथं त्वया शक्यं वक्तुमेतच्छुचिस्मिते । दुर्वाच्यमेतद्वचनं कर्तुं शक्नोम्यहं कथम् २७ इत्युक्त्वा स नरश्रेष्ठो धिग्धिगित्यसकृद्ब्रुवन् । निपपात महीपृष्ठे मूर्छयाभिपरिप्लुतः २८ शयानं भुवि तं दृष्ट्वा हरिश्चन्द्रं महीपतिम् । उवाचेदं सकरुणं राजपत्नी सुदुःखिता २९ पत्न्युवाच ॥ हा महाराज कस्येदमपध्यानमुपस्थितम् । यत्त्वं निपतितो भूमौ राङ्कवास्तरणोचितः ३० येन कोट्यग्रगो वित्तं

अधिक श्रेष्ठ धर्म नाहीं असें ह्मणतात १८. ज्याचें भाषण निष्फल असतें त्याचें अग्निहोत्र, अध्ययन व दानादि सर्व कर्म निष्फल होतात १९. सत्य हेंच विचारी पुरुषांना तारणारें उत्कृष्ट साधन आणि असत्य हेंच अजितेंद्रिय पुरुषांना नरकप्राप्तीचें मुख्य साधन होय; असें धर्मशास्त्रांत सांगितलें आहे २०. कृतिराजा सात अश्वमेध व एक राजसूय करून एकदां खोटें बोलल्यामुळें स्वर्गापासून च्युत झाला २१. हे राजा, मला अपत्य झालें आहे." इतकें बोलून ती रडूं लागली. तेव्हां अश्रूंनीं नेत्र भरून आलेल्या पत्नीला भूपति हरिश्चंद्र ह्मणाला २२ "हे भद्रे, शोक करूं नको. हा बालक आहे. अथवा हे गजगामिनि, तुला काय बोलावयाचें आहे तें बोल." २३. पत्नी ह्मणतेः—हे राजा, मला अपत्य झालें आहे; आणि पुत्र हेंच सज्जनांना स्त्रियांचें फल आहे. ह्यास्तव, मला आपण वित्त घेऊन विका आणि ब्राह्मणाला दक्षिणा द्या २४. पक्षी ह्मणतातः—हें भाषण ऐकून तो अति दुःखी राजा मूर्छित झाला आणि शुद्धीवर येऊन विलाप करूं लागला २५. "हे कल्याणि, माझ्याशीं तुझें हें भाषण फारच दुःखकारक आहे. तुझीं हास्यपूर्वक भाषणें मी पापी विसरलों काय? २६. हे सुहास्यवदने, तुला हें भाषण करणें शक्य कसें झालें? हें अनिर्वाच्य ह्मणणें शेवटास नेण्यास मी कसा समर्थ होईन ?" २७. असें बोलून धिक्कार ! धिक्कार !! असें वारंवार ह्मणत तो राजा मूर्छित होऊन भूतलावर पडला २८. तेव्हां भूमीवर पडलेल्या त्या हरिश्चंद्र भूपतीला पाहून अति दुःखित झालेली राजपत्नी करुण स्वरानें ह्मणाली २९ "हे महाराज, रंकुसंज्ञक मृगरोमांच्या लुसलुशीत आस्तरणावर पडण्याची संवय असल्यामुळें आपण ज्याअर्थी भूमीवर पडलां आहां त्याअर्थी हा कोणाचा शाप उभा राहिला बरें ? ३०. ज्यानें कोट्यधि

विप्राणामपवर्जितम्। स एष पृथिवीनाथो भूमौ स्वपिति मे पतिः ३१ हा कष्टं किं तवानेन कृतं देव महीक्षिता। यदिन्द्रोपेन्द्रतुल्योऽयं नीतः पापामिमां दशाम् ३२ इत्युक्त्वा सापि सुश्रोणी मूर्च्छिता निपपात ह। भर्तृदुःखमहाभारेणासह्येन निपीडिता ३३ तौ तथा पतितौ भूमावनाथौ पितरौ शिशुः। दृष्ट्वात्यन्तक्षुधाविष्टः प्राह वाक्यं सुदुःखितः ३४ तात तात दद स्वान्नमम्बाम्ब भोजनं दद। क्षुन्मे बलवती जाता जिह्वाग्रं शुष्यते तथा ३५ पक्षिण ऊचुः॥ एतस्मिन्नन्तरे प्राप्तो विश्वामित्रो महातपाः। कालकल्प इव क्रुद्धो धनं संमार्गितुं तदा। दृष्ट्वा तु तं हरिश्चन्द्रः पतितो भुवि मूर्च्छितः ३६ स वारिणा समभ्युक्ष्य राजानमिदमब्रवीत्। उत्तिष्ठोत्तिष्ठ राजेन्द्र तां ददस्वेष्टदक्षिणाम् ३७ ऋणं धारयतो दुःखमहन्यहनि वर्द्धते। आप्याय्यमानः स तदा हिमशीतेन वारिणा ३८ अवाप्य चेतनां राजा विश्वामित्रमवेक्ष्य च। पुनर्मोहं समापेदे स च क्रोधं ययौ मुनिः ३९ स समाश्वास्य राजानं वाक्यमाह द्विजोत्तमः। दीयतां दक्षिणा सा मे यदि धर्ममवेक्षसे ४० सत्येनार्कः प्रतपति सत्ये तिष्ठति मेदिनी। सत्यं चोक्तं परो धर्मः स्वर्गः सत्ये प्रतिष्ठितः ४१ अश्वमेधसहस्रं च सत्यं च तुलया धृतम्। अश्वमेधसहस्राद्धि सत्यमेव विशिष्यते ४२ अथवा किं ममैतेन साम्ना प्रोक्तेन कारणम्। अनार्ये पापसंकल्पे क्रूरे चानृतवादिनि ४३ त्वयि राज्ञि प्रभवति सद्भावः श्रूयतामयम्। अथ-

---

वित्त ब्राह्मणांना दिलें तो हा भूपति माझा नाथ भूमीवर शयन करीत आहे ३१. अरेरे! हे देवा, इंद्र व उपेंद्र ह्याची बरोबरी करणाऱ्याही ह्या राजाला ज्याअर्थी ही शोचनीय अवस्था प्राप्त झाली आहे त्याअर्थी ह्यानें तुझें काय रे केलें आहे?" ३२. असें बोलून तीही सुंदरी भर्तृदुःखाच्या प्रचंड व असह्य भारानें पीडित झाल्यामुळे मूर्च्छित होऊन पडली ३३. ते अनाथ मातापितर भूमीवर पडलेले पाहून अत्यंत क्षुधित व दुःखित झालेलो बालक ह्मणाला ३४ "बाबा बाबा, अन्न द्या. आई आई, भोजन घाल. मला फार भूक लागली आहे व जिव्हाग्रही कोरडें पडलें आहे" ३५. पक्षी ह्मणतातः—इतक्यात महातपस्वी विश्वामित्र द्रव्य मागण्याकरितां काळाप्रमाणें क्रुद्ध होऊन आला व तो दृष्टी पडताक्षणीं हरिश्चंद्र मूर्च्छित होऊन भूमीवर पडला ३६. त्थापि, राजावर उदक सिंचन करून विश्वामित्र ह्मणाला "हे राजेंद्रा, ऊठ, ऊठ, ती इष्ट दक्षिणा दे ३७. कारण, कर्जबाजारी पुरुषाचें दुःख प्रत्यहीं वृद्धिंगत होत असतें". बर्फाप्रमाणें शीत असलेलें उदक शरीरावर पडूं लागलें असतां ३८ राजा शुद्धीवर आला; परंतु, विश्वामित्राला पाहून पुनरपि मूर्च्छित झाला व तो मुनि क्रुद्ध झाला ३९. नंतर राजाला सावध करून तो द्विजश्रेष्ठ ह्मणाला "धर्माकडे लक्ष्य असल्यास माझी ती दक्षिणा दे ४०. अरे सूर्य सत्यानें प्रकाशत असून पृथ्वी सत्यामुळें कायम राहिली आहे; आणि सत्य हाच उत्कृष्ट धर्म ह्मटला असून स्वर्गही सत्यावरच अवलंबून आहे ४१. सहस्र अश्वमेध आणि सत्य वजन केलें असतां सहस्र अश्वमेधापेक्षा सत्यच जड भरतें ४२. अथवा अनार्य, पापबुद्धि, क्रूर व असत्यवचनी असलेल्या तुज राजाशीं हें गोड भाषण करण्याचें मला कारण काय आहे?

मे दक्षिणां राजन्न दास्यति भवान्यदि ४४ अस्ताचलं प्रयातेऽर्के शप्स्यामि त्वां ततो ध्रुवम्। इत्युक्त्वा स ययौ विप्रो राजा चासीद्भयातुरः ४५ कान्दिग्भूतोऽधनो निःस्वो नृशंसधनिनार्दितः। भार्यास्य भूयः प्राहेदं क्रियतां वचनं मम ४६ मा शापानलनिर्दग्धः पञ्चत्वमुपयास्यसि। स तया चोद्यमानस्तु राजा पत्न्या पुनः पुनः ४७ प्राह भद्रे करोम्येष विक्रयं तव निर्घृणः। नृशंसैरपि यत्कर्तुं न शक्यं तत्करोम्यहम् ४८ यदि मे शक्यते वाणी वक्तुमीदृक्सुदुर्वचः ४९ एवमुक्त्वा ततो भार्यां गत्वा नगरमातुरः। बाष्पापिहितकण्ठाक्षस्ततो वचनमब्रवीत् ५० राजोवाच॥ भो भो नागरिकाः सर्वे शृणुध्वं वचनं मम। किं मां पृच्छथ कस्त्वं भो नृशंसोऽहममानुषः ५१ राक्षसो वातिकठिनस्ततः पापतरोऽपि वा। विक्रेतुं दयितां प्राप्तो यो न प्राणांस्त्यजाम्यहम् ५२ यदि वः कस्यचित्कार्यं दास्या प्राणेष्टया मम। स ब्रवीतु त्वरायुक्तो यावत्संधारयाम्यहम् ५३ पक्षिण ऊचुः॥ अथ वृद्धो द्विजः कश्चिदागत्याह नराधिपम्। समर्पयस्व मे दासीमहं क्रेता धनप्रदः ५४ अस्ति मे वित्तमस्तोकं सुकुमारी च मे प्रिया। गृहकर्म न शक्नोति कर्तुमस्मात्प्रयच्छ मे ५५ कर्मण्यतावयोरूपशीलानां तव योषितः। अनुरूपमिदं वित्तं गृहाणार्पय मेऽबलाम् ५६ एवमुक्तस्य विप्रेण हरिश्चन्द्रस्य भूपतेः। व्यदीर्यत मनो दुःखान्नैनं किंचिदथाब्र-

हें सत्य भाषण आतां ऐक. हे राजा, आज जर मला दक्षिणा न देशील ४३, ४४ तर सूर्यास्त होतांक्षणीं मी तुला निःसंशय शाप देईन". असें बोलून तो विप्र निघून गेला; राजा भयानें व्याकूळ झाला ४५ आणि द्रव्य अथवा सत्तेचा कोणताही पदार्थ जवळ उरला नसून दुष्ट सावकारानें दुःख दिल्यामुळें तो गोंधळून गेला. तेव्हां भार्या पुनरपि त्याला ह्मणाली " हें माझें ह्मणणें आपण शेवटास न्या ४६. शापाग्नीनें दग्ध होऊन नाश पावूं नका. " ह्याप्रमाणें पत्नी वारंवार आग्रह करूं लागली असतां राजा ४७ ह्मणाला " हे कल्याणि, हा मी निर्दय होऊन तुझा विक्रय करितों. असें दुर्भाषण उच्चारण्यास जर माझी वाणी समर्थ होईल तर दुष्टानाही करण्यास अशक्य असलेली ही गोष्ट मी करितों " ४८, ४९. असें भार्येला सांगून तो दुःखाकुल राजा नगरांत गेला; त्याचा अश्रूंनीं कंठ दाटून आला व तो ह्मणाला ५० " हे सर्व नागरिक हो, माझें ह्मणणें ऐका. तूं कोण ह्मणून मला विचारितां काय ? अमानुष कर्म करणारा मी दुष्ट आहें ५१; अतिक्रूर राक्षस आहें; किंवा प्राणत्याग न करितां ज्याअर्थी मी प्रिय भार्या विकण्यास तयार झालों आहें त्याअर्थी मी क्रूर राक्षसापेक्षांही अधिक दुष्ट आहें ५२. जर कोणाला दासी ह्मणून माझी प्राणप्रिया हवी असेल तर त्यानें *मी जिवंत आहें तोंच सत्वर बोलावें* " ५३. पक्षी ह्मणतातः—इतक्यांत कोणीएक वृद्ध ब्राह्मण राजाजवळ येऊन ह्मणाला " मला दासी दे. मी द्रव्य देऊन विकत घेणारा आहें ५४. माझ्यापाशीं वित्त पुष्कळ आहे. परंतु, माझी भार्या सुकुमार आहे; गृहकर्म करण्यास ती समर्थ नाहीं. ह्यास्तव, तें करण्याकरितां मला दासी दे ५५. तुझ्या स्त्रीचें कर्मसामर्थ्य, वय, रूप व शील ह्यांना अनुरूप असलेलें हें वित्त घेऊन मला अबला दे " ५६. विप्रानें असें हरिश्चंद्र राजाला सांगितलें असतां त्याचें मन दुःखानें विदीर्ण

वीत् ५७ ततः स विप्रो नृपतेर्बद्ध्वान्ते दृढं धनम्। गृहीत्वा केशेष्वथादाय नृपपत्नीमकर्षयत् ५८ रुरोद रोहिताश्वोऽपि दृष्ट्वा कृष्टां तु मातरम्। हस्तेन वस्त्रमाकर्षन्काकपक्षधरः शिशुः ५९ मुञ्चार्य मुञ्च तावन्मां यावत्पश्याम्यहं शिशुम्। दुर्लभं दर्शनं तात पुनरस्य भविष्यति ६० पश्यैहि वत्स मामेवं मातरं दास्यतां गताम्। मां मा स्प्राक्षी राजपुत्र अस्पृश्याहं तवाधुना ६१ ततः स बालः सहसा दृष्ट्वा कृष्टां तु मातरम्। समभ्यधावदम्बेति रुदन्साश्राविलेक्षणः ६२ तमागतं द्विजः क्रोधाद्बालमभ्याहनत्पदा। वदंस्तथापि सोऽम्बेति नैवामुञ्चत मातरम् ६३ राजपत्न्युवाच॥ प्रसादं कुरु मे नाथ क्रीणीष्वेमं च बालकम्। क्रीतापि नाहं भवतो विनैनं कार्यसाधिका ६४ इत्थं ममाल्पभाग्यायाः प्रसादसुमुखो भव। मां संयोजय बालेन वत्सेनेव पयस्विनीम् ६५ ब्राह्मण उवाच॥ गृह्यतां वित्तमेतत्ते दीयतां बालको मम। स्त्रीपुंसोर्धर्मशास्त्रज्ञैः कृतमेव हि वेतनम्। शतं सहस्रं लक्षं च कोटिमूल्यं तथापरैः ६६ पक्षिण ऊचुः॥ तथैव तस्य तद्वित्तं बद्धोत्तरपटे ततः। प्रगृह्य बालकं मात्रा सहैकस्थमबन्धयत् ६७ नीयमानौ तु तौ दृष्ट्वा भार्यापुत्रौ स पार्थिवः। विललाप सुदुःखार्तो निःश्वस्योष्णं पुनःपुनः ६८ यां न वायुर्न चादित्यो नेन्दुर्न च पृथग्जनः। दृष्टवन्तः पुरा पत्नीं सेयं दासीत्वमागता ६९ सूर्यवंशप्रसूतोऽयं सुकुमारकराङ्गुलिः। संप्राप्तो विक्रयं बालो धिङ्मामस्तु सुदुर्मतिम् ७० हा प्रिये हा शिशो वत्स

---

झाल्यामुळें तो विप्राला कांहीं एक बोलला नाहीं ५७. तेव्हां राजाच्या पदरीं द्रव्य घट्ट बांधून व राजपत्नीचे केंस धरून तो ब्राह्मण तिला ओढूं लागला ५८. मातेला ओढल्याचें पाहून रोहिताश्वही रडूं लागला आणि झुलपें असणारा तो बालक हातानें लुगडें ओढूं लागला ५९. (ह्यानंतर राजपत्नी ह्मणाली) हे आर्य, ह्या बालकाला पाहीपर्यंत मला सोड; बाबारे, पुनरपि ह्याचें दर्शन होणें दुर्घट आहे ६०. हे वत्सा, ये, आणि दासी झालेल्या मज मातेला पहा. हे राजपुत्रा, मला शिवूं नको. आतां मी तुला अस्पृश्य झालें आहे" ६१. तदनंतर विप्रानें माता ओढिल्याचें पाहून त्या बालकाचे नेत्र अश्रूंनीं भरून आले व आई, आई, ह्मणत ह्मणत तो एकाएकीं धांवला ६२. जवळ आलेल्या त्या बालकाला द्विजानें क्रोधपूर्वक लाथ मारिली; तथापि आई आई ह्मणत त्यानें मातेला सोडिलें नाहीं ६३. राजपत्नी ह्मणते:— हे नाथ, कृपा करून हें माझें बालक विकत घ्या. ह्याशिवाय मला घेऊन आपला उपयोग होणार नाहीं ६४. ह्यास्तव, मज भाग्यहीन दासीवर आपण कृपा करा; आणि धेनूपाशीं असणान्या वत्साप्रमाणें हें बालक माझ्यापाशीं असूं द्या ६५." ब्राह्मण ह्मणतो:—हें द्रव्य घेऊन तुझा बालक मला दे. धर्मशास्त्रवेत्त्यांनीं स्त्रीपुरुषांची किंमत कोणी शंभर, कोणी सहस्र, व कोणी कोणी कोटि अशी केलेली आहे ६६. पक्षी ह्मणतात:— त्याचप्रमाणें तें वित्त विप्रानें त्याच्या पदरीं बांधिलें आणि बालक घेऊन त्यानें मातेशीं त्याला जखडून टाकिलें ६७. तो विप्र त्या स्त्रीपुत्रांना नेत असल्याचें पाहून अति दुःखाकुल झालेला तो राजा वारंवार उष्ण सुस्कारे टाकून विलाप करूं लागला ६८. "वायु, सूर्य, चंद्र व सामान्य जन यांच्या दृष्टीं पूर्वी पडत नसलेली ही पत्नी दासी झाली

ममानार्यस्य दुर्नयैः । दैवार्थानां दशां प्राप्तो न मृतोऽस्मि तथापि धिक् ७१ पक्षिण ऊचुः ॥ एवं विलपतो राज्ञः स विप्रोऽन्तरधीयत । वृक्षगेहादिभिस्तुङ्गैस्तावादाय त्वरान्वितः ७२ विश्वामित्रस्ततः प्राप्तो नृपं वित्तमयाचत । तस्मै समर्पयामास हरिश्चन्द्रोऽपि तद्धनम् ७३ तद्वित्तं स्तोकमालोक्य दारविक्रयसंभवम् । शोकाभिभूतं राजानं कुपितः कौशिकोऽब्रवीत् ७४ क्षत्रबन्धो ममेमां त्वं सदृशीं यज्ञदक्षिणाम् । मन्यसे यदि तत्क्षिप्रं पश्य त्वं मे बलं परम् ७५ तपसोऽत्र सुतप्तस्य ब्राह्मण्यस्यामलस्य च । मत्प्रभावस्य चोग्रस्य शुद्धस्याध्ययनस्य च ७६ राजोवाच ॥ अन्यां दास्यामि भगवन्कालः कश्चित्प्रतीक्ष्यताम् । साम्प्रतं नास्ति विक्रीता पत्नी पुत्रश्च बालकः ७७ विश्वामित्र उवाच ॥ चतुर्भागः स्थितो योऽयं दिवसस्य नराधिप । एष एव प्रतीक्ष्यो मे वक्तव्यं नोत्तरं त्वया ७८ पक्षिण ऊचुः ॥ तमेव मुक्त्वा राजेन्द्रं निठुरं निर्घृण वचः । तदादाय धनं तूर्णं कुपितः कौशिको ययौ ७९ विश्वामित्रे गते राजा भयशोकादिमध्यगः । स्वविक्रयं विनिश्चित्य प्रोवाचोच्चैरधोमुखः ८० वित्तक्रीतेन यो ह्यर्थी मया प्रेष्येण मानवः । स ब्रवीतु त्वरायुक्तो यावत्तपति भास्करः ८१ अथाजगाम त्वरितो धर्मश्चण्डालरूपधृक् । दुर्गन्धो विकृतो रूक्षः श्मश्रुलो दन्तुरो घृणी ८२ कृष्णो लम्बोदरः पिङ्गरूक्षाक्षः

---

आहे ! ६९. सूर्यवंशांत उत्पन्न झालेला आणि सुकुमार बोटांनीं युक्त असलेला हा बालक विकला गेला आहे. तस्मात्, मज दुर्बुद्धीला धिक्कार असो ! ७०. हे प्रिये, हे शिशो, हे वत्स, मज दुष्टाच्या अपराधामुळें तुह्मांला दुर्दैवानें ही दशा प्राप्त झाली असूनही ज्याअर्थी मी मेलों नाहीं त्याअर्थी मला धिक्कार असो ! ” ७१. पक्षी ह्मणतातः—ह्याप्रमाणें राजा विलाप करीत असतांना उच्च वृक्ष व गृहें इत्यादिक आड आल्यामुळें दिसेनासा झालेला तो विप्र त्यांना घेऊन सत्वर गेला ७२. इतक्यांत विश्वामित्र राजाकडे येऊन वित्त मागूं लागला व हरिश्चंद्रानेंही त्याला तें द्रव्य दिलें ७३. स्त्रीपुत्र विकून आलेलें तें वित्त थोडें पाहून शोकाकुल झालेल्या राजाला विश्वामित्र क्रुद्ध होऊन ह्मणाला ७४ “हे क्षत्रबंधो, ही यज्ञ दक्षिणा मला योग्य आहे असें समजत असशील तर माझें प्रचंड सामर्थ्य सत्वरच तुझ्या दृष्टी पडेल ७५. उत्कृष्ट रीतीनें केलेलें तप, निर्मल ब्राह्मण्य, प्रचंड प्रभाव व शुद्ध अध्ययन ह्यांचें सामर्थ्य तुझ्या दृष्टी पडेल ” ७६. राजा ह्मणतोः— भगवन्, दुसरी दक्षिणा देईन; कांहीं वेळ थांबा. स्त्रीपुत्र विकूनही सांप्रत दक्षिणा नाहीं ७७. विश्वामित्र ह्मणतोः— राजा, पुढें बोलूं नको; दिवसाचा हा चतुर्थांश संपेपर्यंतच मी वाट पाहीन ” ७८. पक्षी ह्मणतातः— असें निठुर व निर्दय भाषण त्या राजेंद्राशीं करून तें द्रव्य घेऊन विश्वामित्र रागानें सत्वर निघून गेला ७९. तो गेल्यावर भयशोकादिकांनीं ग्रस्त झालेला तो राजा स्वतःच्या विक्रीचा निश्चय करून व खालीं मान घालून उच्च स्वरानें ह्मणाला ८० “ ज्या मनुष्याला दास ह्मणून मला द्रव्यानें विकत घेणें असेल त्यानें सूर्य आहे तोंपर्यंत सत्वर सांगावें ” ८१. नंतर चांडाळरूप धारण केलेला धर्म सत्वर तेथें आला. त्याच्या शरीराला घाण येत होती, तो अक्राळ विक्राळ दिसत होता, त्याची स्पर्श वाटलेली होती, त्याचे

परुषाक्षरः । गृहीतपक्षिपुञ्जश्च शवमाल्यैरलंकृतः ८३ कपालहस्तो दीर्घास्यो भैरवोऽतिवदन्मुहुः । श्वगणाभिवृतो घोरो यष्टिहस्तो निराकृतिः ८४ चण्डाल उवाच ॥ अहमर्थी त्वया शीघ्रं कथयस्वात्मवेतनम् । स्तोकेन बहुना वापि येन वै लभ्यते भवान् ८५ पक्षिण ऊचुः ॥ तं तादृशमथालक्ष्य क्रूरदृष्टिं सुनिष्ठुरम् । वदन्तमतिदुःशीलं कस्त्वमित्याह पार्थिवः ८६ चण्डाल उवाच ॥ चण्डालोऽहमिह ख्यातः प्रवीरेति पुरोत्तमे । विख्यातो वध्यवधको मृतकम्बलहारकः ८७ हरिश्चन्द्र उवाच ॥ नाहं चण्डालदास्यत्वमिच्छेयं सुविगर्हितम् । वरं शापाग्निना दग्धो न चण्डालवशं गतः ८८ पक्षिण ऊचुः ॥ तस्यैवं वदतः प्राप्तो विश्वामित्रस्तपोनिधिः । कोपामर्षविवृत्ताक्षः प्राह चेदं नराधिपम् ८९ विश्वामित्र उवाच ॥ चण्डालोऽयमनल्पं ते दातुं वित्तमुपस्थितः । कस्मान्न दीयते मह्यमशेषा यज्ञदक्षिणा ९० हरिश्चन्द्र उवाच ॥ भगवन्सूर्यवंशोत्थमात्मानं वेद्मि कौशिक । कथं चण्डालदासत्वं गमिष्ये वित्तकामुकः ९१ विश्वामित्र उवाच ॥ यदि चण्डालवित्तं त्वमात्मविक्रयजं मम । न प्रदास्यसि कालेन शप्स्यामि त्वामसंशयम् ९२ पक्षिण ऊचुः ॥ हरिश्चन्द्रस्ततो राजा चिन्तावस्थितजीवितः । प्रसीदेति वदन्पादावृषेर्जग्राह विह्वलः ९३ दासोस्म्यार्तोऽस्मि भीतोऽस्मि त्वद्भक्तश्च विशेषतः । कुरु

---

दांत मोठे मोठे होते, तो दिसण्यांत निर्दय ८२, काळा, लांबपोट्या व घाऱ्या डोळ्यांच असून त्याचा स्वर कठोर होता; पक्षिसमुदाय त्याच्या जवळ असून शवांच्या पुष्पांनीं तो भूषित झालेला होता ८३; त्याचें तोंड लांबट असून तो उग्र चांडाल एकसारखें तोंडानें कांहीं तरी बडबडत होता; त्याच्या हातांत नरकपाल होतें; श्वानसमुदायानें तो परिवेष्टित होता; त्या उग्र चांडालाच्या हातांत काठी होती व तो निस्तेज होता ८४. चांडाल ह्मणतोः—मला तुझी गरज आहे; तूं आपली किंमत सांग, थोडें अथवा पुष्कळ द्रव्य तूं मला सांग, ह्मणजे त्याच्या योगानें मी तुला विकत घेईन ८५. पक्षी ह्मणतातः—क्रूर दृष्टि, निष्ठुरता व अत्यंत दुःशीलता ह्यांनीं युक्त असलेला तो चांडाल बोलत असल्याचें पाहून " तूं कोण ? " असें राजानें विचारिलें ८६. चांडाल ह्मणतोः—ह्या श्रेष्ठ नगरांत प्रवीर ह्मणून मी विख्यात चांडाल आहें; व मृतांचीं वस्त्रें घेऊन वध्यांचा वध करणारा ह्मणून माझी प्रसिद्धि आहे ८७. हरिश्चंद्र ह्मणतोः—अति निंद्य चांडालदास्य मला नको; चांडालाधीन होण्यापेक्षां शापाग्नीनें दग्ध होणें बरें ८८. पक्षी ह्मणतातः—तो असें ह्मणत आहे तोंच क्रोधानें नेत्र फिरून गेलेला तपोनिधि विश्वामित्र तेथें आला आणि राजाला ह्मणाला ८९. हा चांडाळ तुला पुष्कळ द्रव्य देण्यास तयार असतांना सर्व यज्ञदक्षिणा तूं मला कां देत नाहींस ? " ९०. हरिश्चंद्र ह्मणतोः—भगवन् कौशिकमुने, मी सूर्यवंशांतील आहें. तेव्हां द्रव्यलोभानें चांडाळदास कसा होऊं ? ९१ विश्वामित्र ह्मणतोः—स्वतःला विकून जर तूं चांडालवित्त मला वेळेवर न देशील तर मी तुला निःसंशय शाप देईन ९२. पक्षी ह्मणतातः—तेव्हां हरिश्चंद्र राजा चिंताक्रांत व विव्हल झाला आणि कृपा करा करा असें ह्मणत ह्मणत त्यानें विश्वामित्राचे पाय धरिले ९३, आणि ह्मणाला "मी दास आहें; भीतीनें व्याकुळ झालों

प्रसादं विप्रर्षे कष्टश्चण्डालसङ्करः ९४ भवेयं वित्तशेषेण सर्वकर्मकरो वशः । तवैव मुनिशार्दूल प्रेष्यश्चित्तानुवर्तकः ९५ विश्वामित्र उवाच ॥ यदि प्रेष्यो मम भवांश्चण्डालाय ततो मया । दासभावमनुप्राप्तो दत्तो वित्तार्बुदेन वै ९६ हरिश्चन्द्र उवाच॥ यद्यसौ शक्यते विप्रः कौशिकः परितोषितुम् । ततो गृहाण मामद्य दासस्त्वं ते करोम्यहम् ९७ चण्डाल उवाच ॥ शतयोजनविस्तीर्णां नानाग्रामैरलंकृताम् । भूमिं रक्षामयीं कृत्वा दास्येहं कौशिकं प्रति ९८ पक्षिण ऊचुः ॥ एवमुक्ते तदा तेन श्वपाको हृष्टमानसः ॥ विश्वामित्राय तद्द्रव्यं दत्त्वा बद्ध्वा नरेश्वरम् ९९ दण्डप्रहारसंभ्रान्तमतीव व्याकुलेन्द्रियम् । इष्टबन्धुवियोगार्तमनयन्निजपक्कणम् १०० हरिश्चन्द्रस्ततो राजा वसंश्चण्डालपक्कणे । प्रातर्मध्याह्नसमये सायं चैतदगायत १ बालां दीनमुखीं दृष्ट्वा बालं दीनमुखं पुरः । मां स्मरत्यसुखाविष्टा मोचयिष्यति नो नृपः २ उपात्तवित्तो विप्राय दत्त्वा वित्तमतोऽधिकम् । न सा मां मृगशावाक्षी वेत्ति पापतरं कृतम् ३ राज्यनाशः सुहृत्त्यागो भार्यातनयविक्रयः । प्राप्ता चण्डालता चेयमहो दुःखपरम्परा ४ एवं स निवसन्नित्यं सस्मार दयितं सुतम् । भार्यां चात्मसमाविष्टां हृतसर्वस्व आतुरः ५ कस्यचित्त्वथ कालस्य मृतचैलापहारकः । हरिश्चन्द्रोऽभवद्राजा श्मशाने तद्वशानुगः ६ चण्डालेनानुशिष्टश्च मृतचैला-

आहे आणि विशेषतः आपला भक्त आहे. ह्यास्तव, हे विप्रर्षे, कृपा करा, चंडालसंकर दुःखावह होय ९४. हे मुनिश्रेष्ठ, मर्जीप्रमाणें वागणारा मी आपलाच दास होऊन आपल्या अधीन राहीन आणि हवें तें काम करून वित्ताची तूट भरून काढीन"९५. विश्वामित्र ह्मणतोः—जर तूं माझा दास झाला आहेस तर मी एक कोटि द्रव्य घेऊन तुज दासाला चांडालाप्रत अर्पण केलें आहे ९६. हरिश्चंद्र ह्मणतोः—हा कौशिक विप्र संतुष्ट होणें शक्य असेल तर तूं आज मला ने. मी तुझें दास्य करीन ९७. चंडाल ह्मणतोः—शंभर योजनें विस्तीर्ण व अनेक प्रकारच्या गांवांनीं भूषित अशी भूमि, रक्षणाचा बंदोबस्त करून मी कौशिकाला देईन ९८. पक्षी ह्मणतातः—" ठीक आहे" असें विश्वामित्रानें ह्मटलें असतां चंडाल आनंदित झाला; विश्वामित्राला तें द्रव्य देऊन त्यानें राजाला बांधिलें ९९; आणि दंडप्रहारानें गोंधळून गेलेल्या, अत्यंत खिन्न झालेल्या व इष्टबंधुवियोगानें व्याकुल झालेल्या राजाला तो आपल्या घरीं घेऊन गेला १००. नंतर चंडालगृहीं राहूं लागलेला हरिश्चंद्र राजा प्रातःकालीं, मध्यान्हसमयीं व सायंकालीं दीनमुखी पत्नी व दीनमुख बालक आपल्यापुढें उभे आहेत असें वाटून पुढील उद्गार काढीत असे. " ब्राह्मणाला द्रव्य देऊन राजा आह्मांला मुक्त करील असें ती दुःखित भार्या मला उद्देशून मनांत आणीत असेल. परंतु, कबूल केल्यापेक्षां अधिक द्रव्य देऊनही मी अधिक पापी बनल्याचें त्या मृगनयनेला ठाऊक नाहीं. १, २, ३. राज्यनाश, मित्रत्याग, स्त्रीपुत्रविक्रय आणि प्राप्त झालेलें चंडालत्व ही कायहो दुःखपरंपरा !"४. सर्वस्व हरण होऊन व्याकुल झालेला तो राजा ह्याप्रमाणें नेहमीं प्रियपुत्राची व मनांत खिन्न राहिलेल्या स्त्रीची आठवण करीत असे ५. कांहीं काळ लोटल्यानंतर हरिश्चंद्र राजा चंडालाधीन झाल्या-

पट्टारिणा। शवागमनमन्विच्छन्निह तिष्ठन्दिवानिशम् ७ इदं राज्ञेऽपि देयं च षड्भागं तु शवं प्रति। त्रयस्तु मम भागाः स्युर्द्वौ भागौ तव वेतनम् ८ इति प्रतिसमादिष्टो जगाम शवमन्दिरम्। दिशं तु दक्षिणां यत्र वाराणस्यां स्थितं तदा ९ श्मशानं घोरसंनादं शिवाशतसमाकुलम्। शवमौलिसमाकीर्णं दुर्गन्धबहुधूमकम् १० पिशाचभूतवेतालडाकिनीयक्षसंकुलम्। महागणमहाभूतस्वनकोलाहलायुतम् ११ गृध्रगोमायुसंकीर्णं श्ववृन्दपरिवारितम्। अस्थिसंघातसंकीर्णं महादुर्गन्धसंकुलम् १२ नानामृतसुहृन्नादरौद्रकोलाहलायुतम्। हा पुत्र मित्र हा बन्धो भ्रातर्वत्स प्रियाद्य मे १३ हा पते भगिनि मातर्हा मातुल पितामह। मातामह पितः पौत्र क्व गतोऽस्येहि बान्धव १४ इत्येवं वदतां यत्र ध्वनिः संश्रूयते महान्। यत्र नेत्रैरनिमिषैः शवा भयमिवाविशन् १५ निमीलितैश्च नयनैर्बन्धुचिन्तापथे स्थिताः। ज्वलन्मांसवसामेदश्छमच्छमितसंकुलम् १६ अर्धदग्धाः शवाः श्यामा विकसद्दन्तपंक्तयः। हसन्त्येवाग्निमध्यस्थाः कायस्येयं दशा त्विति १७ अग्नेश्चटचटाशब्दो वयसामस्थिपंक्तिषु। बान्धवाक्रन्दशब्दश्च पुल्कसेषु प्रहर्षजः १८ गायतां भूतवेतालपिशाचगणरक्षसाम्। श्रूयते सुमहान्घोरः कल्पान्त

मुळें श्मशानामध्यें मृतांचीं वस्त्रें घेऊं लागला ६. मृतवस्त्र हरण करणारा चंडाल त्याला ह्मणाला " प्रेतें येण्याची वाट पहात तूं येथें रात्रंदिवस रहात जा ७; शवसंबंधीं षष्ठांश राजाला देत जा; तीन भाग माझे ठेवीत जा; व दोन भाग वेतन ह्मणून तुझे राहतील " ८. अशी चंडालाची आज्ञा झाल्यामुळें वाराणसीच्या दक्षिणेस असलेल्या श्मशानांत राजा जात असे ९. तें श्मशान घोर ध्वनि, शेंकडों भालू, प्रेतांचीं मस्तकें, दुर्गंध प्रचंड धूर १०, पिशाच, भूत, वेताल, डाकिनी व यक्ष ह्यांनीं व्याप्त असून मोठे मोठे प्राणिगण व भूतगण ह्यांच्या ध्वनीनें व कोलाहलानें तें नादित झालेलें होतें ११. गिधाडें, कोल्हीं व श्वानसमुदाय ह्यांनीं तें व्याप्त झालेलें असून जिकडे तिकडे अस्थिसमुदाय तेथें पसरलेले होते; अतिशय दुर्गंधि तेथें सुटली होती १२; मृतांच्या सुहृदांनीं केलेल्या अनेक प्रकारच्या नादांनीं व भयंकर कोलाहलानें तें युक्त होतें. हे मित्रा, हे बंधो, हे भ्रात्या, हे वत्सा १३, हे प्रिया, हे पते, हे भगिनि, हे माते, हे मातुल, हे पितामह, हे मातामह, हे तात, हे पौत्र, हे बांधव, कोठें रे गेलास ! इकडे येरे ! १४ असें बोलणाऱ्या लोकांचा प्रचंड ध्वनि तेथें कानांवर येत होता. डोळे पापण्या न हालतां उघडे राहिल्यामुळें तेथें प्रेतें भयभीत झाल्यासारखीं दिसत असत १५ आणि डोळे मिटलेलीं प्रेतें बांधवांची काळजी करीत आहेत असें वाटे; मांस, वसा व मेद जळत असल्यामुळें तेथें छम् छम् असा शब्द होत असे १६; अर्धवट जळलेल्या श्यामवर्ण प्रेतांचीं दंतपंक्ति उघडी झाल्यामुळें " कायही देहाची दशा " असें समजून तीं अग्नींत हंसत आहेत असें वाटे १७. अग्नीचा चट्चट् शब्द, अस्थिसमुदाय पाहून आनंदित झालेल्या पक्ष्यांचा ध्वनि, बांधवांचा आक्रोश व चांडाळांचा हर्षध्वनि तेथें होत असे १८; आणि भूत, वेताळ, पिशाचगण व राक्षस गात असल्यामुळें

इव निःस्वनः १९ महामहिषकारीषगोयकृद्राशिसंकुलम् । तदुत्थभस्मकूटैश्च वृतं सास्थिभिरुन्नतैः २० नानोपहारस्रग्दीपकाकविक्षेपसंकुलम् । अनेकशब्दबहुलं श्मशानं नरकायते २१ सवह्निगर्भैरशिवैः शिवारुतैर्निनादितं भीषणरावगह्वरम् । भयं भयस्याप्युपसंजनैर्भृशं श्मशानमाक्रन्दविरावदारुणम् २२ स राजा तत्र संप्राप्तो दुःखितः शोचनोद्यतः । हा भृत्या मंत्रिणो विप्राः क्व तद्राज्यं विधे गतम् २३ हा शैब्ये पुत्र हा बाल मां त्यक्त्वा मन्दभाग्यकम् । विश्वामित्रस्य दोषेण गताः कुत्रापि ते मम २४ इत्येवं चिन्तयंस्तत्र चण्डालोक्तं पुनः पुनः । मलिनो रूक्षसर्वाङ्गः केशवान्गन्धवान्ध्वजी २५ लगुडी कालकल्पश्च धावंश्चापि ततस्ततः । अस्मिन्शवे इदं मूल्यं प्राप्तं प्राप्स्यामि चाप्युत २६ इदं मम इदं राज्ञे मुख्यचण्डालके त्विदम् । इति धावन्दिशो राजा जीवन्योन्यन्तरं गतः २७ जीर्णकर्पटसुग्रन्थिकृतकन्थापरिग्रहः । चिताभस्मरजोलिप्तमुखबाहूदरांघ्रिकः २८ नानामेदोवसामज्जलिप्तपाण्यङ्गुलिः श्वसन् । नानाशवौदनकृताहारतृप्तिपरायणः २९ तदीयमाल्यसंश्लेषकृतमस्तकमण्डनः । न रात्रौ न दिवा शेते हाहेति प्रवदन्मुहुः ३० एवं द्वादशमासास्तु नीताः शतसमोपमाः । स कदाचिन्नृपश्रेष्ठः श्रान्तो बन्धु-

कल्पांतकालाप्रमाणें त्यांचा अति भयंकर ध्वनि कानांवर पडत असे १९. मोठे मोठे रेडे व बैल ह्यांच्या शेणांच्या राशींनीं व त्यापासून बनलेल्या अस्थियुक्त उंच उंच भस्मराशींनीं तें स्मशान व्याप्त झालेलें होतें २० आणि नानाप्रकारचे बलि, माळा, दीप, झडप घालणारे कावळे आणि अनेक प्रकारचे ध्वनि ह्यांनीं गजबजलेलें तें स्मशान नरकाप्रमाणें भासत होतें २१. अग्निज्वालायुक्त व अशुभ अशा माल्ह्यांच्या ध्वनींनीं तें स्मशान नादित झालेलें होतें; भयंकर ध्वनींनीं गजबजून गेलेलें होतें; भयालाही भय उत्पन्न करणारे ध्वनि तेथें होत होते आणि आक्रोश व विलाप ह्यांनीं तें अति भयंकर झालें होतें २२. तेथें प्राप्त झालेला तो राजा दुःखित झाला आणि शोक करूं लागला "अरेरे! हे नशिबा, सेवक, मंत्री, विप्र व राज्य कोठें गेलें! २३. हे शैब्यकन्ये, हे बालका पुत्रा, विश्वामित्राच्या दोषामुळें मज भाग्यहीनाला सोडून माझे ते आप्तही कोठेंतरी निघून गेले!" २४. ह्याप्रमाणें विलाप करीत बसलेल्या त्या राजाला चंडालाच्या आज्ञेची वारंवार आठवण होत असे. मलिन, सर्व शरीराचे ठिकाणीं रूक्षता, केंस, दुर्गंध, ध्वज २५ व सोटा ह्यांनीं युक्त असलेला तो कालतुल्य राजा स्मशानांत इकडे तिकडे धांवत असे. "ह्या प्रेताबद्दल इतकें द्रव्य मिळालें, इतकें आणखी मिळेल २६, हें माझें, हें राजाचें व हें मुख्य चंडालाचें" असें चिंतन करीत करीत जिवंतपणींच अन्ययोनींत गेलेला तो राजा चोहोंकडे धांवाधांव करीत असे २७. जुन्या रगट्यांना अतिशय गांठी देऊन तयार केलेली वाकळ त्यानें घेतलेली होती. त्याचें मुख, हात, पाय व पोट चिताभस्मानें व धुळीनें भरून गेलें होतें २८; नानाप्रकारचे मेद, वसा व मज्जा ह्यांनीं त्याच्या हाताचीं बोटें बरबटलेलीं होतीं. प्रेतांना उद्देशून ठेविलेलीं अनेकप्रकारचीं ओदनें घेऊन तो पोट भरीत असून सुस्कारे टाकीत असे २९. प्रेतांच्या पुष्पांनीं तो आपलें मस्तक शृंगारीत होता; आणि वारंवार हाहाकार करीत असलेला तो राजा रात्रीं व दिवस

वियोगवान् ३१ निद्राभिभूतो रुक्षाङ्गो निश्चेष्टः स तु पत्र च । तत्रापि शयनीये स दृष्टवानद्भुतं महत् ३२ श्मशानाभ्याशयोगेन दैवस्य बलवत्तया । अन्यदेहेन दत्त्वा तु गुरवे गुरुदक्षिणाम् ३३ तदा द्वादश वर्षाणि दुःखदानात्तु निष्कृतिः । आत्मानं स ददर्शाथ पुल्कसीगर्भसंभवम् ३४तत्रस्थश्चाप्यसौ राजा सोऽचिन्तयदिदं तदा । इतो निष्क्रान्तमात्रो हि दानधर्मं करोम्यहम् ३५ अनन्तरं स जातस्तु तदा पुल्कसबालकः । श्मशानमृतसंस्कारकरणेषु सदोद्यतः ३६ प्राप्ते तु सप्तमे वर्षे श्मशानेऽथ मृतो द्विजः । आनीतो बन्धुभिर्दृष्टस्तेन तत्राधनो गुणी ३७ मूल्यार्थिना तु तेनापि परिभूतास्तु ब्राह्मणाः । ऊचुस्ते ब्राह्मणास्तत्र विश्वामित्रस्य चेष्टितम् ३८ पापिष्ठमशुभं कर्म कुरु त्वं पापकारक । हरिश्चन्द्रः पुरा राजा विश्वामित्रेण पुल्कसः ३९ कृतः पुण्यविनाशेन ब्राह्मणस्यापनाशनात् । यदा न क्षमते तेषां तैः स यस्तो रुषा तदा ४० गच्छ त्वं नरकं घोरमधुनैव नराधम । इत्युक्तमात्रे वचने स्वप्नस्थः स नृपस्तदा ४१ अपश्यद्यमदूतान्वै पाशहस्तान्भयावहान् । तैः संगृहीतमात्मानं नीयमानं तदा बलात् ४२ पश्यति स्म भृशं खिन्नो हा मातः पितरश्च मे । एवं वादी स नरके तैलद्रोण्यां निपातितः ४३ क्रकचैः पाट्यमानस्तु क्षुरधाराभिरप्यथ । अन्धे तमसि दुःखार्तः पूयशोणितभोजनः ४४ सप्तवर्षे मृता-

जागाच रहात होता ३०. ह्याप्रमाणें त्यानें बारा महिने नेले व ते त्याला शंभर वर्षांप्रमाणें झाले. एकदां तो बांधवांपासून वियुक्त झालेला श्रेष्ठ राजा श्रमंल्यामुळें ३१ निद्रेनें ग्रस्त झाला आणि रूक्ष शरीरानें युक्त झालेला तो राजा निश्चेष्ट निजला; परंतु, त्याला स्मशान जवळ असल्यामुळें व दैव बलवत्तर असल्यामुळें मोठें अद्भुत स्वप्न पडलें. गुरूला अन्य देहानें त्यानें गुरुदक्षिणा दिली ३२, ३३ आणि बारा वर्षें झाल्यानंतर दुःखापासून त्याची मुक्तता झाली. नंतर चंडालस्त्रीच्या उदरांत गर्भरूपानें असल्याचें त्यानें स्वतःला अवलोकन केलें ३४ आणि "येथून बाहेर पडतांक्षणीं मी दानधर्म करीन" असा त्या राजानें गर्भामध्यें असतांनाच विचार केला ३५. नंतर तो चंडालपुत्र जन्मला आणि स्मशानामध्यें प्रेतांची व्यवस्था करण्याविषयीं सर्वदा तत्पर होऊन राहिला ३६. सातवें वर्ष लागल्यावर तो स्मशानामध्यें असतांना एक मेलेला निर्धन व गुणी ब्राह्मण बंधुजनांनीं तेथें आणिल्याचें त्यानें पाहिलें ३७. राजानेंही त्यावेळीं मूल्य घेण्याकरितां ब्राह्मणांचा अपमान केला. तेव्हां त्या ब्राह्मणांनीं तेथें विश्वामित्राच्या चरित्राचा उल्लेख केला ३८. (ते म्हणाले) "हे पाप्या, तूं पापिष्ठ व अशुभ कर्मच करीत रहा. विश्वामित्रानें पूर्वी हरिश्चंद्र राजाला, ब्राह्मणाची झोंप मोडिल्यानें पुण्य नष्ट झाल्यामुळें, चांडाल करून टाकिला होता." असें बोलणाऱ्या ब्राह्मणांची जेव्हां राजा क्षमा करीना तेव्हां "हे नराधमा, तूं आतांच घोर नरकांत जा" म्हणून त्यांनीं क्रोधानें शाप दिला. इतकें बोलणें संपतांक्षणीं हातांत पाश घेऊन आलेले भयंकर यमदूत, त्या झोंपेंत असलेल्या राजानें अवलोकन केले. नंतर हे आपल्याला बलात्कारानें बांधून नेत आहेत असेंही त्यानें ३९, ४०, ४१, ४२ पाहिलें. तेव्हां तो अतिशय खिन्न झाला आणि "हे माते, हे तात, आज मला" इतकें बोलत आहे तोंच नरकामध्यें तेलाच्या टाकींत यमदूतांनीं

स्मानं पुल्कसस्ते हृदं ह । दिने दिने तु नरके दह्यते पच्यतेऽन्यतः ५५ भिद्यते क्षोभ्यतेऽन्यत्र मार्यते पाट्यतेऽन्यतः । स्राव्यते दीप्यतेऽन्यत्र शीतवाताहतोऽन्यतः ५६ एकं दिनं वर्षशतप्रमाणं नरके ऽभवत् । तथा वर्षशतं तत्र श्वाभिते नरके भटैः ५७ ततो निपातितो भूमौ विष्ठाशी श्वा व्यजायत । वान्ताशी शीतदग्धश्च मासमात्रे मृतोऽपि सः ५८ अथापश्यत्खरं देहं हस्तिनं वानरं पशुम् । छागं विडालं कङ्कं च गामविं पक्षिणं कृमिम् ५९ मत्स्यं कूर्मं वराहं च श्वाविधं कुक्कुटं शुकम् । सारिकां स्थावरांश्चैव सर्पमन्यांश्च देहिनः ६० दिवसे दिवसे जन्म प्राणिनः प्राणिनस्तदा । अपश्यद्दुःखसन्तप्तो दिनं वर्षशतं तथा ६१ एवं वर्षशतं पूर्णं गतं तत्र कुयोनिषु । अपश्यच्च कदाचित्स राजा तत्स्वकुलोद्भवम् ६२ तत्र स्थितस्य तस्यापि राज्यं द्यूतेन हारितम् । भार्या हृता च पुत्रश्च स चैकाकी वनं गतः ६३ तत्रापश्यत्स सिंहं वै व्यादितास्यमथाव्रजम् । विभक्षयिषुमायान्तं शरभेण समन्वितम् ६४ पुनश्च भक्षितः सोऽपि भार्यां शोचितुमुद्यतः । हा शैव्ये क्व गतास्यद्य मामिहापास्य दुःखितम् ६५ अपश्यत्पुनरेवापि भार्यां स्वां हतपुत्रकाम् । त्रायस्व त्वं हरिश्चन्द्र किं द्यूतेन तव प्रभो ६६ पुत्रस्ते शोच्यतां प्राप्तो भार्या

---

त्याला टाकिलें. ४३. करवतांनीं त्याला ते कापूं लागले; अधोभागीं वस्तऱ्यानें छेदूं लागले आणि पू व रक्त तोंडांत कोंबून त्या दुःखाकुल राजाला त्यांनीं गाढ अंधकारांत सोडिलें ४४. चंडालजातींत उत्पन्न होऊन सात वर्षें झाल्यानंतर राजानें स्वतःला मेल्याचें पाहिलें व ह्याप्रमाणें प्रत्यहीं नरकांत व इतर ठिकाणींही त्याला दुःख भोगावें लागलें ४५. यमदूत त्याला खेद व क्षोभ उत्पन्न करीत असत; कोठें तरी नेऊन मारीत असत; दुसरीकडे नेऊन फाडीत असत; जखमेवर ते क्षार टाकीत; एखाद्या ठिकाणीं नेऊन त्याला जाळूं लागत आणि दुसरे ठिकाणीं ते त्याला गार वाऱ्याच्या सोसाट्यांत ठेवीत ४६. नरकांतील एक दिवस त्याला शंभर वर्षांप्रमाणें झाला आणि अशीं शंभर वर्षें नरकामध्यें त्याला यमदूतांनीं दुःख दिलें ४७. नंतर तो भूमीवर मरून पडून श्वानाच्या जन्मास आला आणि विष्ठा व ओक खाऊं लागला. परंतु, थंडीचा कडाका बसल्यामुळें तो एका महिन्यांतच मेला ४८. नंतर गर्दभ, गज, वानर, पशु, बोकड, मार्जार, कंक, गाय, मेंढा, पक्षी, कृमि ४९, मासा, कांसव, सुवर, साळ, कोंबडा, राघु, सारिका, वृक्ष, सर्प व इतर प्राणी ५० ह्यांचे देह प्रत्यहीं भिन्न भिन्न स्वतः प्राप्त झाल्याचें म्हणजे त्या त्या योनींत स्वतः जन्मास आल्याचें त्यानें अवलोकन केलें व दुःखानें संतप्त झाल्यामुळें एक एक दिवस त्यानें शंभर वर्षांप्रमाणें कांढिला ५१. ह्याप्रमाणें नीच योनींमध्यें त्याचीं पुरीं शंभर वर्षें गेलीं. एकदां सूर्यवंशांत स्वतः उत्पन्न झाल्याचेंही त्यानें अवलोकन केलें. तेथें वसतांना द्यूतामुळें त्याचें राज्य, भार्या व पुत्र ह्यांचें हरण होऊन तो एकटा वनांत गेला ५२, ५३; तेथें आपसरलेला भयंकर सिंह आपल्याला खाण्याकरितां येत असल्याचें व त्याच्या मागें शरभ लागल्याचें त्यानें पाहिलें ५४. इतक्यांत त्या सिंहानेंही त्या शरभानें खाऊन टाकिलें व तो राजा भार्येविषयीं शोक करूं लागला. "हे शैब्यकन्ये, आज मज दुःखिताला येथें टाकून तूं कोठें गेली

शैब्यया सह। स नापश्यत्पुनरपि धावमानः पुनः पुनः ६७ अथापश्यत्पुनरपि स्वर्गस्थः स नराधिपः। नीयते मुक्तकेशी सा दीनाविवसना बलाद् ६८हाहा वाक्यं प्रमुञ्चन्ती त्रायस्वेत्यस-कृत्स्वना। अथापश्यत्पुनस्तत्र धर्मराजस्य शासनात् ६९आक्रन्दन्त्यन्तरिक्षस्था आगच्छेह नराधिप। विश्वामित्रेण विज्ञप्तो यमो राजंस्तवार्थतः ६० इत्युक्त्वा सर्पपाशैस्तु नीयते बल-वद्भिः। आद्धदेवेन कथितं विश्वामित्रस्य चेष्टितम् ६१ तत्रापि तस्य विकृतिर्नाधर्मोत्था व्यव-र्धत। एताः सर्वा दशास्तस्य याः स्वप्ने संप्रदर्शिताः ६२ सर्वास्तास्तेन संभुक्ता यावद्वर्षाणि द्वादश। अतीते द्वादशे वर्षे नीयमानो भटैर्बलात् ६३ यमं सोऽपश्यदाकाराद्वाच च नराधि-पम्। विश्वामित्रस्य कोपोऽयं दुर्निवार्यो महात्मनः ६४ पुत्रस्य ते मृत्युमपि प्रदास्यति स कौशिकः। गच्छ त्वं मानुषं लोकं दुःखशेषं च भुंक्ष्व वै ६५ गतस्य तत्र राजेन्द्र श्रेयस्तव भवि-ष्यति ६६व्यतीते द्वादशे वर्षे दुःखस्यान्ते नराधिपः। अन्तरिक्षाच्च पतितो यमदूतैः प्रणोदितः ६७ पतितो यमलोकाच्च विबुद्धो भयसंभ्रमात्। अहो कष्टमिति ध्यात्वा क्षते क्षारावसेचनम् ६८ स्वप्ने दुःखं महद्दृष्टं यस्यान्तो नोपलभ्यते। स्वप्ने दृष्टं मया यत्तु किन्तु मे द्वादशीः समाः ६९

आहेस ? ५५. इतक्यें बोलत आहे तोंच पुत्रमृतझोलेली भार्या "हे हरिश्चंद्रा, हे प्रभो, माझें रक्षण कर. द्यूताचा तुला काय उपयोग आहे ? ५६. शैब्यकन्या भार्येसह तुझ्या पुत्राला शोचनीय अवस्था प्राप्त झाली आहे" असा आक्रोश करीत असल्याचें त्यानें अवलोकन केलें. परंतु, पुनरपि ती दृष्टी पडेनाशी झाल्यामुळें तो एकसारखी धांवा-धांव करूं लागला ५७. इतक्यांत आपण स्वर्गांत असुन वस्त्ररहित व केंस मोकळे असलेल्या आपल्या दीन भार्येला "त्राहि त्राहि" असें वारंवार म्हणत ती हाहाकार करीत असतांना यमदूत बलात्कारानें नेत आहेत असें त्यानें अवलोकन केलें ५८. इतक्यांत धर्मराजाच्या आज्ञेनें दुसरा प्रकार त्याच्या दृष्टीं पडला ५९. "हे राजा, इकडे ये, हे प्रभो, तुझ्याकारितां विश्वामित्रानें यमाची प्रार्थना केली आहे" असें अंतरिक्षस्थ प्राणी ओरडत असल्याचें त्यानें पाहिलें ६०. इतकेंच अंतरिक्षांतील प्राण्यांचें भाषण झाल्यानंतर सर्पपाशांनीं जखडून त्या प्रभु हरिश्चंद्राला यमदूत बलात्कारानें नेऊं लागले व हें कृत्य विश्वामित्राचें आहे असें श्राद्धदेवानें त्याला सांगितलें ६१. तथापि अधर्मजन्य विकार त्याच्या ठिकाणीं दृष्टीं पडला नाहीं. ह्या स्वप्नांत दृष्टीं पडलेल्या सर्व दशांचा उपभोग त्यानें बारा वर्षें घेतला; आणि बारावें वर्ष संपल्यावर यमदूत त्याला बलात्कारानें नेऊं लागले असतां ६२, ६३ प्रत्यक्ष यमाचें त्याला दर्शन झालें. तेव्हां तो राजाला म्हणाला "महात्म्या विश्वामित्राचा हा अनिवार कोप आहे ६४. तो मुनि तुझ्या पुत्रालाही मारील; आतां तूं मनुष्यलोकीं जाऊन अवशिष्ट दुःखाचा उपभोग घे. हे राजा, तूं तेथें गेल्यावर तुझें कल्याण होईल ६५, ६६. बारावें वर्ष लोटल्यावर दुःख संपलें असतां यमदूतांनीं लोटल्यामुळें राजा आकाशांतून पडला ६७; आणि यमलोकांतुन पडून भीतीनें जागा झाल्यावर "अरेरे, काय हें जखमेवर क्षारसिंचन !६८. स्वप्नांत पाहिलेल्या मोठ्या दुःखाचा अंत नाहीं. मीं हें स्वप्नांत पाहिलें;

गतेत्यपृच्छत्तत्रस्थान्पुल्कसांस्तु स संभ्रमात् । नेत्यूचुः केचित्तत्रस्था एवमेवापरेऽब्रुवन् ७० श्रुत्वा दुःखी तदा राजा देवाञ्शरणमीयिवान् । स्वस्ति कुर्वन्तु मे देवाः पत्न्याया बालकस्य च ७१ नमो धर्माय महते नमः कृष्णाय वेधसे । परावराय शुद्धाय पुराणायाव्ययाय च ७२ नमो बृहस्पते तुभ्यं नमस्ते वासवाय च । एवमुक्त्वा स राजा तु युक्तः पुल्कसकर्मणि ७३ शवानां मूल्यकरणे पुनर्नष्टस्मृतिर्यथा । मलिनो जटिलः कृष्णो लगुडी विह्वलो नृपः ७४ नैव पुत्रो न भार्या तु तस्य वै स्मृतिगोचरे । नष्टोत्साहो राज्यनाशाच्छ्मशाने निवसंस्तदा ७५ अथाजगाम स्वसुतं मृतमादाय लापिनी । भार्या तस्य नरेन्द्रस्य सर्पदष्टं हि बालकम् ७६ हा वत्स हा पुत्र शिशो इत्थं वै वदती मुहुः । कृशा विवर्णा विमनाः पांशुध्वस्तशिरोरुहा ७७ राजपत्न्युवाच ॥ हा राजन्पश्य बालं त्वं पश्यसीमं महीतले । रममाणं पुरा दृष्टं दष्टं दुष्टाहिना मृतम् ७८ तस्या विलापशब्दं तमाकर्ण्य स नराधिपः । जगाम त्वरितोऽप्येति भविता मृतकम्बलः ७९ स तां रोरूयतीं भार्यां नाभ्यजानात्तु पार्थिवः । चिरप्रवाससन्तप्तां पुनर्जातामिवाबलाम् ८० सापि तं चारुकेशान्तं पुरा दृष्ट्वा जटालकम् । नाभ्यजानान्नृपसुता शुष्कवृक्षोपमं नृपम् ८१ सोऽपि कृष्णपटे बालं दृष्ट्वाशीविषपीडितम् । नरेन्द्रलक्षणोपेतं चिन्तामाप नरेश्वरः ८२ तस्यास्यं चंद्रबिम्बाभं सुभ्रुरम्यं सुमुन्नसम् । नीलाः केशाः

---

परंतु, मला येथें बारा वर्षे लोटलीं किंवा काय ? ६९ असें त्यानें तेथील चांडालांना गोंधळून विचारिलें असतां, नाहीं असें तेथील चांडाल ह्मणाले व दुसऱ्यांचेंही असेंच ह्मणणें पडलें ७०. तें ऐकून दुःखी राजा देवांना शरण गेला आणि ह्मणाला "देवांनीं बालक व पत्नी ह्यांसह माझें कल्याण करावें ७१. महाधर्म, विश्वोत्पादक, सर्वोत्कृष्ट, शुद्ध, पुरातन व अव्यय असा कृष्ण७२, बृहस्पति व इंद्र ह्या तुह्मांला नमस्कार असो". असें बोलून तो राजा शवांचें मूल्य करणें ह्या चांडालकर्माला लागला असतां ७३ त्याला सर्व विस्मरण पडलें. सारांश, मळ, जटा व सोटा ह्यांनीं युक्त असलेला तो कृष्णवर्ण राजा विव्हळ होऊन काम करूं लागला असतां पुत्राचें व भार्येचें त्याला स्मरणही झालें नाहीं व स्मशानांत असलेल्या त्या राजाचें राज्य नाहींसें झाल्यामुळें त्याचा उत्साहही नाहींसा झाला होता ७४,७५. नंतर कृश, निस्तेज धुळीनें केंस अस्ताव्यस्त झालेली व खिन्न अशी त्या राजाची भार्या "हे वत्सा, हे पुत्रा, हे शिशो," असें वारंवार ह्मणत व विलाप करीत सर्पदंशानें मेलेला आपला पुत्र घेऊन तेथें आली. ७६, ७७ आणि ह्मणाली "हे राजा, पूर्वी खेळतांना दृष्टीं पडलेल्या ह्या बालकाला तूं आज दुष्ट सर्पानें दंश केल्यामुळें मृत होऊन भूतलावर पडल्याचें अवलोकन करीत आहेस"७८. तिचा विलापशब्द ऐकून तो राजा प्रेताचें वस्त्र मिळेल ह्या उद्देशानें सत्वर तेथें आला ७९. परंतु, चिरकाल प्रवासानें संतप्त झाल्यामुळें पुनर्जन्म झाल्यासारखी ती स्त्री रोदन करीत असतांना राजानें ओळखिली नाहीं ८० व तिनेंही मनोहर केशाग्रांनीं युक्त असलेला राजा पूर्वी पाहिल्यामुळें जटाधारण करून शुष्कवृक्षतुल्य बनलेल्या त्याला ओळखिलें नाहीं ८१. परंतु, कृष्णवस्त्रांत सर्पदंश झालेलें बालक राजचिन्हांकित आहे असें पाहून

कुञ्चिताश्च समा दीर्घास्तरङ्गिताः८३राजीवनेत्रयुगुलो बिम्बोष्ठपुटसंहतः। चतुर्दंष्ट्रश्चतुःकिष्कुर्दीर्घघोणो दीर्घबाहुकः ८४ चतुर्लेखः करो मत्स्ययवशृङ्गैकपर्वतः। शिरालपादो गम्भीरः सूक्ष्मत्वक् त्रिवलीधरः८५ अहो कष्टं नरेन्द्रस्य कस्याप्येष कुले शिशुः। जातो नीतः कृतान्तेन कामप्याशां दुरात्मना ८६ एवं दृष्ट्वा हि तं बालं मातुरुत्सङ्गशायिनम्। स्मृतिमभ्यागतो बालो रोहितास्योऽब्जलोचनः८७सोऽप्येतामेव मे वत्सो वयोवस्थामुपागतः। नीतो यदि न घोरेण कृतान्तेनात्मनो वशम् ८८ राजपत्न्युवाच॥हा वत्स कस्य पापस्य अपध्यानादिदं महत्। दुःखमापतितं घोरं यस्यान्तो नोपलभ्यते८९हा नाथ राजन्भवता मामनाश्वास्य दुःखिताम्। क्वापि सन्तिष्ठता स्थाने विश्रब्धं स्थीयते कथम् ९० राज्यनाशः सुहृत्त्यागो भार्यातनयविक्रयः। हरिश्चन्द्रस्य राजर्षेः किं विधे न कृतं त्वया ९१ इति तस्या वचः श्रुत्वा राजा स्वस्थानतश्च्युतः। प्रत्यभिज्ञाय दयितां पुत्रं च निधनं गतम् ९२ कष्टं शैव्येयमेषा हि स बालोऽयमितीरयन्। रुरोद दुःखसन्तप्तो मूर्च्छामभिजगाम च ९४ सा च तं प्रत्यभिज्ञाय तामवस्थामुपागतम्। मूर्च्छिता निपपातार्ता निश्चेष्टा धरणीतले ९५ चेतः संप्राप्य राजेन्द्रो राज-

तो चिंताक्रांत झाला ८२. उत्कृष्ट भिवया व नासिका ह्यांनीं युक्त व चंद्रबिंबतुल्य असें रम्य मुख, केश कुंचित, काळे कुळकुळीत, एकसारखे लांबट व लाटांप्रमाणें असलेले ८३, कमलतुल्य नेत्र, तोंडल्याप्रमाणें आरक्तवर्ण ओंठ, चार दाढा, चार हात लांबी, लांबट तोंडावळा, दीर्घ बाहू ८४, चार रेघा, मत्स्याकृति यव व एक पर्वत—ह्यांनीं युक्त असा हात, शिरायुक्त पाद, सूक्ष्म त्वचा आणि तीन वळ्या ह्यांनीं युक्त असा गंभीर बालक पाहून राजा मनांत ह्मणाला ८५. "अरेरे! हा कोणत्या तरी राजाच्या कुलामध्यें उत्पन्न झालेला पुत्र असून दुष्ट कृतांतानें ह्याला कोणीकडे बरें नेलें आहे! ८६ ह्याप्रमाणें मातेच्या अंकावर पडलेल्या त्या बालकाला पाहून त्याला कमलनयन रोहितास्याचें स्मरण झालें ८७; आणि "तो माझा बालकही इतक्याच वयाचा होता; परंतु, घोर कृतांताच्या तावडींत सांपडला नसला तर बरें असें त्यानें मनांत आणिलें" ८८. राजपत्नी ह्मणते:—हे वत्सा, कोणत्या पाप्याच्या वाईट चिंतनामुळें हें मोठें घोर अनंत दुःख प्राप्त झालें आहे ८९! हे नाथ, हे राजा, मज दुःखितेचें सांत्वन न करितां तूं अदृश्य स्थानामध्यें स्वस्थ कसा राहिला आहेस? ९० अरे दैवा! राज्यनाश, मित्रत्याग व स्त्रीपुत्रविक्रय तूं हरिश्चंद्रराजाचा घडवून आणिलास. आतां काय बरें करावयाचें टेविलें आहेस!" ९१. हें तिचें बोलणें ऐकून राजा पूर्वस्थितीवर आला आणि त्याला स्त्रीची व मृतपुत्राची ओळख पटूं लागली ९२. "कोण ही! कोणाच्या तरी घरीं राहिलेली माझी श्रेष्ठ स्त्री तर नव्हेना! हो मेलेला बालक तरी कोण बरें असावा"! असा विचार राजा करूं लागला ९३; "अरेरे! तीही पत्नी व तोच हा बालक" असें म्हणत म्हणत तो रडूं लागला; आणि दुःखसंतप्त होऊन मूर्च्छित झाला ९४. इकडे त्यांत तशी अवस्था प्राप्त झालेल्या राजाला ही तिनें ओळखिलें व ती

पत्नी च तौ समम्। विलेपतुः सुसन्तप्तौ शोकभारातिपीडितौ ९६ राजोवाच॥ हा वत्स सुकुमारं ते स्वक्षिभ्रूनासिकाळकम्। पश्यतो मे मुखं दीनं हृदयं किं न दीर्यते ९७ तात तातेति मधुरं ब्रुवाणं स्वयमागतम्। उपगुह्य वदिष्ये कं वत्स वत्सेति सौहृदात्९८ कस्य जानुप्रणीतेन पिङ्गेन क्षितिरेणुना। ममोत्तरीयमुत्सङ्गं तथाङ्गमत्यमेष्यति ९९ अङ्गप्रत्यङ्गसम्भूतो मनोहृदयनन्दनः। मया कुपित्रा हा वत्स विक्रीतो येन वस्तुवत् २०० हृत्वा राज्यमशेषं मे सबान्धवधनं महत्। दैवाहिना नृशंसेन दष्टो मे. तनयस्ततः १ अहं दैवादिदष्टस्य पुत्रस्याननपङ्कजम्। निरीक्षन्नपि घोरेण विषेणान्धीकृतोऽधुना २ एवमुक्त्वा तमादाय बालकं बाष्पगद्गदः। परित्यज्य च निश्चेष्टो मूर्च्छया निपपात ह ३ राजपत्न्युवाच॥ अयं स पुरुषव्याघ्रः स्वरेणैवोपलक्ष्यते। विद्वज्जनमनश्चन्द्रो हरिश्चन्द्रो न संशयः४तथास्य नासिका तुङ्गा अग्रतोऽधोमुखं गता। दन्ताश्च मुकुळप्रख्याः ख्यातकीर्तेर्महात्मनः५ श्मशानमागतः कस्मादयं स नरेश्वरः। अपहाय पुत्रशोकं सापश्यत्पतितं पतिम् ६ प्रहृष्टा विस्मिता दीना भर्तृपुत्राधिपीडिता। वीक्षन्ती सा ८ ऽपश्यद्भर्तुर्दण्डं जुगुप्सितम् ७ श्वपाकार्हं मनो मोहं जगामायतलोचना। प्राप्य चेतश्च शनकैः सगद्गदमभाषत ८ धिक्त्वां दैवात्यकरुणं निर्मर्यादं जुगुप्सितम्। येनायममरप्रख्यो

---

मूर्च्छित होऊन भूमीवर निश्चेष्ट पडली ९५. नंतर राजा व राजपत्नी हे दोघेही सावध झाल्यावर अतिशोकानें पीडित व संतप्त झाल्यामुळें विलाप करूं लागले ९६. राजा ह्मणतो " हे वत्सा, उत्कृष्ट नेत्र, भिवया, नासिका व केश ह्यांनीं युक्त असलेलें मुख दीन अवलोकन करून माझें हृदय विदीर्ण कां होत नाहीं ? ९७ आतां मी," बाबा बाबा, " असें मधुर भाषण करीत आपण होऊन आलेल्या कोणाला वरें आलिंगन देऊन बाळा, बाळा, असें ह्मणूं ? ९८ आतां कोणाच्या वरें गुडघ्यांच्या पिंगट धुळीनें माझें अंगवस्त्र, अंक व शरीर मलिन होणार आहे ? ९९ मन व हृदय आनंदित करणाऱ्या तुला हे वत्सा, मी निंद्य बापानें वस्तुप्रमाणें विकून टाकिलें २०० ! बंधु व धन ह्यांसह माझें सर्व प्रचंड राज्य हरण करून दैवरूप दुष्ट सर्पानें माझ्या पुत्राला दंश केला १; व दैवरूप सर्पानें दंश केलेल्या पुत्राचें मुखकमळ पहातां पहातां मीही घोर विषानें सांप्रत अंध झालों आहें ! " २. असें गद्गदस्वरानें बोलून व बाळकाला कवटाळून घेऊन राजा मूर्च्छेनें निश्चेष्ट पडला ३. राजपत्नी ह्मणते:—विद्वज्जनांच्या मनाला चंद्राप्रमाणें आल्हाद देणारा तो पुरुषश्रेष्ठ हरिश्चंद्र स्वरावरून निःसंशय हाच भासत आहे ४. कारण, त्या महात्म्या कीर्तिमान् पुरुषाचे दांत कळ्यांप्रमाणें असून नासिकाही तशीच उन्नत व शेंडा खालीं वळलेली आहे ५. परंतु, हा जर तो राजा असेल तर स्मशानांत कां वरें आला आहे ?" ह्यावेळीं पुत्रशोक बाजूला टेवून ती, भूमीवर पडलेल्या पतीकडे विस्मित व हर्षयुक्त होऊन पाहूं लागली. तो पति व पुत्र ह्यांच्या काळजीनें दीन होऊन पहात असलेल्या त्या तारामतीची दृष्टि भर्त्याच्या चांडाळयोग्य निंद्य दंडाकडे गेली; आणि ती मूर्छेनें मोहित झाली. नंतर शुद्धीवर येऊन गद्गदस्वरानें ती ह्मणाली ६, ७, ८. " हे

नीतो राजा श्वपाकताम् ९ राज्यनाशं सुहृत्त्यागं भार्यातनयविक्रयम्। प्रापयित्वापि नो मुक्तश्चण्डालोऽयं कृतो नृपः १० हा राजन्शतसन्तापाभिस्थं मां धरणीतलात्। उत्थाप्य नाथ पर्यङ्कमारोहेति किमुच्यते ११ नाथ पश्यामि ते छत्रं भृङ्गारमथवा पुनः। चामरं व्यजनं चापि कोऽयं विधिविपर्ययः १२ यस्याग्रे व्रजतः पूर्वं राजानो भृत्यतां गताः। स्वोत्तरीयैः कुर्वन्ति परिशोध्यं महीतलम् १३ सोऽयं कपालसंलग्नघटीपटनिरन्तरे। मृतनिर्माल्यसूत्रान्तर्गुम्फकेशे सुदारुणे १४ वसानिष्यन्दसंशुष्कमहीपृष्ठकलङ्किते। भस्माङ्गारार्धदग्धास्थिमज्जासंघटभीषणे १५ गृध्रगोमायुनादार्तनष्टक्षुद्रविहङ्गमे। चिताधूमायितस्याम नीलीकृतदिगन्तरे १६ कुणपास्वादसमुदा संप्रहृष्टनिशाचरे। चरत्यमेध्ये राजेन्द्रः श्मशाने दुःखपीडितः १७ एवमुक्त्वा समाश्लिष्य कण्ठं राज्ञो नृपात्मजा। कष्टशोकाश्रयाधारा विलापार्तेया गिरा १८ राजपत्न्युवाच॥ राजन्स्वप्नोऽथ तथ्यं वा यदेतन्मन्यते भवान्। तत्कथ्यतां महाभाग मनो वै मुह्यते मम १९ यद्येतदेवं धर्मज्ञ नास्ति धर्मे सहायता। तथैव विप्रदेवादिपूजने पालने भुवः २० नास्ति धर्मः कुतः सत्यमार्जवं चानृशंसता। यत्र त्वं धर्मपरमः स्वराज्यादवरोपितः २१ इति तस्या वचः

तुला धिक्कार असो ! ह्या देवतुल्य राजालाही जर तूं चांडाल केलें आहेस तर तूं अति निर्दय, मर्यादारहित व निंद्य आहेस ९. राज्यनाश, मित्रत्याग व स्त्रीपुत्रविक्रय सोसूनहीं सुटका न करितां ह्या राजाला तूं चांडाल केलें आहेस ! १०. हे राजा, ह्याप्रमाणें संतप्त झालेल्या मला भूतलावरून उचलून आज मंचकावर चढवीत नाहींस ह्याला काय वरें हाणावें ! ११. अरेरे ! काय हा दैवाचा फेरा ! तुझें छत्र, शृंगार, विंझोणा, अथवा चामर आज माझ्या दृष्टीं पडत नाहीं १२. जो जाऊं लागला असतां पूर्वी सेवक बनलेले राजे ज्याच्यापुढें जाऊन आपल्या वस्त्रांनीं रस्ते झाडीत असत १३ तो हा राजेंद्र दुःखपीडित होऊन आज अपवित्र स्मशानामध्यें संचार करीत आहे. हें स्मशान करंट्यांचा स्पर्श झालेल्या मडक्यांनीं भरलेलें आहे. ह्या भयंकर स्मशानांत प्रेतांच्या गळ्यांतील काढून टाकिलेल्या माळांचे सूत्ररूप गुंतवळ रतून बसलेले आहेत; वसेच्या स्रावानें ह्यांतील शुष्क स्थलें भूषित झालेलीं आहेत; राख, निखारे, अर्धवट जळलेलीं हाडें व मज्जा ह्यांचा खच पडल्यामुळें हें भयंकर झालेलें आहे; गृध्र व कोल्हीं ह्यांच्या नादानें भिऊन येथील क्षुद्र पक्षी नाहींसे झाले आहेत; आणि चिताधूमानें येथील दिशा नीलवर्ण झालेल्या असून शवगंधानें निशाचर आनंदित झालेले आहेत" १४, १५, १६, १७. असें बोलून दुःख व शोक ह्यांनीं व्याप्त झालेली राजपत्नी राजाच्या गळ्याला मिठी घालून आर्त वाणीनें विलाप करूं लागली १८. राजपत्नी ह्मणाली:—हे राजा, हें स्वप्न आहे किंवा सत्य आहे ? आपण काय समजत आहां तें सांगा. हे महाभाग, माझें मन गोंधळून गेलें आहे १९. असें जर असेल तर, हे धर्मज्ञ, धर्माचरण, देवब्राह्मणादिकांचें पूजन व पृथ्वीचें पालन ह्या कृत्यांना देवांचें साहाय्यच नाहीं ! २०. आपण धर्मनिष्ठही ज्याअर्थी स्वराज्यापासून भ्रष्ट झाला आहां त्याअर्थी धर्म निष्फळच होय. मग सत्य, सरळपणा व सौजन्य ह्यांची गोष्ट पाहिजे कशाला !" २१. हें तिचें भाषण

श्रुत्वा निःश्वस्योष्णं सगद्गदम् । कथयामास नन्वङ्ग्या यथा प्राप्ता श्वपाकता २२ रुदित्वा सापि सुचिरं निःश्वस्योष्णं च दुःखिता । स्वपुत्रमरणं भीरुर्यथा वृत्तं न्यवेदयत् २३ श्रुत्वा राजा तदा वाक्यं निपपात महीतले । मृतस्य पुत्रस्य तदा जिह्वया लेलिहन्मुखम् २४ राजोवाच ॥ यमस्य भिक्षां याचावः कृपणौ पुत्रगर्द्धिनौ । तस्माच्छीघ्रं व्रजावोऽद्य पुत्रो यत्र प्रियो गतः २५ प्रिये न रोचये दीर्घं कालं क्लेशमुपासितुम् । नात्मायत्तश्च तन्वङ्गि पश्य मे मन्दभाग्यताम् २६ चण्डालेनाननुज्ञातः प्रवेक्ष्ये ज्वलनं यदि । चाण्डालदासतां यास्ये पुनरप्यन्यजन्मनि २७ नरके च पतिष्यामि कीटकः कृमिभोजनः । वैतरण्यां महापूयवसासृक्स्नायुपिच्छिले २८ असिपत्रवने प्राप्य छेदं प्राप्स्यामि दारुणम् । तापं प्राप्स्यामि वा प्राप्य महारौरवरौरवौ २९ मग्नस्य दुःखजलधौ पारः प्राणविमोक्षणम् । एकोऽपि बालको योयमासीद्वंशकरः सुतः ३० मम दैवाम्बुवेगेन मग्नः सोऽपि बलीयसा । कथं प्राणान्विमुञ्चामि परायत्तोऽस्मि दुर्गतः ३१ अथवा नार्त्तिना क्लिष्टो नरः पापमवेक्षते । तिर्यक्त्वेनास्ति तद्दुःखं नासिपत्रवने तथा ३२ वैतरण्यां कुतस्तादृग्यादृशं पुत्रविप्लवे । सोऽहं सुतशरीरेण दीप्यमाने हुताशने ३३ निपतिष्यामि तन्वङ्गि क्षन्तव्यं कुकृतं मम । अनुज्ञाता च गच्छ त्वं विप्रवेश्म शुचिस्मिते ३४ मम वाक्यं च तन्वङ्गि निबोधादृतमानसा । यदि दत्तं यदि हुतं गुरवो यदि तोषिताः ३५

---

ऐकून राजानें उष्ण सुस्कारा टाकिला आणि चांडालत्व कसें प्राप्त झालें तें त्यानें तिला सद्गदित होऊन सांगितलें २२. तेव्हां तीही दुःखित स्त्री पुष्कळ रडली; आणि उष्ण सुस्कारा टाकून त्या अबलेनेंही पुत्रमरणाची हकीकत कळविली २३. ती ऐकून राजा मृत पुत्राचें मुख चाटीत असतांना भूमीवर पडला २४. राजा ह्मणतोः— आपण पुत्रवत्सल व दीन स्त्रीपुरुष यमापाशीं भिक्षा मागूं आणि आजच प्रियपुत्राकडे जाऊं २५. हे प्रिये, फार वेळ क्लेश भोगणें मला आवडत नाहीं. परंतु, दुःखमोक्ष माझ्या हातीं नाहीं. तेव्हां हे सुंदरि; पाव हें माझें दुर्दैव ! २६. चंडालाच्या आज्ञेशिवाय अग्निप्रवेश केल्यास अन्य जन्मांत मी पुनरपि चांडाळदास होईन २७; इतकेंच नव्हे परंतु, कृमिभक्षक कीटक बनून मी पू, वसा, रक्त व स्नायु ह्यांनीं बुळबुळीत झालेल्या नरकामध्यें किंवा वैतरणी नदींत पडेन २८. असिपत्रवनांत जाऊन मला भयंकर छेद प्राप्त होईल किंवा महारौरवनरक प्राप्त होऊन मला ताप प्राप्त होईल २९. तथापि दुःखसागरांत मग्न झालेल्याची मृत्यु हीच सुटका होय. अरेरे ! वंश चालविणारा जो हा एकच बालक होता ३० तोही माझ्या दैवरूप प्रचंड जलप्रवाहामुळें बुडून गेला. पराधीन व ह्मणूनच दुःस्थितींत असलेला मी प्राण तरी कसा देऊं ! ३१ अथवा दुःखानें त्रस्त झालेला पुरुष पापाकडे लक्ष्य देत नसतो. कारण, पुत्रनाशामुळें जसें दुःख प्राप्त होतें तसें दुःख तिर्यग्योनि, असिपत्रवन, अथवा वैतरणी प्राप्त झाल्यानेंही होत नाहीं. तस्मात्, हे सुंदरि, तूं दुर्वर्तनाबद्दल मला क्षमा कर. मी आतां पुत्रदेहासह प्रज्वलित अग्नींत उडी घालितों. हे सुहास्यवदने, तूं माझ्या आज्ञेनें विप्रगृहीं जा ३२, ३३, ३४. हे सुंदरि, आदरपूर्वक हें माझें ह्मणणें लक्ष्यांत ठेव. माझ्या हातून जर दान, गुरुजनांचा संतोष

परत्र संङ्गमो भूयात्पुत्रेण सह च त्वया । इहलोके कृतस्यैतद्भविष्यति ममेप्सितम् ३६ त्वया सह मम श्रेयो गमनं पुत्रमार्गणे । यन्मया हसता किंचिद्रहस्ये या शुचिस्मिते ३७ अश्लीलमुक्तं ;तत्सर्वं क्षन्तव्यं मम याचतः । राजपत्नीति गर्वेण नावमान्यः स ते द्विजः । सर्वयत्नेन ते तोष्यः स्वामी दैवतवच्छुभे ३८ राजपत्न्युवाच ॥ अहमप्यत्र राजर्षे दीप्यमाने हुताशने । दुःखभारासहाचैव सह यास्यामि वै त्वया ३९ सह स्वर्गं च नरकं सहैवावां हि भुंक्ष्वहे । श्रुत्वा राजा ततोवाच एवमस्तु पतिव्रते ४० पक्षिण ऊचुः ॥ ततः कृत्वा चितां राजा आरोप्य तनयं स्वकम् । भार्यया सहितश्चासौ बद्धाञ्जलिपुटस्तदा ४१ चिन्तयन्परमात्मानमीशं नारायणं हरिम् । हृत्कोटरगुहासीनं वासुदेवं सुरेश्वरम् ४२ अनादिनिधनं ब्रह्म कृष्णं पीताम्बरं शुभम् । तस्य चिन्तयमानस्य सर्वे देवाः सवासवाः ४३ धर्मं प्रमुखतः कृत्वा समाजग्मुस्त्वरान्विताः । आगत्य सर्वे प्रोचुस्ते भो भो राजञ्छृणु प्रभो ४४ अयं पितामहः साक्षाद्धर्मश्च भगवान्स्वयम् ४५ साध्याश्च विश्वे मरुतो लोकपालाः सचारणाः । नागाः सिद्धाः सगन्धर्वा रुद्राश्चैव तथाश्विनौ ४६ एते चान्ये च बहवो विश्वामित्रस्तथैव च । विश्वत्रयेण यो मित्रं कर्तुं वै नाशकत्पुरा ४७ विश्वामित्रस्तु ते मैत्रीमिष्टं चाहर्तुमिच्छति । आरुरोह ततः प्राप्तो धर्मः शक्रोऽथ गाधिजः ४८ धर्म उवाच ॥ मा राजन्साहसं कार्षीर्धर्मोऽहं त्वामुपागतः । तितिक्षा-

---

अथवा हवन झालें असेल ३५ तर पुत्रासह मी तुला परलोकीं भेटेन. इहलोकीं ही माझी इच्छा कोठून सफल होणार ! ३६. पुत्राच्या शोधाकरितां तुझ्यासह माझें जाणें श्रेयस्कर आहे. ( परंतु, हें घडणार कसें ? ) असो. हे सुहास्यवदने, मी हंसत हंसत किंवा एकांतामध्यें ३७ जें कांहीं अश्लील भाषण केलें असेल त्या सर्वाबद्दल प्रार्थना करणाऱ्या मला तूं क्षमा कर. मी राजपत्नी अशा गर्वानें तूं त्या द्विजाचा अपमान करूं नको. हे कल्याणि, त्या मालकाला तूं देवाप्रमाणें सर्व प्रयत्नांनीं संतुष्ट ठेवीत जा. ३८ राजपत्नी ह्मणतेः— हे राजर्षे, दुःखभार मला सहन होत नसल्यामुळें मी आजच आपल्याबरोबर प्रज्वलित अग्नीमध्यें येतें ३९.आपण, स्वर्ग अथवा नरक एकत्रच भोगूं. हें ऐकून राजा ह्मणाला " हे पतिव्रते, ठीक आहे ". ४०. पक्षी ह्मणतातः—नंतर चिता रचून व पुत्र वर ठेवून भार्येसह राजानें हात जोडिले ४१; आणि ब्रह्मरूप, अनाद्यनंत, देवाधिदेव, हृदयरूप गुहेमध्यें वास्तव्य करणारा, सर्वेश्वर, पीतांबरधारी, मंगलस्वरूप, दुःखहारक, आणि कृष्ण, नारायण व ब्रह्म ह्या संज्ञांनीं युक्त अशा परमात्म्या वासुदेवाचें तो चिंतन करूं लागला. तेव्हां इंद्रासह सर्वही देव ४२, ४३ धर्माला पुढें घालून सत्वर तेथें आले आणि ते सर्वही त्याला ह्मणाले " हे राजा, हे प्रभो, ऐक ४४. हा साक्षात् ब्रह्मदेव व हा स्वतः भगवान् धर्म ४५, साध्य, विश्वेदेव, मरुद्गण, लोकपाल, चारण, नाग, सिद्ध, रुद्र, अश्विनीकुमार ४६ हे व इतरही असंख्य देव आणि विश्वामित्र हे येथें आले आहेत. त्रैलोक्याशींही जो पूर्वी मैत्री करण्यास समर्थ झाला नाहीं ४७ तो विश्वामित्र तुझ्या मैत्रीची व तुझा मनोरथ पूर्ण करण्याची इच्छा करीत आहे". असें देव सांगत आहेत तोंच राजा चितेवर चढला असतां

दमसत्याद्यैः स्वगुणैः परितोषितः ४९ इन्द्र उवाच ॥ हरिश्चन्द्र महाभाग प्राप्तः शक्रोस्मि तेऽन्तिकम् । त्वया सभार्यापुत्रेण जिता लोकाः सनातनाः ५० आरोह त्रिदिवं राजन्भार्यापुत्रसमन्वितः । सुदुष्प्रापं नरैरन्यैर्जितमात्मीयकर्मभिः ५१ पक्षिण ऊचुः ॥ ततोऽमृतमयं वर्षमपमृत्युविनाशनम् । इन्द्रः प्रासृजदाकाशाच्चितास्थानगतः प्रभुः ५२ पुष्पवर्षं च सुमहद्देवदुन्दुभिनिःस्वनम् । ततस्ततो वर्तमाने समाजे देवसंकुले ५३ समुत्तस्थौ ततः पुत्रो राज्ञस्तस्य महात्मनः । सुकुमारतनुः स्वस्थः प्रसन्नेन्द्रियमानसः ५४ ततो राजा हरिश्चन्द्रः परिष्वज्य सुतं क्षणात् । सभार्यः स्वश्रिया युक्तो दिव्यमाल्याम्बरान्वितः ५५ स्वस्थः सम्पूर्णहृदयो मुदा परमया युतः । बभूव तत्क्षणादिन्द्रो भूयश्चैनमभाषत ५६ सभार्यस्त्वं सपुत्रश्च प्राप्स्यसे सद्गतिं पराम् । समारोह महाभाग निजानां कर्मणां फलैः ५७ हरिश्चन्द्र उवाच ॥ देवराजाननुज्ञातः स्वामिना श्वपचेन वै । अकृत्वा निष्कृतिं तस्य नारोक्ष्येऽहं सुरालयम् ५८ धर्म उवाच ॥ तवैनं भाविनं क्लेशमवगम्यात्ममायया । आत्मा श्वपाकतां नीतो दर्शितं तच्च चापलम् ५९ इन्द्र उवाच ॥ प्रार्थ्यते यत्परं स्थानं समस्तैर्मनुजैर्भुवि । तदारोह हरिश्चन्द्र स्थानं पुण्यकृतां नृणाम् ६० हरिश्चन्द्र उवाच ॥ देवराज नमस्तुभ्यं वाक्यं चैतन्निबोध मे । प्रसाद-

धर्म, इंद्र व विश्वामित्र हे त्याच्याजवळ आले ४८. धर्म ह्मणतो:— हे राजा, साहस करूं नको; धर्म, तितिक्षा, दम, सत्य इत्यादि गुणांनीं संतुष्ट होऊन तुझ्याकडे मी आलों आहें ४९. इंद्र ह्मणतो:— हे महाभाग्यवान् हरिश्चंद्रा, मी इंद्र तुझ्याजवळ आलों आहें. स्त्रीपुत्रांसह तूं अक्षय्य लोक जिंकिले आहेस ५०. ह्यास्तव, हे राजा, स्त्रीपुत्रांसह तूं स्वर्गारोहण कर. स्वकर्मांनीं जिंकिलेला हा स्वर्ग इतर पुरुषांना प्राप्त होणें अति दुर्घट आहे ५१. पक्षी ह्मणतात:—नंतर चितेजवळ असलेल्या प्रभु इंद्रानें आकाशापासून अपमृत्युनाशक अमृतमय वृष्टि केली ५२; व देवदुंदुभींचा प्रचंडध्वनि होत असतांना त्यानें पुष्पवृष्टिही केली. तदनंतर तेथें असलेल्या त्या देवमय समाजामध्यें ५३ सुकुमार शरीर, प्रसन्न इंद्रियें व मन ह्यांनीं युक्त व स्वस्थ असा त्या महात्म्या राजाचा पुत्र उठला ५४. तेव्हां भार्येसह हरिश्चंद्रराजानें तत्क्षणीं पुत्राला आलिंगन दिलें आणि उत्कृष्ट कांतीनें युक्त झालेला तो राजा भार्येसह दिव्य वस्त्रें परिधान करून दिव्य मालांनीं भूषित झाला ५५; आणि अतिशय आनंदित होऊन मनोरथ परिपूर्ण झाले असतां तो स्वस्थ झाला. तेव्हां इंद्र तत्क्षणीं त्याला ह्मणाला ५६ "हे महाभाग्यवान् राजा, स्वकर्मफलामुळें स्त्रीपुत्रांसह तुला उत्कृष्ट सद्गति मिळेल. तूं स्वर्गारोहण कर" ५७. हरिश्चंद्र ह्मणतो:—हे देवराज, प्रभु चांडालाच्या अनुज्ञेशिवाय आणि त्याच्या ऋणांतून मुक्त झाल्याशिवाय मी स्वर्गारोहण करणार नाहीं ५८. धर्म ह्मणतो:—तुझें हें भावी दुःख जाणून मी स्वमायेनें स्वतः चांडाल झालों आणि ती चपलता दर्शविली ५९. इंद्र ह्मणतो:—हे हरिश्चंद्रा, भूमीवरील सर्व मानव ज्या उत्कृष्ट स्थानाची इच्छा करीत असतात त्या पुण्य पुरुषांना प्राप्त होणाऱ्या स्थानावर तूं आरोहण कर ६०. हरिश्चंद्र ह्मणतो:—हे देवराज, तुला नमस्कार असो; कृपा करण्यास उद्युक्त झालेल्या

प्रमुख यस्त्वां ब्रवीमि प्रश्रयान्वितः ६१ मच्छोकमग्नमनसः कोसलानगरे जनाः। तिष्ठन्ति सानपोह्याय कथं यास्याम्यहं दिवम् ६२ ब्रह्महत्या गुरोर्घातो गोवधः स्त्रीवधस्तथा। तुल्यमेभिर्महापापं भक्तत्यागेऽप्युदाहृतम् ६३ भजन्तं भक्तमत्याज्यमदुष्टं त्यजतः सुखम्। नेह नामुत्र पश्यामि तस्माच्छक्र दिवं व्रज ६४ यदि ते सहिताः स्वर्गं मया यान्ति सुरेश्वर। ततोऽहमपि यास्यामि नरकं वापि तैः सह ६६ इन्द्र उवाच॥ बहूनि पुण्यपापानि तेषां भिन्नानि वै पृथक्। कथं संघातभोग्यं त्वं भूयः स्वर्गमवाप्स्यसि ६६ हरिश्चन्द्र उवाच॥ शक्र भुंक्ते नृपो राज्यं प्रभावेण कुटुम्बिनाम्। यजते च महायज्ञैः कर्म पौर्तं करोति च ६७ तच्च तेषां प्रभावेण मया सर्वमनुष्ठितम्। उपकर्तॄन्न सन्त्यक्ष्ये तानहं स्वर्गलिप्सया ६८ तस्माद्यन्मम देवेश किंचिदस्ति सुचेष्टितम्। दत्तमिष्टमथो जप्तं सामान्यं तैस्तदस्तु नः ६९ बहुकालोपभोग्यं हि फलं यन्मम कर्मणः। तदस्तु दिनमप्येकं तैः समं त्वत्प्रसादतः ७० पक्षिण ऊचुः॥ एवं भविष्यतीत्युक्त्वा शक्रस्त्रिभुवनेश्वरः। प्रसन्नचेता धर्मश्च विश्वामित्रश्च गाधिजः ७१ गत्वाथ नगरं सर्वे चातुर्वर्ण्यसमाकुलम्। हरिश्चन्द्रस्य निकटे प्रोवाच विबुधाधिपः ७२ आगच्छन्तु जनाः शीघ्रं स्वर्गलोकं सुदुर्लभम्। धर्मप्रसादात्संप्राप्तं सर्वैर्युष्माभिरेव तु ७३ विमानकोटिसंबद्धं स्वर्गलोकान्महीतलम्। गत्वाऽयोध्याजनं प्राह दिवमारुह्यतामिति ७४ तदिन्द्रस्य वचः श्रुत्वा प्रीत्या

---

तुला मी विनयानें सांगत आहें तें ऐक ६१. माझ्या शोकानें ग्रस्त झालेले लोक अयोध्येंत असतांना त्यांना सोडून आज मी स्वर्गाला कसा येऊं ? ६२. ब्रह्महत्या, गुरुहत्या, स्त्रीहत्या व गोहत्या ह्यांच्या बरोबरीचें महापातक भक्तत्यागाविषयीं सांगितलें आहे ६३. सेवा करणाऱ्या आणि ह्मणूनच त्यागास अयोग्य असणाऱ्या निर्दोष भक्ताचा त्याग करण्याला इहलोकीं अथवा परलोकीं मला सुख दिसत नसल्यामुळें, हे इंद्रा, तूं स्वर्गाला जा ६४. हे देवराज, ते प्रजाजन जर माझ्या बरोबर येतील तर मीही स्वर्गास जाईन किंवा त्यांच्याबरोबर नरकांतही पडेन ६५. इंद्र ह्मणतोः—त्यांचीं पुण्यपापें प्रत्येकीं भिन्न भिन्न आहेत. तेव्हां समुदायानें भोग्य असा स्वर्ग तुला मिळेल कसा ? ६६. हरिश्चंद्र ह्मणतोः—हे इंद्रा, कुटुंबी जनांच्या प्रभावानें राजा—राज्य, महायज्ञ व पूर्तकर्म—करीत असतो ६७; आणि त्यांच्या प्रभावानें तें सर्व मीं केलें आहे. तस्मात्, स्वर्गाच्या इच्छेनें मी त्या उपकार करणाऱ्यांना सोडणार नाहीं ६८. ह्यास्तव, हे सुरेश्वर, माझें जर कांहीं सदाचरण, दान, याग, अथवा जप असेल तर त्याचें फल त्यांच्यासह मला विभागून मिळावें ६९. माझ्या कर्माचें फल जर बहुकालपर्यंत टिकणारें असेल तर तुझ्या प्रसादानें तें त्यांच्याबरोबर मला एकच दिवस मिळो ७०. पक्षी ह्मणतातः—नंतर " ठीक आहे " असें त्रैलोक्याधिपति इंद्रानें, संतुष्ट धर्मानें व गाधिपुत्र विश्वामित्रानें सांगितलें ७१ आणि ते सर्व चातुर्वर्ण्यानें युक्त असलेल्या अयोध्या नगरांत सत्वर गेले. नंतर हरिश्चंद्राच्या समीप इंद्र ह्मणाला ७२, धर्मप्रसादानें तुह्मां सर्वांनाच अतिदुर्लभ स्वर्गलोक प्राप्त झाला आहे. ह्यास्तव, प्रजाजनांनीं सत्वर स्वर्गाला चलावें ७३. इतक्यांत कोट्यवधि विमानें स्वर्गलोकांतून भूतळावर

तस्य च भूपतेः। आनीय रोहितास्यं च विश्वामित्रो महातपाः ७५ अयोध्याख्ये पुरे रम्ये सोऽभ्यषिञ्चन्नृपात्मजम्। देवैश्च मुनिभिः सिद्धैरभिषिच्य नराधिपः ७६ राज्ञा सह तदा सर्वे हृष्टपुष्टसुबान्धवाः। सपुत्रभृत्यदारास्ते दिवमारुरुहुर्जनाः ७७ पदे पदे विमानात्ते विमानमगमन्नराः। तदा संभृतहर्षोऽसौ हरिश्चन्द्रश्च पार्थिवः ७८ संप्राप्य भूतिमतुलां विमानैः स महीपतिः। आसांचक्रे पुराकारे वप्रप्राकारसंवृते ७९ ततस्तस्यर्द्धिमालोक्य श्लोकं तत्रोशना जगौ। दैत्याचार्यो महाभागः सर्वशास्त्रार्थतत्त्ववित् ८० शुक्र उवाच ॥ हरिश्चन्द्रसमो राजा न भूतो न भविष्यति। यश्चैतच्छृणुयाद्भक्त्या नैरन्तर्येण मानवः ८१ तेन वेदाः पुराणानि सर्वे मन्त्राः ससंग्रहाः। श्रुताः स्युः पुष्करे तीर्थे प्रयागे सिन्धुसागरे ८२ देवागारे कुरुक्षेत्रे वाराणस्यां विशेषतः। विषुवग्रहणे चैव यत्फलं जपतो लभेत् ८३ तत्फलं द्विगुणं चैव संयतात्मा शृणोति यः। श्रुत्वा तु पूजयेद्भक्त्या पुराणज्ञं द्विजोत्तमम् ८४ गोभूहिरण्यवस्त्रैश्च तथैवान्नेन जैमिने। तेनैवं यत्कृतं पुण्यं तच्छक्यं न मयोदितुम् ८५ अहो तितिक्षामाहात्म्यमहो दानफलं महत्। यदा गतो हरिश्चन्द्रः पुरीं चेन्द्रत्वमाप्तवान् ८६ पक्षिण ऊचुः ॥ एतत्ते सर्वमाख्यातं हरिश्चन्द्रविचेष्टितम्।

---

आलों असतां इंद्र "स्वर्गारोहण करा" ह्मणून अयोध्यावासी लोकांना ह्मणाला ७४. तें इंद्राचें व त्या राजाचें भाषण आनंदानें ऐकून महातपस्वी विश्वामित्रानें राजकुमार रोहितास्याला आणून रम्य अयोध्यानगरांत अभिषेक केला. ह्याप्रमाणें अभिषेक केल्यावर देव, मुनि व सिद्ध ह्यांसह राजा जाण्यास निघाला ७५, ७६. तेव्हां हृष्ट व पुष्ट असे सर्वही सुहृज्जन आणि पुत्र, सेवक व स्त्रिया ह्यांसह सर्वही प्रजाजन राजाबरोबर स्वर्गाला गेले ७७ आणि ते लोक पदोपदीं ह्या विमानांतून त्या विमानांत जाऊं लागले. तेव्हां हरिश्चंद्र राजा आनंदित झाला ७८ आणि अतुल ऐश्वर्य प्राप्त झालें असतां विमानांच्या योगानें वेशी व तट ह्यांनीं व्याप्त असलेल्या नगराप्रमाणें बनलेल्या विमानसमुदायामध्यें तो आपल्या विमानांत बसून चालला ७९. तेव्हां त्याचें तें ऐश्वर्य पाहून सर्वशास्त्रार्थतत्त्ववेत्त्या महाभाग्यवान् दैत्यगुरु शुक्राचार्यानें त्याचें वर्णन केलें ८०. शुक्राचार्य ह्मणतातः—हरिश्चंद्रतुल्य राजा झाला नाहीं व होणार नाहीं. हें आख्यान जो मानव निरंतर भक्तिपूर्वक श्रवण करील ८१ त्याला वेद, पुराणें व सर्वमंत्र पठन केल्याचें फळ प्राप्त होईल. पुष्करतीर्थ, प्रयाग, सिंधुसागर ८२, देवालय, कुरुक्षेत्र व विशेषतः वाराणसी ह्या ठिकाणीं विषुवकालीं व ग्रहणसमयीं जप केल्यानें जें फळ प्राप्त होतें ८३ त्याच्या द्विगुणित फळ जितेंद्रिय राहून हें आख्यान श्रवण करणाऱ्याला प्राप्त होतें. श्रवण झाल्यानंतर पुराणवेत्त्या द्विजोत्तमाचें गाय, भूमि, सुवर्ण, वस्त्र व अन्न ह्यांच्या योगानें भक्तिपूर्वक, हे जैमिने, पूजन करावें. जो असें करील त्याला प्राप्त होणारें पुण्य मला सांगतां येणें शक्य नाहीं ८४, ८५. काय हो, हें तितिक्षेचें माहात्म्य आहे! काय हो हें दानाचें मोठें फळ आहे! अहो, हरिश्चंद्र त्यामुळें राजधानींत परत आला! त्याला इंद्रपद प्राप्त झालें! ८६ पक्षी ह्मणतातः—हें सर्व हरिश्चंद्राख्यान आपणांला कथन केलें आहे. जो अतिदुःखाकुळ पुरुष हें श्रवण

यः शृणोति एदुःखार्तः सखं महदाप्नुयात् ८७ स्वर्गार्थी प्राप्नुयात्स्वर्गं पुत्रार्थी पुत्रमाप्नुयात्। भार्यार्थी प्राप्नुयाद्भार्यां राज्यार्थी राज्यमाप्नुयात् ८८ अतः परं कथाशेषः श्रूयतां मुनिसत्तम। विपाको राजसूयस्य पृथिवीक्षयकारणम्। तद्विपाकनिमित्तं च युद्धमाडिबकं महत् २८९ (६९०) इति श्रीमार्कण्डेयपुराणे हरिश्चन्द्रोपाख्यानं नामाष्टमोऽध्यायः ॥ ८ ॥

पक्षिण ऊचुः ॥ राज्यच्युते हरिश्चन्द्रे गते च त्रिदशालयम्। निश्चक्राम महातेजा जलवासात्पुरोहितः १ वसिष्ठो द्वादशाब्दान्ते गङ्गापर्युषितो मुनिः। शुश्राव च समस्तं तु विश्वामित्रविचेष्टितम् २ हरिश्चन्द्रस्य नाशं च राज्ञश्चोदारकर्मणः। चण्डालसंप्रयोगं च भार्यातनयविक्रयम् ३ स श्रुत्वा सुमहाभागः प्रीतिमानवनीपतौ। चकार कोपं तेजस्वी विश्वामित्रमृषिं प्रति ४ वसिष्ठ उवाच ॥ मम पुत्रशतं तेन विश्वामित्रेण घातितम्। तत्रापि नाभवत्क्रोधस्ता-दृशो यादृशोऽद्य मे ५ श्रुत्वा नराधिपमिमं स्वराज्यादवरोपितम्। महात्मानं महाभागं देवब्राह्मणपूजकम् ६ यस्मात्स सत्यवाक्छान्तः शत्रावपि विमत्सरः। अनागाश्चैव धर्मात्मा अप्रमत्तो मदाश्रयः ७ सपत्नीभृत्यपुत्रस्तु प्रापितोऽन्त्यां दशां नृपः। स राज्याच्च्यावितोऽनेन बहुशश्च खिलीकृतः ८ तस्माद्दुरात्मा ब्रह्मद्विड् यज्विनामवरोपकः। मच्छापोपहतो मूढः स बकत्वमवाप्स्यति ९ पक्षिण ऊचुः ॥ श्रुत्वा शापं महातेजा विश्वामित्रोऽपि कौशिकः। स्वम-

---

करील त्याला मोठें सुख प्राप्त होईल ८७. इतकेंच नव्हे परंतु, तो स्वर्गेच्छु असल्यास त्याला स्वर्ग, पुत्रेच्छु असल्यास त्याला पुत्र, स्त्रीच्छु असल्यास त्याला स्त्री अथवा राज्येच्छु असल्यास त्याला राज्य प्राप्त होईल ८८. आतां हे मुनिश्रेष्ठ, अवशिष्ट कथा म्हणजे पृथ्वीक्षयकारक असा राजसूयाचा परिणाम आणि त्याच निमित्तानें झालेलें प्रचंड आडिबकयुद्ध आपण श्रवण करावें २८९. ( ६९० ) ह्याप्रमाणें मार्कंडेयपुराणांतील हरिश्चंद्रोपाख्याननामक आठवा अध्याय समाप्त झाला ॥ ८ ॥

पक्षी म्हणतातः—हरिश्चंद्र राज्यभ्रष्ट होऊन स्वर्गी गेल्यावर महातेजस्वी पुरोहित वसिष्ठ उदकांतून बाहेर निघाले १. ते मुनि बारा वर्षें गंगेचे ठिकाणीं राहिले असून तेथें त्यांनीं विश्वामित्राची सर्व कृति २ व त्यामुळें उदारकर्मी हरिश्चंद्र राजाचा नाश, स्त्रीपुत्रविक्रय व चंडालसंयोग हीं ऐकिलीं ३. ऐकिल्यानंतर ते महाभाग्यवान् तेजस्वी वसिष्ठमुनि हरिश्चंद्र प्रिय असल्यामुळें त्या विश्वामित्रावर क्रुद्ध झाले ४. वसिष्ठ म्हणालेः— त्या विश्वामित्रानें माझे शंभर पुत्र मारिले; परंतु, आज ह्या देवब्राह्मणपूजक महात्म्या व महाभाग्यवान् राजाला, स्वराज्यापासून भ्रष्ट केल्याचें ऐकून जसा मला क्रोध आला आहे तसा तेव्हां आला नव्हता ५, ६. सत्यवक्ता, शांत, शत्रूशीं मत्सररहित, निरुपद्रवी, धर्मनिष्ठ, माझ्या आश्रयानें रहाणारा व मदरहित असा जो हरिश्चंद्र राजा त्याला स्त्री, सेवक व पुत्र ह्यांसह अत्यंत वाईट स्थिति आणून व राज्यापासून च्युत करून त्यामुळें ह्यानें त्याला अति दुःख दिलें आहे, त्यामुळें ७, ८. हा यागकर्त्यांना दुःख देणारा दुरात्मा, ब्रह्मद्वेष्टा व मूढ माझ्या शापानें दग्ध होऊन बगळा होईल ९. पक्षी म्हणतातः— हा शाप ऐकून महातेजस्वी कौशिक

प्याडिर्भवस्वेति प्रतिशापमयच्छत १० अन्योन्यशापात्तौ प्राप्तौ तिर्यक्त्वं परमद्युती। वसिष्ठः स महातेजा विश्वामित्रश्च कौशिकः ११ अन्यजातिसमायोगं गतावप्यमितौजसौ। युयुधातेऽतिसंरब्धौ महाबलपराक्रमौ १२ योजनानां सहस्रे द्वे प्रमाणे नाडिरुच्छ्रितः। षण्णवत्यधिकं ब्रह्मन्सहस्रत्रितयं बकः १३ तौ तु पक्षप्रहाराभ्यामन्योन्यस्योरुविक्रमौ। प्रहरन्तौ भयं तीव्रं प्रजानां चक्रतुस्तदा १४ विधूय पक्षाणि बको रक्तोद्वृत्ताक्षिराहनत्। आडिं सोऽप्युन्नतग्रीवो बकं पद्भ्यामताडयत् १५ तयोः पक्षानिलापास्ताः प्रपेतुर्गिरयो भुवि। गिरिप्रपाताभिहता चकम्पे च वसुन्धरा १६ क्ष्मा कम्पमाना जलधीनुद्वृत्ताम्बूंश्चकार च। ननाम चैकपार्श्वेन पातालगमनोन्मुखी १७ केचिद्गिरिनिपातेन केचिदम्भोधिवारिणा। केचिन्महीसंचलनात्प्रययुः प्राणिनः क्षयम् १८ इति सर्वं परित्रस्तं हाहाभूतमचेतनम्[1]। जगदासीत्सुसंभ्रान्तं पर्यस्तक्षितिमण्डलम् १९ हा वत्स हा कान्त शिशो प्रयाह्येषोऽस्मि संस्थितः। हा प्रिये कान्त शैलोऽयं पतत्याशु पलायताम् २० इत्याकुलीकृते लोके संत्रासविमुखे तदा। सुरैः परिवृतः सर्वैराजगाम पितामहः २१ प्रत्युवाच च विश्वेशस्तावुभावतिकोपितौ। युद्धं वां विरमत्वेतल्लोकाः स्वास्थ्यं भजन्तु च २२ शृण्वन्तावपि तौ वाक्यं ब्रह्मणोऽव्यक्तजन्मनः। कोपामर्षसमाविष्टौ युयुधाते न तस्थतुः २३ ततः पितामहो देवस्तं दृष्ट्वा लोकसंक्षयम्। तयोश्च हितम-

---

विश्वामित्राने "तूंही आडि हो" ह्मणून उलट शाप दिला १०; परस्पर शापामुळे ते महातेजस्वी वसिष्ठविश्वामित्र तिर्यग्योनिप्रत गेले ११; आणि अन्य जातींत गेलेले ते महाबलाढ्य, महापराक्रमी व महातेजस्वी वसिष्ठविश्वामित्र अतिक्षुब्ध होऊन युद्ध करूं लागले १२. आडि दोन हजार योजनें उंच होता व, हे विप्र, बक तीन हजार शहाण्णव योजनें उंच होता १३. ते उभयतां महापराक्रमी आडिबक एकमेकांना पक्षप्रहार करूं लागले असतां प्रजाजनांला मोठें भय उत्पन्न झालें १४. पंख हालवून व आपले लाल डोळे फिरवून बक आडीला प्रहार करीत असे व तोही मान उंच करून पायांनीं बगळ्याला ताडन करीत असे १५. त्यांच्या पक्षवायूनें पर्वत भूमीवर उलथून पडूं लागले व पर्वतपतनाचा धक्का बसून भूकंप होऊं लागला १६. भूकंपामुळें समुद्रांतील उदक अमर्याद उसळूं लागलें व पृथ्वी एका बाजूनें चापट होऊन जशी कांहीं पातालांतच जाण्याविषयीं उत्सुक झाली १७. कांहीं प्राणी पर्वतपातामुळें, कांहीं समुद्रजलानें व कांहीं भूकंपामुळें मृत्यु पावले १८. ह्याप्रमाणें जिकडे तिकडे हाहाकार उडून सर्व जगत् त्रस्त, भ्रांत व निश्चेष्ट झालें आणि सर्व भूमंडलाची उलथापालथ झाली १९. "हे वत्सा, हे प्रियशिशो, जा, हा मी मेलों. हे प्रिये, हे कांत, हा पर्वत पडत आहे. सत्वर पळा" २०. अशा रीतीनें जगत् व्याकुळ होऊन त्रास सोसण्यास असमर्थ झालें असतां ब्रह्मदेव सर्व देवांसह आला २१; आणि तो विश्वाधिपति त्या उभयतां अति क्रुद्ध मुनींना ह्मणाला "तुमचें हें युद्ध पुरे; लोक स्वस्थ होऊं द्या" २२. ज्याची उत्पत्ति प्रसिद्ध नाहीं त्या ब्रह्मदेवाचें ह्मणणें ऐकत असूनही त्या क्रुद्ध मुनींनीं न थांबतांच युद्ध सुरू ठेविलें २३. तेव्हां तो लोकनाश पाहून त्या उभयतांचें हित

सुगुरूण्यपि ५ भक्ष्याणि तत्र नो जन्तुर्जीर्यते कथमल्पकः । कथं भोक्ता स सर्वस्य कर्मणः सुकृतस्य वै ६ एतन्मे ब्रूत सकलं सन्देहोक्तिविवर्जितम् । तदेतत्परमं गुह्यं यत्र मुह्यन्ति जन्तवः ७ पक्षिण ऊचुः ॥ प्रश्नभारोऽयमतुलस्त्वयास्मासु निवेशितः । दुर्भाव्यः सर्वभूतानां भावाभावसमाश्रितः ८ तं शृणुष्व महाभाग यथा प्राह पितुः पुरा । पुत्रः परमधर्मात्मा सुमतिर्नाम नामतः ९ ब्राह्मणो भार्गवः कश्चित्सुतमाह महामतिः । कृतोपनयनं शान्तं सुमतिं जडरूपिणम् १० वेदानधीष्व सुमते यथानुक्रममादितः । गुरुशुश्रूषणे व्यग्रो भैक्षान्नकृतभोजनः ११ ततो गार्हस्थ्यमास्थाय चेष्ट्वा यज्ञाननुत्तमान् । इष्टमुत्पादयापत्यमाश्रयेथा वनं ततः १२ वनस्थश्च ततो वत्स परिव्राड्निष्परिग्रहः । एवमाप्स्यसि तद्ब्रह्म यत्र गत्वा न शोचसि १३ पक्षिण ऊचुः ॥ इत्येवमुक्तो बहुशो जडत्वान्न द किञ्चन । पितापि तं सुबहुशः प्राह प्रीत्या पुनः पुनः १४ इति पित्रा सुतस्नेहात्प्रलोभि मधुराक्षरम् । स चोच्यमानो बहुशः प्रहस्येदमथाब्रवीत् १५ तातैतद्बहुशोऽभ्यस्तं यच्चयाद्योपदिश्यते । तथैवान्यानि शास्त्राणि शिल्पानि विविधानि च १६ जन्मनामयुतं साग्रं मम स्मृतिपथं गतम् । उत्पन्नज्ञान-

---

त्याला पापपुण्य कसें भोगावें लागतें ? तीं पापपुण्यें त्याला फळ कसें कसें देतात ? ४ स्त्रीच्या कोठ्यांत अतिजड देखील भक्ष्य पदार्थ सेविलेले जिरत असतांना हा पिंडरूप अल्प प्राणी गर्भाशयांत जिरत कसा नाहीं ? आणि हा प्राणी सर्व प्रकारच्या सुकृतदुष्कृतांचा उपभोग कसा घेतो ? ५, ६. हें सर्व आपण मला निःसंशय सांगा; कारण, हें अति गुह्य असून ह्याविषयीं प्राणी मोहित होत असतात ७. पक्षी ह्मणतातः—हा जन्ममरणसंबंधीं फारच मोठा अतुल प्रश्न आपण आह्मांला केला असून सर्व प्राण्यांना तो समजण्यासारखा नाहीं ८. तथापि, हे महाभाग्यवान् मुने, सुमतिनामक परम धर्मनिष्ठ पुत्रानें पूर्वी पित्याला जें ह्या प्रश्नाचें उत्तर सांगितलें आहे तें आपण ऐका ९. कोणी एक महाविचारी भृगुकुलोत्पन्न ब्राह्मण आपल्या उपनयन झालेल्या परंतु, जडतुल्य व शांत असलेल्या सुमतिनामक पुत्राला ह्मणाला १० "हे सुमते, अनुक्रमानें तूं वेद पढ; गुरुशुश्रूषेविषयीं तत्पर रहा आणि भिक्षेवर निर्वाह करीत जा ११. नंतर गृहस्थाश्रम स्वीकारून उत्कृष्ट यज्ञ कर; व इष्ट अपत्य उत्पन्न करून वनांत जा १२. वानप्रस्थ झाल्यावर, हे वत्सा, तूं कांहींएक न स्वीकारितां संन्यासी हो. ह्मणजे तुला ब्रह्मप्राप्ति होईल व ती झाल्यावर शोक होणार नाहीं" १३. पक्षी ह्मणतातः—असें अनेक वेळां सांगितलें तरी जडत्वामुळें पुत्र कांहींएक बोलेना. परंतु, पिता त्याला वारंवार प्रेमानें तसेंच सांगत असे १४. ह्याप्रमाणें पुत्रस्नेहामुळें पिता मधुर शब्दांनीं त्याच्याशीं लोभाचें भाषण करीत असे. परंतु, असें वारंवार तो बोलूं लागला असतां पुत्र हास्य करून ह्मणाला १५ "हे तात, तूं जें आज सांगत आहेस तें मीं अनेकवेळां आचरिलें आहे; आणि त्याप्रमाणें इतर शास्त्रें व विविध शिल्पें मीं संपादन केलेलीं आहेत १६. संपूर्ण दहा हजार जन्म मला आठवत आहेत व मला ज्ञान प्राप्त झालें आहे. तेव्हां

रसहर्षभयोद्वेगक्रोधामर्षजवागुरा । विज्ञाता नृमृगग्राहिसंघपाशायताकुला २१ तस्माद्यास्याम्यहं तात त्यक्त्वेमां दुःखसन्ततिम् । त्रयीधर्ममधर्माढ्यं किं पापफलसन्निभम् २२ पक्षिण ऊचुः ॥ तस्य तद्वचनं श्रुत्वा हर्षविस्मयगद्गदम् । पिता प्राह महाभागः स्वसुतं हृष्टमानसः २३ पितोवाच ॥ किमेतद्वदसे वत्स कुतस्ते ज्ञानसम्भवः । केन ते जडता पूर्वमिदानीं च प्रबुद्धता २४ किंतु शापविकारोऽयं मुनिदेवकृतस्तव । यत्ते ज्ञानं तिरोभूतमाविर्भावमुपागतम् २५ पुत्र उवाच ॥ शृणु तात यथावृत्तं ममेदं सुखदुःखदम् । यश्चाहमासमन्यस्मिञ्जन्मन्यस्मात्परं तु यत् २६ अहमासं पुरा विप्रो न्यस्तात्मा परमात्मनि । आत्मविद्याविचारेषु परां निष्ठामुपागतः २७ सततं योगयुक्तस्य सतताभ्याससङ्गमात् । सत्संयोगात्स्वस्वभावाद्विचारविधिशोधनात् २८ तस्मिन्नेव परा प्रीतिर्ममासीद्युञ्जतः सदा । आचार्यतां च संप्राप्तः शिष्यसन्देहहृत्तमः २९ ततः कालेन महता ऐकान्तिकमुपागतः । अज्ञानाकृष्टसद्भावो विपन्नश्च प्रमादतः ४० उत्क्रान्तिकालादारभ्य स्मृतिलोपो न मेऽभवत् । यावदन्दं गतं चैव जन्मनां स्मृतिमागतम् ४१ पूर्वाभ्यासेन तेनैव सोऽहं तात जितेन्द्रियः । यतिष्यामि तथा कर्तुं न भविष्ये यथा पुनः ४२ ज्ञानदानफलं येत-

---

प्राप्त होणार आहे २०. रस, हर्ष, भय, उद्वेग, क्रोध व असहिष्णुता ह्यांपासून उत्पन्न झालेली वागुरा नररूप मृग पकडणाऱ्या रेंकडों पाशांनीं युक्त असलेली, मीं ओळखिली आहे २१. तस्मात्, हे तात, ही दुःखपरंपरा सोडून मी जाणार आहें. पापफलतुल्य असलेला हा अधर्मप्रचुर वेदधर्म मला हवा कशाला ?" २२. पक्षी ह्मणतातः—तें त्याचें हर्षविस्मययुक्त सद्गदित भापण ऐकून महाभाग्यवान् पिता प्रसन्न मनानें पुत्राला ह्मणाला २३ "हे वत्सा, हें काय बोलत आहेस ? तुला ज्ञान कसें झालें ? पूर्वी जाड्य असतांना सांप्रत ज्ञान कशामुळें झालें आहे २४ ? तुझें ज्ञान गुप्त होऊन ज्याअर्थी प्रकट झालें आहे त्याअर्थी मुनिदेवकृत शापाचा हा परिणाम आहे किंवा काय." २५. पुत्र ह्मणतोः—हे तात, ह्याहून भिन्न जो अन्य जन्म त्या जन्मीं मी कोण होतों हें माझें सुखदुःखदायक वृत्त आपण श्रवण करावें २६. मी पूर्वी परमात्म्याचे ठिकाणीं अंतःकरणाचें लय लाविलेला विप्र होतों व अध्यात्मज्ञानसंबंधीं विचारामध्येंच मी एकसारखा गढून गेलों होतों २७. सर्वदां योगाचें अवलंबन असल्यामुळें, सतत अभ्यासामुळें, सत्समागमामुळें, सत्स्वभावामुळें, शुद्धविचारामुळें २८ आणि परमात्म्याच्या ठिकाणीं सर्वदां चित्ताची एकाग्रता असल्यामुळें त्याच्याचविषयीं माझे ठिकाणीं पराकाष्ठेचें प्रेम उत्पन्न झालें होतें व शिष्यसंदेह निवृत्त करणाऱ्यांमध्यें श्रेष्ठ असा आचार्यही मी झालों होतों २९. नंतर वराच काळ लोटला असतां मी परमात्मनिष्ठ झालों; परंतु, प्रमादामुळें मी मायामोहित होऊन मृत झालों ४०. तथापि, मरणकाळापासून माझें स्मरण नष्ट झालें नाहीं. शेवटल्या वर्षापर्यंत सर्व कांहीं मला जन्मासंबंधानें आठवत आहे ४१. हे तात, पूर्वाभ्यासामुळें मी जितेंद्रिय आहें व पुनर्जन्म प्राप्त न होण्याविषयीं मी यत्न करणार आहें ४२. हे तात, पूर्वजन्मस्मृति

यज्जातिस्मरणं मम। न ह्येतत्प्राप्यते तात नरैर्धर्माश्रितैर्नरैः ४३ सोऽहं पूर्वाश्रमादेव निष्ठाधर्ममुपाश्रितः। एकान्तित्वमुपागम्य यतिष्याम्यात्ममोक्षणे ४४ तद्ब्रूहि त्वं महाभाग यत्ते सांशयिकं हृदि। एतावतापि तेप्रीतिमुत्पाद्यानृण्यमाप्नुयाम् ४५ पक्षिण ऊचुः॥ पिता प्राह ततः पुत्रं श्रद्दधत्तस्य तद्वचः। भवता यद्वयं पृष्टाः संसारग्रहणाश्रयम्४६ पुत्र उवाच॥ शृणु तात यथा तत्त्वमनुभूतं मयाऽसकृत्। संसारचक्रमजरं स्थितिर्यस्य न विद्यते ४७ सोऽहं वदामि ते सर्वं तवैवाज्ञया पितः। उत्क्रान्तिकालादारभ्य यथा नान्यो वदिष्यति ४८ ऊष्मा प्रकुपितः काये तीव्रवायुसमीरितः। भिनत्ति मर्मस्थानानि दीप्यमानो निरिन्धनः ४९ उदानो नाम पवनस्ततश्चोर्ध्वं प्रवर्तते। भुक्तानामम्बुभक्ष्याणामधोगतिनिरोधकृत्५० ततो येनाम्बुदानानि कृतान्यन्नरसास्तथा। दत्ताः स तस्य आल्हादमापदि प्रतिपद्यते५१अन्नानि येन दत्तानि श्रद्धापूतेन चेतसा। सोऽपि तृप्तिमवाप्नोति विनाप्यन्नेन वै तदा ५२येनानृतानि नोक्तानि प्रीतिभेदःकृतो नच। आस्तिकः श्रद्दधानश्च स सुखं मृत्युमृच्छति ५३देवब्राह्मणपूजायां ये रता नोनसूयवः। शुक्ला वदान्या ह्रीमन्तस्ते नराः सुखमृत्यवः५४यो न कामान्न संरम्भान्न द्वेषाद्धर्ममुत्सृजेत्। यथोक्तकारी सौम्यश्च स सुखं मृत्युमृच्छति ५५

हें ज्ञानदानाचें फल आहे. केवल कर्मावलंबी मनुष्यांना हें फल प्राप्त होत नसतें ४३. सारांश, *ब्रह्मचर्यापासून मी निवृत्तिनिष्ठ आहें आणि त्या मार्गाविषयींच मी तत्पर* राहून आत्ममुक्तीकरितां यत्न करणार आहें ४४. ह्यास्तव, हे महाशय, आपल्या मनांत जो संशय असेल तो आपण मला विचारा ह्मणजे (त्याचें निरसन करणें) एवढ्यानेंही मी तुह्मांला संतुष्ट करून तुमच्या ऋणांतून मुक्त होईन ४५. पक्षी ह्मणतातः—त्या पुत्राच्या त्या भाषणावर विश्वास ठेवून पिता त्याला ह्मणाला "ज्याअर्थी तूं आह्मांला पृच्छा करण्याविषयीं सांगत आहेस त्याअर्थी प्राण्याला प्राप्त होणाऱ्या संसारासंबंधानेंच तूं आह्मांला सांग" ४६. पुत्र ह्मणतोः—हे तात, वारंवार मीं अनुभविलेल्या ह्या अक्षय्य संसारचक्राविषयीं आपण तत्वतः हकीकत श्रवण करा; ह्याला स्थैर्य नाहीं ४७; हे तात, आपल्या आज्ञेनें मी आपणांला मरणसमयापासून सर्व कथन करितों; हें दुसऱ्याला सांगतां येणार नाहीं ४८. तीव्र वायूनें प्रेरित झालेला अग्नि देहाचे ठिकाणीं कुपित होतो आणि तो देदीप्यमान् अग्नि इंधनरहित झाल्यामुळें मर्मस्थानें फोडूं लागतो ४९. तेव्हां उदानवायु ऊर्ध्वभागीं प्रदीप्त होतो आणि सेवन केलेल्या अन्नपानांना तो खालीं जाऊं देत नाहीं ५०. परंतु, ज्यानें अन्नोदक दिलें असेल त्याला तो उदानवायु मरणसमयींही आल्हादच देतो ५१. श्रद्धायुक्त मनानें ज्यानें अन्नदान केलें असेल तो त्यावेळीं अन्नावांचूनही तृप्त होतो ५२. ज्यानें असत्य भाषण केलें नसेल व प्रीतिभंग केला नसेल त्या आस्तिक व श्रद्धालु पुरुषाला सुखानें मरण येतें ५३. देवब्राह्मणपूजनतत्पर, निर्मत्सर, निष्कलंक, उदार व पापभीरु पुरुषांना सुखानें मरण येतें ५४. कामानें, क्रोधानें व द्वेषानें धर्मत्याग न करितां विहित कर्मे करणाऱ्या सौम्य

अवारिदायिनो दाहं क्षुधां चानन्नदायिनः । प्राप्नुवन्ति नराः काले तस्मिन्मृत्यावुपस्थिते ६६ शीतं जयन्ति धनदास्तापं चन्दनदायिनः । प्राणघ्नीं वेदनां कष्टां येचान्युद्वेगकारिणः ६७ मोहाज्ञानप्रदातारः प्राप्नुवन्ति महद्भयम् । वेदनाभिरुग्राभिः प्रपीड्यन्तेऽधमा नराः ६८ कूटसाक्षी मृषावादी यश्चासदनुशास्ति वै । ते मोहमृत्यवः सर्वे तथान्ये वेदनिन्दकाः ६९ विभीषणाः पूतिगन्धाः कूटमुद्गरपाणयः । आगच्छन्ति दुरात्मानो यमस्य पुरुषास्तदा ६० प्राप्तेषु दृक्पथं तेषु जायते तस्य वेपथुः । क्रन्दत्यविरतं सोऽथ भ्रातृमातृसुतानथ ६१ सास्य वागस्फुटा तात एकवर्णा विभाव्यते । दृष्टिश्च भ्राम्यते त्रासाच्छ्वासाच्छुष्यत्यथाननम् ६२ ऊर्ध्वश्वासान्वितः सोऽथ दृष्टिभङ्गसमन्वितः । ततः स वेदनाविष्टस्तच्छरीरं विमुञ्चति ६३ वाय्वग्रसारी तद्रूपं देहमन्यत्प्रपद्यते । तत्कर्मजं यातनार्थं न मातृपितृसंभवम् । तत्प्रमाणवयोवस्थासंस्थानैः प्राग्भवं यथा ६४ ततो दूतो यमस्याशु पाशैर्बध्नाति दारुणैः । दण्डप्रहारसंभ्रान्तं कर्षते दक्षिणां दिशम् ६५ कुशकण्टकवल्मीकशंकुपाषाणकर्कशे । तथा प्रदीप्तज्वलने क्वचिच्छ्वभ्रशतोत्कटे ६६ प्रदीप्तादित्यतप्तेन दह्यमानेन तद्रश्मिभिः । कृष्यते यमदूतैश्च शिवासंनादभीषणैः ६७ विकृष्यमाणस्तैर्घोरैर्भक्ष्यमाणः शिवाशतैः । प्रयाति दारुणे मार्गे

पुरुषाला सुखानें मरण येतें ५९. मृत्यु जवळ आला असतां अन्नोदक न देणारे लोक त्यावेळीं क्षुधेनें व तृषेनें पीडित होतात ९६. द्रव्यप्रद, चंदनप्रद व कोणालाही संताप न आणणाऱ्या लोकांना अनुक्रमें शैत्यपीडा, ताप व प्राणघातक असह्य वेदना प्राप्त होत नाहींत ९७. मोह व अज्ञान देणाऱ्यांना मोठें भय प्राप्त होतें आणि त्या नराधमांना असह्य वेदना होऊं लागतात ९८. कपटानें साक्ष देणारा, असत्यवचनी, अहितोपदेशक व वेदनिंदक ह्या सर्वांना मोहयुक्त मरण प्राप्त होतें ९९. भयंकर, दुर्गंधयुक्त व हातामध्यें कूटमुद्गर घेतलेले दुरात्मे यमदूत त्यावेळीं येतात ६०. ते दृष्टी पडतांक्षणीं प्राण्याला कंप सुटतो आणि तो बंधु, माता व पुत्र ह्यांच्या नांवानें आक्रोश करूं लागतो ६१. हे तात, त्याची वाणी अस्पष्ट होते व एकच वर्ण निघूं लागतो; भयानें दृष्टि गरगर फिरूं लागते; श्वासानें मुख कोरडें पडतें ६२. ऊर्ध्व होऊन दृष्टिनाश झाला असतां वेदना होऊं लागतात व प्राणी तें शरीर सोडून जातो ६३. परंतु, वायूला अनुसरून असणाऱ्या त्या प्राण्याला दुसरा कर्मजन्य देह यातना भोगण्याकरितां प्राप्त होत असतो; तो मातापितरांपासून उत्पन्न झालेला नसतो. त्या देहाचा आकार वयोवस्था व प्रमाण हीं पूर्वीच्याच देहाप्रमाणें असतात ६४. नंतर, यमदूत दारुण पाशांनीं त्याला सत्वर बांधून दंडप्रहारानें मूर्छित होत असलेल्या त्याला दक्षिण दिशेस ओढून नेतात ६५. दर्भांचीं कुसळें, वारूळें, खिळे व खडे ह्यांनीं तो मार्ग कोठें कोठें दुःखप्रद झालेला असतो, कोठें कोठें मार्गांत अग्नि पेटलेला असतो व कोठें कोठें मार्गांत शेंकडों खड्डे असतात ६६. प्रखर सूर्यानें तप्त झाल्यामुळें दाह करणाऱ्या मार्गावरून यमदूत त्याला सांडसांनीं ओढीत असतात आणि भालूंच्या ध्वनीमुळें ते भयंकर भासतात ६७. तथापि, ते घोर यमदूत त्याला ओढीत असतांना

पापकर्मा यमक्षयम् ६८ छत्रोपानत्प्रदातारो ये च वस्त्रप्रदा नराः । ते यान्ति मनुजा मार्गं तं सुखेन तथान्नदाः ६९ विमानैः सौम्यरूपैर्यान्ति भूमिदानप्रदा नराः । एवं क्लेशानलमवश-वशः पापपीडितः । नीयते द्वादशाहेन धर्मराजपुरं नरः ७० कलेवरे दह्यमाने महान्तं दाहमृच्छति । ताड्यमाने तथैवाति छिद्यमाने च दारुणाम् ७१ क्लिद्यमाने चिरतरं जन्तुर्दुःखमवाप्नुते । स्वेनैव कर्मविपाकेन देहान्तरगतोऽपि सन् ७२ तत्र यद्बान्धवास्तोयं प्रयच्छन्ति तिलैः सह । यच्च पिण्डं प्रयच्छन्ति नीयमानस्तदश्नुते ७३ तैलाभ्यङ्गो बान्धवानामङ्गसंवाहनं च यत् । तेन चाप्याप्यते जन्तुर्यथाश्नन्ति स्वबान्धवाः ७४ भूमौ स्वपद्भिर्नात्यन्तं क्लेशमाप्नोति बान्धवैः । दानं ददद्भिश्च तथा जन्तुराप्याय्यते मृतः ७५ नीयमानः स्वकं गेहं द्वादशाहं स पश्यति । उपभुङ्क्ते तथा दत्तं तोयपिण्डादिकं भुवि ७६ द्वादशाहात्परं घोरमावासं भीषणाकृतिम् । याम्यं पश्यत्यथो जन्तुः कृष्यमाणः पुरं ततः ७७ गतमात्रोऽतिरक्ताक्षं भिन्नाञ्जनचयप्रभम् । मृत्युकालान्तकादीनां मध्ये पश्यति वै यमम् ७८ दंष्ट्राकरालवदनं भ्रुकुटीदारुणाकृतिम् । विरूपैर्भीषणैर्वक्रैर्वृतं व्याधिशतैः प्रभुम् ७९ दण्डासक्तं महाबाहुं पाशहस्तं सुभैरवम् । तन्निर्दिष्टां ततो याति गतिं जन्तुः शुभाशुभाम् ८० रौरवे कूट-

---

शेंकडो कोल्हीं त्याचें लचके तोडूं लागतात आणि अशा भयंकर मार्गावरून पापकर्मी पुरुष यमसदनीं जात असतो ६८. छत्री, जोडा, वस्त्र व अन्न देणारे मानव त्या मार्गावरून सुखानें जातात ६९; आणि भूमि देणारे लोक उज्वल विमानांत बसून जातात. ह्याप्रमाणें पापामुळें दुःखी व पराधीन झालेला प्राणी क्लेश भोगीत भोगीत बारा दिवसांत यमपुरीला नेला जातो ७०. शरीर दग्ध होऊं लागलें असतां त्याचा मोठा दाह होऊं लागतो आणि तो ताडित व छिन्न भिन्न होऊं लागलें असतांही भयंकर दुःख त्याला प्राप्त होतें ७१. शरीर भिजूं लागलें असतां प्राण्याला पुष्कळ वेळ दुःखें होतें आणि स्वतःच्या कर्मविपाकामुळें प्राण्याला दुसरा देह प्राप्त झाला तरी दुःख भोगावें लागतें ७२. बांधव जें तिलोदक व पिंड देतात तें तो जातां जातां सेवन करितो ७३. बांधवांचा तैलाभ्यंग, अंगसंवाहन व अन्न ह्यांच्या योगानें प्राणी पुष्ट होतो ७४. बांधवांनीं भूमीवर शयन केल्यास प्राण्याला क्लेश होत नाहींत व बांधवांनीं दान दिल्यास त्याचें पोषण होत असतें ७५. यमपुरीला यमदूत नेऊं लागले असतांना प्राण्याला बारा दिवस आपलें घर दिसत असतें आणि उदक, पिंड वगैरे जें भूमीवर दिलेलें असतें तें तो सेवन करितो ७६. बारा दिवसांनंतर खेंचल्या जाणाऱ्या त्या प्राण्याला आकारानेंही भयंकर व घोर असें यमगृह दृष्टीं पडतें ७७. तेथें जातांक्षणीं मृत्यु, काल, अंतक इत्यादिकांमध्यें बसलेला यम त्याच्या दृष्टीं पडतो; त्याचे नेत्र फारच लाल असतात. कांति कज्जलराशीप्रमाणें असते ७८; दाढांमुळें त्याचें मुख भयंकर दिसत असतें; भिवयांमुळेंही त्याचा चेहरा दारुण दिसत असतो; विरूप, भयंकर व वक्र अशा शेंकडो व्याधींनीं तो प्रभु परिवेष्टित असतो ७९. आणि त्या महाभयंकर व महाबाहु यमानें दंड व पाश हातीं घेतलेले असतात

साक्षी तु याति यथानृती नरः। ब्रह्मघ्नो हत्यया दुष्टो गोघ्नश्च पितृघातकः ८१ क्षेत्रदाराप-
हारी च सीमानिक्षेपहारकः। गुरुपत्न्यभिगामी च कन्यागामी तथैव च ८२ तस्य स्वरूपं
गदतो रौरवस्य निशामय। योजनानां सहस्रे द्वे रौरवो हि प्रमाणतः। जानुमात्रप्रमाणश्च
ततः श्वभ्रः सुदुस्तरः ८३ तत्राङ्गारचयोपेतं कृतं च धरणीसमम्। जाज्वल्यमानस्तीव्रेण
तापिताङ्गारभूमिना ८४ तन्मध्ये पापकर्माणं विमुञ्चन्ति यमानुगाः। स दह्यमानस्तीव्रेण
वह्निना तत्र धावति ८५ पदे पदे च पादोऽस्य शीर्यते जायते पुनः। अहोरात्रेणोद्धरणं पाद-
न्यासं च गच्छति ८६ एवं सहस्रमुत्तीर्णो योजनानां विमुच्यते। ततोऽन्यत्पापशुद्ध्यर्थं
तादृङ्निरयमृच्छति ८७ ततः सर्वेषु निस्तीर्णः पापी तिर्यक्त्वमश्नुते। कृमिकीटपतङ्गेषु
श्वापदे मशकादिषु ८८ गत्वा गजद्रुमाद्येषु गोष्वश्वेषु तथैव च। अन्यासु चैव पापासु
दुःखदासु च योनिषु ८९ मनुष्यं प्राप्य कुब्जो वा कुत्सितो वामनोऽपि वा। चण्डालपुल्क-
सायासु नरो योनिषु जायते ९० अवशिष्टेन पापेन पुण्येन च समन्वितः। ततश्चारोहणीं जातिं
शूद्रवैश्यनृपादिकाम् ९१ विप्रदेवेन्द्रतां चापि कदाचिदवरोहणीम्। एवं तु पापकर्माणो
नरकेषु पतन्त्यधः ९२ यथा पुण्यकृतो यान्ति तन्मे निगदतः शृणु। ते यमेन विनिर्दिष्टा यान्ति
पुण्यां गतिं नराः ९३ प्रगीतगन्धर्वगणैः प्रनृत्ताप्सरसांगणैः। हारनूपुरमाधुर्यशोभितान्यु-

---

व त्याच्या आज्ञेप्रमाणें प्राण्याला बरी वाईट गति प्राप्त होत असते ८०. कपटानें साक्ष
देणारा, असत्यवचनी, ब्रह्मघाती, गोघातक, पितृघातक, हिंसक, स्त्रीक्षेत्रापहारी,
सीमाहारक, ठेवी बुडविणारा, गुरुतल्पग व कन्यागामी लोक रौरव नरकांत पडत
असतात ८१, ८२. त्यांचें स्वरूप मी सांगत आहें तें श्रवण कर. रौरवाचें प्रमाण दोन
हजार योजनें आहे व गुडघ्या इतक्या खोलीचा अति दुस्तर खड्डा तेथें आहे ८३. त्यांत
निखारे घालून तो भूमीबरोबर केलेला असतो आणि तप्त निखाऱ्याच्या तीव्र धगानें
त्यांत ज्वाला निघत असतात ८४ त्यांत यमदूत पापकर्म्याला सोडितात व तीव्र अग्नीनें
दग्ध होत असलेला तो पापकर्मी तेथें धांवत असतो ८५. पदोपदीं त्याचा पाय गळत
असतो व पुनरपी नवा फुटत असतो. अहोरात्रांत एकच पाऊल त्याला उचलतां व
टाकितां येतें ८६. ह्याप्रमाणें हजार योजनें चालून गेल्यानंतर तेथून त्याची सुटका
होते व पापक्षालनार्थ तशाच प्रकारचा दुसरा नरक त्याला प्राप्त होतो ८७. तदनंतर
सर्व नरकांतून पार पडल्यावर प्राण्याला तिर्यग्योनि प्राप्त होते. कृमि, कीटक, पतंग,
श्वापद, मशकादिक ८८, गज, -वृक्षादिक, गाई, अश्व व इतरही दुःखप्रद पापयोनी
भोगिल्यानंतर ८९ चंडाल; पुल्कस इत्यादि जातींमध्यें तो कुबडा, व्यंग अथवा खुजा
मनुष्य उत्पन्न होतो ९०. नंतर अवशिष्ट पापपुण्यानें युक्त असलेला तो शूद्र, वैश्य,
क्षत्रिय इत्यादि वरच्या जातींमध्यें उत्पन्न होत असतो ९१; आणि ब्राह्मण, देव, व इंद्रही
तो कदाचित् होतो; परंतु, कदाचित् त्याला खालची योनिही प्राप्त होत असते. ह्याप्रमाणें
पापी माणसें नरकांत पडत असतात ९२. आतां पुण्यवान् कसे जातात तें माझ्या मुखां-
तून श्रवण कर. यमाचे आज्ञेनें त्यांना पुण्यगति प्राप्त होते ९३; गायन करणारे

त्तमानि च ९४ प्रयान्त्याशु विमानानि नानादिव्यस्रगुज्ज्वलाः। तस्माच्च प्रच्युता राज्ञामन्येषां च महात्मनाम् ९५ जायन्ते च कुले तत्र सद्वृत्तपरिरक्षकाः। भोगान्संप्राप्नुवन्त्यग्र्यांस्ततो यान्त्यूर्ध्वमन्यथा ९६ अवरोहणीं च संप्राप्य पूर्ववद्यान्ति मानवाः। एतत्ते सर्वमाख्यातं यथाजन्तुर्विपद्यते। अतः शृणुष्व विप्रर्षे यथा गर्भं प्रपद्यते ९७ ( ८२० ) इति श्रीमार्कण्डेयपुराणे पितापुत्रसंवादे मृत्युदशावर्णनं नाम दशमोऽध्यायः॥ १० ॥

पुत्र उवाच ॥ निषेके मानवस्त्रीणां बीजं प्रोक्तं रजस्यथ। विमुक्तमात्रो नरकात्स्वर्गाद्वापि प्रपद्यते १ तेनाभिभूतं तत्स्थैर्यं याति बीजद्वयं पितः। कललत्वं बुद्बुदत्वं ततः पेशित्वमेव च २ पेश्यास्तथा यथा बीजादंकुरादिसमुद्भवः। अङ्गानां च तथोत्पत्तिः पञ्चानामनुभागशः ३ उपाङ्गान्यङ्गुलीनेत्रनासास्यश्रवणानि च। प्ररोहं यान्ति चाङ्गेभ्यस्तद्वत्तेभ्यो नखादिकम् ४ त्वचि रोमाणि जायन्ते केशाश्चैव ततः परम्। समं समृद्धिमायाति तेनैवोद्भवकोशकः ५ नारिकेलफलं यद्वत्सकोशं वृद्धिमृच्छति। तद्वत्प्रयात्यसौ वृद्धिं सकोशोऽधोमुखः स्थितः ६ तले तु जानुपार्श्वाभ्यां करौ न्यस्य स वर्धते। अंगुष्ठौ चोपरि न्यस्तौ जान्वोरग्रे तथांगुली ७ जानुपृष्ठे तथा नेत्रे जानुमध्ये च नासिका। स्फिचौ पार्ष्णिद्वयस्थौ च बाहू जंघोपरि स्थितौ ८

---

गण व नाचणारे अप्सरांचे समुदाय ह्यांसह ते शीघ्रगामी विमानांमध्यें आरूढ होऊन जात असतात; नानाप्रकारच्या दिव्य माळांनीं ते झळकत असतात; व त्यांचीं उत्कृष्ट विमानेंही हार, नूपुर व सौंदर्य ह्यांनीं भूषित असतात; ते स्वर्गभ्रष्ट झाल्यास राजांच्या अथवा इतर महात्म्यांच्या ९४,९५ कुलांमध्यें उत्पन्न होतात. तेथें सद्वृत्ताचें रक्षण करून उत्कृष्ट भोग ते भोगितात आणि नंतर स्वर्गारोहण करितात; किंवा ९६ कदाचित् खालची खालची योनिही त्या मानवांना प्राप्त होऊन ते पूर्वी निर्दिष्ट केल्याप्रमाणें नरकांत जात असतात. हे प्राणी कसे मरत असतात हें मीं सर्व आपणाला कथन केलें आहे. आतां, हे विप्र, प्राण्याला गर्भावस्था कशी प्राप्त होते हें श्रवण करावें ९७. ( ८२० ) ह्याप्रमाणें श्रीमार्कंडेयपुराणांतर्गत पितापुत्रसंवादांतील मृत्युदशावर्णन-नामक दहावा अध्याय समाप्त झाला ॥ १० ॥

पुत्र म्हणतो:— स्वर्गापासून अथवा नरकापासून मुक्त झालेला प्राणी मानव-स्त्रियांच्या रजाचे ठिकाणीं सिंचन केलेलें जें बीज, त्याला येऊन मिळतो १. हे पित्या, रज व शुक्र ह्या दोहोंशीं तो प्राणी मिळून गेला असतां तें स्थिर होतें आणि कलल, बुद्बुद व पेशी हे आकार त्याला प्राप्त होतात २. बीजापासून ज्याप्रमाणें अंकुराची उत्पत्ति होते त्याचप्रमाणें पांच अंगांची उत्पत्ति यथाविभाग पेशीपासून होते ३. बोटें, डोळे, नाक, तोंड व कान हीं उपांगें अंगापासून फुटतात व त्या उपांगांना नखें वगैरे येतात ४. त्वचेवर रोम व नंतर केस उत्पन्न होतात आणि त्यासह वरील कवच वृद्धिंगत होतें ५. नारळ ज्याप्रमाणें कवचासह वाढतो त्या-प्रमाणें अधोमुख असलेला हा प्राणी कवचासह वाढतो ६. गुडघ्यांच्या बाजूंस हातांचे तळवे व गुडघ्यांवर अंगठे आणि बोटें असतांना तो वाढतो ७. गुडघ्यांच्या पृष्ठभागीं

एवं वृद्धिं क्रमायाति जन्तुः स्त्रीगर्भसंस्थितः। अन्यमन्त्रोदरे जन्तोर्यथारूपं तथा स्थितिः ९ काठिन्यमग्निना याति भुक्तपीतेन जीवति। पुण्यापुण्याश्रयमयी स्थितिर्जन्तोस्तथोदरे १० नाडी चाप्यायनी नाम नाभ्यां तस्य निबध्यते। स्त्रीणां तथान्त्रसुषिरे सा निबद्धोपजायते ११ क्रामन्ति भुक्तपीतानि स्त्रीणां गर्भोदरे यथा। तैराप्यायितदेहोऽसौ जन्तुर्वृद्धिमुपैति वै १२ स्मृतिं तत्र प्रयान्त्यस्य बह्वयः संसारभूमयः। ततो निर्वेदमायाति पीड्यमान इतस्ततः १३ पुनर्नैवं करिष्यामि मुक्तमात्र इहोदरात्। तथा तथा यतिष्यामि गर्भं नाप्स्याम्यहं यथा १४ इति चिन्तयते स्मृत्वा जन्मदुःखशतानि वै। यानि पूर्वानुभूतानि दैवभूतानि यानि वै १५ ततः कालक्रमाज्जन्तुः परिवर्तत्यधोमुखः। नवमे दशमे वापि मासि संजायते ततः १६ निष्क्राम्यमाणो वातेन प्राजापत्येन पीड्यते। निष्क्राम्यते च विलपन्हृदि दुःखेन पीडितः १७ निष्क्रान्तश्चोदरान्मूर्च्छामसह्यां प्रतिपद्यते। प्राप्नोति चेतनां चासौ वायुस्पर्शसमन्वितः १८ ततस्तं वैष्णवी माया समास्कन्दति मोहिनी। तया विमोहितात्मासौ ज्ञानभ्रंशमवाप्नुते १९ भ्रष्टज्ञानो बालभावं ततो जन्तुः प्रपद्यते। ततः कौमारकावस्थां यौवनं वृद्धतामपि २० पुनश्च मरणं तद्वज्जन्म चाप्नोति मानवः। ततः संसारचक्रेऽस्मिन्भ्राम्यते घटियन्त्रवत् २१ कदाचि-

---

नेत्र व मध्यभागीं नाक असतें. कुले टांचावर असतात आणि हात पोटऱ्यावर असतात ८. ह्याप्रमाणें स्त्रीचे गर्भाशयांत असलेला प्राणी क्रमानें वृद्धि पावतो व इतर प्राण्यांच्या उदरामध्यें प्राण्याची स्थिति त्या प्राण्याच्या रूपाला अनुसरून होत असते ९. अग्नीच्या योगानें त्याला काठिन्य प्राप्त होत असतें; सेवन केलेल्या अन्नपानानें तो जगतो आणि पापपुण्यरूप आधारावर तो उदरांत रहातो १०. त्याच्या बेंबीशीं आप्यायनीनामक नाडी जखडलेली असते व ती नाडी स्त्रियांच्या आंतडयात बद्ध असते ११. स्त्रियांच्या गर्भाशयांत सेवन केलेलीं अन्नपानें जातात आणि त्यांच्या योगानें पुष्ट होत असलेला हा प्राणी वाढत असतो १२. त्या ठिकाणीं अनेक जन्मांची त्याला आठवण होऊं लागते व इकडून तिकडून पीडा होऊं लागली असतां त्याला पश्चात्ताप होतो १३. "मी असें पुनः करणार नाहीं व उदरांतून सुटतांक्षणीं फिरून गर्भांत न येण्याचा मी यत्न करीन" १४ असें तो संचित कर्मामुळें पूर्वी भोगिलेलीं शेंकडों दुःखें आठवूं लागल्या-कारणानें चिंतन करीत असतो. १५. कालगतीनें तो नंतर अधोमुखच फिरूं लागतो आणि नववा अथवा दहावा महिना लोटल्यावर तो जन्मास येत असतो १६. बाहेर पडतां पडतां प्राजापत्यवायूची त्याला पीडा होत असते आणि दुःखग्रस्त झालेला अस-ल्यामुळें मनामध्येंच शोक करीत करीतच तो बाहेर पडत असतो १७. उदरांतून बाहेर पडतांक्षणीं त्याला असह्य मूर्छा प्राप्त होत असते व वायूचा स्पर्श झाल्यावोवर त्याला चेतना प्राप्त होते १८. तदनंतर, मोहिनी वैष्णवी माया त्याला व्याप्त करिते व तिच्या योगानें मोहित झालेल्या प्राण्याचा ज्ञानभ्रंश होत असतो १९. ज्ञानभ्रंश झाल्या-नंतर प्राण्याला बाल्य, कौमार, यौवन व वार्धक्य ह्या अवस्था प्राप्त होत असतात २०. पुनरपि त्याला जन्ममरण प्राप्त होत असतें व अशारीतीनें रहाटगाडग्याप्रमाणें

त्स्वर्गमाप्नोति कदाचिन्निरयं नरः। निरयं चैव स्वर्गं च कदाचिच्च मृतोऽश्नुते २२ कदाचिदत्रैव पुनर्जातः स्वं कर्म सोऽश्नुते। कदाचिद्भुक्तकर्मा च मृतः स्वल्पेन गच्छति २३ कदाचिदल्पशेषेण ततो जायेत तत्र शुभाशुभः। स्वर्लोके नरके वापि भुक्तप्रायो द्विजोत्तम २४ नरकेषु महद्दुःखमेतद्यत्स्वर्गवासिनः। दृश्यन्ते तात मोदन्ते पात्यमानाश्च नारकाः २५ स्वर्गेऽपि दुःखमतुलं यदारोहणकालतः। प्रभृत्यहं पतिष्यामीत्येतन्मनसि वर्तते २६ नरकांश्चैव संप्रेक्ष्य महद्दुःखमवाप्यते। एतां गतिमहं गन्तेत्यहर्निशमनिर्वृतः २७ गर्भवासे महद्दुःखं जायमानस्य योनितः। जातस्य बालभावे च वृद्धत्वे दुःखमेव च २८ कामेर्ष्याक्रोधसम्बन्धं यौवनं चातिदुःसहम्। दुःखप्राया वृद्धता च मरणे दुःखमुत्तमम् २९ कृष्यमाणश्च याम्यैश्च नरकेषु च पात्यते। पुनश्च गर्भो जन्माथ मरणं नरकस्तथा ३० एवं संसारचक्रेऽस्मिञ्जन्तवो घटियन्त्रवत्। भ्राम्यन्ते प्राकृतैर्बन्धैर्बद्ध्वा बध्यन्ति चासकृत् ३१ नास्ति तात सुखं किंचिदत्र दुःखशताकुले। तस्मान्मोक्षाय यतता कथं सेव्या मया त्रयी ३२ ( ८४६ ) इति श्रीमार्कण्डेयपुराणे पितापुत्रसंवादे गर्भस्थितिवर्णनं नाम एकादशोऽध्यायः ॥ ११ ॥

तो प्राणी ह्या संसारचक्रांत फिरत रहातो २१. मरणानंतर त्याला कधीं स्वर्ग, कधीं नरक व कधीं दोन्हीं प्राप्त होत असतात २२. कधीं योनि योनीमध्यें जन्मास येऊन त्याला स्वकीय कर्म भोगावें लागतें; कधीं कर्मोपभोग झाल्यानंतर मृत झालेला प्राणी स्वल्पच कर्म अवशिष्ट राहिलेलें असून जन्मास येतो २३ व कधीं स्वर्गांत अथवा नरकांत कर्मफलोपभोग जवळ जवळ संपून गेल्यानें अल्प पापपुण्यामुळें, हे द्विजोत्तम, तो जन्मास येत असतो २४. हे तात, स्वर्गवासी लोक आनंदांत असल्याचें दिसतात; परंतु, ते पतन पावूं लागले असतां नरकवासी पुरुषांप्रमाणें त्यांनाही नरकामध्यें मोठें दुःख भोगण्याचा प्रसंग येतो २५. स्वर्गारोहणकालापासून " मी पडणार आहें " असें मनांत घोळत असल्यामुळें स्वर्गांतही अतुल दुःख होत असतें २६. नरक अवलोकन केल्यावरही " ही अवस्था आपली होणार " ह्या विचारानें रात्रंदिवस तळमळ लागून मोठें दुःख होत असतें २७, गर्भवासांत, योनींतून बाहेर पडतांना आणि उत्पन्न झाल्यावरही बाल्य व वार्धक्य ह्या अवस्थांत दुःखच प्राप्त होत असतें २८. कामवासना, ईर्ष्या व क्रोध ह्यांनीं युक्त असलेलें यौवन अति दुःसह आहे; वार्धक्य दुःखमय आहे; आणि मरणसमयींही पराकाष्ठेचें दुःख आहे २९. यमदूत ओढूं लागतात; नरकांत लोटून देत असतात व त्या लोटल्या जाणाऱ्या प्राण्याला पुनरपि गर्भ, जन्म, मरण व नरक हीं प्राप्त होत असतात ३०. अशा रीतीनें ह्या संसारचक्रांत प्राणी रहाटगाडग्याप्रमाणें फिरविले जात असतात; व मायापाशांनीं जखडून जाऊन त्यांचा वारंवार बंध होत असतो ३१. सारांश, हे तात, शेंकडो दुःखांनीं गजबजलेल्या ह्या संसारांत सुख यत्किंचितही नाहीं. तस्मात्, मोक्षार्थ यत्न करणाऱ्या माझ्या हातून वेदाध्ययन कसें होणार ! ३२. (८९२) ह्याप्रमाणें मार्कंडेयपुराणांतर्गत पितापुत्रसंवादांतील गर्भस्थितिवर्णननामक अकरावा अध्याय समाप्त झाला ॥ ११ ॥

पितोवाच । साधु वत्स त्वया ख्यातं संसारगहनं परम् । ज्ञानप्रदानसंभूतं समाश्रित्य महाफलम् १ तत्र ते नरकाः सर्वे यथा वै रौरवस्तथा । वर्णितास्तान्समाचक्ष्व विस्तरेण महामते २ पुत्र उवाच । रौरवस्ते समाख्यातः प्रथमं नरको मया । महारौरवसंज्ञं तु शृणुष्व नरकं पितः ३ अगम्यागमने ये च अभक्ष्यभक्षणे रताः । मित्रद्रोहकराश्चैव स्वामिविश्रम्भघातकाः ४ परदाररताश्चैव स्वदारपरिवर्जिनः । मार्गभङ्गकरा ये च तडागारामभेदकाः । एतेऽन्ये च दुराचारा दह्यन्ते तत्र किंकरैः ५ योजनानां सहस्राणि सप्त पञ्च समन्ततः । तत्र ताम्रमयी भूमिरधस्तस्या हुताशनः ६ तत्तापतप्ता सा सर्वा प्रोद्यद्विद्युत्समप्रभा । विभात्यतिमहारौद्रा दर्शनस्पर्शनादिषु ७ तस्यां बद्धः कराभ्यां च पद्भ्यां चैव यमानुगैः । मुच्यते पापकृन्मध्ये लुण्ठ्यमानः स गच्छति ८ काकैर्बकैर्वृकोलूकैर्वृश्चिकैर्मशकैस्तथा । भक्ष्यमाणस्तथा गृध्रैर्द्रुतं मार्गे विकृष्यते ९ दह्यमानः पितर्मातर्भ्रातस्तातेति चाकुलः । वदत्यसकृदुद्विग्नो न शान्तिमधिगच्छति १० एवं तस्मान्नरैर्मोक्षो ह्यतिक्रान्तैरवाप्यते । वर्षायुतायुतैः पापं यैः कृतं दुष्टबुद्धिभिः ११ तथान्यस्तु तमो नाम सोऽतिशीतः स्वभावतः । महारौरववद्दीर्घस्तथा तितमसावृतः १२ गोवधश्च कृतो यैन भ्रातृणां घात एव च । अत्र बालघाती च नीयते शीतसंकटे १३ शीतार्तास्तत्र धावन्ति नरास्तमसि दारुणे । परस्परं समासाद्य परिरभ्याश्रयन्ति च १४ दन्तास्तेषां च

पिता ह्मणतोः—हे वत्सा, ज्ञानदानजन्य महाफल प्राप्त झाल्यामुळें तूं उत्कृष्ट रीतीनें हा अतिगहन संसार कथन केला आहेस १. परंतु, हे महामते, रौरवाप्रमाणें त्यांत वर्णिलेले सर्व नरक तूं मला सविस्तर कथन कर २. पुत्र ह्मणतोः—हे तात, प्रथम मीं आपणांला रौरवनरक कथन केला आहे; आतां महारौरव नरक मी कथन करितों तो आपण श्रवण करा ३. अगम्यागमन, अभक्ष्यभक्षण, मित्रद्रोह, प्रभूचा विश्वासघात, परदारागमन, स्वस्त्रीत्याग, मार्गभंग आणि तडाग व आराम ह्यांचा नाश करणारे लोक व इतरही दुराचारी यमदूतांकडून तेथें पीडिले जातात ४, ५. ह्याचा परिघ बारा हजार योजनें असून तेथें ताम्रमय भूमि आहे व तिच्या अधोभागीं अग्नि आहे ६. त्याच्या तापानें तप्त झालेली ती सर्व भूमि चमकणाऱ्या विद्युल्लतेप्रमाणें भासत असते आणि तिच्याकडे पहाणें किंवा स्पर्श वगैरे करणें अति भयंकर वाटत असतें ७. त्या भूमींत हातपाय बांधून यमदूत प्राण्याला सोडितात व तो लोळत जातो ८. जातांना कावळे, बगळे, लांडगे, विंचू, मशक, घुबडें, व गिधाडें त्याचे लचके तोडून त्याला मार्गावरून ओढीत असतात ९. त्याला चटके बसूं लागले असतां तो उद्विग्न होतो; आणि, हे तात, बाबा, आई, भाऊ असें वारंवार ह्मणत ह्मणत तो व्याकुळ प्राणी तळमळत असतो १०. ज्या दुर्बुद्धि लोकांनीं पाप केलें असतें त्यांनीं कोट्यवधि वर्षें नरकांत ह्याप्रमाणें घालविल्यानंतर ते मुक्त होतात ११. तम ह्मणून एक दुसरा नरक आहे. तो स्वभावतः अतिशीत आहे. महारौरवनरकाप्रमाणें तो दीर्घ आहे आणि अत्यंत अंधकारानें तो व्याप्त आहे १२. गोवध, भ्रातृवध, उदकनाश, अन्नघात अथवा बालहत्या करणाऱ्याला यमदूत त्या शीतमय नरकांत नेतात १३. त्या दारुण अंधकारामध्यें

भज्यन्ते शीतार्तिपरिकम्पिताः। क्षुत्तृष्णा प्रबला तत्र तथैवान्येऽप्युपद्रवाः १५ हिमखण्डवहो वायुर्भिनत्त्यस्थीनि दारुणः। मज्जासृग्गलितं तस्मादश्नुवन्ति क्षुधान्विताः १६ लेलिह्यमाना भ्राम्यन्ते परस्परसमागमे। एवं तत्रापि सुमहान्क्लेशस्तमसि मानवैः १७ प्राप्यते ब्राह्मणश्रेष्ठ यावद्दुष्कृतसंक्षयः। निकृन्तन इति ख्यातस्ततोऽन्यो नरकोत्तमः १८ तस्मिन्कुलालचक्राणि भ्राम्यन्त्यविरतं पितः। अदृष्टं दृष्टवद्रूपादश्रुतं श्रुतमेव च १९ एकाक्षरं गुरुं यस्तु दुराचारो मन्यते। नशृणोति गुरोर्वाक्यं शास्त्रवाक्यं तथैव च २० एते पापा दुराचारास्तत्र तैर्यमदू-तैः। तेष्वारोप्य निकृत्यन्ते कालसूत्रेण मानवाः २१ यमानुगाङ्गुलिस्थेन आपादतलमस्तकम्। न चैषां जीवितभ्रंशो जायते द्विजसत्तम २२ छिन्नानि तेषां शतशः खण्डान्यैक्यं भजन्ति च। एवं वर्षसहस्राणि छिद्यन्ते पापकर्मिणः २३ तावद्यावदशेषं वै तत्पापं हि क्षयं गतम्। अप्रतिष्ठं च नरकं श्रृणुष्व गदतो मम २४ यत्रस्थैर्नारकैर्दुःखमसह्यमनुभूयते। स्वधर्मरतवि-प्राणां विघ्नं यस्तु समाचरेत् २५ स बद्धैर्दारुणैः पाशैर्नीयते चक्रसंकटैः। तान्येव तत्र चक्राणि घटीयन्त्राणि चान्यतः २६ दुःखस्य हेतुभूतानि पापकर्मकृतां नृणाम्। चक्रेष्वारोपिताः केचिद्भ्राम्यन्ते तत्र मानवाः २७ यावद्वर्षसहस्राणि न तेषां स्थितिरन्तरा। घटीयन्त्रेषु

---

थंडीनें कुडकुडलेले लोक धांवत असतात आणि परस्पर भेट झाली असता ते परस्परांना कवटाळून धरूं लागतात १४. शैत्यानें थरथर कांपत असलेल्या त्या लोकांचे दात पडतात; तेथें अतिशय क्षुधा व तृषा लागते व इतरही उपद्रव फार असतात १५. बर्फ उडविणाऱ्या भयंकर वायूनें फुटलेल्या हाडांतून बाहेर आलेली मज्जा व रक्त ते क्षुधित लोक सेवन करीत असतात १६. परस्पर भेट झाली असतां ते चाटीत चाटीत हिंडूं लागतात व ह्याप्रमाणें ह्या तमोनामक नरकांत, हे ब्राह्मणश्रेष्ठ, मानवांना पापक्षय होईपर्यंत अतिशय क्लेश भोगावे लागतात. निकृंतन ह्मणून एक ह्याहूनही अतिभयंकर दुसरा नरक आहे १७,१८. तेथें, हे तात, कुंभाराची चाकें एकसारखी फिरत असतात. न पाहिलेलें पाहिलें ह्मणून व न ऐकलेलें ऐकिलें ह्मणून जो सांगतो १९, एक अक्षरही पढविणाऱ्या गुरूला मान न देणारा; दुराचारी, शास्त्र आणि गुरु ह्यांची अवज्ञा करणारा २०, ह्या दुष्कर्मी पापी मानवांना ते यमदूत त्या चक्रांवर चढवितात आणि कालसूत्रानें त्यांना तोडितात २१. यमदूतांच्या बोटांत तें सूत्र असतें व पायापासून मस्तकापर्यंत त्यांना पीडा होत असते; परंतु, हे द्विजश्रेष्ठ, त्यांचा जीव जात नाहीं २२. त्यांच्या शरीराचे तोडिलेले शेंकडों तुकडे एक होतात व त्यांचें सर्व पाप नाहींसें होईपर्यंत हजारों वर्षें ते पापी भिन्न भिन्न केले जातात. अप्रतिम नरक माझ्यापासून ऐका २३,२४. तेथील नरकवासी जनांना असह्य दुःख भोगावें लागतें. स्वधर्मनिष्ठ विप्रांना विघ्न करणाऱ्याला २५ दारुण पाशांनीं बांधून चक्रसमुदायांसह यमदूत तेथें नेत असतात. तेथें तींच चक्रें व रहाटगाडग्यीं दुष्कर्मी पुरुषांना दुःख देण्याकरितां असतात. तेथें चक्रांवर चढवून, मध्यंतरीं न थांबतां, हजारों वर्षेंपर्यंत पापी मानव फिरविले जातात. रहाटगाडग्यांना बांधून

चैवान्यो वदस्तोये यथा घटी २८ भ्राम्यन्ते मानवा रक्तमुद्गिरन्तः पुनः पुनः । अन्त्रैर्मुखे विनिष्क्रान्तैर्नेत्रैश्चावलम्बिभिः २९ दुःखानि ते प्राप्नुवन्ति यान्यसह्यानि जन्तुभिः । असिपत्रवनं नाम नरकं शृणु चापरम् ३० योजनानां सहस्रं यो ज्वलदग्न्यास्तृतावनि. । ब्रह्मचारिव्रतानां च तपसां विघ्नमाचरेद् ३१ असिपत्रवनं यान्ति ये सदोद्वेगकारिणः । तप्ताः सूर्यकरैश्चण्डैर्यत्रातीव सुदारुणैः ३२ प्रपतन्ति सदा तत्र प्राणिनो नरकौकसः । तन्मध्ये च वनं रम्यं स्निग्धपत्रं विभाव्यते ३३ पत्राणि तत्र खड्गानां फलानि द्विजसत्तम । श्वानश्च तत्र सबलाः स्वनन्त्ययुतशोभितः ३४ महावक्त्रा महादंष्ट्रा व्याघ्रा इव भयानकाः । ततस्तद्वनमालोक्य शिशिरच्छायमग्रतः ३५ प्रयान्ति प्राणिनस्तत्र तृट्तापपरिपीडिताः । हा मातर्हा तात इति क्रन्दन्तोऽतीव दुःखिताः ३६ दह्यमानाङ्घ्रियुगला धरणीस्थेन वह्निना । तेषां गतानां तत्रासिपत्रपाती समीरणः ३७ प्रवाति तेन पात्यन्ते तेषां खड्गास्तथोपरि । ततः पतन्ति ते भूमौ ज्वलत्पावकसंचये ३८ लेलिह्यमाने चातीव व्याप्ताशेषमहीतले । सारमेयास्ततः शीघ्रं शातयन्ति शरीरतः ३९ तेषामंगानि रुदतां त्वचश्चातीव भीषणाः । असिपत्रवनं तात मयेतत्कीर्तितं तव ४० अतः परं भीमतरं तप्तकुम्भं निबोध मे । समन्ततस्तप्तकुम्भा वह्निज्वा-

---

टाकिलेल्या घटाप्रमाणें पापी तेथें खालीवर होत असतो २६,२७,२८; ते मानव वारंवार रक्ताच्या गुळण्या टाकीत असतात; त्यांच्या मुखांतून आतडीं बाहेर निघालेलीं असतात; त्यांचे नेत्र आंतड्यांच्या टोकांनां लोंबकळत असतात २९; आणि अशा रीतीनें असह्य दुःखें त्या प्राण्यांना प्राप्त होत असतात. आतां दुसरा असिपत्रवन नरक ऐका ३०. तो सहस्र योजनें असून त्याच्या भूमीवर रखरखीत निखारे पसरलेले असतात. ब्रह्मचारी, व्रतें आणि तपें ह्यांना विघ्न करणारे आणि सर्वदा दुःख देणारे असिपत्रवन नरकांत जातात. प्रचंड व भयंकर सूर्यकिरणांनीं तप्त झालेले ३१, ३२ नरकास्पद प्राणी तेथें पडत असतात. त्यांच्यामध्यें एक रम्य स्निग्धवन आहे ३३. हे द्विजश्रेष्ठ तरवारींचीं पातीं हींच त्या वनांतील वृक्षांचीं फळें होत. तेथें सभोंवतीं प्रबळ श्वान दहादहा हजारांच्या टोळ्यांनीं ओरडत असतात ३४; त्यांचीं मुखें व दाढा प्रचंड असून ते व्याघ्रतुल्य भयंकर असतात. शीतळ छायेनें युक्त असें तें वन अग्रभागीं अवलोकन करून ३५ तृषेनें व तापानें पीडित झालेले प्राणी तेथें जात असतात. पृथ्वीवरील अग्नीनें त्यांचे पाय भाजत असतात; व हे माते, हे तात, अशा आरोळ्या ते अति दुःखित होऊन ठोकीत असतात. तेथें ते गेले असतां तरवारींचीं पातीं उडविणारा वायु ३६, ३७ वाहूं लागतो व त्याच्या योगानें त्यांच्यावर तलवारी पडूं लागतात. नंतर रसरसीत निखाऱ्यांचा ढीग केलेल्या भूमीवर ते पडतात ३८; त्या ढिगांतून अतिशय ज्वाला निघत असतात व त्यानें सर्व जागा व्याप्त केलेली असते. नंतर कुत्रीं त्यांच्या शरीराचे भराभर लचके तोडूं लागतात ३९ व ते रडूं लागले असतां त्यांचे अवयव व त्यांच्या त्वचा फारच भयंकर भासूं लागतात. हे मीं आपणांला असिपत्रवन कथन केलें ४०. आतां ह्याहू-

लासमावृताः ४१ ज्वलदग्निचयोत्तप्तास्तैलायश्चूर्णपूर्णपूरिताः । तेषु दुष्कृतकर्माणो याम्यैः क्षिप्तास्त्वधोमुखाः ४२ दूषयेद्धर्मशास्त्राणि ये चान्येतीर्थदूषकाः । भुक्तभोगां तु यो नारीमिष्यमाणां प्रियां शुभाम् ४३ अदुष्टामपि दोषेण त्यजते मूढचेतनः । ते समानीय पच्यन्ते लोहकुम्भेषु शीघ्रतः ४४ क्वाथ्यन्ते विस्फुटद्गात्रा ज्वलन्मज्जाजलाविलाः । स्फुटत्कपालनेत्रास्थिच्छिद्यमाना विभीषणैः ४५ गृध्रैरुत्पाट्य मुच्यन्ते पुनस्तेष्वेव वेगितैः । पुनः सिमसिमायन्ते तैलेनैक्यं व्रजन्ति च ४६ द्रवीभूतैः शिरोगात्रस्नायुमांसत्वगस्थिभिः । ततो याम्यैर्भटैराशु दर्वीघट्टनघट्टिताः ४७ कृतावर्ते महातैले मथ्यन्ते पापकर्मिणः । एष ते विस्तरेणोक्तस्तप्तकुम्भो मया पितः ४८ ( ९०० ) इति श्रीमार्कण्डेयपुराणे पितापुत्रसंवादे महारौरवादिनरकाख्यानकथनं नाम द्वादशोऽध्यायः ॥ १२ ॥

पुत्र उवाच । अहं वैश्यकुले जातो जन्मन्यस्मात्तु सप्तमे । समतीते गवां रोधं निपाने कृतवान्पुरा १ विपाकात्कर्मणस्तस्य नरकं भृशदारुणम् । संप्राप्तोऽग्निशिखाजाम अयोमुखखगाकुलम् २ यन्त्रपीडनगात्रासृक्प्रवाहोद्भूतकर्दमम् । विकृष्यमाणदुष्कर्मितन्निपातरवाकुलम् ३ पात्यमानस्य मे तत्र साग्रं वर्षशतं गतम् । महातापार्तितप्तस्य तृष्णादाह-

नही भयंकर असा तप्तकुंभ नरक श्रवण करा. अग्निज्वालांनीं व्याप्त असे तप्तकुंभ सभोंवतीं असतात ४१; रसरशीत निखाऱ्यांच्या राशींनीं ते तप्त झालेले असतात आणि तेलानें व लोहपिष्टानें ते भरलेले असतात. त्यांमध्यें दुष्कर्मी लोकांना उलटे करून यमदूत टाकीत असतात ४२. धर्मशास्त्रांना दोष लावणारे, तीर्थें दोषित करणारे आणि उपभोग घेतलेली व स्वतःला आवडलेली अशी प्रिय व शुभ स्त्री दोषी ठरली नसतांनाही तिचा त्याग करणारा मूढ हे ह्या लोहकुंभामध्यें सत्वर आणून कढविले जातात ४३,४४.कढतां कढतां त्यांचीं गात्रें फुटत असतात; व प्रज्वलित मज्जेनें व उदकानें ते मलिन झालेले असतात. त्यांचीं कपालें, नेत्र व हाडें तडतडून फुटत असतात; भयंकर ४५ गिधाडें त्यांचे लचके तोडून पुनरपि वेगानें त्यांना आंत टाकीत असतात; नंतर सुंसुं शब्द करून ते तेलाशीं मिसळून जातात ४६; मस्तक, अवयव, स्नायु, मांस, त्वचा व अस्थि हीं द्रवरूप होऊन जातात; नंतर यमदूत सत्वर त्यांना पळीनें ढवळीत असतात ४७; आणि अशा रीतीनें पापकर्मी मानव उकळी फुटलेल्या प्रचंड तेलामध्यें कढविले जातात. हे तात, हा तप्तकुंभ नरक मीं आपणांला सविस्तर कथन केला आहे ४८. (९००) ह्याप्रमाणें मार्कंडेयपुराणांतर्गत पितापुत्रसंवादांतील महारौरवादिनरकाख्यानकथननामक बारावा अध्याय समाप्त झाला ॥ १२ ॥

पुत्र म्हणतोः—मागल्या सात जन्मांचे पूर्वी मी वैश्यकुलांत जन्मलों होतों. तेव्हां पाणवठ्यावर मीं गाईंना अडथळा केला १. त्या कर्माच्या विपाकामुळें, हे नाथ, अति भयंकर अग्निशिखानरक मला प्राप्त झाला. तेथें लोहमुखी पक्ष्यांची गर्दी होती २. चरकांतून पिळून काढिलेल्या शरीरांतून निघालेल्या रक्तप्रवाहामुळें तेथें चिखल झालेला होता आणि त्यांत नेले जाणारे पातकी त्यांत पडत असल्यामुळें ते एकसारखें

न्वितस्य च ४ तत्राल्हादकरः सद्यः पवनः सुखशीतलः । करम्भवालुकाकुम्भमध्यस्थे वै समागतः ५ अकस्मादेव भो तात नररत्नं समागतम् । तत्संपर्कादशेषाणां नाभवद्यातना नृणाम् । मम चापि यथा स्वर्गे स्वर्गिणां निर्वृतिः परा ६ किमेतदिति चाल्हादविंम्नास्तिमितेक्षणैः । दृष्टमस्माभिरासन्नं नररत्नमनुत्तमम् ७ याम्यश्च पुरुषो घोरो दण्डहस्तोऽसत्प्रभः । पुरतो दर्शयन्मार्गमित एहीति च ब्रुवन् ८ ततस्ते जन्तवः सर्वे मत्वा तद्दर्शनात्सुखम् । ऊचुः प्राञ्जलयो भूपं क्षणमात्रं स्थितो भव ९ त्वद्गात्रसंगी पवनो ह्यस्माकं सुखकारकः । ततोऽसौ नरकाभ्याशे उपविष्टः कृपान्वितः १० पुरुषः स तदा दृष्ट्वा यातनाशतसंकुलम् । नरकं प्राह तं याम्यं किंकरं कृपयान्वितः ११ पुरुष उवाच । भो याम्य पुरुषाचक्ष्व किं मया दुष्कृतं कृतम् । येनेदं यातनाभीमं प्राप्तोऽस्मि नरकं परम् १२ विपश्चिदिति विख्यातो जनकानामहं कुले । जातो विदेहविषये सम्यङ्मनुजपालकः १३ चातुर्वर्ण्यं स्वधर्मस्थं कृत्वा संरक्षितं मया । धर्मतो धर्मकल्पेन मनुनात्र यथा पुरा १४ यज्ञैर्मयेष्टं बहुभिर्धर्मतः पालिता मही । नोत्सृष्टश्चैव संग्रामो नातिथिर्विमुखो गतः १५ पितृदेवर्षिभृत्याश्च न चापचरिता मया । महातापार्तितप्तस्य तृष्णादाहार्दितस्य च १६ सर्वस्य जीवभूतस्य कृतं त्राणं सदा मया । कृता स्पृहा च न मया परस्त्रीविभवा-

---

आक्रोश करीत होते ३. तेथें यमदूत मला पीडित असतांना संपूर्ण शंभर वर्षें लोटलीं; महातापजन्य दुःखानें मी तप्त झालों होतों व तृषेमुळेंही माझा दाह झालेला होता. ४. चिखल व वाळू ह्यांनीं भरलेल्या डेऱ्यांत मी असतांना आल्हादकारक, सुखावह आणि शीतल वायु एकाएकीं आला ५; आणि, हे तात, अकस्मात् एक श्रेष्ठ पुरुष तेथें आला. त्याच्या संपर्कामुळें सर्व मानवांची पीडा नाहींशी झाली; आणि मलाही स्वर्गनिवासी लोकांप्रमाणें अतिशय सुख झालें ६. तेव्हां हें काय आहे ह्मणून आनंदानें आह्मी डोळे उघडले आणि त्या अत्युत्कृष्ट महापुरुषाकडे आह्मी टक लावून पाहूं लागलों ७. हातांत दंड घेऊन चमकत असलेला भयंकर यमदूतही इकडे ये असें ह्मणत ह्मणत त्याला पुढें मार्ग दर्शवीत होता ८. तेव्हां ते सर्व प्राणी, त्याच्या दर्शनानें सुख होऊं लागल्यामुळें हात जोडून त्या राजाला ह्मणाले "क्षणभर थांब ९. तुझ्या शरीराचा संपर्क झालेला वायु आह्माला सुख देत आहे." हें ऐकून त्या राजाला दया आली व तो त्या नरकासमीप बसला १०. नंतर शेंकडों यातनांनीं भरलेला नरक पाहून तो दयालु पुरुष त्या यमदूताला ह्मणाला ११ "यातनांनीं भयंकर असा हा दुःसह नरक प्राप्त होण्यासारखें पातक, हे यमदूता, मीं काय केलें आहे तें सांग." १२. मीं विदेहदेशामध्यें जनककुळांत विपश्चित् ह्मणून विख्यात असा प्रजासंरक्षक राजा झालों होतों १३. धर्मनिष्ठ मनूनें पूर्वी जसें चातुर्वर्ण्य स्वधर्मांत ठेवून रक्षिलें होतें तसें मीं धर्मानें रक्षिलें होतें. १४. मीं बहुत यज्ञ केले; धर्मानें पृथ्वीपालन केलें; संग्रामांत मागें राहिलों नाहीं व अतिथि माझ्यापासून परत गेला नाहीं १५. पितर, देव, ऋषि व सेवक ह्यांचा मीं अपमान केला नाहीं. महादुःखानें गांजलेल्या व तृषेनें व्याकुळ झालेल्या १६ प्राणिमात्राचें मी सर्वदा रक्षण करीत असें; परस्त्री, परधन इत्यादिकांचा मीं कधीं

दिपु १७ पर्वकालेपु पितरस्तिथिकालेपु देवताः । पुरुषं स्वयमायान्ति निपानमिव धेनवः १८ यतस्ते विमुखा यान्ति निःस्वस्य गृहमेधिनः । तस्मादिष्टश्च पूर्तश्च धर्मौ द्वावपि नश्यतः १९ पितृनिःश्वासविध्वस्तं सप्तजन्मार्जितं धनम् । त्रिजन्मप्रभवं दैवो निःश्वासो हन्त्यसंशयम् २० तस्माद्दैवे च पित्र्ये च नित्यमेव हितोऽभवम् । सोऽहं कथमिमं प्राप्तो नरकं भृशदारुणम् २१ ( ९२१ ) इति श्रीमार्कंडेयपुराणे पितापुत्रसंवादे त्रयोदशोऽध्यायः ॥ १३ ॥

पुत्र उवाच ॥ इति पृष्टस्तदा तेन शृण्वतां नो महात्मना । उवाच पुरुषो याम्यो घोरोऽपि प्रश्रितं वचः १ यमकिङ्कर उवाच । महाराज यथात्थ त्वं तथैतन्नात्र संशयः । किं तु स्वल्पं कृतं पापं भवता स्मारयामि तत् २ वैदर्भी तव या पत्नी पीवरी नाम नामतः । ऋतुमत्यां ऋतुर्वन्ध्यस्त्वया तस्याः कृतः पुरा ३ सुशोभनायां कैकेय्यामासक्तेन ततो भवान् । ऋतुव्यतिक्रमात्प्राप्तो नरकं घोरमीदृशम् ४ होमकाले यथावह्निराज्यपातमवेक्षते । ऋतौ प्रजापतिस्तद्वद्बीजपातमवेक्षते ५ यस्तमुल्लङ्घ्य धर्मात्मा कामेष्वासक्तिमान्भवेत् । स तु पित्र्यादृणात्पापमवाप्य नरकं पतेत् ६ एतावदेव ते पापं नान्यत्किंचन विद्यते । तदेह्यागच्छ पुण्यानामुपभोगाय पार्थिव । एतच्छ्रुत्वा तु राजर्षिः कृपया जनकोऽब्रवीत् ७ राजोवाच । यास्यामि देवानुचर यत्र त्वं मां नयिष्यसि । किंचित्पृच्छामि तन्मे त्वं यथावद्वक्तुमर्हसि ८ वज्रतुण्डास्त्वमी

---

अभिलाष धरिला नाहीं १७. पर्वकाळीं पितर, तिथीस देव, पाणवठ्यावर येणाऱ्या गाईप्रमाणें माझ्याकडे आपोआप येत असत १८. दरिद्री पुरुषापासून ते परत गेले असतां इष्ट व पूर्त हे दोन्ही धर्म निष्फल होतात १९. इतकेंच नव्हे परंतु; पितरांच्या सुस्कान्यामुळें सप्तजन्मार्जित द्रव्य नाहींसें होतें आणि देवांच्या सुस्कान्यामुळें तीन जन्मांतील द्रव्य निःसंशय नाहींसें होतें २०. ह्यास्तव, देवपितृकार्याविषयीं मी सर्वदां दक्ष असें. परंतु, मला हा अति भयंकर नरक कसा प्राप्त झाला आहे? २१. (९२१) ह्याप्रमाणें श्रीमार्कंडेयपुराणांतर्गत पितापुत्रसंवादविषयक तेरावा अध्याय समाप्त झाला ॥ १३ ॥

पुत्र ह्मणतोः—ह्याप्रमाणें आमच्या समक्ष त्या महात्म्यानें विचारिलें असतां तो यमदूत भयंकर असूनही विनयानें ह्मणाला १ " महाराज, आपलें ह्मणणें बरोबर आहे; परंतु, तुझ्या हातून घडलेल्या अल्प पातकाची मी आतां आठवण करितों २. विदर्भराजकन्या पीवरी तुझी पत्नी होती. ती ऋतुस्नात असतांना तूं तिचा ऋतु निष्फल केलास ३. कारण, सुंदरी कैकेयीचे ठिकाणीं तूं आसक्त होतास. ऋतूचें अतिक्रमण केल्यामुळें तुला हा अशाप्रकारचा घोर नरक प्राप्त झाला आहे ४. होमकालीं घृतपतनाची वाट पहाणाऱ्या अग्नीप्रमाणें प्रजापति ऋतुकालीं बीजपतनाची वाट पहात असतो ५. ह्यास्तव, जो धर्मात्मा त्याचें उल्लंघन करून कामासक्त होईल त्याला पितृऋणामुळें पाप, लागेल व तो नरकांत पडेल ६. एवढेंच तुझें पातक आहे; दुसरें कांहींएक नाहीं. तस्मात्, हे राजा, पुण्योपभोगार्थ तूं इकडे ये " हें ऐकून तो राजर्षि जनक कृपेनें ह्मणाला ७ " हे देवदूता, जिकडे नेशील तिकडे मी येईन; परंतु, मी कांहीं विचारीत आहें त्याचें तूं योग्य उत्तर दे ८. हे वज्रमुखी

काकाः पुंसां नयनहारिणः । पुनः पुनश्च नेत्राणि तद्वदेषां भवन्ति हि ९ किं कर्म कृतवन्तश्च कथयैतज्जुगुप्सितम् । हरन्त्येषां तथा जिह्वां जायमानां पुनर्नवाम् १० करपत्रेण पाट्यन्ते कस्मादेतेऽतिदुःखिताः । करम्भवालुकास्थाश्च तथैते क्वाथतैलगाः ११ अयोमुखैः खगैश्चैव कृष्यन्ते किंविधा वद । विश्लिष्टदेहबन्धार्तिमहारावविराविणः १२ अयश्चञ्चुनिपातेन सर्वाङ्गक्षतविक्षताः । किमेते निःस्वनन्तोपि तुद्यन्तेऽहर्निशं नराः १३ एताश्चान्याश्च दृश्यन्ते यातनाः पापकर्मिणाम् । येन कर्मविपाकेन तन्ममोदेश्यतो वद १४ यमकिङ्कर उवाच । यन्मां पृच्छसि भूपाल पापकर्मफलोदयम् । ततेऽहं संप्रवक्ष्यामि संक्षेपेण यथातथम् १५ पुण्यापुण्ये हि पुरुषः पर्यायेण समश्नुते । भुञ्जतश्च क्षयं याति पापं पुण्यमथापि वा १६ न तु भोगादृते पुण्यं पापं वा कर्म मानवः । परित्यजति भोगाच्च पुण्यापुण्ये निबोध मे १७ दुर्भिक्षादेव दुर्भिक्षं क्लेशात्क्लेशं भयाद्भयम् । मृतेभ्यः प्रमृता यान्ति दरिद्राः पापकर्मिणः १८ गतिं नानाविधां यान्ति जन्तवः कर्मबन्धनात् । उत्सवादुत्सवं यान्ति स्वर्गात्स्वर्गं सुखात्सुखम् १९ श्रद्धानाश्च दान्ताश्च धनदाः शुभकारिणः २० व्याघ्रकुञ्जरदुर्गाणि सर्पचौरभयानि तु । हताः पापेन गच्छन्ति पापिनः किमतः परम् २१ सुगन्धिमाल्यसद्वस्त्रसाधुयानासनाशनाः । स्तूयमानाः सदा यान्ति पुण्यैः पुण्याटवीष्वपि २२ अनेकयतसाहस्रजन्मसंचयसंचितम् । पुण्या-

कावळे मानवांचे नेत्र हरण करीत आहेत व पुनःपुनः त्या मानवांना नेत्र येत आहेत ९. तेव्हां ह्यांनीं काय निंद्य कर्म केलें आहे हें तूं सांग. पुनः पुनः नवीन उत्पन्न होणाऱ्या ह्यांच्या जिभाही ते हरण करीत आहेत १०. ह्या अति दुःखित मानवांना करवतानें कां कापीत आहेत ? कांहीं चिखलांत, कांहीं वाळूंत व कांहीं कढणाऱ्या तेलांत कां टाकिले आहेत ? ११ कशाप्रकारच्या मानवांना लोहमुखी पक्षी ओढीत असतात तें सांग. देहबंध शिथिल झाल्यामुळें दुःख होऊन हे मोठ्यानें ओरडत आहेत १२. लोखंडी चोंचीच्या प्रहारामुळें ह्यांचें सर्वांग जखमांनीं तुटून गेलें आहे. ओरडत असलेल्याही ह्या मानवांना रात्रंदिवस दुःख दिलें जात आहे हें काय ? १३ ह्या व दुसऱ्या यातना पाप्यांना कोणत्या कर्मामुळें होत आहेत हें मळा आपण संक्षेपानें सांगा १४. यमदूत ह्मणतोः—, हे भूपाळ, तूं विचारीत असलेलें पापकर्माचें फल मी तुला संक्षेपतः सत्य सांगतों १५. पुरुषांना पाप व पुण्य ह्यांचें फल अनुक्रमानें प्राप्त होत असतें व उपभोगानें पापाचा अथवा पुण्याचा क्षय होत असतो १६. उपभोगाशिवाय पापपुण्यापासून पुरुषाची सुटका होत नाहीं; उपभोगानें च ती होत असते. माझ्यापासून पापपुण्य ऐक १७. दुर्भिक्षानंतर दुर्भिक्ष, क्लेशानंतर क्लेश व भयानंतर भय पापी दरिद्र्यांना प्राप्त होत असतें व ते मेल्यानंतरही हाच क्रम सुरू रहातो १८. कर्मबंधनामुळें अनेक प्रकारची गति प्राण्यांना प्राप्त होत असते. श्रद्धाळु, जितेंद्रिय व दान देणाऱ्या पुण्यवानांना उत्सवानंतर उत्सव, स्वर्गानंतर स्वर्ग व सुखानंतर सुख प्राप्त होत असतें १९, २०. सुगंधी पुष्पें, मांगलिक वस्त्रें, उत्कृष्ट वाहनें, आसनें व भोजन ह्यांनीं संपन्न असे लोक पुण्यामुळें सर्वदा पवित्र वनांतून हिंडत असतात व इतर त्यांची स्तुति करीत अस-

न्पुण्यानि स्वर्गलोकेऽमरैः सह। गन्धर्वसिद्धाप्सरसां गीताद्यैरुपभुज्यते ३७ देवत्वे मानुषत्वे च तिर्यक्त्वे च शुभाशुभम्। पुण्यपापोद्भवं भुङ्क्ते सुखदुःखोपलक्षणम् ३८ यत्वं पृच्छसि मां राजन्यातनाः पापकर्मिणाम्। केन केनेति पापेन तत्ते वक्ष्याम्यशेषतः ३९ दुष्टेन चक्षुषा दृष्टाः परदारा नराधमैः। मानसेन च दुष्टेन परद्रव्यं च सस्पृहैः ४० वज्रतुण्डाः खगास्तेषां हरन्त्येते विलोचने। पुनःपुनश्च संभूतिरक्ष्णोरेषां भवत्यथ ४१ यावतोऽक्षिनिमेषांस्तु पापमेभिर्नृभिः कृतम्। तावद्वर्षसहस्राणि नेत्रार्तिं प्राप्नुवन्त्युत ४२ असच्छास्त्रोपदेशास्तु यैर्दत्ता यैश्च मन्त्रिताः। सम्यग्दृष्टेर्विनाशाय रिपूणामपि मानवैः ४३ यैः शास्त्रमन्यथा प्रोक्तं यैरसद्वाग्युदाहृता। वेददेवद्विजातीनां गुरोर्निन्दा च यैः कृता ४४ हरन्ति तेषां जिह्वाश्च जायमानाः पुनःपुनः। तावतो वत्सरानेते वज्रतुण्डाः सुदारुणाः ४५ मित्रभेदं तथा पित्रा पुत्रस्य स्वजनस्य च। यज्वोपाध्याययोर्मात्रा सुतस्य सहचारिणः ४६ भार्यापत्योश्च ये केचिद्भेदं चक्रुर्नराधमाः। त इमे पश्य पाट्यन्ते करपत्रेण पार्थिव ४७ परोपतापका ये च ये चाह्लादनिषेधकाः। तालवृन्तानिलस्नानचन्दनोशीरहारिणः ४८ प्राणान्तिकं दद्दुस्तापमदुष्टानां च येऽधमाः। करम्भवालुकासंस्थास्त इमे पापभागिनः ४९ भुङ्क्ते श्राद्धं तु योऽन्यस्य भरोन्येन निमन्त्रितः। दैवे वाप्यथवा पैत्र्ये स द्विधा कृष्यते खगैः ५० मर्माणि यस्तु साधूना-

यातनांच्या योगानें महापातकाचें फळ संपवीत असतात ३६; आणि त्याचप्रमाणें, हे राजा, स्वर्गलोकामध्यें पुण्यफळांचाही उपभोग गंधर्व, सिद्ध व अप्सरा ह्यांच्या गीतादिकांनीं त्यांना घडत असतो ३७. सारांश, पापपुण्यमूलक सुखदुःखरूप शुभाशुभ फल—देव, मानव व पशुपक्षी ह्यांच्या योनींत पुरुष भोगीत असतो ३८. हे राजा, कोणत्या कोणत्या पापामुळें काय काय यातना प्राण्यांना भोगाव्या लागतात हें जें तूं मला विचारीत आहेस तें मी तुला सर्व सांगतों ३९. वाकडी दृष्टि परस्त्रीवर करणारे आणि मन अशुद्ध ठेवून अभिलाषपूर्वक परद्रव्यावर दृष्टि ठेवणारे जे नराधम ४० त्यांचे नेत्र, हे वज्रमुखी पक्षी हरण करीत असतात व त्यांना पुनः पुनः नेत्र फुटत असतात ४१; आणि जितके निमिषपर्यंत ह्या मानवांनीं तें पाप केलेलें असतें तितकीं हजार वर्षें त्यांना नेत्रपीडा प्राप्त होते ४२. शत्रूंनाही मोह पाडण्याकरितां ज्या मानवांनीं असच्छास्त्रोपदेश दिलेले असतात किंवा देण्याविषयीं मसलती केलेल्या असतात ४३; ज्यांनीं शास्त्राचा अर्थ भलत्याच रीतीनें केलेला असतो, ज्यांनीं दुर्भाषण केलेलें असतें आणि वेद, देव, द्विज व गुरु ह्यांची निंदा ज्यांनीं केलेली असते ४४ त्यांच्या वारंवार जिभा, तितके संवत्सरपर्यंत हे वज्रमुखी अति दारुण पक्षी हरण करीत रहातात ४५. मित्र, पिता, पुत्र, स्वजन, यजमान व उपाध्याय, माता व तिच्या अनुरोधानें वागणारें अपत्य ४६ आणि स्त्रीपुरुष ह्यांमध्यें भेद पाडणारे ते हे नराधम, हे राजा, पहा करवतानें फाडिले जात आहेत ४७. परपीडक, दुसऱ्यांचा आनंद कमी करणारे, पंखा, हवाशीर जागा, चंदन व वाळा हरण करणारे ४८ आणि सज्जनांना प्राणांतिक दुःख देणारे ते हे अधम पापी चिखलांत व वाळूंत रुतलेले आहेत ४९.

मसद्वाग्भिर्निकृन्तति । तमिमे तुदमानास्तु खगास्तिष्ठन्त्यवारिताः ९१ यः करोति च पैशुन्यमन्यथा वागन्यथा मतिः । पाट्यते हि द्विधा जिह्वा तस्येयं निशितैः क्षुरैः ९२ मातापित्रोर्गुरूणां च येऽवज्ञां चक्रुरुद्धताः । त इमे पूयविण्मूत्रगर्ते मज्जन्त्यधोमुखाः ९३ देवतातिथिभूतेषु भृत्येष्वभ्यागतेषु च । अभुक्तवत्सु येऽश्नन्ति तद्वत्पित्रग्निपक्षिषु ९४ दुष्टास्ते पूयनिर्यासभुजः सूचीमुखास्तु ते । जायन्ते गिरिवर्ष्माणः पश्यैते यादृशा नराः ९५ एकपंक्त्या तु ये विप्रमथवेतरवर्णजम् । विषमं भोजयन्तीह विड्भुजस्त इमे यथा ९६ एकार्थप्रयातं ये निःस्वमर्थार्थिनं नरम् । अपास्य स्वार्थमश्नन्ति त इमे श्लेष्मभोजिनः ९७ गोब्राह्मणाग्नयः स्पृष्टा यैरुच्छिष्टैर्नरेश्वर । तेषामेतेऽग्निकुण्डेषु प्रज्वलत्स्वाहिताः कराः ९८ सूर्येन्दुतारका दृष्टा यैरुच्छिष्टैस्तु कामतः । तेषां याम्यैर्नरैर्नेत्रे न्यस्तो वह्निः समिध्यते ९९ गावोऽग्निर्जननी विप्रो ज्येष्ठभ्राता पिता स्वसा । जामयो गुरवो वृद्धा यैः स्पृष्टास्तु पदा नृभिः १०० बद्धांघ्रयस्ते निगडैर्लोहैरग्निप्रतापितैः । अंगारराशिमध्यस्थास्तिष्ठन्त्याजानुदाहिनः १०१ पायसं कृसरं छागं देवान्नानि च यानि वै । भुक्तानि यैरसंस्कृत्य तेषां नेत्राणि पापिनाम् १०२ निपातितानां भूपृष्ठे उद्धृत्याक्षिनिरीक्षताम् । संदंशैः पश्य कृष्यन्ते नरैर्याम्यैर्मुखात्ततः १०३

---

एकानें केलेलें आमंत्रण टाकून जो दुसऱ्याचे घरीं देवस्थानीं अथवा पितृस्थानीं श्राद्धाला बसतो त्याला दोन्ही बाजूंनीं पक्षी ओढीत असतात ९०. अयोग्य शब्दांनीं साधूंच्या मर्मावर जो प्रहार करितो त्याला हे अनिवार पक्षी तोडीत आहेत ९१. मनांत एक व बोलण्यांत एक असें वागून जो दुष्टपणा करीत असतो त्याच्या जिभेचे तीक्ष्ण वस्तऱ्यांनीं असे दोन तुकडे केले जातात ९२. मातापितरें व गुरु ह्यांची अवज्ञा करणारे जे उद्दट ते हे अधोमुख होऊन पू, विष्ठा व मूत्र ह्यांनीं भरलेल्या खड्यांत बुडत आहेत ९३. देव, अतिथि, भूतें, भृत्य, अभ्यागत, पितर, अग्नि व पक्षी ह्यांना अन्नदान न करितां जे भोजन करितात ९४ ते दुष्ट सूचीमुख होऊन व्रणांतून बाहेर पडणारा पू खात असतात आणि त्यांचीं शरीरें अचल होत असतात ९५. एकाच पंक्तीमध्यें जे ब्राह्मणाला अथवा इतरांला भिन्न अन्न वाढितात ते हे विष्ठाभक्षक होत ९६. एका टोळींत निघालेल्या दरिद्री व धनार्थी पुरुषाला सोडून जे अन्न सेवन करितात ते हे कफाचे बेडके खात रहातात ९७. उच्छिष्ट असतांना धेनु, ब्राह्मण व अग्नि ह्यांना स्पर्श करणाऱ्यांचे हात, हे राजा, प्रज्वलित अग्निकुंडांमध्यें जळत ठेविलेले आहेत ९८. सूर्य, चंद्र व नक्षत्रें जाणूनबुजून उच्छिष्ट असतांना अवलोकन करणाऱ्यांच्या डोळ्यांवर अग्नि ठेवून यमदूत पेटवीत असतात ९९. धेनु, अग्नि, माता, विप्र, ज्येष्ठ भ्राता, पिता, भगिनी, सून, गुरु व वृद्ध ह्यांना पाय लावणाऱ्यांच्या १०० पायांत अग्नितप्त लोखंडी बिड्या घातलेल्या असतात व गुडघ्यापर्यंत असणाऱ्या निखाऱ्यांच्या राशीमध्यें ते जळत रहात असतात १०१. खीर, खिचडी, सागुती व देवप्रिय अन्नें संस्काराशिवाय भक्षण करणाऱ्या पातक्यांना भूतलावर पाहून ते डोळे फिरवीत असतांना त्यांचे नेत्र यमदूत

गुरुदेवद्विजातीनां वेदानां च नराधमैः । निन्दा निशामिता यैश्च पापानामभिनन्दताम् ६४ तेषामयोमयान्कीलानग्निवर्णान्पुनः पुनः । कर्णेषु पूरयन्त्येते याम्या विलपतामपि ६५ यैः प्रपा देवविप्रौकोदेवालयसभाः शुभाः । भङ्क्त्वा विध्वंसमानीताः क्रोधलोभानुवर्तिभिः ६६ तेषामेतैः शितैः शस्त्रैर्दुर्विलपतां त्वचः । पृथक्कुर्वन्ति वै याम्याः शरीरादतिदारुणाः ६७ गोब्राह्मणार्कमार्गांम्तु येऽत्वमेहन्ति मानवाः । तेषामेतानि कृष्यन्ते गुदेनान्त्राणि वायसैः ६८ दत्त्वा कन्यां य एकस्मै द्वितीयाय प्रयच्छति । स त्वेवं नैकधा छिन्नः क्षारनद्यां प्रवाह्यते ६९ स्वपोषणपरो यस्तु परित्यजति मानवः । पुत्रभृत्यकलत्रादिबन्धुवर्गमकिंचनम् ७० दुर्भिक्षे संभ्रमे वापि सोऽप्येवं यमकिंकरैः । उत्कृत्य दत्तानि मुखे स्वमांसान्यद्यते क्षुधा ७१ शरणागतान्यस्त्यजति लोभादुत्कोचजीविकः । सोऽप्येवं यन्त्रपीडाभिः पीड्यते यमकिंकरैः ७२ सुकृतं ये प्रयच्छन्ति यावज्जन्मकृतं नराः । ते पिष्यन्ते शिलापेषैर्यथैते पापकर्मिणः ७३ न्यासापहारिणो बद्धाः सर्वगात्रेषु बन्धनैः । कृमिवृश्चिककाकोलैर्भुज्यन्तेऽहर्निशं नराः ७४ क्षुत्क्षामास्तृट्पतज्जिह्वाताल्वो वेदनातुराः । दिवामैथुनिनः पापाः परदारभुजश्च ये ७५ तथैव कण्टकैस्तीक्ष्णैरायसैः पश्य शाल्मलिम् । आरोपिता विभिन्ना-

---

सांडसांनीं मुळापासून उपटून काढीत आहेत हें पहा ६२, ६३. गुरु, देव, द्विज व वेद ह्यांची निंदा श्रवण करून आनंद मानणाऱ्या प्राण्यांच्या ६४ कानांमध्यें हे यमदूत त्यांच्या विलापाचीही पर्वा न करितां अग्निवर्ण केलेले लोखंडी खिळे वारंवार ठोकीत असतात ६५. पाणपोया, देवालयें, विप्रगृहें व सभामंडप अशा चांगल्या इमारती क्रोधानें अथवा लोभानें मोडून नाहींशा करणाऱ्यांच्या ६६ विलापाचीही पर्वा न करितां अतिभयंकर यमदूत ह्या तीक्ष्ण शस्त्रांनीं त्यांची आंतडीं वारंवार त्यांच्या शरीरापासून सोलून काढीत असतात ६७. धेनु, ब्राह्मण व सूर्य ह्यांच्या समोर मुतणाऱ्या मानवांचींही आंतडीं कावळे गुदद्वारांतून ओढीत असतात ६८. एकाला कन्या दिल्यानंतर तीच दुसऱ्याला देणाऱ्याचे ह्याप्रमाणें अनेक तुकडे केले जातात आणि तो क्षारनदीमध्यें वहात जात असतो ६९. स्वतःच्याच पोषणाचे मार्गे लागून जो मनुष्य दुर्भिक्षसमयीं अथवा संकटसमयीं पुत्र, भृत्य, पत्नी व दरिद्री बंधुवर्ग ह्यांचा त्याग करितो तोही ह्याप्रमाणें यमदूतांनीं तोडून तोंडांत कोंबिलेलें स्वतःचें मांस क्षुधेमुळें खात असतो ७०, ७१. लोभानें लांच खाऊन शरणागतांचा जो त्याग करितो त्यालाही यमदूत ह्याप्रमाणें खोड्यांत अडकवून पीडा देत असतात ७२. जन्मभर केलेलें पुण्य जे मानव दुसऱ्याला देतात ते ह्या पापकर्मी पुरुषांप्रमाणें दगडावर वाटले जातात ७३. ठेवी बुडविणाऱ्यांचे सर्व अवयव पाशांनीं बांधिले जातात आणि कीटक, विंचू व सर्प त्यांना रात्रंदिवस डसत असतात ७४. जे दिवसा स्त्रीसमागम करितात व जे परस्त्रीसेवन करितात ते पातकी क्षुधेनें कृश व वेदनांनीं व्याकुळ होतात; तृषेनें त्यांची जीभ व तालु शुष्क होऊन जाते ७५ आणि त्याच-प्रमाणें कांटेशेवरीच्या झाडावर ते बांधिले जातात आणि लोहतुल्य तीक्ष्ण कांट्यांनीं

दुर्गाः प्रभूतासृक्स्रवाविलाः ७६ मूर्च्छायामपि पश्यैतान्ध्मायमानान्यमाहवैः। पुरुषैः पुरुषव्याघ्र परदारावमर्शिनः ७७ उपाध्यायमधः कृत्वा स्तब्धो योऽध्ययनं नरः। गृह्णाति शिल्पमथवा सोऽप्येवं शिरसा शिलाम् ७८ बिभ्रत्क्लेशमवाप्नोति जनमार्गेऽतिपीडितः। क्षुत्क्षामोऽहर्निशं भारपीडाव्यथितमस्तकः ७९ मूत्रश्लेष्मपुरीषाणि यैरुत्सृष्टानि वारिणि। त इमे श्लेष्मविण्मूत्रदुर्गन्धं नरकं गताः ८० परस्परं च मांसानि भक्षयन्ति क्षुधान्विताः। भुक्तं नातिथ्यविधिना पूर्वमेभिः परस्परम् ८१ अपविद्धास्तु यैर्वेदा वह्नयश्चाहिताग्निभिः। त इमे शैलशृंगाग्रात्पात्यन्तेऽधः पुनः पुनः ८२ पुनर्भूपतयो ये च कामतापवशानुगाः। इमे कृमित्वमापन्ना भक्ष्यन्तेऽत्र पिपीलिकैः ८३ नीचप्रतिग्रहादानाद्याजनान्नित्यसेवनात्। पाषाणमध्यकीटत्वं नरः सततमश्नुते ८४ पश्यतो भृत्यवर्गस्य मित्रस्याप्यतिथेस्तथा। एको मिष्टान्नभुग्भुङ्क्ते ज्वलदङ्गारसंचयम् ८५ वृकैर्भयंकरैः पृष्ठं नित्यमस्योपभुज्यते। पृष्ठमांसं नृपैतेन यतो लोकस्य भक्षितम् ८६ अन्धोऽथ बधिरो मूको भ्राम्यतेऽत्र क्षुधातुरः। अकृतज्ञोऽधमः पुंसामुपकारिषु वर्तते ८७ अयं कृतघ्नो मित्राणामपकारी सुदुर्मतिः। तप्तकुम्भे निपतितो विलपन्याति शोषणम् ८८ करम्भवालुकां तस्मात्ततो यन्त्रावपीडनम्। असिपत्रवनं तस्मात्करपत्रेण पाटनम् ८९ कालसूत्रे तथाच्छेदमनेकाश्चैव यातनाः। प्राप्य निष्कृतिमेतस्मात्

शरीर फाटून गेल्यामुळें प्रचंड रक्तप्रवाहानें ते भरून जातात ७६. हे पुरुषश्रेष्ठा, ह्या परस्त्रीसमागम करणाऱ्यांना, पहा हे यमदूत मुशींत घालून आटीत आहेत ७७. गुरूची पर्वा न करितां जो गर्विष्ठ वेद अथवा शिल्पकला शिकतो तो ह्याप्रमाणें अतिशय पीडित होऊन हमरस्त्यामध्यें डोक्यावर धोंडा घेऊन क्लेश भोगीत असतो व क्षुधेनें कृश होऊन रात्रंदिवस त्याच्या मस्तकाला पाषाणाच्या भारानें वेदना होत असते ७८, ७९. उदकामध्यें ज्यांनीं मूत्र, विष्ठा व खाकरे टाकिलेले असतात ते हे—खाकरे, विष्ठा व मूत्र ह्यांनीं दुर्गंधयुक्त झालेल्या नरकांत—पडलेले आहेत ८०. हे क्षुधित होऊन परस्परांचें मांस खात आहेत. कारण, ह्यांनीं पूर्वी अतिथीचा सत्कार करून भोजन केलेलें नाहीं ८१. वेद व अग्नि ह्यांची बेपर्वा करणारे हे अग्निहोत्री पर्वतशिखरापासून वारंवार खालीं लोटले जात असतात ८२. विषयाधीन होऊन जे लोक विवाहित स्त्रीशीं पुनः विवाह करितात ते हे कृमि झाले असून त्यांना मुंग्या खातात ८३. नीचाचा प्रतिग्रह, यजन व नित्यसमागम ह्यांमुळें मनुष्य सर्वदां पाषाणांतील कीटक होतो ८४. भृत्यवर्ग, मित्र व अतिथि ह्यांची पर्वा न करितां एकटा मिष्टान्न भक्षण करणारा रखरखीत निखाऱ्यांची रास खात असतो ८५, आणि हे राजा, ज्याअर्थी ह्यानें लोकांचें पृष्ठमांस भक्षिलेलें असतें त्याअर्थी भयंकर लांडगे ह्याच्या पाठीचे लचके नित्य तोडीत असतात ८६. उपकारकर्त्याविषयीं कृतघ्न होणारा नराधम, अंध, बधिर, मूक व क्षुधित होऊन येथें भटकत असतो ८७. मित्रांना अपकार करणारा हा अति दुष्ट कृतघ्न तप्तकुंभनरकांत पडलेला आहे आणि विलाप करीत करीत हा शुष्क होत आहे ८८, त्यानंतर ह्याला चिखल व वाळू, नंतर चरकांतून निघणें, नंतर असिपत्रवन, नंतर

वेद्मि कथमेष्यति ९० श्राद्धे संगतिनो विप्राः समुपेत्य परस्परम् । दुष्टाहिनिःसृतं फेनं सर्वांगेभ्यः पिबन्ति वै ९१ सुवर्णस्तेयी विप्रघ्नः सुरापो गुरुतल्पगः । अधश्चोर्ध्वं च दीप्ताग्नौ दह्यमानाः समन्ततः ९२ तिष्ठन्त्यब्दसहस्राणि सुबहूनि ततः पुनः । जायन्ते मानवाः कुष्ठक्षयरोगादिचिह्निताः ९३ मृताः पुनश्च नरकं पुनर्जाताश्च तादृशम् । व्याधिमृच्छन्ति कल्पान्तपरिमाणं नराधिप ९४ गोघ्नो न्यूनतरं याति नरकेऽथ त्रिजन्मनि । तथोपपातकानां स सर्वेषामिति निश्चयः ९५ नरकप्रच्युता यान्ति यैर्यैर्विहितपातकैः । प्रयान्ति योनिजातानि तन्मे निगदतः शृणु ९६ ( १०१७ ) इति श्रीमार्कण्डेयपुराणे पितापुत्रसंवादे यमकिंकरसंवादे स्वकृतकर्मभुक्तिकथनं नाम चतुर्दशोऽध्यायः ॥ १४ ॥

यमकिंकर उवाच । पतितात्प्रतिगृह्याथ खरयोनिं व्रजेद्द्विजः । नरकात्प्रतिमुक्तस्तु कृमिः पतितयाजकः १ उपाध्यायव्यलीकं तु कृत्वा श्वा भवति द्विजः । तज्जायां मनसा वाचा तद्द्रव्यं वापि कामयेत् २ गर्दभो जायते जन्तुः पित्रोश्चाप्यवमानकः । मातापितरावाकुश्य सारिका संप्रजायते ३ भ्रातुः पत्न्यवमन्ता च कपोतत्वं प्रपद्यते । तावेव पीडयित्वा तु कच्छपत्वं प्रपद्यते ४ भर्तृपिण्डमुपाश्नन्यस्तदिष्टं न निषेवते । सोऽपि मोहसमापन्नो जायते वानरो मृतः ५ न्यासापहर्ता नरकाद्विमुक्तो जायते कृमिः । अभ्यसूयकश्च नरकान्मुक्तो भवति राक्षसः ६ विश्वा-

---

करवतीनें कापणें ८९. नंतर कालसूत्र नरकांत तुकडे होणें ह्या व दुसऱ्या अनेक यातना ह्याला भोगाव्या लागतील व त्यापासून हा कसा सुटेल हें मलाही समजत नाहीं ९०. श्राद्धदिवशीं स्त्रीसमागम करणारे विप्र एकत्र जुळून दुष्ट सर्पाच्या अंगापासून निघालेला फेस पीत असतात ९१. सुवर्णापहार, ब्रह्महत्या, सुरापान व मातृगमन हीं महापातकें करणारे प्रदीप्त अग्निमध्यें खालीं वर हजारों वर्षें जळत रहातात; नंतर कुष्ठ, क्षयरोग इत्यादि चिन्हांसह ते मानव जन्मास येतात ९२, ९३, मेल्यावर पुनरपि नरकांत पडतात, आणि जन्मल्यावर पुनरपि, हे राजा, कल्पांत होईपर्यंत तशाच प्रकारच्या व्याधीनें ते ग्रस्त असतात ९४. गोहत्या करणारा ह्मणजे महापातक्यांपेक्षां किंचित् कमी असें उपपातक करणारा तीन जन्म नरकांत पडतो आणि हीच शिक्षा सर्व उपपातकांना असल्याचें सिद्ध आहे ९५. आतां नरक भोगिल्यानंतर कोणत्या पातकांमुळें कोणती योनि प्राप्त होते हें आपण माझ्यापासून ऐका ९६. ( १०१७ ) ह्याप्रमाणें मार्कंडेयपुराणांतर्गत पितापुत्रसंवादांतील यमदूतसंवादसंबंधीं स्वकर्मभोगकथननामक चवदावा अध्याय समाप्त झाला ॥ १४ ॥

यमदूत ह्मणतोः—पतिताचा प्रतिग्रह घेणारा द्विज नरकानंतर गर्दभ होतो, पतिताचें याजन करणारा कृमि होतो १; उपाध्यायाला दुःख देणारा आणि मनानें अथवा वाणीनें त्याच्या स्त्रीचा किंवा द्रव्याचा अभिलाष धरणारा द्विज श्वान होतो २; मातापितरांचा अवमान करणारा गर्दभ होतो व त्यांना शिव्या देणारा सारिका होतो ३; भ्राता व पत्नी ह्यांचा अवमान करणारा कबूतर होतो आणि त्यांना पीडा देणारा कासव होतो ४. मालकाचें अन्न खाऊन त्याचें मोहानें कल्याण न करणारा मरणानंतर

संहन्ता च शरो मीनयोनौ प्रजायते । धान्यं यवांस्तिलान्माषान्कुलत्थान्सर्षपांश्चणान् ७ कलायानथ मुद्गांश्च गोधूमानतसीस्तथा । सस्यान्यन्यानि वा हृत्वा मोहाज्जन्तुरचेतनः ८ संजायते महावक्त्रो मूषिको पशुसन्निभः । परदाराभिमर्शात्तु वृको घोरोऽभिजायते ९ श्वा सृगालो बको गृध्रो व्यालः कङ्कस्तथा क्रमात् । भ्रातृभार्यां च दुर्बुद्धिर्यो धर्षयति पापकृत् १० पुंस्कोकिलत्वमाप्नोति स चापि नरकाच्च्युतः । सखिभार्यां गुरोर्भार्यां राजभार्यां च पापकृत् ११ प्रधर्षयित्वा कामात्मा सूकरो जायते नरः । यज्ञदानविवाहानां विघ्नकर्ता भवेत्कृमिः १२ पुनर्दाता तु कन्यायाः कृमिरेवोपजायते । देवतापितृविप्राणामदत्वा योऽन्नमश्नुते १३ प्रमुक्तो नरकात्सोऽपि वायसः संप्रजायते । ज्येष्ठं पितृसमं चापि भ्रातरं योऽवमन्यते १४ नरकात्सोऽपि विभ्रष्टः क्रौञ्चयोनौ प्रजायते । शूद्रश्च ब्राह्मणीं गत्वा कृमियोनौ प्रजायते १५ तस्यामपत्यमुत्पाद्य काष्ठान्तःकीटको भवेत् । सूकरः कृमिको मद्गुश्चण्डालश्च प्रजायते १६ अकृतज्ञोऽधमः पुंसां विमुक्तो नरकान्नरः । कृतघ्नः कृमिकः कीटः पतङ्गो वृश्चिकस्तथा १७ मत्स्यस्तु वायसः कूर्मः पुक्कसो जायते ततः । अशस्त्रं पुरुषं हत्वा नरः संजायते खरः । कृमिः स्त्रीवधकर्ता च बालहन्ता च जायते १८ भोजनं चोरयित्वा तु मक्षिका जायते नरः । तत्राप्यस्ति विशेषो वै भोजनस्य शृणुष्व तत् १९ हृत्वा दुग्धं तु मार्जारो जायते नरकाच्च्युतः । तिलपिण्याकसंमिश्रमन्नं हृत्वा तु मूषकः २० घृतं हृत्वा तु नकुलः काको मद्गुरजामिषम् । मत्स्यमांसापहृत्काकः श्येनो मेषामिषापहृत् २१ चिरीवाकस्त्वपहृते लवणे दधि वा कृमिः । चोरयित्वा पयश्चापि

वानर होतो ६. ठेव चोरणारा नरकानंतर कृमि होतो; मत्सर करणारा राक्षस होतो ६; व विश्वासघातकी मासा होतो. धान्य, यव, तीळ, उडीद, हुलगे, मोहऱ्या, चणे ७, वाटाणे, साळी, मूग, गहूं, जवस व इतर धान्यें मोहामुळें चोरणारा अविचारी मनुष्य ८.घूस होतो. परस्त्रीसेवन करणाऱ्याला भयंकर लांडगा ९, श्वान, कोल्हा, बगळा, गिधाड, सर्प व कंक ह्या योनि अनुक्रमें प्राप्त होतात. भ्रातृपत्नीशीं समागम करणारा दुष्ट पापी १० नरकानंतर कोकिल होतो. मित्र, गुरु व नृप ह्यांच्या स्त्रीचा उपभोग घेणारा पापी ११ मदांध सूकर होतो. यज्ञ, दान व विवाह ह्यांना विघ्न करणारा कृमि होतो १२; व कन्येचें दुसऱ्यांदा दान करणारा कृमि होतो. देव, पितर व विप्र ह्यांना न देतां अन्न सेवन करणारा १३ कावळा होतो; पितृतुल्य ज्येष्ठ भ्रात्याचा अवमान करणारा १४ नरक भोगिल्यानंतर क्रौंच पक्षी होतो. ब्राह्मणीशीं रत होणारा शूद्र कृमि होतो १५; आणि तिचे ठिकाणीं अपत्य उत्पन्न करणाऱ्याला काष्ठांतील कीटक, सूकर, कृमि, कारंडव व चंडाल व्हावें लागतें १६. उपकार न जाणणारा कृतघ्न नराधम कृमि, कीटक, पतंग, विंचू १७, मत्स्य, काक, कासव व चंडाल होतो. निःशस्त्र पुरुषाचा वध करणारा गर्दभ होतो आणि स्त्रीहत्या व बालहत्या करणारा कृमि होतो १८. अन्न चोरणारा मक्षिका होतो. आतां ह्यांतही कांहीं विशेष प्रकार आहे तो श्रवण कर १९. दूध चोरणारा मांजर होतो; तीळ व पेंड ह्यांसह अन्न चोरणारा उंदीर होतो २०. तूप चोरणारा मुंगुस, अजामांस चोरणारा कावळा व कारंडव पक्षी, मत्स्यमांस चोरणारा काक व मेंढ्याचें मांस चोर-

बलाका संप्रजायते २२ यस्तु चोरयते तैलं तैलपायी स जायते । मधु हृत्वा नरो दंशोऽपूपं हृत्वा पिपीलिका २३ चोरयित्वा हविष्यान्नं जायते गृहगोधिका । आसवं चोरयित्वा तु तित्तिरित्वमवाप्नुयात् २४ अयो हृत्वा तु पापात्मा वायसः संप्रजायते । पात्रे कांस्येपि हारीतः कपोतो रौप्यभाजने २५ हृत्वा तु काञ्चनं भाण्डं कृमियोनौ प्रजायते । कौशेयं चोरयित्वा तु चक्रवाकत्वमृच्छति २६ कोशकारश्च कौशेये हृते वस्त्रेऽभिजायते । दुकूले शार्ङ्गकः पापो हृते चैवांशुके शुकः २७ क्षश्चैवाविकं हृत्वा वर्णं क्षौमं च जायते । कार्पासिके हृते क्रौञ्चो वह्निहर्ता बकः खरः २८ मयूरो वर्णकान्हृत्वा पत्रशाकं च जायते । जीवंजीवकतां याति रक्तवस्त्रापहारकः २९ छुच्छुन्दरी शुभान्गन्धान्वासो हृत्वा शशो भवेत् । खञ्जः फलापहरणे काष्ठहृद्घुणकीटकः ३० पुष्पापहृद्दरिद्रस्तु पंगुर्यानापहारकः । शाकहर्ता च हारीतस्तोयहर्ता च चातकः ३१ भूमिहृन्नरकान्गत्वा रौरवादीन्सुदारुणान् । तृणगुल्मलतावल्लीत्वक्सारतरुतां क्रमात् ३२ प्राप्य क्षीणाल्पपापस्तु नरो भवति वै ततः । वृषस्य वृषणौ छित्त्वा षण्ढत्वं प्राप्नुयान्नरः ३३ परिहृत्य तथा भूयो जन्मनामेकविंशतिः । कृमिः कीटः पतंगो वा पक्षी तोयचरो मृगः ३४ गोत्वं च प्राप्य चाण्डालपुल्कसादि जुगुप्सितम् । पंग्वन्धो बधिरः कुष्ठी यक्ष्मणा च प्रपीडितः ३५ मुखरोगाक्षिरोगैश्च गुदरोगैश्च बाध्यते । अपस्मारी च भवति शूद्रत्वं च स गच्छति ३६ एष एव क्रमो दृष्टो गोसुवर्णादिहारिणाम् ।

णारा ससाणा होतो २१. मीठ चोरणारा चिरीवाक, दहीं चोरणारा कृमि व दूध चोरणारा बगळा होतो २२. तेल चोरणारा तैलपायी होतो; मध चोरणारा मधुमक्षिका होतो; अपूप चोरणारा मुंगी होतो २३; हविष्यान्न चोरणारा पाल होतो; आसव चोरणारा तित्तिरि होतो २४; लोखंड चोरणारा कावळा होतो; कांस्यपात्र चोरणारा हारीत पक्षी होतो; रौप्यपात्र चोरणारा कबूतर होतो २५; सुवर्णपात्र चोरणारा कृमि होतो; रेशीम चोरणारा चक्रवाक होतो २६; रेशमी वस्त्र चोरणारा रेशमाचा किडा होतो; पैठणी चोरणारा शार्ङ्ग पक्षी होतो; कपडा चोरणारा राघू होतो २७; लोकरीचें अथवा रेशमी वस्त्र चोरणारा अस्वल होतो; कापसाचें वस्त्र चोरणारा क्रौंच होतो; अग्नि चोरणारा बगळा व गर्दभ होतो २८; रंग व पालेभाजी चोरणारा मयूर होतो; रंगीत वस्त्र चोरणारा जिवंजीवक होतो २९; सुगंध चोरणारा चिचुंद्री होतो; वस्त्र चोरणारा ससा होतो; फळें चोरणारा खंजपक्षी होतो; काष्ठ चोरणारा काष्ठकीटक होतो ३०; फुलें चोरणारा दरिद्री होतो; वाहन चोरणारा पांगळा होतो व शाकहारी हारीत पक्षी होतो. उदक चोरणारा चातकपक्षी होतो ३१. भूमीचा अपहार करणारा पुरुष रौरवादि नरक भोगिल्यानंतर तृण, गुल्म, लता, वल्ली व कदली अनुक्रमें होऊन ३२ पाप नाहींसें झालें असतां मनुष्य होतो. बैलाचे आंड कापणारा पुरुष पंढ होतो ३३; बैल चोरणारा एकवीस जन्म पंढ बनतो आणि नंतर कृमि, कीटक, पतंग, पक्षी, जलचर प्राणी ३४ व बैल होऊन चंडाळ, पुल्कस इत्यादि निंद्य योनींत तो जन्मास येऊन पंगु, अंध, बधिर, कुष्टी व क्षयरोगी होतो ३५. त्याच-

विद्यापहारिणां चैव निष्क्रयध्वंसिनां गुरोः ३७ जायामन्यस्य पारक्यां पुरुषः प्रतिपादयेत्। प्राप्नोति षण्ढतां मूढो यातनाभ्यः परिच्युतः ३८ यः करोति नरो होममसमिद्धे हुताशने। सोऽजीर्णधनदुःखार्तो मन्दाग्निरभिजायते ३९ परनिन्दा कृतघ्नत्वं परमर्मापघट्टनम्। नैष्ठुर्यं निर्घृणत्वं च परदारोपसेवनम् ४० परस्वहरणाशा च देवतानां च कुत्सनम्। निकृत्या वञ्चनान्नृणां कार्पण्यं च नृणां वधः ४१ यानि च प्रतिषिद्धानि तद्वृत्तिं च प्रशंसताम्। उपलक्षणानि जानीयान्मुक्तानां नरकादनु ४२ दयाभूतेषु सद्वादः परलोकं प्रतिक्रिया। सत्या भूतहिता चोक्तिर्वेदप्रामाण्यदर्शनम् ४३ गुरुदेवर्षिसिद्धर्षिपूजनं साधुसंगमः। सत्क्रियाभ्यसनं मैत्री चैतद्बुध्येत पण्डितः ४४ अन्यानि चैव सद्धर्मक्रियाभूतानि यानि च। स्वर्गच्युतानां लिङ्गानि पुरुषाणामपापिनाम् ४५ एतदुद्देशतो राजन्भवतः कथितं मया स्वकर्मफलभोक्तॄणां पुण्यानां पापिनां तथा ४६ तदेह्यन्यत्र गच्छामो दृष्टं सर्वं त्वयाधुना। त्वया च दृष्टो नरकस्तदेह्यन्यत्र गम्यताम् ४७ पुत्र उवाच। ततस्तमग्रतः कृत्वा स राजा गन्तुमुद्यतः। ततश्च सर्वैरुत्क्रुष्टं यातनास्थायिभिर्नृभिः ४८ प्रसादं कुरु भूपेति तिष्ठ तावन्मुहूर्तकम्। त्वदङ्गसंगी पवनो मनो ह्लादयते हि नः ४९ परितापं च गात्रेषु पीडां बाधां च कृत्स्नशः। अपहन्ति नरव्याघ्र कृपां कुरु महीपते ५० एतच्छ्रुत्वा वचस्तेषां तं याम्यं पुरुषं ततः।

प्रमाणें, मुखरोग, नेत्ररोग व गुदरोग त्याला होतात. फेपरें येऊं लागतें व नंतर शूद्र योनि प्राप्त होते ३६. धेनु, सुवर्ण इत्यादिकांचा अपहार करणाऱ्यांना, विद्या चोरणारांना व गुरूला दक्षिणा न देणाऱ्यांना अशीच शिक्षा होत असते ३७. परस्त्रीसेवन करणारा मूढ यातना भोगिल्यानंतर षंढ होतो ३८. ज्वालारहित अग्नीमध्यें होम करणारा अजीर्णदुःखानें व अग्निमांद्यानें पीडित होतो ३९. परनिंदा, कृतघ्नता, दुसऱ्याचें मर्म उघडकीस आणणें, निष्ठुरता, निर्दयपणा, परस्त्रीसेवन ४०, परद्रव्याभिलाष, देवनिंदा, कपटानें लोकांची फसवणूक, कृपणता, मनुष्यवध ४१ व इतरही निषिद्ध कर्में करणाऱ्या किंवा तीं कर्में करणाऱ्यांची प्रशंसा करणाऱ्या पुरुषांना नरकानंतर ह्याप्रमाणें जन्म येऊन दुःख प्राप्त होत असतें असें समजावें ४२. भूतदया, सद्वचन, पारलौकिककर्म, सत्य व लोकहितावह भाषण, वेदप्रामाण्यदर्शन ४३, गुरु, देव, ऋषि, सिद्ध व मुनि ह्यांचें पूजन, साधुसमागम, सत्कर्माभ्यास व मैत्री हीं स्वर्गभ्रष्ट निष्पाप पुरुषांचीं चिन्हें विचारी पुरुषानें जाणावीं ४४; आणि सद्धर्मकर्मविषयक इतरही चिन्हें त्यानें समजावीं ४५. हे राजा, स्वकर्मफल भोगणाऱ्या पुण्यवान् व पापी पुरुषांचें हें वृत्त मीं तुला कथन केलें आहे ४६. तूं सर्व पाहिलें आहेस; आतां दुसरीकडे जाऊं. तूं नरक पाहिला आहेस. तस्मात् इकडे ये; दुसरीकडे जाऊं ४७. पुत्र ह्मणतोः—तदनंतर त्या दूताला पुढें करून तो राजा निघाला असतां यातना भोगणारे सर्व मानव ओरडून ह्मणाले ४८" हे राजा, कृपा करून क्षणभर थांब. तुझ्या शरीरावरून येणारा वारा आमच्या मनाला आल्हाद देत आहे ४९; आणि आमच्या शरीराचा दाह, पीडा व बाधा सर्वस्वीं नष्ट करीत आहे. वास्तव,

पप्रच्छ कथमेतेषामाह्लादो मयि तिष्ठति । ६१ किं मया कर्म तत्पुण्यं मर्त्यलोके महत्कृतम्। आह्लाददायिनी व्युष्टिर्यस्येयं तदुदीरय ६२ याम्य उवाच ॥ पितृदेवातिथिप्रेष्यशिष्टेनान्नेन ते ततः । पुष्टिमभ्यागता यस्मात्तद्गतं च मनो यतः ६३ ततस्त्वद्गात्रसंसर्गी पवनो ह्लाददायकः । पापकर्मकृतो राजन्यातना न प्रबाधते ६४ अश्वमेधादयो यज्ञास्त्वयेष्टा विधिवद्यतः । ततस्त्वद्दर्शनाद्याम्या यन्त्रशस्त्राग्निवायसाः ६५ पीडनच्छेददाहादिमहादुःखस्य हेतवः । मृदुत्वमागता राजंस्तेजसोपहतास्तव ६६ राजोवाच ॥ न स्वर्गे ब्रह्मलोके वा तत्सुखं प्राप्यते नरैः । यदार्त्तजन्तुनिर्वाणदानोत्थमिति मे मतिः ६७ यदि मत्सन्निधावेतान्यातना न प्रबाधते । ततो भद्रमुखात्राहं स्थास्ये स्थाणुरिवाचलः ६८ यमपुरुष उवाच ॥ एहि राजेन्द्र गच्छामि निजपुण्यसमार्जितान् । भुंक्ष्व भोगानमुं भुज्यन्तु यातनाः पापकर्मिणः ६९ राजोवाच ॥ तस्मात्तावद्यास्यामि यावदेते सदुःखिताः । मत्सन्निधानात्सुखिनो भवन्ति नरकौकसः ६० धिक्तस्य जीवितं पुंसः शरणार्थिनमागतम् । यो नार्त्तमनुगृह्णाति वैरिपक्षमपि ध्रुवम् ६१ यज्ञदानतपांसीह परत्र च न भूतये । भवन्ति तस्य यस्यार्त्तपरित्राणे न मानसम् ६२ नरस्य यस्य कठिनं मनो बालातुरादिषु । वृद्धेषु च न तं मन्ये मानुषं राक्षसो हि सः ६३ एषां मत्सन्निकर्षात्तु

---

हे पुरुषश्रेष्ठ राजा, कृपा कर " ६०. हें त्याचें भाषण ऐकून राजा त्या यमदूताला ह्मणाला "मी येथें असल्यानें यांना सुख कसें होत आहे? ६१ ज्याचें हें आल्हादकारक फल आहे असें मर्त्यलोकीं मीं कोणतें मोठें पुण्य केलें होतें तें सांग ६२. यमदूत ह्मणतो " पितर, देव, अतिथि व दास ह्यांना देऊन अवशिष्ट राहिलेल्या अन्नानें ज्याअर्थी तुझें शरीर पुष्ट झालें आहे व ज्याअर्थी तुझें मन त्यांच्याकडे असे ६३ त्याअर्थी तुझ्या शरीरावरुन जाणारा वारा, हे राजा, प्राण्यांना सुखदायक होत आहे व त्यानें त्यांना यातना होत नाहींत ६४. तूं ज्याअर्थी यथाविधि अश्वमेधादि याग केले आहेस त्याअर्थी तुझ्या दर्शनामुळें पीडा, छेद, दाह इत्यादि महादुःखाला कारणीभूत होणारे यमलोकींतील पक्षी, यंत्रें, शस्त्रें व अग्नि मृदु झाले आहेत. कारण, हे राजा, तुझ्या तेजानें त्यांचें सामर्थ्य कमी झालें आहे ६५, ६६. राजा ह्मणतोः—दुःखित प्राण्यांला दुःखमुक्त करण्यानें प्राप्त होणारें सुख स्वर्गांत अथवा ब्रह्मलोकींही पुरुषाला मिळत नाहीं असें मला वाटतें ६७. हे भद्रमुखा, माझे संनिध जर ह्यांना पीडा होत नाहीं तर मी स्थाणूप्रमाणें येथेंच अचल राहीन ६८. यमदूत ह्मणतोः—हे राजेंद्रा, चल, मी निघालों; स्वपुण्यानें मिळविलेल्या भोगांचा तूं उपभोग घे; व ह्या पाप्यांना यातना भोगूं दे ६९. राजा ह्मणतोः—हे नरकवासी अतिदुःखी प्राणी माझ्या सान्निध्यानें सुखी होत आहेत तोंपर्यंत मी जाणार नाहीं ६०. शत्रुपक्षाकडीलही आर्त होऊन शरण आलेल्यावर जो अनुग्रह करित नाहीं त्या पुरुषाच्या जीविताला निःसंशय धिक्कार असो ६१. आर्तत्राणाकडे ज्याचें मन नाहीं त्याला यज्ञ, दान व तप इहलोकीं अथवा परलोकीं कल्याणकारक होत नाहीं ६२. बाल, वृद्ध, आतुर इत्यादिकांविषयीं ज्याचें मन कठिण राहतें त्याला मी मनुष्य समजत नाहीं; तो राक्षस होय ६३. हे भद्रमुखा, माझ्या सान्निध्यामुळें अग्नि-

त्रिदशाधिप । मुच्यन्ते तेन नरकात्पापिनो यातना गताः ७७ इन्द्र उवाच । एवमूर्ध्वतरं स्थानं त्वया प्राप्तं महीपते । एतांस्तु नरकात्पश्य विमुक्तान्पापकर्मिणः ७८ पुत्र उवाच । ततोऽपतत्पुष्पवृष्टिस्तस्योपरि महीपतेः । विमानं चाधिरोप्यैनं स्वर्लोकमनयद्धरिः ७९ अहं चान्ये च ये तत्र यातनाभ्यः परिच्युताः । स्वकर्मफलनिर्दिष्टं ततो योन्यन्तरं गताः ८० एवमेते समाख्याता नरका द्विजसत्तम । येन येन च पापेन यां यां योनिमुपैति वै ८१ तत्तत्सर्वं समाख्यातं यथा दृष्टं मया पुरा । पुराद्भवजं ज्ञानमवाप्य कथितं तव । अतःपरं महाभाग किमन्यत्कथयामि ते ८२ (१०९९) इति श्रीमार्कण्डेयपुराणे पितापुत्रसंवादे नरकस्योद्धारवर्णनं नाम पंचदशोऽध्यायः ॥ १५ ॥

पितो उवाच ॥ कथितं मे त्वया वत्स संसारस्याव्यवस्थितम् । स्वरूपमपि देहस्य घटीयंत्रवदव्ययम् १ तदेवमेतदखिलं ममावगतमीदृशम् । किं मया वद कर्तव्यमेवमस्मिन्व्यवस्थिते २ पुत्र उवाच । यदि मद्वचनं तात श्रद्धास्यविशंकितः । तत्परित्यज्य गार्हस्थ्यं वानप्रस्थमना भव ३ तमनुष्ठाय विधिवद्विहायाग्निपरिग्रहम् । आत्मन्यात्मानमाधाय निर्द्वन्द्वो निष्परिग्रहः ४ एकान्तशीलो वश्यात्मा भव भिक्षुरतन्द्रितः । तत्र योगपरो भूत्वा बाह्यस्पर्शविवर्जितः ५ ततः प्राप्स्यसि तं योगं दुःखसंयोगभेषजम् । मुक्तिहेतुमनौपम्यमनाख्ये-

समागमानें इच्छा तरी फशी होईल ? ७६. तस्मात्, हे स्वर्गाधिपते, माझें जें पुण्य असेल त्याच्या योगानें यातना भोगीत असलेले हे प्राणी नरकांतून मुक्त होऊं देत ७७. इंद्र ह्मणतोः—हे भूपते, ह्याप्रमाणें तुला अधिक उच्च स्थान प्राप्त झालें आहे. नरकांतून सुटलेल्या ह्या पाप्यांना पहा ७८. पुत्र ह्मणतोः—नंतर ह्या भूपतीवर पुष्पवृष्टि झाली आणि त्याला विमानांत बसवून इंद्रानें स्वर्गांत नेलें ७९. मी व यातनांपासून सुटलेले जे इतर तेथें होते ते निर्दिष्ट केलेल्या स्वकर्माप्रमाणें इतर योनींमध्यें गेले ८०. हे द्विजश्रेष्ठ, ह्याप्रमाणें हे नरक कथन केले आणि कोणत्या पापानें कोणती योनि प्राप्त होते ८१ हेंही सर्व मीं पूर्वी अनुभविल्याप्रमाणें सांगितलें. सारांश, पूर्वानुभवजन्य ज्ञान मिळाल्यामुळें मीं तुला कथन केलें आहे. हे महाशय, आतां मी आपणांला काय कथन करूं? ८२. (१०९९) ह्याप्रमाणें श्रीमार्कंडेयपुराणांतर्गत पितापुत्रसंवादांतील नरकस्योद्धारवर्णननामक पंधरावा अध्याय समाप्त झाला ॥ १५ ॥

पिता ह्मणतोः—हे वत्सा, तूं मला संसाराचें व रहाटगाडग्याप्रमाणें अक्षय्य असलेलें देहाचें व्यवस्थित स्वरूप कथन केलें आहेस १. ह्यामुळें अशा प्रकारचें हें सर्व मला अवगत झालें आहे. आतां अशी स्थिति असतांना मी काय करूं तें सांग २. पुत्र ह्मणतोः—हे तात, माझ्या सांगण्यावर तुझा निःसंशय विश्वास असल्यास गार्हस्थ्य सोडून वानप्रस्थ होण्याचें मनांत आण ३. त्याचें अवलंबन करून विधीनें अग्नित्याग कर आणि आत्म्याचेच ठिकाणीं चित्त ठेवून शीतोष्णादि द्वंद्वांची पर्वा न करितां व कसलाही स्वीकार न करितां ४ एकांतशील, जितेंद्रिय व दक्ष असा भिक्षु हो व त्या आश्रमांत योगनिष्ठ होऊन शब्दादि बाह्य विषयांचा त्याग कर ५. ह्मणजे दुःखाचें

सप्ताग्निपरितापजम् । तथोग्रगन्धजं वापि दुःखं नरकसंभवम् ६४ क्षुत्पिपासोद्भवं दुःखं यच्च मूर्च्छाप्रदं महत् । विनाशमेति तद्भद्र मन्ये स्वर्गसुखात्परम् ६५ प्राप्स्यन्ते ते यदि सुखं बहवो दुःखिते मयि । किं वा प्राप्तं मया न स्यात्तस्मात्त्वं वद मा चिरम् ६६ याम्य उवाच । एष धर्मश्च शक्रश्च त्वां नेतुं समुपागतौ । अवश्यमस्माद्गन्तव्यं तस्मात्पार्थिव गम्यताम् ६७ धर्म उवाच । नयामि त्वामहं स्वर्गं त्वया सम्यगुपासितः । विमानमेतदारुह्य मा विलम्बस्व गम्यताम् ६८ राजोवाच ॥ नरके मानवा धर्म पीड्यमानाः सहस्रशः । त्राहीत्यमी च क्रन्दन्ति मामतो न व्रजाम्यहम् ६९ इन्द्र उवाच ॥ कर्मणा नरकप्राप्तिरेषां पापिष्ठकर्मणाम् । स्वर्गस्त्वयापि गन्तव्यो नृप पुण्येन कर्मणा ७० राजोवाच ॥ यदि जानासि धर्म त्वं त्वं वा देव शतक्रतो । मम यावत्प्रमाणं तु शुभं तद्वक्तुमर्हथ ७१ धर्म उवाच ॥ अब्बिन्दवो यथाम्भोधौ यथा वा दिवि तारकाः । यथा वा वर्षतो धारा गंगायां सिकता यथा ७२ असंख्येया महाराज यथा योनिषु जन्तवः । तथा तवापि पुण्यस्य संख्या नैवोपपद्यते ७३ अनुकम्पामिमामद्य नारकेष्विह कुर्वता । तदेव शतसाहस्रसंख्यानीतं त्वया नृप ७४ तद्गच्छ त्वं नृपश्रेष्ठ तल्लोकममराज्यम् । एते तु नरके पापं क्षपयन्तु स्वकर्मजम् ७५ राजोवाच ॥ कथं स्पृहां करिष्यन्ति मत्संपर्काय मानवाः । यदि मत्संनिधावेषामुत्कर्षो नोपपद्यते ७६ तस्माद्यत्सुकृतं किंचिन्ममास्ति

---

दाह, उग्र गंध, नरक, क्षुधा व तृषा ह्यांपासून उत्पन्न होणारें दुःख आणि त्याचप्रमाणे मूर्च्छा आणणारें मोठें दुःख जर ह्यांचें नष्ट होत आहे तर स्वर्गसुखापेक्षांही येथें राहणें मला उत्कृष्ट वाटत आहे ६४,६५. मी एक दुःखी असतांना, जर त्या पुष्कळांना सुख होत आहे तर मला काय बरें मिळालें नाहीं हें तूं सत्वर सांग ६६. यमदूत म्हणतोः— हा धर्म व इंद्र असे तुला नेण्यास आले आहेत. ह्यास्तव, येथून अवश्य गेलें पाहिजे. तस्मात्, हे राजा, तूं चल ६७. धर्म म्हणतोः—मी तुला स्वर्गास नेतों. कारण, चांगल्या रीतीनें तूं तो संपादन केला आहेस. ह्यास्तव, ह्या विमानांत बसून सत्वर चल ६८. राजा म्हणतोः— हे धर्मा, नरकामध्यें हे हजारों दुःख भोगणारे प्राणी मला उद्देशून "त्राहि त्राहि" असें ओरडत आहेत. ह्यास्तव, मी येत नाहीं ६९. इंद्र म्हणतोः— हे राजा, ह्या अत्यंत दुष्कर्मी लोकांना त्यांच्या कर्मानेंच नरकप्राप्ति झाली असून तुला पुण्यकर्मामुळें स्वर्गास जावयाचें आहे ७०. राजा म्हणतोः— हे धर्मा, जर तुला समजत असेल, अथवा हे देवेंद्रा, जर तूं जाणत असशील तर माझें पुण्य किती आहे हें तुम्ही सांगा ७१. धर्म म्हणतोः—समुद्रांतील उदकबिंदु, आकाशांतील तारका, पर्जन्याच्या धारा, गंगेंतील वालुकाकण ७२, अथवा अनेक योनींतील प्राणी ह्यांची गणना ज्याप्रमाणें अशक्य आहे त्याचप्रमाणें, हे महाराज, तुझ्या पुण्याची गणना शक्य नाहीं ७३. शिवाय, हे राजा, आज नरकवासी प्राण्यांवर तूं ही कृपा करीत असल्यामुळें तेंच पुण्य तूं लक्षपट वाढविलें आहेस ७४. तस्मात्, हे नृपश्रेष्ठ, स्वर्गोपभोगार्थ तूं चल; ह्यांना नरकामध्यें आपल्या कर्मजन्य पापफलाचा उपभोग घेऊं दे ७५. राजा म्हणतोः—माझे संनिध जर ह्यांचा उत्कर्ष होणें शक्य नसेल तर लोकांना माझ्या

त्रिदशाधिप । मुच्यन्ते तेन नरकात्पापिनो यातना गताः ७७ इन्द्र उवाच । एवमूर्ध्वतरं स्थानं त्वया प्राप्तं महीपते । एतांस्तु नरकात्पश्य विमुक्तान्पापकर्मिणः ७८ पुत्र उवाच । ततोऽपतत्पुष्पवृष्टिस्तस्योपरि महीपतेः । विमाने चाधिरोप्यैनं स्वर्लोकमनयद्धरिः ७९ अहं चान्ये च ये तत्र यातनाभ्यः परिच्युताः । स्वकर्मफलनिर्दिष्टं ततो योन्यन्तरं गताः ८० एवमेते समाख्याता नरका द्विजसत्तम । येन येन च पापेन यां यां योनिमुपैति वै ८१ तत्तत्सर्वं समाख्यातं यथा दृष्टं मया पुरा । पुरावृत्तवशं ज्ञानमवाप्य कथितं तव । अतःपरं महाभाग किमन्यत्कथयामि ते ८२ (१०९९) इति श्रीमार्कण्डेयपुराणे पितापुत्रसंवादे नरकस्योद्धारवर्णनं नाम पंचदशोऽध्यायः ॥ १५ ॥

पितोवाच ॥ कथितं मे त्वया वत्स संसारस्य व्यवस्थितम् । स्वरूपमपि देहस्य घटीयन्त्रवदव्ययम् १ तदेवमेतदखिलं ममावगतमीदृशम् । किं मया वद कर्तव्यमेवमस्मिन्व्यवस्थिते २ पुत्र उवाच । यदि मद्वचनं तात श्रद्धास्यविशंकितः । तत्परित्यज्य गार्हस्थ्यं वानप्रस्थमना भव ३ तमनुष्ठाय विधिवद्विहायाग्निपरिग्रहम् । आत्मन्यात्मानमाधाय निर्द्वन्द्वो निष्परिग्रहः ४ एकान्तशीलो वश्यात्मा भव भिक्षुरतन्द्रितः । तत्र योगपरो भूत्वा बाह्यस्पर्शविवर्जितः ५ ततः प्राप्स्यसि तं योगं दुःखसंयोगभेषजम् । मुक्तिहेतुमनौपम्यमनाख्ये-

---

समागमाची इच्छा तरी कशी होईल ? ७६. तस्मात्, हे स्वर्गाधिपते, माझें जें पुण्य असेल त्याच्या योगानें यातना भोगीत असलेले हे प्राणी नरकांतून मुक्त होऊं देत ७७. इंद्र ह्मणतो:—हे भूपते, ह्याप्रमाणें तुला अधिक उच्च स्थान प्राप्त झालें आहे. नरकांतून सुटलेल्या ह्या पाप्यांना पहा ७८. पुत्र ह्मणतो:—नंतर त्या भूपतीवर पुष्पवृष्टि झाली आणि त्याला विमानांत बसवून इंद्रानें स्वर्गात नेलें ७९. मी व यातनांपासून सुटलेले जे इतर तेथें होते ते निर्दिष्ट केलेल्या स्वकर्माप्रमाणें इतर योनींमध्यें गेले ८०. हे द्विजश्रेष्ठ, ह्याप्रमाणें हे नरक कथन केले आणि कोणत्या पापानें कोणती योनि प्राप्त होते ८१ हेंही सर्व मी पूर्वी अनुभविल्याप्रमाणें सांगितलें. सारांश, पूर्वानुभवजन्य ज्ञान मिळाल्यामुळें मी तुला कथन केलें आहे. हे महाशय, आतां मी आपणांला काय कथन करूं ? ८२. (१०९९) ह्याप्रमाणें श्रीमार्कंडेयपुराणांतर्गत पितापुत्रसंवादांतील नरकस्योद्धारवर्णननामक पंधराचा अध्याय समाप्त झाला ॥ १५ ॥

पिता ह्मणतो:—हे वत्सा, तूं मला संसाराचें व रहाटगाडग्याप्रमाणें अक्षय्य असलेल्या देहाचें व्यवस्थित स्वरूप कथन केलें आहेस १. ह्यामुळें अशा प्रकारचें हें सर्व मला अवगत झालें आहे. आतां अशी स्थिति असतांना मी काय करूं तें सांग २. पुत्र ह्मणतो:—हे तात, माझ्या सांगण्यावर तुझा निःसंशय विश्वास असल्यास गार्हस्थ्य सोडून वानप्रस्थ होण्याचें मनांत आण ३. त्याचें अवलंबन करून विधीनें अग्नित्याग कर आणि आत्म्याचेच ठिकाणीं चित्त ठेवून शीतोष्णादि द्वंद्वांची पर्वा न करितां व कसलाही स्वीकार न करितां ४ एकांतशील, जितेंद्रिय व दक्ष असा भिक्षु हो व त्या आश्रमांत योगनिष्ठ होऊन शब्दादि बाह्य विषयांचा त्याग कर ५. ह्मणजे दुःखाचें

यमसंज्ञितम् ६ तत्संयोगान्न ते योगो भूयो भूतैर्भविष्यति । पितोवाच ॥ वत्स योगं ममाचक्ष्व मुक्तिहेतुमतः परम् ७ येन भूतैः पुनर्भूतो नैवं दुःखमवाप्नुयाम् । यत्रासक्तिपरस्यात्मा मम संसारबंधनैः ८ नैति योगमयोगोपि तं योगमधुना वद । संसारादित्यतापार्तिविशुष्यद्देहमानसम् ९ ब्रह्मज्ञानाम्बुशीतेन सिंच मां वाक्यवारिणा । अविद्याकृष्णसर्पेण दष्टं तद्विषपीडितम् १० स्ववाक्यामृतदानेन मां जीवय पुनर्मृतम् । पुत्रदारगृहक्षेत्रममत्वनिगडार्दितम् ११ मां मोचयेष्टसद्भावविज्ञानोद्घाटनैश्चिरम् । पुत्र उवाच ॥ शृणु तात यथा योगो दत्तात्रेयेण धीमता १२ अलर्काय पुरा प्रोक्तः सम्यक्पृष्टेन विस्तरात् । पितोवाच ॥ दत्तात्रेयः सुतः कस्य कथं वा योगमुक्तवान् १३ कश्चालर्को महाभागो यो योगं परिपृष्टवान् । पुत्र उवाच ॥ कौशिको ब्राह्मणः कश्चित्प्रतिष्ठानेऽभवत्पुरे १४ सोन्यजन्मकृतैः पापैः कुष्टरोगातुरोऽभवत् । तं तथा व्याधितं भार्या पतिं देवमिवार्चयत् १५ पादाभ्यंगांगसंवाहस्नानाच्छादनभोजनैः । श्लेष्ममूत्रपुरीषासृक्प्रवाहक्षालनेन च १६ रहस्येवोपचारेण प्रियसंभाषणेन च । सततं पूज्यमानोपि तयातीव विनीतया १७ अतितीव्रप्रकोपत्वान्निर्भर्त्सयति दारुणः । तथापि प्रणता साध्वी

---

औषध व मुक्तीचें कारण असा अनुपम, अनिर्वचनीय व संसाररहित योग तुला प्राप्त होईल ६; व तो प्राप्त झाल्यावर तुला पुनरपि पंचमहाभूतात्मक देह प्राप्त होणार नाहीं. पिता ह्मणतोः—हे वत्सा ह्यानंतर मुक्तिदायक योग तूं मला सांग ७. ह्मणजे भूतांच्या योगानें पुनरपि जन्मास येऊन मला असें दुःख होणार नाहीं. ज्याविषयीं तत्पर राहिल्यानें माझ्या आत्म्याला संसारबंधनें ८ प्राप्त होणार नाहींत तो योग सांप्रत तूं मला सांग. तो वस्तुतः अयोगच आहे. संसारसूर्याच्या तापानें ज्याचें शरीर व मन दग्ध होत आहे ९; अशा मला ब्रह्मज्ञानरूप उदकानें थंड झालेल्या उपदेशरूप-जलानें स्नान घाल. अज्ञानरूप भयंकर सर्पाचा दंश होऊन त्याच्या विषानें पीडित झाल्यामुळें १० मरून पडलेल्या मला तूं स्वोपदेशरूप अमृत देऊन जिवंत कर. सारांश, पुत्र, स्त्री, गृह व क्षेत्र एतद्विषयक ममत्वरूप शृंखलेनें चिरकाल पीडित झालेल्या मला आत्मज्ञानदायक वाक्यानें मुक्त कर. पुत्र ह्मणतोः— हे तात; विवेकी दत्तात्रेयानें ज्याप्रमाणें योग ११;१२, अलर्काला, त्याचा पूर्वी प्रश्न झाल्यामुळें सविस्तर कथन केला त्याप्रमाणें तूं ऐक. पिता ह्मणतोः—दत्तात्रेय हा कोणाचा मुलगा ? त्याला ह्यानें योग कसा सांगितला ? १३ आणि योग विचारणारा महाशय अलर्क कोण ? पुत्र ह्मणतोः—प्रतिष्ठान नगरांत कोणीएक कौशिक ब्राह्मण होता १४. तो पूर्वजन्मार्जित पापांमुळें कुष्टरोगानें पीडित झाला होता. परंतु, त्याप्रमाणें त्या व्याधिग्रस्त झालेल्या पतीचें अर्चन त्याची भार्या देवाप्रमाणें करीत असे १५. पायाला तूप लावणें, आंग चेपणें, स्नान घालणें, वस्त्र नेसविणें, अन्न वाढणें, कफाचे बडके, मूत्र, विष्टा व रक्त ह्यांचा स्राव धुवून काढणें १६, एकांतांतील सेवा करणें व प्रिय भाषण करणें ह्यांच्या योगानें ती नम्र भार्या जरी,त्याला सतत संतुष्ट ठेवण्याचा यत्न करीत असे १७ तरी तो भयंकर ब्राह्मण कोप अतिशयच असल्यामुळें तिची निर्भर्त्सना करीत असे.

तममन्यत दैवतम् १८ तं तथाप्यतिबीभत्सं सर्वश्रेष्ठममन्यत । अचंक्रमणशीलोपि स कदाचिद्द्विजोत्तमः १९ प्राह भार्यां नयस्वेति त्वं मां तस्या निवेशनम् । या सा वेश्या मया दृष्टा राजमार्गे गृहे सता २० तां मे प्रापय धर्मज्ञे सैव मे हृदि वर्तते । दृष्टा सूर्योदये बाला रात्रिश्चेयमुपागता २१ दर्शनानन्तरं सा मे हृदयान्नापसर्पति । यदि सा चारुसर्वांगी पीनश्रोणिपयोधरा २२ नोपगूहति तन्वंगी तन्मां द्रक्ष्यसि वै मृतम् । वामः कामो मनुष्याणां बहुभिः प्राप्य चेतसः २३ समाशक्तिश्च गमने संकुलं प्रतिभाति मे । तत्तदा वचनं श्रुत्वा भर्तुः कामातुरस्य सा २४ तपस्वी व्याकुला जाता महाभागा पतिव्रता । गाढं परिकरं बद्ध्वा शुल्कमादाय चाधिकम् २५ स्कन्धे भर्तारमारोप्य जगाम मृदुगामिनी । निशि मेघावृते व्योम्नि चलद्विद्युच्च दृश्यते २६ राजमार्गे प्रियं भर्तुश्चिकीर्षन्ती द्विजांगना पथि शूले तदा प्रोतमचोरं चोरशंकया २७ माण्डव्यमतिदुःखार्तमन्धकारे च स द्विजः पत्नीस्कन्धसमारूढश्चालयामास कौशिकः २८ वामांगेनाथ संक्रुद्धो माण्डव्यस्तमुवाच ह । येनाहमेवमत्यर्थं दुःखितश्चालितो वृथा २९ इत्थं कष्टमनुप्राप्तः स पापात्मा नराधमः । सूर्योदयेऽवशः प्राणैर्वियोक्ष्यति न संशयः ३० भास्करालोकनादेव स विनाशमवाप्स्यति । तस्य भार्या ततः श्रुत्वा तं शापम-

तथापि ती नम्र साध्वी त्याला देव मानीत असे १८ आणि तो जरी अति बीभत्स होता तरी त्याला ती सर्वांत श्रेष्ठ समजत असे. चालतांही न येणारा तो द्विजश्रेष्ठ एकदां १९ भार्येला ह्मणाला " तूं मला तिच्या घरीं ने. मी घरांत असतांना राजमार्गामध्यें जी वेश्या मीं पाहिली २० तिच्याकडे, हे धर्मज्ञे, तूं मला घेऊन जा. तीच माझ्या मनांत खेळून राहिली आहे. सूर्योदयसमयीं ती बाला माझ्या दृष्टीं पडली आहे व आतां रात्र झाली आहे २१. दृष्टीं पडल्यापासून ती माझ्या मनांतून जातच नाहीं. फार कशाला ! स्थूल श्रोणितट व स्तन ह्यांनीं युक्त असलेली ती सर्वांगसुंदरी २२ कृशोदरी जर मला आलिंगन न देईल तर तूं मला मृत पाहशील. मनुष्याच्या मनामध्यें अनेक कारणांनीं उत्पन्न झालेली विषयवासना अनिवार असते २३; आणि मला तर चालतां येत नाहीं. ह्यास्तव, हें संकटच मला ओढवलेलें वाटत आहे. " हें कामातुर पतीचें भाषण ऐकून ती २४ त्याची महाभाग्यवती पतिव्रता पत्नी हळहळली. परंतु, घट्ट कास घालून तिनें बरेंचसें द्रव्य बरोबर घेतलें २५ आणि पतीला खांद्यावर बसवून ती हळू चालणारी ब्राह्मणस्त्री भर्त्याची मर्जी राखण्याकरितां राजमार्गानें रात्रीं निघाली. त्या वेळीं आकाश मेघाच्छादित झालें असून वीज चमकत होती, चोर ह्मणून मार्गावरच चोर नसलेल्या मांडव्य मुनीला सुळावर चढविलें असतांना त्या अतिदुःखाकुल मुनीला पत्नीच्या खांद्यावर बसलेल्या त्या कौशिक ब्राह्मणाच्या डाव्या अंगाचा धक्का लागला. तेव्हां मांडव्य अति क्रुद्ध होऊन ह्मणाला " अति दुःखी असलेल्या मला विनाकारण हलवून ज्यानें २६, २७, २८, २९ ह्याप्रमाणें कष्ट दिले तो पापी नराधम सूर्योदय होतांक्षणीं निरुपाय होऊन निःसंशय मरेल ३०. सारांश, सूर्यदर्शनाबरोबर

तिदारुणम् ३१ प्रोवाच व्यथिता भार्या नैवोदयमुपेष्यति । ततः सूर्योदयाभावादभवत्संतता निशा ३२ बहून्यहःप्रमाणानि ततो देवा भयं ययुः । निःस्वाध्यायवषट्कारं स्वधास्वाहाविवर्जितम् ३३ कथं नु खल्विदं सर्वं न गच्छेत्संक्षयं जगत् । अहोरात्रव्यवस्थाया विना मासर्तुसंक्षयः ३४ तत्संक्षयाच्च त्वयने ज्ञायेते दक्षिणोत्तरे ३५ विना चायनविज्ञानं कालः संवत्सरः कुतः । पतिव्रताया वचनान्नोद्गच्छति दिवाकरः ३६ सूर्योदयं विना नैव स्नानदानादिकाः क्रियाः । अग्नेर्विहरणं चैव क्रत्वभावश्च लक्ष्यते ३७ न कालेन विना चेष्टिर्न च यज्ञादिकाः क्रियाः । नश्यन्ति सर्वभूतानि तमोभूते चराचरे ३८ नैवाप्यायनमस्माकं विना होमेन जायते वयमाप्यायिता मर्त्यैर्यज्ञभागैर्यथोचितैः ३९ वृष्ट्यादिनानुगृह्णीमो मर्त्यान्सस्याभिवृद्धये । निष्पादितास्वौषधीषु मर्त्या यज्ञैर्यजन्ति नः ४० एवं वयं प्रयच्छामः कामान्यज्ञादिपूजिताः । अधो हि वर्षाम वयं मर्त्याश्चोर्ध्वं प्रवर्षिणः ४१ तोयवर्षेण हि वयं हविर्वर्षेण मानवाः । येऽस्माकं न प्रयच्छन्ति नित्यनैमित्तिकीः क्रियाः ४२ क्रतुभागं दुरात्मानः स्वयं चाश्नन्ति लोलुपाः । विनाशाय वयं तेषां तोयसूर्याग्निमारुतान् ४३ क्षितिं च संदूषयामः पापानामपकारिणाम् । दुष्टतोयादिदोषेण तेषां दुष्कृतकर्मणाम् ४४ उपसर्गाः प्रवर्तन्ते मरणाय सुदारुणाः । ये

---

त्याचा नाश होईल " तो अतिभयंकर शाप ऐकून त्याची भार्या ३१ दुःखित झाली आणि " सूर्योदय होणारच नाहीं " असें ह्मणाली. तदनंतर सूर्योदय न झाल्यामुळें रात्रच एकसारखी ३२, पुष्कळ दिवसांचा काल लोटेपर्यंत सुरू राहिली. असतां देव भ्याले आणि ह्मणाले " वेदाध्ययन, वषटकार, स्वधा व स्वाहा ह्यांनीं रहित झालेलें ३३ हें सर्व जगत कसें बरें नष्ट होणार नाहीं ! अहोरात्रव्यवस्था नसेल तर मास व ऋतु ह्यांचा क्षय होईल ३४; त्याच्या क्षयामुळें दक्षिणोत्तर अयनें समजणार नाहींत ३५. आयनज्ञानाशिवाय संवत्सररूप काल कळणार कसा ? पतिव्रतेच्या वचनानें सूर्योदय होत नाहीं ३६. सूर्योदयाशिवाय स्नानदानादि कर्मे, अग्निहोत्र व क्रतु होत नाहींत ३७. कालाशिवाय इष्टि व यज्ञादि कर्मे संभवनीय नाहींत व अशा रीतीनें चराचर अंधकारानें व्याप्त झाल्यास प्राणी जगणें शक्य नाहीं ३८. होमाशिवाय आमची तृप्ति होणार नाहीं; मनुष्यांनीं यथोचित यज्ञभागांनीं आह्मांला तृप्त केलें असतां ३९ धान्य वाढावें एतदर्थ आह्मी वृष्टिप्रभृतींच्या द्वारानें मनुष्यांवर अनुग्रह करीत असतों व धान्य निष्पन्न झाल्यावर मानव आह्मांला उद्देशून यज्ञ करीत असतात ४०. ह्याप्रमाणें यज्ञादिकांनीं आमचें पूजन झालें असतां आह्मी मनुष्यांचे मनोरथ परिपूर्ण करितों. आह्मी उदकाच्या द्वारानें अधोभागीं वृष्टि करणारे असून मानव हवीच्या द्वारानें ऊर्ध्वभागीं वृष्टि करणारे आहेत ४१,४२. जे आह्मांला उद्देशून नित्यनैमित्तिक कर्मे करीत नाहींत; अथवा जे दुरात्मे स्वतःच लुब्ध होऊन यज्ञभाग स्वतः भक्षण करीत असतात त्या अपकारी पाप्यांच्या नाशाकरितां आह्मी, उदक, सूर्यकिरणें, अग्नि, वायु व पृथ्वी दूषित करीत असतों; दुष्टजलादि दोषांमुळें त्या पाप्यांना ४३, ४४ मरण येण्याकरितां भयंकर

त्वस्मान्प्रीणयित्वा तु भुज्यन्ते येऽन्नमात्मना ४५ तेषां पुण्यतमाँल्लोकान्विनरामो महात्मनाम् । तदास्ति सर्वमेतद्धि न चोपायस्त्वयास्थितम् ४६ कथं तु दिनसर्गः स्यादन्योन्यमत्र-दन्दशाः । तेषामेव समेतानां यज्ञव्युच्छित्तिशंकिनाम् ४७ देवानां वचनं श्रुत्वा प्राह देवः प्रजापतिः । तेजः परं तेजसैव तपसा च तपस्तया ४८ प्रशाम्यत्यमरास्तस्माच्छृणुध्वं वचनं मम । पतिव्रताया माहात्म्यान्नोद्गच्छति दिवाकरः ४९ तस्य चानुदयाद्धानिर्मर्त्यानां भवतां यथा । तस्मात्पतिव्रतामत्रेरनसूयां तपस्विनीम् ५० प्रसादयत वै पत्नीं भानोरुदयकाम्यया । पुत्र उवाच ॥ तैः सा प्रसादिता गत्वा प्राहेष्टं वियतामिति ५१ अयाचन्त दिनं देवा भवत्विति यथा पुरा । अनसूयोवाच ॥ पतिव्रताया माहात्म्यं न हीयेत कथं त्विति ५२ संमान्यतां तथा साध्वीं तथा प्रेष्याम्यहं सुराः । यथा पुनरहोरात्रसंस्थानमुपजायते ५३ यथा च तस्याः स पतिर्न शापान्नाशमेष्यति । पुत्र उवाच ॥ एवमुक्त्वा सुरांस्तस्या गत्वा सा मन्दिरं शुभा ५४ उवाच कुशलं पृष्टा धर्मं भर्तुस्तथात्मनः । कच्चिन्नन्दसि कल्याणि स्वभर्तुः मुखदायिनी ५५ कच्चिच्चाखिलदेवेभ्यो मन्यसे ह्यधिकं पतिम् । भर्तुः शुश्रूषणादेव मया प्राप्तं महत्फलम् ५६ सर्वकामफलावाप्तिः पत्युः शुश्रूषणात्स्त्रियाः । पञ्चर्णानि मर्त्येन साध्वि देयानि सर्वदा ५७ तथात्मवर्णधर्मेण कर्तव्यो धनसंचयः । प्राप्तश्चार्थस्तथा

उपद्रव सुरू होतात. परंतु, जे आम्हांला तृप्त करून अवशिष्ट अन्न स्वतः भक्षण करीत असतात ४५ त्या महात्म्यांना अत्यंत पुण्यस्थानें आम्ही देतों. सारांश, हें आतां कांहीं एक चालणार नाहीं व ह्याला कांहीं उपायही नाहीं ४६. आतां दिवस उगवणार कसा ? " ह्याप्रमाणें देव परस्पर बोलूं लागले तेव्हां एकत्र जुळून यज्ञविच्छेदाची शंका घेणाऱ्या ४७ देवांचें भाषण ऐकून ब्रह्मदेव ह्मणाला " तेजानें उत्कृष्ट तेज व तपानें तप ४८ शांत होत असतें. तस्मात्, हे देवहो, तुह्मी माझें ह्मणणें ऐका. पतिव्रतेच्या सामर्थ्यामुळें सूर्य उगवत नाहीं ४९; व तो न उगवल्यामुळें मानवांची व तुमची हानि होत आहे. ह्यास्तव, अत्रिपत्नी जी तपस्विनी पतिव्रता अनसूया तिला सूर्योदयाकारितां तुह्मी प्रसन्न करून घ्या. पुत्र ह्मणतोः—त्या देवांनीं जाऊन तिला प्रसन्न केलें असतां " इष्ट वर मागा " ह्मणून ती ह्मणाली ५०, ५१. तेव्हां देवांनीं पूर्वीप्रमाणें हो हो ह्मणून दिवसाविषयीं याचना केली. तेव्हां अनसूया ह्मणाली "कांहीं केलें तरी पतिव्रतेचें माहात्म्य कमी होणार नाहीं ५२. त्या साध्वीला मान देऊन, हे देवहो, तिचा पति शापानें नाश न पावतां पुनरपि अहोरात्र व्यवस्था सुरू होईल असा मी यत्न करितें. पुत्र ह्मणतोः— ह्याप्रमाणें देवांना सांगून ती कल्याणी त्या ब्राह्मणीच्या घरीं गेली ५३, ५४ आणि भर्त्याविषयीं व स्वतःविषयीं कुशल प्रश्न झाल्यावर तो ह्मणाली "हे कल्याणि, स्वपतीला सुख देणारी तूं आनंदांत आहेसना ५५ ? सर्व देवांपेक्षां तूं पति अधीक मानीत असतेसना? पतिसेवेनेंच मला मोठें फल प्राप्त झालें ५६. स्त्रीचे सर्व मनोरथ पतिसेवेनेंच शेवटास जातात. हे साध्वि, मनुष्यानें पांच ऋणें सर्वदां दिलीं पाहिजेत ५७. त्याचप्रमाणें आपल्या वर्णधर्मानें त्यानें धनसंचय करावा;

पात्रे विनियोज्यो विधानतः ५८ सत्यार्जवतपोदानदयायुक्तो भवेत्सदा । क्रिया च शास्त्रनिर्दिष्टा रागद्वेषविवर्जिता ५९ कर्तव्याहरहः श्रद्धापुरस्कारेण शक्तितः । स्वजातिविहितानेवं लोकान्प्राप्नोति मानवः ६० क्लेशेन महता साध्वि प्राजापत्यादिकान्क्रमात् । स्त्रियश्चैवं समस्तस्य नरैर्दुःखार्जितस्य वै ६१ पुण्यस्यार्धापहारिण्यः पतिशुश्रूषयैव हि । नास्ति स्त्रीणां पृथग्यज्ञो न श्राद्धं नाप्युपोषितम् ६२ भर्तुः शुश्रूषयैवैता लोकानिष्टान्व्रजन्ति हि । तस्मात्साध्वि महाभागे पतिशुश्रूषणं प्रति । त्वया मतिः सदा कार्या यतो भर्ता परा गतिः ६३ यद्देवेभ्यो यच्च पित्रादिकेभ्यः कुर्याद्भर्ताभ्यर्चनं सत्क्रियां च । तस्यार्धं वै केवलानन्यचित्ता नारी भुंक्ते भर्तृशुश्रूषयैव ६४ पुत्र उवाच ॥ तस्यास्तद्वचनं श्रुत्वा प्रतिपज्य तदादरात् । प्रत्युवाचात्रिपत्नीं तामनसूयामिदं वचः ६५ धन्यास्म्यनुगृहीतास्मि दैवस्याप्यवलोकतः । यन्मे प्रकृतिकल्याणि श्रद्धां वर्धयसे पुनः ६६ जानाम्येतन्न नारीणां काचित्पतिसमा गतिः । तत्प्रीतिश्चोपकाराय इहलोके परत्र च ६७ पतिप्रसादादिह च प्रेत्य चैव यशस्विनी । नारी सुखमवाप्नोति नार्या भर्ता हि दैवतम् ६८ सा त्वं ब्रूहि महाभागे प्राप्ताया मम मन्दिरम् । आर्याया: किं नु कर्तव्यं मयार्येणापि वा शुभे ६९ अनसूयोवाच ॥ एते देवाः सहेन्द्रेण मामुपागम्य दुःखिताः । त्वद्वाक्यापास्तसत्कर्मदिननक्तनिरूपणाः ७० याचन्ते

व मिळालेल्या द्रव्याचा यथाविधि सत्पात्रीं विनियोग करावा ५८. सत्य, सरळपणा, तप, दान व दया ह्यांचें अवलंबन सर्वदा करावें; शास्त्रविहित कर्म रागद्वेषरहित व श्रद्धापुरःसर यथाविधि प्रत्यहीं करावें. ह्मणजे मानवाला स्वजातिविहित प्राजापत्यादि लोक मोठ्या कष्टानें अनुक्रमें प्राप्त होतात. पुरुषांनीं दुःखानें मिळविलेल्या सर्व पुण्याचा अर्धा अंश स्त्रिया पतिसेवेनेंच घेत असतात. स्त्रियांना वेगळा यज्ञ, श्राद्ध अथवा उपोषण नाहीं ५९, ६०, ६१, ६२. पतिसेवेनेंच त्यांना इष्ट लोक प्राप्त होतात. तस्मात्, हे महाभाग्यवती साध्वी, भर्ताच मुख्य गति असल्यामुळें भर्तृसेवेकडेच तुझें सर्वदा लक्ष्य असूंदे ६३. देवांना व पितरादिकांना उद्देशून पतीनें केलेलें सत्कर्म व पूजन त्याचें अर्धे फल केवळ पतिसेवेनेंच पतीशिवाय दुसऱ्याकडे लक्ष्य न देणाऱ्या स्त्रीला प्राप्त होत असतें ६४. पुत्र ह्मणतोः— तिचें तें भाषण ऐकून व आदरानें त्याला मान देऊन त्या अत्रिपत्नी अनसूयेला ती ब्राह्मणी ह्मणाली ६५ "हे कल्याणि, ज्याअर्थी तूं माझी श्रद्धा वृद्धिंगत करीत आहेस त्याअर्थी मी धन्य असून सर्वसाक्षी देवाचा माझ्यावर अनुग्रहच झाला आहे ६६. स्त्रियांना पतितुल्य आश्रय कोणताच नाहीं; व त्याचे ठिकाणीं प्रेम हेंच ऐहिक व पारलौकिक कल्याणाचें कारण आहे हें मी जाणून आहें ६७. पतीच्या प्रसादामुळें स्त्री इहलोकीं व परलोकीं यशस्विनी होऊन सुखी होते. कारण, भर्ता हेच स्त्रीचें दैवत होय ६८. हे महाभाग्यवति, हे कल्याणि, माझ्या घरीं आलेल्या आपलें मी अथवा पतींनीं काय कार्य करावें हें आपण मला सांगा ६९. अनसूया ह्मणतेः— तुझ्या वचनामुळें ज्यांचीं सत्कर्में व अहोरात्रगणना ह्यांचा अभाव झाला आहे असे हे

हर्निशासंस्थां यथावदविखण्डिताम् । अहं तदर्थमायाता शृणु चैतद्वचो मम ७१ दिनाभावात्समस्तानामभावो यागकर्मणाम् । तदभावात्सुराः पुष्टिं नोपयान्ति तपस्विनि ७२ अह्नश्चैव समुच्छेदादुच्छेदः सर्वकर्मणाम् । तदुच्छेदादनावृष्ट्या जगदुच्छेदमेष्यति ७३ तत्त्वमिच्छसि धैर्येण जगदुद्धर्तुमापदः । प्रसीद साध्वि लोकानां पूर्ववद्वर्ततां रविः ७४ ब्राह्मण्युवाच ॥ माण्डव्येन महाभागे शप्तो भर्ता ममेश्वरः । सूर्योदये विनाशं त्वं प्राप्स्यसीत्यतिमन्युना ७५ अनसूयोवाच । यदि ते रोचते भद्रे ततस्तद्वचनादहम् । करोमि पूर्ववद्देहं भर्तारं वचनात्तव ७६ मयापि सर्वथा स्त्रीणां माहात्म्यं वरवर्णिनि । पतिव्रतानामाराध्यमिति संमानयामि ते ७७ पुत्र उवाच ॥ तथेत्युक्ते तया सूर्यमाजुहाव तपस्विनी । अनसूयार्घ्यमुद्यम्य अर्घरात्रे तदा निशि ७८ ततो विवस्वान्भगवान्फुल्लपद्मारुणाकृतिः । शैलाधिराजमुदयमारुरोहोरुमण्डलः ७९ समनन्तरमेवास्या भर्ता प्राणैर्व्ययुज्यत । पपात च महीपृष्ठे पतन्तं जगृहे च सा ८० अनसूयोवाच " न विषादस्त्वया भद्रे कर्तव्यः पश्य मे बलम् । पतिशुश्रूषयावाप्तं तपसः किं चिरेण मे ८१ यथा भर्तृसमं नान्यमपश्यं पुरुषं क्वचित् । रूपतः शीलतो बुद्ध्या वाङ्माधुर्यादिभूषणैः ८२ तेन सत्येन विप्रोयं व्याधिमुक्तः पुनर्युवा । प्राप्नोत्वजीवितं भार्यासहायः शरदां शतम् ८३ यथा भर्तृसमं नान्यमहं पश्यामि दैवतम् । तेन सत्येन विप्रोयं पुनर्जी-

---

इंद्रासह दुःखित देव माझ्याकडे येऊन ७० पूर्वीप्रमाणें अखंडित अहोरात्र व्यवस्थेविषयीं याचना करीत आहेत व मी त्याकरितां आलें आहें. माझें हें म्हणणें ऐक ७१. दिवस नसल्यामुळें सर्व यागकर्में बंद झालीं आहेत व त्यामुळें, हे तपस्विनि, देवांचें पोषण होत नाहीं ७२. दिवसाच्यांच उच्छेदामुळें सर्व कर्मांचा उच्छेद होऊन त्यामुळें अनावृष्टीनें जगत् उच्छिन्न होणार आहे ७३. म्हणून, संकटांतून धैर्यानें जगताचा उद्धार करण्याची तुझी इच्छा असल्यास, हे साध्वि, लोकांवर कृपा कर आणि सूर्य पूर्वीप्रमाणें उगवूं दे ७४. ब्राह्मणी म्हणते:— हे महाभाग्यवति, " सूर्योदयीं तूं मरशील " म्हणून अति रागिट मांडव्यानें माझ्या प्राणाधिपति भर्त्याला शाप दिला आहे ७५. अनसूया म्हणते:— हे कल्याणि, तुला पटेल तर तुझ्या सांगण्यावरून मी तुझा भर्ता पूर्वीप्रमाणें जिवंत करीन ७६. हे श्रेष्ठ स्त्रिये, पतिव्रता स्त्रियांच्या सामर्थ्याला मींही सर्वस्वीं मान दिला पाहिजे; म्हणून मी तुला मानीत आहें ७७. पुत्र म्हणतो:— ह्यावर 'ठीक आहे' असें म्हणून तपस्विनी अनसूयेनें अर्घ्य घेऊन रात्रीं सूर्याला आवाहन केलें ७८. नंतर प्रफुल्लित रक्त कमलाकार व विस्तीर्ण मंडलांनीं युक्त असा भगवान् सूर्य उदयाचलावर आरूढ झाला ७९; तत्क्षणीं तिचा भर्ता मरून भूमीवर पडला व पडतां पडतां तो तिनें धरिला ८०. अनसूया म्हणते:— हे कल्याणि, तूं खेद करूं नकोस. पतिसेवेनें प्राप्त झालेलें माझें बल तूं पहा ! मला उशीर कशाला? ८१. ज्याअर्थी रूप, शील, बुद्धि व वाङ्माधुर्यादि भूषणें ह्यांनीं पतीची बरोबरी करणारा जर दुसरा कोणताही पुरुष मी मानिला नसेल तर ८२ त्या सत्याच्या योगानें हा विप्र पुनरपि व्याधिमुक्त व तरुण होऊन भार्येसह शंभर वर्षे जगेल ८३. भर्तृतुल्य दुसरें दैवत मी

वत्स्यमीमथः ८४ कर्मणा मनसा वाचा भर्तृशुश्रूषणंप्रति । यथा ममोद्यमो नित्यं तथायं जीवताद्द्विजः ८५ पुत्र उवाच ॥ ततो विप्रः समुत्तस्थौ व्याधिमुक्तः पुनर्युवा । स्वभाभिर्भासयन्वेश्म वृन्दारक इवाजरः ८६ ततोऽपतत्पुष्पवृष्टिर्देववाद्यानि सस्वनुः । लेभिरे च मुदं देवा अनसूयामथाब्रुवन् ८७ देवा ऊचुः । वरं वृणीष्व कल्याणि देवकार्यं महत्कृतम् । आदित्योदयसद्भावाद्वरं वरय शोभने ८८ त्वया यस्मात्ततो देवा वरदास्ते तपस्विनि । अनसूयोवाच ॥ यदि देवाः प्रसन्ना मे पितामहपुरोगमाः ८९ वरदा वरयोग्या च यद्यहं भवतां मता । तद्यान्तु मम पुत्रत्वं ब्रह्मविष्णुमहेश्वराः ९० योगं च प्राप्नुयां भर्तृसहिता क्लेशमुक्तये ॥ पुत्र उवाच ॥ एवमस्त्विति देवास्तां ब्रह्मविष्णुशिवादयः ९१ उक्त्वा जग्मुर्यथान्यायमनुमान्य तपस्विनीम् । ततः काले बहुतिथे द्वितीयो ब्रह्मणः सुतः ९२ स्वभार्यां भगवानत्रिरनसूयामपश्यत । ऋतुस्नातां सुचार्वंगीं लोभनीयतमाकृतिम् ९३ सकामो मनसा भेजे स मुनिस्तामनिन्दिताम् । तस्याभिध्यायतस्तां तु विकारो योऽभ्यजायत ९४ तमपोवाह पवनस्तीर्यगूर्ध्वं च वेगवान् । ब्रह्मरूपं च शुक्राभं पतमानं समन्ततः ९५ सोमरूपं रजोरूपं दिशस्तं जगृहुर्दश । स सोमो मानसो जज्ञे तस्यामत्रेः प्रजापतेः ९६ पुत्रः समस्तसत्त्वानामायुराधार एव च । तुष्टेन विष्णुना जज्ञे दत्तात्रेयो महात्मना ९७ स्वशरीरात्समुत्पन्नः

जाणीत नाहीं हें जर खरें असेल तर हा विप्र रोगमुक्त होऊन उठो ८४; कायेनें, वाचेनें व मनानें जर मी पतिसेवनाविषयीं सर्वदा उद्युक्त राहिलें असेन तर हा द्विज जिवंत होवो ८५: पुत्र ह्मणतो:—तदनंतर तो विप्र व्याधिमुक्त व पुनरपि तरुण होऊन उठला आणि जरारहित देवाप्रमाणें तो स्वप्रकाशानें तें स्थळ प्रकाशित करूं लागला ८६. तेव्हां पुष्पवृष्टि झाली; देववाद्यें वाजूं लागलीं; आणि देव आनंदित होऊन अनसूयेला ह्मणाले ८७ " हे कल्याणि, हे सुव्रते, वर माग. सूर्योदय झाल्यामुळें तूं मोठें देवकार्य केलें आहेस; वर माग ८८. हे तपस्विनि, तूं ज्याअर्थी देवांना संकटांतून मुक्त केलें आहेस त्याअर्थी ते तुला वर देण्यास उद्युक्त झाले आहेत." अनसूया ह्मणते:—जर पितामहप्रभृति देव मजवर प्रसन्न झाले असतील ८९; आणि मी वरप्रद वर घेण्यास योग्य आहें असें जर तुह्मांस वाटत असेल तर ब्रह्मा, विष्णु व शिव ह्यांनीं माझें पुत्रत्व स्वीकारावें ९०; आणि पतीसह मला क्लेशमुक्तीकरितां योगप्राप्ति व्हावी. पुत्र ह्मणतो:— ह्यावर " ठीक आहे " ह्मणून देव तिला ह्मणाले आणि ब्रह्मा, विष्णु, शिव इत्यादि देव तिची यथान्याय अनुज्ञा घेऊन निघून गेले. नंतर बराच काळ लोटल्यावर द्वितीय ब्रह्मपुत्र भगवान् अत्रिमुनि अत्यंत मोहक, सुंदर व ऋतुस्नात झालेल्या आपल्या भार्येकडे पाहूं लागले आणि त्या सकाम मुनींनीं त्या निर्दोष स्त्रीचा मनानें उपभोग घेतला. त्या स्त्रीकडे पहातां पहातां त्या मुनींपासून जें तेज पडलें ९१, ९२, ९३, ९४ तें वेगवान् वायूनें अडवें उभें उडविलें. तें शुक्रवर्ण ब्रह्मतेज चोहोंकडे पडूं लागलें असतां ९५ दहा दिशांनीं तें आकर्षण करून घेतलें; तें रजोगुणी सोमरूप होतें. तो प्रजाधिपति अत्रिमुनींचा सोम ह्मणून मानसपुत्र

सत्वोद्रिक्तो द्विजोत्तमः। दत्तात्रेय इति ख्यातः सोऽनसूयास्तनं पपौ ९८ विष्णुरेवावतीर्णोऽसौ द्वितीयोऽत्रेः सुतो भवत्। सप्ताहात्प्रच्युतो मातुरुदरात्कुपितो यतः ९९ हैहयेन्द्रमुपावृत्तमपराध्यन्तमुद्धतम्। दृष्ट्वात्रौ कुपितः सद्यो दग्धुकामः स हैहयम् १०० गर्भवासमहायासदुःखामर्षसमन्वितः। दुर्वासास्तमसा युक्तो रुद्रांशः सोऽभ्यजायत १ इति पुत्रत्रयं तस्या जज्ञे ब्रह्मेशवैष्णवम्। सोमो ब्रह्माभवद्विष्णुर्दत्तात्रेयोऽभ्यजायत २ दुर्वासाः शंकरो जज्ञे वरदानाद्दिवौकसाम्। सोमः स्वरश्मिभिः शीतैर्वीरुदोषधिमानवान् ३ आप्याययन्सदा स्वर्गे वर्तते स प्रजापतिः। दत्तात्रेयः प्रजाः पाति दुष्टदैत्यनिबर्हणात् ४ शिष्टानुग्रहकृद्योगी श्रेयःश्रांशः स वैष्णवः। निर्दहत्यवमन्तारं दुर्वासा भगवानजः ५ रौद्रभावं समाश्रित्य दृङ्मनोवाग्भिरुद्धतः। सोमत्वं भगवानत्रिः पुनश्चक्रे प्रजापतिः ६ दत्तात्रेयोऽपि विषयान्योगस्थो बुभुजे हरिः। दुर्वासाः पितरं त्यक्त्वा मातरं चोत्तमं व्रतम् ७ उन्मत्ताख्यं समाश्रित्य परिबभ्राम मेदिनीम्। मुनिपुत्रवृतो योगी दत्तात्रेयोऽप्यसंगिताम् ८ अभीप्समानः सरसि निम-

---

उत्पन्न झाला ९६; तो सर्व प्राण्याच्या आयुष्याचा आधार होय. नंतर महात्मा विष्णु संतुष्ट झाल्यामुळे दत्तात्रेय जन्मला ९७. स्वशरीरापासून जो सत्त्वगुणी द्विजश्रेष्ठ उत्पन्न झाला तो दत्तात्रेय ह्मणून उत्पन्न झाला आणि तो अनसूयेचें स्तनपान करूं लागला ९८. अवतीर्ण झालेला विष्णुच अत्रीचा द्वितीय पुत्र होय. हैहयाधिपति मत्त झाल्यामुळें कुमार्गाला लागून अत्रिमुनींचा अपमान करीत आहे असें दृष्टी पडताक्षणीं जो कुपित होऊन हैहयाधिपतीला दग्ध करण्याकरिता सात दिवसांनीच मातेच्या उदरापासून च्युत झाला ९९; १००; व गर्भवाससंबंधी होणाऱ्या आयासामुळें व दुःखामुळें जो संतप्त झालेला होता तो दुर्वास ह्मणून तमोगुणी रुद्रांश उत्पन्न झाला १. ह्याप्रमाणें ब्रह्मा, विष्णु व महेश्वर ह्यांच्या अंशानें त्या अनसूयेला तीन पुत्र झाले. ब्रह्मदेव सोम झाला; विष्णु दत्तात्रेय झाला २; आणि देवांच्या वरप्रदानामुळें शंकर दुर्वास झाला. आपल्या शीत किरणांनीं लता, ओषधि व मानव ह्यांची अभिवृद्धि करणारा प्रजाधिपति सोम सर्वदा अंतरिक्षामध्यें असतो आणि दुष्ट व दैत्य ह्यांचा नाश करून दत्तात्रेय प्रजेचें रक्षण करीत असतो ३, ४. तो योगी असून सज्जनांवर अनुग्रह करणारा असा विष्णूचा अंश आहे. भगवान् जन्मरहित दुर्वास रौद्ररूप धारण करून अवमान करणाऱ्याला दग्ध करीत असतो आणि त्याची दृष्टि, मन व वाणी ह्यांचे ठिकाणीं सौम्यपणा नसतो. भगवान् प्रजाधिपति अत्रिमुनींनीं सोमाचें स्वरूप उत्पन्न केलें ५, ६; दत्तात्रेयरूप हरि योगाचें अवलंबन करून विषयालोचन करूं लागला आणि मातापितरांचा त्याग करून व उत्कृष्ट उन्मत्तवृत्ति स्वीकारून दुर्वास पृथ्वीवर हिंडूं लागला. मुनिपुत्रांनीं परिवेष्टित असलेला योगी व समर्थ दत्तात्रेयही संग नसावा एतदर्थ सरोवरामध्यें पुष्कळ वेळपर्यंत बुडून राहिला. तथापि, सरोवराचे तीरीं वसून राहिलेल्या त्या ऋषिपुत्रांनीं त्या अत्यंत प्रियदर्शन महात्म्याचा त्याग केला नाहीं. शंभर दिव्य वर्षें पूर्ण झालीं असतांही त्याच्या प्रेमामुळें जेव्हां सर्व मुनिकुमार तें सरोवराचें तीर

मग्ना चिरं विभुः । तथापि तं महात्मानमतीव प्रियदर्शनम् ९ तत्यजुर्न कुमारास्ते सरस्तीरसंश्रयाः । दिव्ये वर्षशते पूर्णे यदा ते न त्यजन्ति तम् ११० तस्मीत्या सरस्तीरं सर्वे मुनिकुमारकाः। ततो दिव्याम्बरधरां सुरूपां पृथुनितम्बिनीम् ११ नारीमादाय कल्याणीमुत्ततार जलान्मुनिः । स्त्रीसंनिकर्षिणं ह्येते परित्यक्ष्यन्ति मामिति १२ मुनिपुत्रास्ततो योगे स्थास्यन्तीति विचिन्तयन्। तथापि ते मुनिसुता न त्यजन्ति यदा मुनिम् १३ ततः सह तया नार्या मद्यपानमथाकरोत् । सुरापानरतं तेन सभार्यं तत्यजुस्ततः १४ गीतवाद्यादिवनिताभोगसंसर्गदूषितम् । मन्यमाना महात्मानं तया सह बहिष्कृतम् १५ नावापदोषं योगीशो वारुणीं स पिबन्नपि । अन्त्यावसायिवेश्मान्तर्मातरिश्वा स्पृशन्निव १६ सुरां पिबन्सपत्नीकस्तपस्तेपे स योगवित् । योगीश्वरश्चिन्त्यमानो योगिभिर्मुक्तिकाङ्क्षिभिः १७ कस्यचित्त्वथ कालस्य कार्तवीर्योऽर्जुनो बली । कृतवीर्ये दिवं याते मन्त्रिभिः सपुरोहितैः १८ पौरैश्चात्माभिषेकार्थं समाहूतोऽब्रवीदिदम् । नाहं राज्यं करिष्यामि मन्त्रिणो नरकोत्तरम् १९ यदर्थं गृह्यते शुल्कं तदनिष्पादयन्वृथा । पण्यानां द्वादशं भागं भूपालाय वणिग्जनः १२० दत्त्वार्थरक्षिभिर्मार्गे रक्षितो याति दस्युतः । गोपाश्च घृततक्रादेः षड्भागं च कृषीवलाः २१ दत्त्वान्यद्भुञ्जते यदि भागं ततोऽधिकम् । पण्यादीनामशेषाणां वणिजो गृह्णतस्ततः २२

---

सोडीनात तेव्हां दिव्य वस्त्रें व मनोहर नितंब ह्यांनीं युक्त असलेली एक सुरूप ७, ८, ९, १०, ११ व शुभ स्त्री घेऊन दत्तात्रेयमुनि उदकांतून बाहेर निघाले. स्त्रीचे ठिकाणीं मी आसक्त असल्याचें पाहून तरी हे मुनिकुमार मला सोडून योगाचें अवलंबन करतील असें त्या मुनीला वाटलें होतें. परंतु, ते मुनिकुमार त्याला सोडीनात १२, १३. तेव्हां त्या स्त्रीसह तो मद्यपान करूं लागला. भार्येसह तो सुरापानाविषयीं आसक्त झाल्यामुळें त्यांनीं त्याचा त्याग केला १४. गायन, वाद्यें व स्त्रीसंभोग ह्यांच्या संसर्गानें तो महात्मा दूषित आहे आणि ह्मणूनच तिच्यासह बहिष्कृत आहे असें ते मानूं लागले, १५. तो जरी मद्यपान करीत असे तरी योगीश्वर असल्यामुळें अत्यंज-गृहांत प्रवेश करणाऱ्या वायुप्रमाणें दोषानें लिप्त झाला नाहीं १६. तो योगवेत्ता व योगीश्वर सुरापान करीत असूनही पत्नीसह तपश्चर्या करीत असे ; आणि मुमुक्षु योगी त्याचें चिंतन करीत असत १७, कृतवीर्य परलोकीं गेल्यानंतर बलाढ्य कार्तवीर्यार्जुनाला अभिषेक करण्याकरितां, मंत्री, पुरोहित व पौरजन ह्यांनीं बोलाविलें असतां तो ह्मणाला "हे मंत्रिजनहो, नरकरूप फल देणारें राज्य मी करणार नाहीं १८, १९. कारण, ज्याकरितां कर घ्यावयाचा ते कार्य न करणाऱ्या राजाचें जीवित व्यर्थ होय. मालाचा बारावा हिस्सा राजाला देऊन व्यापारी लोक मार्गामध्यें सुरक्षित जात असतात २०. कारण, रक्षक लोक चोरांपासून त्यांचें रक्षण करीत असतात. गोप हे ह्याचकरितां तूप, ताक इत्यादिकांचा द्वादशांश जकात राजाला देत असतात. शेतकरी षष्ठांश २१ राजाला देऊन अवशिष्ट राहिलेल्याचा उपभोग घेत असतात व वाणीही द्वादशांश राजाला देऊन सर्व मालाचा उपभोग घेत

अग्निहोत्रं तपः सत्यं वेदानां चैव साधनम् । आतिथ्यं वैश्वदेवं च इष्टमित्यभिधीयते २३ वापीकूपतडागानि देवतायतनानि च । अन्नप्रदानमर्थिभ्यः पूर्तमित्यभिधीयते २४ इष्टापूर्तविनाशाय तद्राज्ञश्चौरकर्मिणः । यदन्यैः पाल्यते लोकस्तद्वृत्त्यन्तरसंश्रितः २५ गृह्णतो बलिषड्भागं नृपतेर्नरको ध्रुवम् । निरूपितमिदं राज्ञः पूर्वं रक्षणवेतनम् २६ अरक्षंश्चोरतश्चोरस्तदघं नृपतेर्भवेत् । तस्माद्यदि तपस्तप्त्वा प्राप्तो योगित्वमीप्सितम् २७ भुवः पालनसामर्थ्ययुक्त एको महीपतिः । पृथिव्यामेक भूपालो भविष्याम्यहमर्द्धिसंयुतः २८ ततो भविष्ये नात्मानं करिष्ये पापभागिनम् । तस्य तं निश्चयं ज्ञात्वा मन्त्रिमध्यस्थितोऽब्रवीत् २९ गर्गो नाम महाबुद्धिर्मुनिर्भूपवयोऽतिगः । भक्त्या तु कृपयाविष्टस्तं तोषयितुमर्हति १३० यद्येवं कर्तुकामस्त्वं राज्यं सम्यक्प्रशासितुम् । ततः शृणुष्व मे वाक्यं कुरुष्व च नृपात्मज ३१ दत्तात्रेयं महात्मानं सह्यद्रोणीकृताश्रमम् । तमाराधय भूपाल पाति यो भुवनत्रयम् ३२ योगयुक्तं महात्मानं सर्वत्रसमदर्शिनम् । विष्णोरंशं जगद्धातुरवतीर्णं धरातले ३३ यमाराध्य सहस्राक्षः प्राप्तवान्पदमात्मनः । हृतं दुरात्मभिर्दैत्यैर्जघान च दितेः सुतान् ३४ अर्जुन

---

असतात २२. अग्निहोत्र, तप, सत्य, वेद पठन, अतिथिसत्कार आणि वैश्वदेव ह्यांना इष्ट ह्मणतात २३. वापी, कूप तडाग, देवालयें बांधणें आणि याचकांना अन्नदान करणें ह्याला पूर्त असें ह्मणतात २४. चौरकर्मी राजाचें तें कारद्रव्य इष्ट व पूर्त ह्यांच्या नाशाला कारण होत असतें. रक्षणाकरितां जर लोकांना कांहीं दुसरी व्यवस्था करणें भाग पडलें ह्मणजे षष्ठांश कर राजाला देणें हें जे रक्षणाचें मुख्य साधन तें व्यर्थ होऊन जर इतर साधनांनीं लोकाचें रक्षण होऊं लागलें २५ तर षष्ठांश कर घेणाऱ्या राजाला नरकप्राप्ति निःसंशय होईलच. कारण, षष्ठांश कर हें प्रजा रक्षणाकरितां राजाचें वेतन होय, असें प्राचीन लोकांनीं निरूपण केलें आहे २६. कराचा विनियोग प्रजेच्या रक्षणाकडे न करणारा राजा चोरापेक्षांही चोर होय आणि त्याच्यापाशीं असलेलें तें द्रव्य चोरीचें द्रव्य होय. ह्यास्तव, तपश्चर्या करून जर मला इष्ट योगसिद्धि प्राप्त झाली २७ तर पृथ्वीपालनाला अवश्य असलेलें जें सामर्थ्य तें मला प्राप्त होऊन मी या भूतलावर ऋद्धियुक्त असा अद्वितीय राजा होईन. परंतु, तशी सिद्धि अद्यापि मला प्राप्त झाली नाहीं २८. तशी सिद्धि प्राप्त झाल्यानंतर मी राजा होईन; परंतु, तोंपर्यंत मी पापभागी होणार नाहीं. " हा त्याचा निश्चय जाणून मंत्र्यामध्यें स्थित असलेले, महाज्ञानी व राजापेक्षां वयोवृद्ध गर्गमुनि राजाच्या भक्तीनें दयार्द्र होऊन त्याला संतुष्ट करण्याकरितां ह्मणाले २९, १३० " हे राजपुत्रा, जर ह्याप्रमाणें उत्कृष्ट रीतीनें राज्य चालविण्याची तुझी इच्छा असेल तर माझ्या ह्मणण्याप्रमाणें वाग ३१. महात्मा त्रैलोक्यपालक दत्तात्रेय सह्याद्रीच्या खोऱ्यांत राहिलेला आहे. त्याचें आराधन, हे भूपाला तूं कर. ३२. सर्वत्र समदृष्टि ठेवणारा तो महात्मा योगी जगत्पालक विष्णूचाच अंश भूतलावर अवतीर्ण झालेला आहे ३३; आणि दुष्ट दैत्यांनीं हरण केलेलें स्वकीय पद, त्याचीच आराधना करून इंद्रानें

उवाच ॥ कथमाराधितो देवैर्दत्तात्रेयः प्रतापवान् । कथं वापहृतं दैत्यैरिन्द्रत्वं प्राप वासवः ३५ गर्ग उवाच ॥ दैत्यानां देवतानां च युद्धमासीत्सुदारुणम् । दैत्यानामीश्वरे जंभे देवानां च शचीपतौ ३६ तेषां तु युध्यमानानां दिव्यः संवत्सरो गतः । ततो देवाः पराभूता दैत्या विजयिनोऽभवन् ३७ विप्रचित्तिमुखैर्देवा दानवैस्ते पराजिताः । पलायनकृतोत्साहा निरुत्साहा द्विषज्जये ३८ बृहस्पतिमुपागम्य दैत्यसैन्यवधेप्सवः । अमन्त्रयन्त सहिता वालखिल्यैः सहर्षिभिः ३९ बृहस्पतिरुवाच ॥ दत्तात्रेयं महाभागमत्रेः पुत्रं तपोधनम् । विकृताचरणं भक्त्या संतोषयितुमर्हथ १४० स वो दैत्यविनाशाय वरदो दास्यते वरम् । ततो हनिष्यथ सुराः सहितान्दैत्यदानवान् ४१ गर्ग उवाच ॥ हन्तुं शक्ता न संदेहो दत्तात्रेयप्रसादतः। इत्युक्तास्ते तदा जग्मुर्दत्तात्रेयाश्रमं सुराः ४२ ददृशुश्च महात्मानं शान्तं लक्ष्म्या समन्वितम् । उद्गीयमानं गन्धर्वैः सुरापानरतं मुनिम् ४३ ते तस्य गत्वा प्रणतिं चक्रुः सर्वार्थसाधनीम् । भक्त्या तस्योपजह्रुश्च भक्ष्यपेयं सुरादिकम् ४४ तिष्ठन्तमनुतिष्ठन्ति यान्तं यान्ति दिवौकसः । आराधयामासुरथः स्थितास्तिष्ठन्तमासने ४५ स प्राह देवान्प्रणतान्दत्तात्रेयः किमिष्यते । मत्तो भवद्भिर्येनेयं शुश्रूषा क्रियते मम ४६ देवा ऊचुः । दानवैर्मुनिशार्दूल जम्भाद्यैर्भूर्भुवादिकम् । हृतं त्रैलोक्यमाक्रम्य क्रतुभागाश्च कृत्स्नशः ४७ तद्वधे कुरु बुद्धिं

मिळविलें आहे व दैत्यांचा वध केला आहे " ३४. अर्जुन ह्मणतोः—प्रतापी दत्तात्रेयाचें आराधन देवांनीं कसें केलें व दैत्यांनीं हरण केलेलें इंद्रपद इंद्राला कसें प्राप्त झालें? ३५ गर्ग ह्मणतातः— जंभ व इंद्र अनुक्रमें देवदैत्यांचे अधिपति असतांना त्यांमध्यें अति भयंकर युद्ध झालें ३६. ते युद्ध करीत असतांना एक दिव्य वर्ष लोटल्यावर देव पराजित व दैत्य विजयी झाले ३७. विप्रचित्तिप्रभृति दानवांमुळें पराजित झालेले देव शत्रूंना जिंकण्याविषयीं निरुत्साह होऊन पळण्यासच तयार झाले ३८. तथापि, दैत्यसेनेचा वध व्हावा ह्या उद्देशानें बृहस्पतीकडे जाऊन वालखिल्यऋषींसह ते विचार करूं लागले असतां ३९ बृहस्पति ह्मणाले " निषिद्ध आचरण करणाऱ्या महाभाग्यवान् व तपस्वी अत्रिपुत्र दत्तात्रेयाला तुह्मी भक्तीनें संतुष्ट करा १४०. देवहो, तो वरप्रद दैत्यनाशार्थ तुह्मांला वर देईल आणि नंतर तुह्मी दैत्यदानवांचा एकदम वध कराल ४१." ह्यावर गर्गमुनींनींही " दत्तात्रेयकृपेनें तुह्मी निःसंशय वध करण्यास समर्थ व्हाल " असें सांगितलें असतां ते देव दत्तात्रेयाच्या आश्रमाला गेले ४२. तों श्रीयुत, क्षमाशील व महात्मा मुनि मद्यपानासक्त असून गंधर्व त्याचें स्तवन करीत आहेत असें त्यांनीं अवलोकन केलें ४३. त्यांच्याकडे जाऊन त्यांनीं त्याला सर्वार्थसाधक प्रणाम केला आणि त्या मद्यपानासक्त मुनीला त्यांनीं भक्तीनें मद्य वगैरे अर्पण केलें ४४. तो उभा राहिला असतां देव उभे रहात, चालूं लागला असतां चालत आणि आसनावर असतांना खालीं उभे राहून त्याला मान देत ४५. तो दत्तात्रेय नम्र झालेल्या देवाना " माझ्यापासून काय प्राप्त होण्याच्या उद्देशानें तुह्मी ही माझी सेवा करीत आहां ? " असें ह्मणाला असतां ४६ देव ह्मणाले " हे मुनिश्रेष्ठ, भूमि, अंतरिक्ष

त्वं परित्राणाय नोऽनघ । त्वत्प्रसादादभीप्सामः पुनः प्राप्तं त्रिपिष्टपम् ४८ दत्तात्रेय उवाच ॥ मद्यासक्तोहमुच्छिष्टो न चैवाहं जितेन्द्रियः । कथमिच्छत मत्तोपि देवाः शत्रुपराभवम् ४९ देवा ऊचुः ॥ अनघस्त्वं जगन्नाथ न लेपस्तव विद्यते । विद्याक्षालनशुद्धान्तर्निविष्टज्ञानदीधिते १५० दत्तात्रेय उवाच ॥ सत्यमेतत्सुरा विद्या ममास्ति समदर्शिनः । अस्यास्तु योषितः संगादहमुच्छिष्टतां गतः ५१ स्त्रीसंभोगोतिदुःखाय सातत्येनोपसेवितः । एवमुक्तास्ततो देवाः पुनर्वचनमब्रुवन् ५२ देवा ऊचुः ॥ अनघेयं मुनिश्रेष्ठ जगन्माता न दुष्यति । या सा विद्या तव विभो सर्वज्ञस्य हृदि स्थिता ५३ यथांशुमाला सूर्यस्य द्विजचण्डालसंगिनी । न दुष्यति जगन्नाथ तथेयं वरवर्णिनी ५४ *गर्ग उवाच* ॥ एवमुक्तस्ततो देवैर्दत्तात्रेयोऽब्रवीदिदम् । प्रहस्य त्रिदशान्सर्वान्यद्येतद्भवतां मतम् ५५ तदाहूयासुरान्सर्वान्युद्धाय सुरसत्तमाः । इहानयत मद्दृष्टिगोचरं मा विलम्ब्यताम् ५६ मद्दृष्टिपातहुतभुक्प्रक्षीणबलतेजसः । येन नाशमशेषास्ते प्रयान्ति ममदर्शनात् ५७ गर्ग उवाच ॥ तस्य तद्वचनं श्रुत्वा देवैर्दैत्या महाबलाः । आहवाय समाहूता जग्मुर्देवगणाश्रमम् ५८ ते हन्यमाना दैतेयैर्देवाः सर्वे भयातुराः । दत्तात्रेयाश्रमं जग्मुः समस्ताः शरणार्थिनः ५९ तमेव विविशुर्दैत्याः काल्यन्ते दिवौकसः । ददृशुस्तं महात्मानं दत्तात्रेयं मदालसम् १६० वामपार्श्वस्थितामिष्टामशेषजगतः शुभाम् । भार्यां चास्य

---

इत्यादि लोक जंभादि दैत्यांनीं हरण केलें आणि त्रैलोक्य जिंकून सर्व यज्ञभाग घेतले ४७. हे निष्पाप, आमच्या रक्षणाकरितां आपण त्यांच्या वधाचा बेत करा. आपल्या प्रसादानें स्वर्ग पुनः प्राप्त होण्याची आह्मांला आशा आहे ४८. दत्तात्रेय ह्मणतातः— देवहो, मी मद्यासक्त व उच्छिष्ट असून जितेंद्रिय नाहीं. तस्मात्, माझ्यानें शत्रुपराभव तुह्मी कसा इच्छितां ? ४९. देव ह्मणतातः—हे जगन्नाथा, तूं निष्पाप व निर्लेप आहेस; व विद्यारूप उदकानें धुऊन गेलेल्या तुझ्या शुद्ध अंतःकरणांत ज्ञानकिरणें कायम झालेलीं आहेत १५०. दत्तात्रेय ह्मणतातः—देवहो, हें सत्य आहे. मज समदृष्टीचे ठिकाणीं विद्या आहे; परंतु, मी ह्या स्त्रीच्या संगामुळें उच्छिष्ट झालों आहे ५१. स्त्रीसंभोग सतत घडल्यानें अति दुःख होतें. ह्यावर देव पुनः ह्मणाले ५२ " हे मुनिश्रेष्ठ, हे प्रभो, ही निष्पाप जगन्माता तुज सर्वज्ञाच्या हृदयांत असलेल्या विद्येप्रमाणें दूषित होत नाहीं ५३. द्विज व चंडाल ह्यांचा संग करणाऱ्या सूर्याच्या किरणमालेप्रमाणें, हे जगन्नाथ, ही श्रेष्ठ स्त्री दूषित होणारी नाहीं " ५४. गर्गमुनि ह्मणतातः— देवांच्या ह्या ह्मणण्यावर दत्तात्रेय हंसून सर्व देवांना ह्मणाले " तुह्मांला हें संमत असल्यास ५५ सर्व असुरांना युद्धाला बोलावून, हे सुरश्रेष्ठहो, माझ्यासमोर येथें सत्वर आणा ५६. ह्मणजे माझ्या दृष्टिरूप अग्नीनें त्यांचें बल व तेज क्षीण होईल आणि माझ्या दर्शनानें ते सर्व नाश पावतील ५७. गर्ग ह्मणतात :— तें त्यांचें भाषण ऐकून देवांनीं महाबलाढ्य दैत्य युद्धाला बोलाविले व ते देवगणांच्या आश्रमाला गेले ५८. पुढें दैत्य मारूं लागले असतां सर्व देव भयभीत होऊन आश्रयाकरितां दत्तात्रेयाश्रमाला गेले ५९ व दैत्यही देवांचा पाठलाग करीत त्या आश्रमांत प्रविष्ट झाले असतां मदानें धुंद

सुचार्वंगीं लक्ष्मीमिन्दुनिभाननाम् ६१ नीलोत्पलाभनयनां पीनश्रोणिपयोधराम्। मृदुवाक् मधुराभाषां सर्वयोषिद्गुणैर्युताम् ६२ दृष्ट्वाथ तस्तदा दैत्याः साभिलाषमनोभवाः। न शेकुस्ते तदा दैत्या मनसा वोढुमातुराः ६३ त्यक्त्वा देवान्स्त्रियं तां तु हर्तुकामा हतौजसः। प्रेरितास्तेन पापेन ह्यासक्तास्ते ततोऽब्रुवन् ६४ स्त्रीरत्नमेतत्त्रैलोक्यसारं चेद्धिदितं भवेत्। कृतकृत्यास्ततः सर्वे इति नो भावितं मनः ६५ तस्मात्सर्वे समुत्क्षिप्य शिबिकायां सुरार्दनाः। आरोप्य स्वमधिष्ठानं नयाम इति निश्चिताः ६६ गर्ग उवाच ॥ सानुरागास्ततस्ते तु मुनेरन्तिकमागमन्। तस्य तां योषितं साध्वीं समुत्क्षिप्य स्मरातुराः ६७ शिबिकायां समारोप्य सहिता दैत्यदानवाः। शिरः सुशिबिकां कृत्वा स्वस्थानाभिमुखा ययुः ६८ दत्तात्रेयस्तथा देवान्विहस्येदमथाब्रवीत्। दिष्ट्या च हन्त दैत्यानामेषा लक्ष्मीः शिरोगता। सप्तस्थानान्यतिक्रम्य स्थानमन्यमुपेष्यति ६९ देवा ऊचुः ॥ कथयस्व जगन्नाथ केषु स्थानेष्ववस्थिता ॥ पुरुषस्य फलं किं वा प्रयच्छत्यथ नश्यति १७० दत्तात्रेय उवाच ॥ नृणां पादस्थिता लक्ष्मीर्निलयं संप्रयच्छति। सक्थ्नोश्च संस्थिता वस्त्रं रत्नं नानाविधं वसु ७१ कलत्रदा गुह्यसंस्था क्रोडस्थापत्यदायिनी। मनोरथान्पूरयति पुरुषाणां हृदि स्थिता ७२ लक्ष्मीर्लक्ष्मीवतां श्रेष्ठा कण्ठस्था कण्ठभूषणम्। अभीष्टबन्धुदारैश्च तथा श्लेषं प्रवासिभिः ७३ मृष्टान्नवाक्यलावण्यमाज्ञामवितथां तथा। मुखस्थिता कवित्वं च यच्छत्युदधिसंभवा ७४ शिरोगता संत्यजति ततोऽन्यं

झालेला महात्मा दत्तात्रेय त्यांच्या दृष्टीं पडला१६०. नंतर सर्व विश्वाला इष्ट, कल्याणी, चंद्रतुल्य मुख व मनोहर अवयव ह्यांनीं युक्त, कमलाक्षी, पुष्ट श्रोणी व पुष्ट स्तन, उत्कृष्ट दांत, मधुर भाषण आणि सर्व स्त्रीगुण ह्यांनीं संपन्न अशी त्याची भार्या लक्ष्मी डाव्या बाजूला असलेली६१, ६२ दृष्टीं पडतांक्षणीं दैत्य मदनानें व्याकुल झाले आणि कामुक व मत्त झालेल्या त्या दैत्यांचें मन अनावर झालें ६३. तेव्हां दैवाची प्रेरणा झाल्यामुळें पापासक्त व निःतेज झालेले ते दैत्य देवांना सोडून ती स्त्री हरण करण्याच्या उद्देशानें ह्मणाले ६४ " त्रैलोक्याचें सार असलेलें हें स्त्रीरत्न मिळाल्यास आपण सर्व कृतकृत्य होऊं, असें आह्मांला वाटत आहे ६५. ह्यास्तव, हे दैत्यहो, सर्वांनीं मिळून हिला उचलून पालखींत ठेवावें आणि स्वस्थानीं न्यावें, असा आमचा निश्चय झाला आहे " ६६. गर्ग ह्मणतात:—नंतर ते कामातुर दैत्य मुनीजवळ आले आणि त्याची ती पतिव्रता स्त्री पालखींत उचलून ठेवून व पालखी डोक्यावर घेऊन स्वस्थानाकडे निघाले ६७, ६८. तेव्हां दत्तात्रेय हंसून देवांना ह्मणाले " ही लक्ष्मी दैत्यमस्तकीं चढली हें फारच उत्तम होय; सात स्थानें सोडून ही आतां अन्य ठिकाणीं जाईल ६९. देव ह्मणतात:—हे जगन्नाथ, लक्ष्मी पुरुषाच्या कोणत्या स्थानीं असली ह्मणजे कोणतें फल देते व कोठें गेली ह्मणजे नाहींशी होते हें आपण सांगा १७०. दत्तात्रेय ह्मणतात:—लक्ष्मी पुरुषाच्या पायावर असल्यास घर, मांड्यांवर असल्यास वस्त्रें, रत्नें व नानाप्रकारचें द्रव्य ७१, गुह्यस्थानीं स्त्री, भुजमध्यभागीं अपत्य, हृदयावर मनोरथ ७२, कंठावर कंठभूषण आणि इष्टबंधु, स्त्रिया व प्रवासी ह्यांची भेट ७३

याति चाश्रयम् । सेयं शिरोगता दैत्यान्परित्यजति सांप्रतम् ७५ प्रगृह्यास्त्राणि वध्यन्तां तस्मादेते सुरारयः । न भेतव्यं भृशं ह्येते मया निस्तेजसः कृताः ७६ परदारावमर्शेन दग्धपुण्या हतौजसः । तस्मादेतेऽभिहन्यन्तां भवद्भिरविशंकितैः ७७ गर्ग उवाच ॥ ततस्ते विविधै-रस्त्रैर्वध्यमानाः सुरारयः । शिरः सुलक्ष्म्याप्याक्रान्ता विनेशुरिति नः श्रुतम् ७८ लक्ष्मीश्चोत्पत्य संप्राप्ता दत्तात्रेयं महामुनिम् । स्तूयमाना सुरैः सेन्द्रैर्दैत्यनाशान्मुदान्वितैः ७९ प्रणिपत्य ततो देवा दत्तात्रेयं महामुनिम् । जय कृष्ण जगन्नाथ दैत्यान्तक हर प्रभो १८० नारायणाच्युतानन्त वासुदेवाक्षयाजर । त्वत्प्रसादात्सुखं लक्ष्मी राज्यं संपज्जनार्दन ८१ शार्ङ्गधन्वं चक्रपाणे भक्तानां नित्यवत्सल । इति स्तुत्वा नाकपृष्ठं यथापूर्वं गताः सुराः ८२ तथा त्वमपि राजेन्द्र यदिच्छसि यथेप्सितम् । प्राप्तमैश्वर्यमतुलं तूर्णमाराधयस्व तम् १८३ [ १२८२ ] इति श्रीमार्कण्डेयपुराणे दत्तात्रेयमाहात्म्यवर्णनं नाम षोडशोऽध्यायः ॥ १६ ॥

पुत्र उवाच ॥ इत्यृषेर्वचनं श्रुत्वा कार्त्तवीर्यो नरेश्वरः । दत्तात्रेयाश्रमं गत्वा तं भक्त्या समपूजयत् १ पादसंवाहनाद्येन अर्घ्याद्याहरणेन च । स्रक्चन्दनादिगन्धाम्बुफलाद्यानयनेन च २ तथान्नसाधनैस्तस्य उच्छिष्टापोहनेन च । परितुष्टो मुनिर्भूपं तमुवाच तथैव सः ३ यथै-

---

आणि मुखांवर असल्यास उत्कृष्ट अन्नें, मनोहर भाषण, सफल आज्ञा व कवित्व देते ७४ आणि मस्तकीं असल्यास ज्याच्या मस्तकीं असेल त्याचा त्याग करून दुसऱ्या स्थानीं जाते. ती ही लक्ष्मी मस्तकीं गेल्यामुळें सांप्रत दैत्यांचा त्याग करील ७५. ह्यास्तव, अस्त्रें घेऊन ह्या देवशत्रूंचा तुह्मी वध करा, भिऊं नका, मीं हे अगदीं निस्तेज केले आहेत ७६. परस्त्रीस्पर्शामुळें ह्यांचें पुण्य व तेज नष्ट झालें आहे. तस्मात्, तुह्मी निःशंकपणें ह्यांचा वध करा ७७. गर्ग ह्मणतातः—नंतर नानाप्रकारच्या अस्त्रांनीं वध होऊं लागल्यामुळें व लक्ष्मी ही मस्तकावर चढल्यामुळें दैत्य नष्ट झाल्याचें आमच्या ऐकण्यांत आहे ७८. तदनंतर दैत्यनाशामुळें इंद्रासह आनंदित झालेले देव स्तवन करीत असतांना लक्ष्मी उड्डाण करून महर्षि दत्तात्रेयाकडे आली ७९. तेव्हां देवांनीं दत्तात्रेय महर्षींना प्रणिपात केला आणि "हे प्रभो, हे दैत्यनाशक, हे हर, हे जगन्नाथ, हे कृष्ण, तुझा विजय असो १८०. हे नारायणा, तूं भक्तांवर नित्य प्रेम करणारा आहेस आणि हे जनार्दना, हे जरारहित अक्षय्य वासुदेवा, हे अच्युता, हे अनंता, हे चक्रधरा, शार्ङ्गधनुर्धरा, तुझ्या प्रसादानें सुख, लक्ष्मी, राज्य व संपत्ति प्राप्त होत असते" असें स्तवन करून देव पूर्वीप्रमाणें स्वर्गलोकीं गेले ८१, ८२. त्याचप्रमाणें हे राजेंद्रा, तुला इष्ट मनोरथ पूर्ण होऊन अतुल ऐश्वर्य प्राप्त होण्याची इच्छा असल्यास तूंही सत्वर त्याचें आराधन कर १८३ (१२८२) ह्याप्रमाणें श्रीमार्कंडेयपुराणांतील दत्तात्रेयमाहात्म्यवर्णननामक सोळावा अध्याय समाप्त झाला ॥ १६ ॥

पुत्र ह्मणतोः—हें ऋषिवचन ऐकून कार्तवीर्यराजा दत्तात्रेयमुनींच्या आश्रमांत गेला आणि त्यानें त्यांचें भक्तीनें पूजन केलें १. पाय चेपणें, अर्घ्य, माला, चंदनादि सुगंधित द्रव्यें, उदक व फळें इत्यादि आणणें २, अन्नसामग्री तयार करणें व उष्टें

योषितः पुरा देवा मद्यभोज्यादिदूषितम् । स्त्री चेयं मम पार्श्वस्थेत्येतद्भोगाद्धि कुत्सितः ४ मदे-वाहं न मामेवमुपरोद्धुं त्वमर्हसि । अशक्तमुपकाराय शक्तमाराधयस्व भोः ५ पुत्र उवाच ॥ तेनैवमुक्तो मुनिना स्मृत्वा गर्गवचश्च तत् । प्रत्युवाच प्रणम्यैनं कार्तवीर्यस्ततोऽर्जुनः ६ अर्जुन उवाच ॥ देवस्त्वं हि पुराणो यः स्वां मायां समुपाश्रितः । अनघस्त्वं तथैवेयं देवी सर्वभवारणिः ७ इत्युक्तः प्रीतिमान्देवो भूयस्तं प्रत्युवाच ह । कार्तवीर्यं महावीर्यं वशीकृतमहीतलम् ८ वरं वृणीष्व गुह्यं मे त्वया नाम यदीरितम् । तेन तुष्टिः परा जाता त्वय्यद्य मम पार्थिव ९ ये च मां पूजयिष्यन्ति गन्धमाल्यादिभिर्नराः । मांसमद्योपहारैश्च मृष्टान्नैश्चात्मसंमतैः १० लक्ष्म्या समेतं गीतैश्च ब्राह्मणानां तथार्चनैः । वाद्यैर्मनोरमैर्वीणावेणुशङ्खादिभिस्तथा ११ तेषामहं परां पुष्टिं पुत्रदारधनादिकीम् । प्रदास्याम्यवधूतश्च हनिष्याम्यवमन्यताम् १२ स त्वं वरय भद्रं मे वरं यं मनसेच्छसि । प्रसादसुमुखस्तेऽहं गुह्यनामप्रकीर्तनात् १३ कार्तवीर्य उवाच ॥ यदि देवप्रसन्नस्त्वं तत्प्रयच्छर्द्धिमुत्तमाम् । यया प्रजाः पालयेयं न चाधर्ममवाप्नुयाम् १४ परानुस्मरणं ज्ञानमप्रतिद्वन्द्वतां रणे । सहस्रमाप्तुमिच्छामि बाहूनां लघुतागुणम् १५ असंगा गतयः सन्तु शैलाकाशाम्बुभूमिषु । पातालेषु च सर्वेषु वधश्चाप्यधिकान्नरात् १६ तथा मार्गप्रवृत्तस्य सन्तु सन्मार्गदेशिकाः । सन्तु मेऽतिथयः श्लाघ्या

---

काढणें ह्यांच्यायोगानें तो मुनि संतुष्ट होऊन त्या भूपाला ह्मणाला३ ''ज्याप्रमाणें मी पूर्वी देवांना सांगितलें होतें त्याचप्रमाणें मी तुलाही सांगतों. माझें आचरण मद्यसेवनादिकांनीं निंद्य असून ही स्त्री माझ्याजवळ असते. ह्या भोगामुळें मी सर्वदा निंद्य ठरलेला आहे ४. ह्यास्तव, उपकार करण्यास समर्थ नसलेल्या मला तूं पंचायतींत पाडूं नकोस; तूं समर्थाला भज ५. पुत्र ह्मणतो:—ह्याप्रमाणें मुनीनें सांगितलें असतां तें गर्गवचन स्मरून कार्तवीर्य अर्जुन प्रणामपूर्वक त्याला ह्मणाला ६'' स्वकीय मायेचें अवलंबन करणारा तूं पुरातन देव निष्पाप आहेस व सर्व प्राण्यांची माता असलेली ही देवी तशीच आहे''७.ह्यावर देव प्रसन्न होऊन त्या जगद्विजयी व महावीर्यवान् कार्तवीर्याला ह्मणाला ८''वर माग, तूं जें माझें गुह्य उच्चारिलें आहेस त्याच्या योगानें, हे राजा, आज मी तुझ्यावर अति संतुष्ट झालों आहें ९. गंध, पुष्पादिक, मांस, मद्य, स्वतःला प्रिय असलेलीं मिष्टान्नें, गीतें, ब्राह्मणपूजनें आणि वीणा, अल्गुज, शंख इत्यादि मनोहर वाद्यें ह्यांच्यायोगानें जे नर लक्ष्मीसह माझें पूजन करितील १०, ११ त्यांना पुत्र, स्त्री, धन इत्यादिविषयक मी अवधूत परम पुष्टि देईन आणि अवमानकर्त्यांना मारीन १२. तस्मात्, तूं जो कल्याणप्रद वर तुझ्या मनांत असेल तो मागून घे. तूं माझें गुह्य नाम उच्चारिल्यामुळें मी तुजवर प्रसन्न झालों आहें १३. कार्तवीर्य ह्मणतो:—हे देवा, तूं प्रसन्न असशील तर मला उत्कृष्ट समृद्धि दे; ह्मणजे पाप न लागतां माझ्या हातून प्रजापालन होईल १४. परमात्म्याचें स्मरण, ज्ञान, संग्रामांत प्रतिपक्षराहित्य आणि लाघव ह्या गुणांनीं युक्त असे हजार बाहु प्राप्त होण्याची मला इच्छा आहे १५. पर्वत, आकाश, उदक, भूमि व सर्व पाताळें ह्यांच्या ठिकाणीं माझी गति अकुंठित असो. श्रेष्ठ मानवापा-

वित्तं वान्यत्तपाक्षयम् १७ अनष्टद्रव्यता राष्ट्रे ममाह्नस्मरणेन च । त्वयि भक्तिश्च देवास्तु नित्यमव्यभिचारिणी १८ दत्तात्रेय उवाच ॥ य एते कीर्तिताः सर्वे तान्वत्स संमवाप्स्यसि । मत्प्रसादात्प्रभविता चक्रवर्तित्वमैश्वरम् १९ पुत्र उवाच ॥ प्रणिपत्य ततस्तस्मै दत्तात्रेयाय सोऽर्जुनः । आनीय प्रकृतीः सम्यगभिषेकमगृह्णत २० आगताश्चापि गन्धर्वास्तथैवाप्सरसां गणाः । ऋषयश्च वसिष्ठाद्या मेर्वाद्याः पर्वतास्तथा २१ गंगाद्याः सरितः सर्वाः समुद्रा रत्नसंभवाः । प्लक्षाद्याश्च तथा वृक्षा देवा वै वासवादयः २२ वासुकिप्रमुखा नागा अभिषेकार्थमागताः । तार्क्ष्याद्याः पक्षिणश्चैव पौरा जानपदास्तदा २३ संभाराः संभृताः सर्वे दत्तात्रेयप्रसादतः । अथ संज्वाल्य तैर्वह्निं देवैर्ब्रह्मादिभिः सह २४ नारायणेनाभिषिक्तो दत्तात्रेयस्वरूपिणा । समुद्रैश्च नदीभिश्च ऋषिभिश्चाभिषेचितः २५ आघोषयामास तदा स्थितो राज्ये स हैहयः । दत्तात्रेयात्परामृद्धिमवाप्यातिबलान्वितः २६ अद्यप्रभृति यः शस्त्रं मामृतेऽन्यो ग्रहीष्यति । हन्तव्यः स मया दस्युः परहिंसारतोऽपि वा २७ इत्याज्ञप्ते तद्राज्ये कश्चिदायुधभृन्नरः । तमृते पुरुषव्याघ्रं बभूवोरुपराक्रमम् २८ स एव ग्रामपालोऽभूत्पशुपालः स एव च । क्षेत्रपालः स एवासीद्द्वितीयो न च रक्षिता २९ तपस्विनां पालयिता सार्थपालश्च सोऽभवत् । दस्युव्यालाग्निशस्त्रारिभयेष्वन्यां निमज्जताम् ३० अन्यासु चैवमग्नानामापत्सु परवीरहा ।

---

सून माझा वध होवो १६. मार्गानें वागणाऱ्या मला सन्मार्ग दर्शविणारे मिळोत; श्लाघ्य अतिथि मला मिळोत; माझें द्रव्य अक्षय्य असो १७; राष्ट्रामध्यें माझ्या स्मरणानें कोणतीही वस्तु नष्ट न होवो आणि, हे देवा, तुझे ठिकाणीं माझी भक्ति सर्वदा अचल असो १८. दत्तात्रेय ह्मणतातः— हे वत्सा, तूं निर्दिष्ट केलेले हे सर्व गुण तुला प्राप्त होतील आणि माझ्या प्रसादानें सार्वभौम ऐश्वर्य तुला प्राप्त होईल १९. पुत्र ह्मणतोः— तदनंतर त्या अर्जुनानें त्या दत्तात्रेयाला प्रणाम करून व प्रजाजनांना बोलावून अभिषेकाचा यथाविधि स्वीकार केला २०. गंधर्व, अप्सरांचे समुदाय, वसिष्ठादि ऋषि, मेरुप्रभृति पर्वत २१, गंगादि सर्व नद्या, रत्नखनिरूप समुद्र, प्लक्षादि वृक्ष, इंद्रादि देव २२, वासुकिप्रभृति नाग, गरुडादि पक्षी आणि नगरांतील व देशांतील लोक अभिषेकाकरितां आले होते २३; व दत्तात्रेयाच्या प्रसादानें सर्व सामग्री जुळली होती. नंतर अग्नि प्रज्वलन करून ब्रह्मादि देवांसह २४ दत्तात्रेयस्वरूप नारायणानें व ऋषींनीं समुद्र व नद्या ह्यांच्या उदकानें त्याला अभिषेक केला २५. तदनंतर राज्यारूढ झाल्यावर दत्तात्रेयाच्या कृपेमुळें त्या अतिबलाढ्य राजाला पराकोटीचें तेज प्राप्त झालें; आणि " आजपासून माझ्याशिवाय जो शस्त्र घेईल त्या चोराचा व दुसऱ्याला दुःख देणाऱ्याचा मी वध करीन " अशी त्यानें दवंडी दिली २६, २७. अशी आज्ञा झाल्यापासून त्याच्या राज्यांत त्या पुरुषश्रेष्ठ महापराक्रमी राजाशिवाय कोणीही शस्त्रधर पुरुष राहिला नाहीं २८. गांवांचें, पशूंचें व शेतांचें रक्षण त्याच्याशिवाय कोणीही करीत नसे २९. तपस्वी व व्यापारी ह्यांचा रक्षक तोच असून चोर, सर्प, अग्नि, शस्त्र व शत्रु ह्यांच्या भयापासून प्रजेचें रक्षण करणारा तोच

स एव संस्मृतः सद्यः समुद्धर्ताऽभवन्नृणाम् २१ अनष्टद्रव्यता चासीत्तस्मिञ्छासति पार्थिवे। तेनेष्टं क्रतुभिर्यज्ञैः समाप्तवरदक्षिणैः २२ तपश्च तप्तं सुमहत्संग्रामे चातिचेष्टितम्। तस्यर्द्धिमहिमानं च दृष्ट्वा प्राहाङ्गिरा मुनिः २३ न नूनं कार्तवीर्यस्य गतिं यास्यन्ति पार्थिवाः। यज्ञैर्दानैस्तपोभिर्वा संग्रामे चातिचेष्टितैः २४ दत्तात्रेयाद्दिने यस्मिन्संप्राप्तर्द्धिर्नरेश्वरः। तस्मिंस्तस्मिन्दिने यागं दत्तात्रेयस्य सोऽकरोत् २५ तथैव च प्रजाः सर्वास्तस्मिन्नहनि भूपतेः। तस्यर्द्धिं परमां दृष्ट्वा यागं चक्रुः समाधिना २६ इत्येतत्तस्य माहात्म्यं दत्तात्रेयस्य धीमतः। विष्णोश्चराचरगुरोरनन्तस्य महात्मनः २७ प्रादुर्भावाः पुराणेषु कथ्यन्ते शार्ङ्गधन्वनः। अनन्तस्याप्रमेयस्य शंखचक्रगदाभृतः २८ एतस्य परमं रूपं यश्चिन्तयति मानवः। स सुखी स च संसारात्समुत्तीर्णोऽचिराद्भवेत् २९ सदैव वैष्णवानां च भक्त्याहं सुलभोऽस्मि भोः। पत्रपुष्पफलैर्नाहं पूजितो मोक्षदोऽस्मि वै ४० इत्येवं यस्य वै वाचस्तं कथं नाश्रयेज्जनः। अधर्मस्य विनाशार्थं धर्माधारार्थमेव च ४१ अनादिनिधनो देवः करोति स्थितिपालनम्। तथैव जन्म चाख्यास्ये ह्यालर्कं कथयामि ते ४२ यथा च योगः कथितो दत्तात्रेयेण तस्य वै। पितृभक्तस्य राजर्षेरलर्कस्य महात्मनः ४३ [१२२६] इति श्रीमार्कण्डेयपुराणे दत्तात्रेयोपाख्यानं नाम सप्तदशोऽध्यायः॥ १७ ॥

असे. समुद्रांत बुडणाऱ्या २० व इतरही विपत्तींत सांपडणाऱ्या लोकांचा उद्धार तोच शत्रुपक्षीयवीरनाशक राजा स्मरण होतांक्षणीं करीत असे २१. त्या राजाचे कारकीर्दीत वस्तु हरवत नसे. त्यानें विपुल गाई दक्षिणार्थ देऊन अनेक यज्ञ केले २२ आणि संग्रामांत अतिशय पराक्रम गाजवून मोठें तपही केलें. त्याचें मोठें ऐश्वर्य पाहून अंगिरामुनि ह्मणाले २३ "खरोखर राजांना यज्ञ, दान, तप व संग्रामांतील पराक्रम ह्यांपैकीं कोणत्याही बाबतींत कार्तवीर्याची बरोबरी करितां येणार नाहीं २४. ज्या ज्या दिवशीं दत्तात्रेयापासून त्याला ऐश्वर्य प्राप्त झालें होतें त्या त्या दिवशीं तो दत्तात्रेयाला उद्देशून याग करीत असे २५. त्याचप्रमाणें हे राजा, त्याचें उत्कृष्ट ऐश्वर्य पाहून प्रजाजन त्या दिवशीं मनापासून याग करीत असत २६. महात्मा चराचर गुरु जो अनंत विष्णु तोच ज्ञानवान् दत्तात्रेय असून त्याचें माहात्म्य हें होय २७. शार्ङ्गधनुष्य धारण करणाऱ्या अतर्क्य, अनंत आणि शंख, चक्र व गदा धारण करणाऱ्या विष्णूचा हा अवतार पुराणांमध्यें सांगितलेला आहे २८. जो मानव ह्याच्या उत्कृष्ट रूपाचें ध्यान करील तो लवकरच संसारसागरांतून तरून सुखी होईल २९. "भक्तीच्या योगानें मी विष्णुभक्तांना सर्वदांच सुलभ आहें आणि पत्र, पुष्प व फल ह्यांनीं पूजन झालें असतां मी मोक्ष देणारा आहें" ४०. असें ज्याचें वचन आहे त्याचा आश्रय लोक कां करणार नाहींत ? अधर्माच्या नाशाकरितां व धर्माच्या रक्षणाकरितां ४१ अनादि व अनंत असलेला हा देव अवतीर्ण होत असून आचाराचें परिपालन करीत असतो. आतां मी तुला अलर्क कथन करितों ४२; आणि महात्म्या पितृभक्त अलर्क राजर्षीला दत्तात्रेयानें योग कसा कथन केला हेंही

पुत्र उवाच ॥ प्राग्बभूव महावीर्यः शत्रुजिन्नाम पार्थिवः । तुतोष यस्य यज्ञेषु सोमावाप्त्या पुरन्दरः १ तस्यात्मजो महावीर्यो बभूवारिविदारणः । नाम्ना ऋतध्वजः ख्यातः सर्वलक्षणसंयुतः २ बुद्धिविक्रमलावण्यैर्गुरुशक्राश्विनां समः । स समानवयोबुद्धिसत्त्वविक्रमचेष्टितैः ३ नृपपुत्रो नृपसुतैर्नित्यमास्ते समावृतः । कदाचिच्छास्त्रसद्भावविवेककृतनिश्चयः ४ कदाचित्काव्यसंलापगीतनाटकसंभवैः । तथैवाक्षविनोदैश्च शस्त्रास्त्रविनयेषु च ५ योग्यो नियुद्धनागाश्वस्यन्दनाभ्यासतत्परः । रेमे नृपेन्द्रपुत्रोऽसौ नरेन्द्रतनयैर्वृतैः ६ यथैव हि दिवा तद्वद्रात्रावपि मुदा युतः । तेषां तु क्रीडतां तत्र द्विजभूपविशां सुताः ७ समानवयसः प्रीत्या रन्तुमायान्त्यनेकशः । कस्यचित्त्वथ कालस्य नागलोकान्महीतलम् ८ कुमारावागतौ नागौ पुत्रावश्वतरस्य तु । ब्रह्मरूपप्रतिच्छन्नौ तरुणौ प्रियदर्शनौ ९ तौ तैर्नृपसुतैः सार्धं तथैवान्यैर्द्विजात्मजैः । विनोदैर्विविधैस्तत्र तस्थतुः प्रीतिसंयुतौ १० सर्वे च ते नृपसुतास्ते च ब्रह्मविशां सुताः । नागराजात्मजौ तौ च स्नानसंवाहनादिकाम् ११ वस्त्रगन्धान्नसंयुक्तां चक्रुर्भोगभुजिक्रियाम् १२ अहन्यहन्यनुप्राप्तौ तौ च नागकुमारकौ । आजग्मतुर्मुदा युक्तौ प्रीत्या सूनोर्महीपतेः १३ स च ताभ्यां नृपसुतः परं निर्वाणमाप्तवान् । विनोदैर्विविधैर्हास्यसंलापादिभिरेव च १४ विना

---

सांगतों ४३. (१३२९) ह्याप्रमाणें श्रीमार्कंडेयपुराणांतील दत्तात्रेयोपाख्याननामक सतरावा अध्याय समाप्त झाला ॥ १७ ॥

पुत्र ह्मणतो:—पूर्वी शत्रुजित् ह्मणून एक महावीर्यवान् राजा होता व त्याच्या यज्ञांत सोमपानानें इंद्र संतुष्ट झाला होता १. ऋतध्वज ह्मणून एक सर्व लक्षणसंपन्न, महावीर्यवान् व शत्रुघातक पुत्र त्याला होता २; व तो बुद्धि, पराक्रम आणि सौंदर्य ह्यांनीं अनुक्रमें गुरु, शुक्र व अश्विनीकुमार ह्यांची बरोबरी करणारा होता. वय, बुद्धि, धैर्य, पराक्रम व उद्योग ह्यांनीं समान असलेल्या राजकुमारांसह तो राजपुत्र सर्वदा असे. कधीं कधीं शास्त्रजन्यविवेकानें तो निर्णय करीत असे ३, ४; कधीं कधीं काव्य, गीत, नाटक, अक्षद्यूत व विनोद ह्यांच्या योगानें तो आपला काळ घालवीत असे; कधीं कधीं शस्त्रास्त्रशिक्षणांत तो दंग होत असे ५; आणि कधीं कधीं युद्ध, गजारोहण, अश्वारोहण व रथारोहण ह्यांच्या अभ्यासाविषयीं तो राजपुत्र इतरराजकुमारांसह रममाण होत असे ६. दिवसां व रात्रीं तो आनंदांत खेळत असे व त्यांचा खेळ चालला असतांना ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य ह्यांचीं समानवयस्क अनेक मुलें प्रेमानें खेळण्यास येत असत ७. एकदां अश्वतर नागाचे पुत्र नागलोकांतून भूतलावर विप्ररूपानें आले. ते तरुण असून सुंदर होते ८, ९. राजपुत्र व इतरही द्विजपुत्र ह्यांसह ते नानाप्रकारचे विनोद करून प्रेमानें तेथें राहिले १०. ते सर्व राजपुत्र, ब्राह्मण व वैश्य ह्यांचे पुत्र आणि ते नागराजाचे पुत्र स्नान, संवाहन, वस्त्रपरिधान, गंधसेवन आणि अन्नसेवन बरोबर करूं लागले. ते नागकुमार प्रत्यहीं त्या राजकुमाराच्या प्रेमाकरितां तेथें आनंदानें येत असत व तो राजपुत्र त्यांच्यासह अत्यंत सुखी होत असे ११, १२, १३. नानाप्रकारचे विनोद, हास्य, संभाषण इत्यादिकांच्या योगानें सुखी

ताभ्यां न बुभुजे न सस्नौ न पपौ मधु। न रेमे च न जग्राह शास्त्राण्यात्मगुणर्द्धये १५ रसातले च तौ रात्रिं विना तेन महात्मना। निःश्वासपरमौ नीत्वा जग्मतुस्तं दिने दिने १६ मर्त्यलोके परा प्रीतिर्भवतोः केन पुत्रकौ। सदेति च प्रलपितौ तावुभौ नागदारकौ १७ दृष्टयोरत्र पाताले बहूनि दिवसानि मे। दिवा रजन्यामेवोभौ पश्यामि प्रियदर्शनौ १८ जड उवाच॥ इति पित्रा स्वयं पृष्टौ प्रणिपत्य कृताञ्जली। प्रत्यूचतुर्महाभागावुरगाधिपतेः सुतौ १९ पुत्रावूचतुः॥ पुत्रः शत्रुजितस्तात नाम्ना ख्यात ऋतध्वजः। रूपवानार्जवोपेतः शूरो मानी प्रियंवदः २० अनाहूतकथो वाग्मी विद्वान्मैत्रो गुणाकरः। मान्यमानयिता धीमान्ह्रीमान्विनयभूषणः २१ तस्योपचारसंप्रीतिसंभोगापहृतं मनः। नागलोकेऽन्यलोके वा न रतिं विन्दते पितः २२ तद्वियोगेन नौ तात निशा पातालशीतला। परितापाय तत्संगश्चाह्लादाय रविर्दिवा २३ पितोवाच॥ पुत्रः पुण्यवतो धन्यः स यस्यैवं भवद्विधैः। परोक्षस्यापि गुणिभिः क्रियते गुणकीर्तनम् २४ सन्ति शास्त्रविदोऽशीलाः सन्ति मूर्खाः सुशीलिनः। शास्त्रशीले समं मन्ये यस्मिन्धन्यतरं तु तम् २५ यस्य मित्रगुणान्मित्राण्यमित्राश्च पराक्रमम्। कथयन्ति सदा सत्सु पुत्रवांस्तेन वै पिता २६ तस्योपकारिणः कच्चिद्भवद्भ्यामभिवाञ्छितम्। किंचिन्निष्पादितं वत्सौ

---

होत असलेला तो राजकुमार भोजन, स्नान, पान क्रीडा व आपल्या अंगचे गुण वृद्धिंगत होण्याकरितां त्याच्याशिवाय शास्त्रग्रहणही करीत नसे. त्या महात्म्याचा वियोग होत असल्यामुळें रसातळांत ते रात्र १४, १५ मोठ्या दुःखानें काढून प्रत्यहीं त्याच्याकडे जात असत. एकदां त्यांना बापानें " मर्त्यलोकीं तुमचें अति प्रेम कां ? तुह्मांला पाताळांत दिवसां पाहून मला फार दिवस झाले. तुह्मी रात्रीं मात्र माझ्यां दृष्टीं पडता " असें विचारिलें असतां ते नागराजाचे पुत्र प्रणिपात करून व हात जोडून त्याला ह्मणाले " हे तात, ऋतध्वज ह्मणून एक शत्रुजिताचा पुत्र आहे १६, १७, १८ १९. तो रूपवान्, सरळ, शूर, अभिमानी, प्रिय भाषण करणारा, मनाचा मोकळा, वक्ता, विद्वान्, मैत्र, गुणांची खाण २०, मान्यांना मान देणारा, बुद्धिमान्, विनयी व निंद्यकर्माची लाज वाळगणारा आहे. त्याच्या वर्तनानें व प्रेमानें आमचें मन आकृष्ट झाल्यामुळें २१, हे तात, नागलोकीं अथवा इतर लोकीं आह्मांला चैन पडत नाहीं. हे तात, पाताळांतील थंड रात्र त्याच्या वियोगामुळें २२ आमच्या संतापाला व त्याच्या समागमामुळें दिवसां सूर्य आमच्या आनंदाला कारण होत असतो ". पिता ह्मणतोः— तुह्मांसारखे गुणी लोक ज्याची मागें अशी स्तुति करीत आहेत तो ज्या पुण्यवानाचा पुत्र असेल तो धन्य होय. शास्त्रवेत्ते दुराचरणी आणि मूर्ख लोक सुशील असा प्रकार कोठें कोठें दृष्टीं पडतो २३, २४; परंतु, शास्त्र व शील हीं दोन्हीं ज्याच्या ठिकाणीं आहेत त्याला मी अधिक धन्य समजत आहें. ज्याच्या गुणांचें व पराक्रमाचें वर्णन सज्जनांमध्यें मित्र व शत्रु सर्वदां करीत असतात त्याच्याच योगानें पिता खरा खरा पुत्रवान् होय. पुत्रहो, त्याच्या मनाला संतोष होण्याकरितां तुमच्या हातून त्या उपकार करणाऱ्याचा कांहीं मनोरथ शेवटास गेला आहे काय ? ज्याच्यापासून

परितोषाय चेतसः २७ स धन्यो जीवितं तस्य तस्य जन्मसु जन्मनः । यस्यार्थिनो न विमुखा मित्रार्थे न च दुर्बलः २८ मद्गृहे यत्सुवर्णादि रत्नं वाहनमासनम् । यद्वान्यत्प्रीतये तस्य तद्देयमविशंकया २९ धिक्तस्य जीवितं पुंसो मित्राणामपकारिणः । प्रतिरूपमकुर्वन्यो जीवामीत्यवगच्छति ३० उपकारं सुहृद्वर्गेष्वपकारं च शत्रुषु । नृमेघो वर्षति प्राज्ञास्तस्येच्छन्ति सदोन्नतिम् ३१ पुत्रावूचतुः॥ किं तस्य कृत कृत्यस्य कर्तुं शक्येत केनचित् । यस्य सर्वार्थिनो गेहे सर्वकामैः सदार्चिताः ३२ यानि रत्नानि सद्गेहे पाताले तानि नः कुतः । वाहनासनयानानि भूषणान्यम्बराणि च ३३ विज्ञानं यच्च तत्रास्ति तदन्यत्र न विद्यते । प्राज्ञानामप्यसौ तात सर्वसंदेहहृत्तमः ३४ एकं तस्यास्ति कर्तव्यमसाध्यं तच्च नो मतम् । हिरण्यगर्भगोविन्दशर्वादीनां वरादृते ३५ पितोवाच ॥ तथापि श्रोतुमिच्छामि तस्य यत्कार्यमुत्तमम् । असाध्यमथवा साध्यं किं चासाध्यं विपश्चिताम् ३६ देवत्वममरेशत्वं तत्पूज्यत्वं च मानवाः । प्रयान्ति वाञ्छितं चान्यदृढं ये व्यवसायिनः ३७ नाविज्ञातं न चागम्यं नाप्राप्यं दिवि चेह वा । उद्यतानां मनुष्याणां यतचित्तेन्द्रियात्मनाम् ३८ योजनानां सहस्राणि याति गच्छन्पिपीलिका । अगच्छन्वैनतेयोपि पदमेकं न गच्छति ३९ क्व भूतलं क्व च ध्रौव्यं स्थानं यत्प्राप्तवान्ध्रुवः॥ उत्तानपादनृपतेः पुत्रः सन्भूमिगोचरः

---

याचक विमुख जात नाहींत व मित्रांकरितां जो कधींही खिन्न होत नाहीं तो धन्य असून त्याचेंच जीवित व जन्म सफल होय. माझ्या घरांत जें सुवर्ण, रत्न, वाहन, आसन २५, २६, २७, २८ अथवा इतर कांहीं त्याला आवडणारें असेल तें तुंही त्याला खुशाल द्या. मित्रांना अपकार करणाऱ्या आणि त्यांच्यावर प्रत्युपकार न करितां स्वतःला जिवंत मानणाऱ्या पुरुषाच्या जीविताला धिक्कार असो. मित्रवर्गावर उपकाराची आणि शत्रूंवर अपकाराची वृष्टि जो नररूप मेघ करीत असतो त्याची उन्नत्ति प्राज्ञजन सर्वदा इच्छित असतात. पुत्र ह्मणतातः—त्या कृतकृत्य पुरुषाचें कोणाच्या हातून कायवरें होणें शक्य आहे? २९, ३०, ३१. ज्याच्या घरीं सर्व याचकांच्या सर्व इच्छा सर्वदा पूर्ण होत असतात त्याच्या घरांत जीं रत्नें आहेत तीं पातालांत असणार कोठून? ३२. वाहनें, आसनें, यानें, भूषणें, वस्त्रें व ज्ञान जें तेथें आहे तें इतर ठिकाणीं नाहीं ३३. हे तात, तो ज्ञानवानांचा सर्व संशय नाहींसा करणारा आहे. त्याच्यासंबंधानें एक कर्तव्य आहे; परंतु, तें ब्रह्मविष्णुमहेश्वरांच्या कृपेशिवाय असाध्य आहे असें आह्मांला वाटतें ३४, ३५. पिता ह्मणतोः—तथापि त्याचें उत्कृष्ट कार्य ऐकण्याची माझी इच्छा आहे मग तें साध्य असो किंवा असाध्य असो. विद्वानाला असाध्य काय आहे? देवत्व, देवाधिपतित्व, देवपूज्यत्व व इतरही मनोरथ दीर्घोद्योगी मानव पूर्णकरीत असतात ३६, ३७. मनोनिग्रही, जितेंद्रिय व उद्योगी मनुष्यांना जाणण्यास, जाण्यास अथवा मिळण्यास, येथें अथवा स्वर्गांत कांहींएक अशक्य नाहीं ३८. मुंगी चालत राहिल्यास हजारों योजनें जाते; परंतु, स्वस्थ बसणारा गरुड एक पाऊलही पुढें जात नाहीं ३९. भूतळ कोठें व ध्रुवाचें स्थान कोठें? परंतु, उत्तानपाद राजाच्या

४० तस्य कथ्यतां महाभागौ कार्यमन्येन पुत्रकौ । स भूपालसुतः साधुर्येनानृण्यं लभेत वाम् ४१ पुत्रावूचतुः ॥ तेनाख्यातमिदं तात पूर्ववृत्तं महात्मना । कौमारके यथा तस्य वृत्तं सङ्गतयोर्द्वयोः ४२ तस्य शत्रुजितं तातं पूर्वं कश्चिद्द्विजोत्तमः । गालवोऽभ्यागमद्धीमान्गृहीत्वा तुरगोत्तमम् ४३ प्रत्युवाच च राजानं समुपेत्याश्रमं मम । कोऽपि दैत्याधमो राजन्विध्वंसयति पापकृत् ४४ तत्तद्रूपं समास्थाय सिंहेभवनचारिणाम् । अन्येषां चातिकायानामनिशमकारणात् ४५ समाधिध्यानयुक्तस्य मौनव्रतरतस्य च । तथा करोति विघ्नानि तथा नेच्छामि पार्थिव ४६ दग्धुं कोपाग्निना सद्यः समर्थोऽस्मि वयं न तु । दुःखार्जितस्य तपसो व्ययमिच्छामि पार्थिव ४७ एकदा तु मया राजन्नतिनिर्विण्णचेतसा । तस्मिन्विचिन्तितेन निःश्वासो निरीक्ष्याप्यम्बरादुज्झितः ४८ ततोऽम्बरतलात्सद्यः पतितोऽयं तुरङ्गमः । वाक्चाशरीरिणी प्राह नरनाथ शृणुष्व तत् ४९ अश्रान्तः सकलं भूमेर्वलयं तुरगोत्तमः । समर्थः क्रान्तुमर्केण तवार्थं प्रतिपादितः ५० पातालाम्बरतोयेषु नास्य प्रतिहता गतिः । समस्तदिक्षु व्रजतो न सक्तः पर्वतेषु च ५१ यतो भूवलयं सर्वमश्रान्तोऽयं चरिष्यति । ततः कुवलयो नाम्ना ख्यातिं लोके यास्यति ५२ क्लिश्नात्यहर्निशं पापो यश्च त्वां दानवाधमः । तमश्वेनं समारुह्य द्विजश्रेष्ठ हनिष्यति ५३ शत्रुजिन्नाम भूपालस्तस्य पुत्र ऋतध्वजः । प्राप्यैतं रत्नमश्वं च ख्यातिमेतेन यास्यति

भूमीवरील ध्रुव पुत्राला तें स्थान प्राप्त झालें ४०. ह्यास्तव, हे महाभाग्यवान् पुत्रहो, त्या सज्जन राजपुत्राला काय हवें आहे तें सांगा. ह्मणजे तुह्मी त्याच्या ऋणांतून मुक्त व्हाल ४१. पुत्र ह्मणतातः— लहानपणीं घडलेली स्वतःची हकीकत, हे तात, त्या महात्म्या सज्जनानेंही आह्मांला कथन केली आहे ४२. त्याच्या शत्रुजित् पित्याकडे पूर्वी कोणी गालव ह्मणून बुद्धिमान् ब्राह्मण एक उत्कृष्ट अश्व घेऊन आला ४३ आणि त्याला ह्मणाला " हे राजा, कोणी अधम व पापी दैत्य समीप येऊन आणि सिंह, गज, वनेचर व इतरही अति प्रचंड प्राणी ह्यांचें रूप धारण करून विनाकारण रात्रंदिवस माझ्या आश्रमाचा विध्वंस करीत असतो ४४, ४५. समाधि, ध्यान व मौन व्रत ह्यां-विषयीं मी तत्पर असतांना, हे राजा, अनिष्ट विघ्नें तो मला करीत असतो ४६. क्रोधा-ग्नीनें त्याला सत्वर दग्ध करण्यास आह्मी समर्थ आहों; परंतु, हे राजा, कष्टानें संपा-दन केलेलें तप खर्ची घालण्याची माझी इच्छा नाहीं ४७. हे राजा, एकदां त्यानें क्लेश दिल्यामुळे मी अति खिन्न झालों व आकाशाकडे पाहून सुस्कारा टाकिला ४८; तों आकाशांतून हा घोडा पडला आणि आकाशवाणी झाली. ती, हे राजा, तूं श्रवण कर ४९. हा अश्व न श्रमतां सर्व भूमंडल चालून जाण्यास समर्थ आहे व सूर्यानें हा तुला दिला आहे ५०. पाताल, आकाश व उदक ह्यांमध्यें ह्याची गति अकुंठित आहे; चाल-तांना कोणत्याही दिशेस अथवा पर्वतांवर हा कुंठित होत नाहीं ५१. ज्याअर्थी हा न श्रमतां सर्व भूमंडळ चालेल त्याअर्थी कुवलय ह्मणून हा लोकांत प्रसिद्ध होईल ५२. हे द्विजश्रेष्ठ, जो अधम व पापी दानव तुला रात्रंदिवस क्लेश देत आहे त्याचाही वध तूं ह्याच्यावर आरूढ होऊन करशील ५३. शत्रुजित् ह्मणून एक राजा आहे व त्यात-

पत्र सोऽहं त्वामनुसंप्राप्तस्तपसो विघ्नकारिणम् । तं निवारय भूपाल नागमाद्‍नृपतिर्यतः १५ तदेतदश्वरत्नं ते मया भूप निवेदितम् । पुत्रमाज्ञापय तथा यथा धर्मो न हन्यते १६ स तस्य वचनाद्राजा तं वै पुत्रमृतध्वजम् । तदश्वरत्नमारोप्य कृतकौतुकमंगलम् १७ अप्रैषयत धर्मात्मा गालवेन समं तदा । स्वमाश्रमपदं सोऽपि तमादाय ययौ मुनिः १८ [१३८३] इति श्रीमार्कण्डेयपुराणे पितापुत्रसंवादे मदालसोपाख्याने कुवलयाश्वीयेऽष्टादशोऽध्यायः ॥ १८ ॥

पितोवाच ॥ गालवेन समं गत्वा नृपपुत्रेण तेन यत् । कृतं तत्कथ्यतां पुत्रौ विचित्रावुभयोधिया १ पुत्रावूचतुः ॥ स गालवाश्रमे रम्ये तिष्ठन्नृपतिनन्दनः । सर्वविघ्नोपशमनं चकार ब्रह्मवादिनाम् २ वीरं कुवलयाश्वं तं वसन्तं गालवाश्रमे । मदावलेपोपहतो नाज्ञासीद्दानवाधमः ३ ततस्तं गालवं विप्रं सन्ध्योपासनतत्परम् । सौकरं रूपमास्थाय प्रधर्षयितुमागमत् ४ मुनिशिष्यैरथोत्कृष्टे शीघ्रमारुह्य तं हयम् । अन्वधावद्वराहं तं नृपसूनुः शरासनी ५ आजघान च बाणेन चन्द्रार्धाकारवर्चसा । आकृष्य बलवच्चापं चारुचित्रोपशोभितम् ६ बाणाभिहतः शीघ्रमात्मत्राणपरो मृगः । गिरिपादपसंबाधां सोऽत्कामन्महाटवीम् ७ तमन्वधावद्वेगेन तुरगोऽसौ मनोजवः । चोदितो राजपुत्रेण पितुरादेशकारिणा ८ अतिक्रम्याथ

ध्वज ह्मणून त्याचा एक पुत्र आहे. हें अश्व रत्न मिळाल्यानें त्याची प्रसिद्धि होईल १४. सारांश, तो मी तुझ्याकडे आलों आहें. ह्मणून, हे भूपाला, त्या तपोविघ्नकारक दानवाचें निवारण कर. कारण, राजा आमच्या तपाचा विभागी आहे १५. हे राजा, हें अश्वरत्न मीं तुला दिलें आहे. आतां पुत्राला आज्ञा कर; ह्मणजे धर्मलोप होणार नाहीं" १६. त्याच्या वचनावरून त्या राजानें त्या ऋतध्वज पुत्राला त्या उत्कृष्ट अश्वावर मंगल करून बसविलें १७ आणि त्या धर्मात्म्यानें गालवासह त्याला पाठविलें. तेव्हां मुनिही त्याला घेऊन आपल्या आश्रमांत गेला १८. ( १३८३ ) ह्याप्रमाणें श्रीमार्कंडेयपुराणांतर्गत पितापुत्रसंवादांतील मदालसोपाख्यानसंबंधीं कुवलयाश्वाविषयीं अठरावा अध्याय समाप्त झाला ॥ १८ ॥

पिता ह्मणतो:— हे पुत्रहो, गालवाबरोबर जाऊन विचित्र आयुधांनीं युद्ध करणाऱ्या त्या राजपुत्रानें काय केलें हें सांगा १. पुत्र ह्मणतात:— तो वीर राजपुत्र रम्य गालवाश्रमांत राहून ब्रह्मवेत्त्यांचीं सर्व विघ्नें दूर करूं लागला; परंतु, गालवाश्रमांत राहणाऱ्या त्या कुवलयाश्वाविषयीं तो मत्त दानवाधम बेफिकीर असे २,३. एकदां तो विप्र गालव संध्या करीत असतांना सूकराचें रूप घेऊन दानव त्याला त्रास देण्याकरितां आला ४. तेव्हां मुनिशिष्यांनीं आक्रोश केला असतां तो धनुर्धर राजपुत्र त्या अश्वावर आरूढ होऊन त्या सूकराच्या मागें लागला ५ आणि सुंदर चित्रांनीं सुशोभित केलेलें प्रचंड धनुष्य ओढून अर्धचंद्र बाणानें त्याला त्यानें प्रहार केला ६. बाणप्रहार होतांक्षणीं स्वसंरक्षणाविषयीं तत्पर असलेला तो पशु पर्वत व वृक्ष ह्यांनीं गजबजलेल्या मोठ्या अरण्यांत शिरला ७. त्याच्या मागोमाग पित्याच्या आज्ञेप्रमाणें वागणाऱ्या राजपुत्रानें इशारा केलेला तो मनोवेगवान् अश्वही वेगानें धांवला ८. कालें

वेगेन योजनानि सहस्रशः। धरण्यां विवृते गर्ते निपपात लघुक्रमः ९ तस्यानन्तरमेवाथ स चाश्वी नृपतेः सुतः। निपपात महागर्ते तिमिरौघसमावृते १० ततो नादृश्यत मृगः स तस्मिन्राजसूनुना। प्रकाशं च स पातालमपश्यत्तत्र पार्थिवः ११ ततोऽपश्यत्स सौवर्णं प्रासादशतसंकुलम्। पुरन्दरपुरप्रख्यं पुरं प्राकारशोभितम् १२ तत्प्रविश्य स नापश्यत्तत्र कंचिन्नरं पुरे। भ्रमता च ततो दृष्टा तत्र योषिद्वरान्विता १३ सा पृष्टा तेन तन्वंगी प्रस्थिता क्वेति कस्य वा। नोवाच किंचित्प्रासादमारुरोह च भामिनी १४ सोऽप्यश्वमेकतो बद्ध्वा तामेवानुससार वै। विस्मयोत्फुल्लनयनो निःशंको नृपतेः सुतः १५ ततोऽपश्यत्सुविस्तीर्णे पर्यंके सर्वकाञ्चने। निषण्णां कन्यकामेकां कामयुक्तां रतिं यथा १६ विस्पष्टेन्दुमुखीं सुभ्रूं पीनश्रोणिपयोधराम्। बिम्बाधरौष्ठीं तन्वंगीं नीलोत्पलविलोचनाम् १७ रक्ततुंगनखां श्यामां मृदुताम्रकरांघ्रिकाम्। करभोरुं सुदशनां नीलसूक्ष्मस्थिरालकाम् १८ तां दृष्ट्वा चारुसर्वांगीमनंगांगलतामिव। सोऽमन्यत्पार्थिवसुतस्तां रसातलदेवताम् १९ सा च दृष्ट्वैव तं बाला नीलकुञ्चितमूर्धजम्। पीनोरःस्कन्धबाहुं तममंस्त मदनं शुभा २० उत्तस्थौ च शुभाचारा चित्तक्षोभमवाप सा। लज्जाविस्मयदैन्यानां सद्यस्तन्वी वशं गता २१ कोऽयं देवोथ यक्षो नु गन्धर्वो वोरगोपि वा। विद्याधरो वा संप्राप्तः कृतपुण्यापतिर्नरः २२

हजारों योजनें गेल्यानंतर गति कमी झालेला तो सूकर भूमींतील एका उघड्या खड्यांत पडला असतां ९ तो अश्वारूढ राजपुत्रही अंधकारानें व्याप्त झालेल्या त्या मोठ्या खड्यांत त्याच्या मागोमाग पडला १०. तेव्हां तेथें तो पशु दिसेनासा होऊन प्रकाशयुक्त पाताल त्याला दिसलें ११. तेथें शेंकडों इमारतींनीं भरलेलें व प्राकारांनीं सुशोभित झालेलें एक अमरावतीप्रमाणें सुवर्णाचें नगर त्याच्या दृष्टीं पडलें १२. त्या नगरांत शिरल्यावर कोणीही पुरुष दृष्टीं न पडतां हिंडतां हिंडतां लगबगीत असलेली एक स्त्री त्याच्या दृष्टीं पडली १३. त्यानें "तूं कोणाची व कोठें जात आहेस?" असें विचारिलें असतां कांहींएक न बोलतां ती स्त्री वाड्यामध्यें गेली १४. तेव्हां तोही राजपुत्र घोडा एकीकडे बांधून विस्मयचकित झाला आणि निःशंकपणें तिच्या मागोमाग गेला १५. तेव्हां सुवर्णमय विस्तीर्ण मंचकावर मदनयुक्त रतीप्रमाणें असलेली एक कन्या त्यानें पाहिली १६. तिचें मुख निर्मल चंद्राप्रमाणें असून भिवया उत्कृष्ट होत्या, श्रोणी व स्तन पुष्ट होते, अधरोष्ठ पिकलेल्या तोंडल्याप्रमाणें लाल होता, डोळे नील कमलाप्रमाणें होते, त्या कृशोदरीचीं १७ नखें लाल व उन्नत होतीं, वर्ण श्याम असून हातापायांचे तळवे मृदु व लाल होते, मांड्या हत्तीच्या सोंडेप्रमाणें असून दांत मनोहर होते आणि केंस कृष्णवर्ण, बारीक व स्थिर होते १८. मदनभार्या रतिच की काय अशी ती सर्वांगसुंदर स्त्री दृष्टीं पडतांक्षणीं ही रसातलदेवता आहे असें त्या राजपुत्राला वाटलें १९. कृष्णवर्ण व कुंचित केश आणि विशाल वक्षःस्थल, स्कंध व बाहु यांनीं युक्त असलेल्या त्याला पहातांक्षणीं ती सुंदरी बाला मदन समजूं लागली २०. ती सद्वर्तनी सुंदरी—लज्जा, विस्मय व दैन्य यांच्या अधीन होऊन

एवं विचिन्त्य बहुधा निःश्वस्य च महीतले । उपविश्य तदा भेजे सा मूर्च्छामिन्दिरेक्षणा २३ सोऽपि कामशराघातमवाप्य नृपतेः सुतः । तां समाश्वासयामास न भेतव्यमिति ब्रुवन् २४ सा च स्त्री या तदा दृष्टा पूर्वं तेन महात्मना । तालवृन्तमुपादाय पर्यवीजयदाकुला २५ समाश्वस्ता तदा पृष्टा तेन सा मोहकारणम् । किंचिल्लज्जान्विता बाला तस्यै सख्यै न्यवेदयत् २६ सा चास्मै कथयामास नृपपुत्राय विस्तरात् । मोहस्य कारणं सर्वं तद्दर्शनसमुद्भवम् २७ यथा तया समाख्यातं तद्वृत्तान्तं च भामिनी । सख्युवाच ॥ विश्वावसुरिति ख्यातो दिवि गन्धर्वराट् प्रभो २८ तस्येयमात्मजा सुभ्रूर्नाम्ना ख्याता मदालसा । वज्रकेतोः सुतश्चोग्रो दानवोऽरिविदारणः २९ पातालकेतुर्विख्यातः पातालान्तरसंश्रयः । तेनेयमुद्यानगता कृत्वा मायां तमोमयीम् ३० अपहृत्य समानीता बालेयं दुष्टबुद्धिना । आगामिन्यां त्रयोदश्यामुद्वक्ष्यति किलासुरः ३१ स तु नार्हति चार्वङ्गीं शूद्रो वेदश्रुतिं यथा । अतीते च दिने बाला चात्मव्यापादनोद्यताम् ३२ सुरभिः प्राह नायं त्वां प्राप्स्यते दानवाधमः । मर्त्यलोकमनुप्राप्तं य एनं भेत्स्यते शरैः ३३ स ते भर्ता महाभागे अचिरेण भविष्यति । अहं त्वस्याः सखी नाम्ना कुण्डलेति मनस्विनी ३४ सुता विन्ध्यवतः पत्नी वीरपुष्करमालिनः । हते

---

उठली असतां तिचें चित्त क्षुब्ध झालें २१ आणि "मी पुण्य केल्यामुळें हा कोणी देव, यक्ष, गंधर्व, उरग, विद्याधर अथवा मनुष्य पतिच प्राप्त झाला आहे की काय ? " २२ असा अनेक प्रकारांनीं विचार करून व सुस्कारा टाकून ती कमलाक्षी भूतलावर बसली असतां मूर्च्छित झाली २३. तेव्हां मदनबाणांचे प्रहार प्राप्त झाल्यामुळें तो राजपुत्रही भिऊं नको असें ह्मणत ह्मणत तिला धीर देऊं लागला २४. त्या महात्म्यानें पूर्वी पाहिलेली स्त्री विंझोणा घेऊन लगबगीनें तिला वारा घालूं लागली २५. त्यानें धीर देऊन मूर्च्छेचें कारण विचारिलें असतां, लज्जित होऊन त्या बालेनें त्या सखीला निवेदन केलें २६; तिनें त्या राजपुत्राला त्याच्याच दर्शनामुळें उद्भवलेलें सर्वही मोहकारण सविस्तर कथन केलें २७ आणि तिच्या सांगण्याप्रमाणें तिचा वृत्तांतही तिनें सांगितला. सखी ह्मणते:— हे प्रभो, स्वर्गांत विश्वावसु ह्मणून गंधर्वराज आहे २८; त्याची ही सुंदर कन्या मदालसा होय. वज्रकेतूचा पुत्र एक उग्र दानव असून शत्रूंचा नाश करणारा आहे २९. तो पातालांत रहात असून पातालकेतु ह्या नांवानें विख्यात आहे. ही बाला बागेंत असतांना तमोमयी माया निर्माण करून त्या दुष्टबुद्धि दानवानें हरण करून येथें आणिली आहे आणि येत्या त्रयोदशीला हा तिच्याशीं विवाह करणार आहे ३०, ३१. परंतु, शूद्र ज्याप्रमाणें वेदश्रवणासही पात्र नाहीं त्याप्रमाणें हा त्या सुंदरीला पात्र नाहीं. काल ही बाला आत्मघात करण्यास उद्युक्त झाली असतां ३२ सुरभि तिला ह्मणाली "ह्या अधम दानवाला तूं मिळणार नाहींस. मर्त्यलोकीं प्राप्त झालेल्या ह्याला जो बाणांनीं प्रहार करील ३३ तो, हे महाभाग्यवति, लवकरच तुझा भर्ता होईल. मी कुंडला ह्मणून हिची विचारी सखी ३४; विन्ध्यवानाची कन्या आणि पुष्करमाली वीराची पत्नी आहे.

भर्तरि शुम्भेन तीर्थातीर्थमनुव्रता ३६ चरामि दिव्यया गत्या परलोकार्थमुद्यता। पातालके-
तुर्दुष्टात्मा वाराहं वपुरास्थितः ३६ केनापि विद्धो बाणेन मुनीनां त्राणकारणे। तथाहं
तत्वतोऽन्विष्य त्वरिताहमिहागता ३७ सत्यमेव स केनापि ताडितो दौष्ट्यमाचरन्।
इयं च मूर्च्छामगमद्येन तत्कारणं शृणु ३८ त्वयि प्रीतिमती बाला दर्शनादेव मानद। देव-
पुत्रोपमे श्लाघ्यवाक्यरूपादिशालिनि ३९ आर्या त्वन्यस्य विद्धिर्येन विद्धः स दानवः।
एतस्मात्कारणान्मोहं महान्तमियमागता ४० यावज्जीवं च तन्वंगी दुःखमेवोपभोक्ष्यति।
त्वन्मनस्या हृदयं याति भर्ता चान्यो भविष्यति ४१ यावज्जीवमतो दुःखं सुरभ्या नान्यथा
वचः। अहं त्वस्याः प्रभो प्रीत्या दुःखिताऽत्र समागता ४२ यतो विशेषो नैवास्ति स्वश-
रीरसखीदेहयोः। यद्येषाभिमतं वीर पतिमाप्नोति शोभना ४३ ततस्त्वहं तपः कुर्यां निर्व्य-
लीकेन चेतसा। त्वं तु को वा किमर्थं वा संप्राप्तोऽत्र महामते ४४ देवो दैत्यो ह गन्धर्वः
पन्नगः किन्नरोपि वा। न ह्यत्र मानवगतिर्न चेदृङ्मानुषी गतिः ४५ तन्ममाख्याहि कोसि
त्वं यथैवावितथं मया। कुवलयाश्व उवाच॥ यन्मां पृच्छसि धर्मज्ञे कस्त्वं किं वा समागतः
४६ तच्छृणुष्वामलप्रज्ञे कथयाम्यादितस्तव। राज्ञः शत्रुजितः पुत्रः पित्रा संप्रेषितः शुभे ४७
मुनिरक्षणमुद्दिश्य गालवाश्रममागतः। कुर्वतो मम रक्षां च मुनीनां धर्मचारिणाम् ४८
विघ्नार्थमागतः कोपि सौकरं वपुरास्थितः। मया स विद्धो बाणेन चन्द्रार्धाकारवर्चसा ४९

---

शुंभानें पतीचा वध केल्यापासून मी पतिव्रता राहून दिव्यगतीनें तीर्थाटन करीत आहें
३५ आणि परलोकाविषयीं मी उद्युक्त झालें आहें. सूकररूप घेतलेल्या दुष्ट पातालके-
तूला ३६. मुनींच्या रक्षणार्थ कोणीं बाणानें वेध केला आहे आणि ह्मणून मी तत्वतः
शोध करीत करीत येथें आलें आहें ३७. दुष्टपणा करणाऱ्या त्या दानवाला खरोखरच
कोणीं ताडण केलें आहे. हिला मूर्च्छा येण्याचें कारण आतां ऐक ३८. हे मान्य, मनो-
हर भाषण, रूप इत्यादि गुणांनीं संपन्न असलेल्या देवकुमारतुल्य तुझ्यावर हिचें प्रेम,
दर्शन होतांक्षणींच बसलें आहे ३९. परंतु, ज्यानें त्या दानवाला वेध केला आहे
त्या दुसऱ्याची ही भार्या होण्याचें ठरलें आहे. ह्या कारणामुळें हिला मोठी मूर्च्छा
आली ४०. कारण, हिचें चित्त तुझ्या ठिकाणीं अनुरक्त असून हिचा भर्ता अन्य
होणारा असल्यामुळें जन्मभर ही सुंदरी दुःखच भोगणार ४१. परंतु,
सखीचा देह व आपला देह ह्यांत भेद नाहीं. हे वीर, ह्या कल्याणीला अभिमत पति
प्राप्त होईल तर ४२,४३ मी निर्मल मनानें तप करीन. हे महामते, तूं कोण व किमर्थ
येथें आला आहेस? ४४ देव, दैत्य, गंधर्व, पन्नग किंवा किन्नर तूं आहेस किंवा
काय? येथें मानवांची गति नाहीं व मानवांची गति अशी नाहीं ४५. वास्तव, माझ्या-
प्रमाणें तूंही कोण आहेस हें खरें सांग. कुवलयाश्व ह्मणतो:— हे धर्मज्ञे, कोण व
कशाकरितां आला आहेस असें जर तूं मला विचारीत आहेस ४६ तर, हे शुद्धचित्ते,
श्रवण कर. मी प्रथमपासून तुला सांगतो. राजा शत्रुजिताचा मी पुत्र आहें व हे
कल्याणि, पित्यानें मला पाठविलें असून ४७ मुनिरक्षणार्थ मी गालवाश्रमांत आलों

अपक्रान्तोऽतिवेगेन तमस्म्यनुगतो हयी। पपात सहसा गर्ते सोऽश्वोऽप्यश्व मामकः ५० सोऽहमश्वं समारूढस्तमस्येकः परिभ्रमन्। प्रकाशमासादितवान्दृष्टा च भवती मया ५१ पृष्टा च न च मे किंचिद्भवत्या दत्तमुत्तरम्। त्वां चैवानु प्रविष्टोऽहमिमं प्रासादमुत्तमम् ५२ इत्येतत्कथितं सत्यं न देवो न दानवः। न पन्नगो न गन्धर्वः किन्नरो वा शुचिस्मिते ५३ समस्ताः पूज्यपक्षा वै देवाद्या मम कुण्डले। मनुष्योऽस्मि विशङ्का ते न कर्तव्यात्र काचित् ५४ पुत्रावूचतुः॥ ततः प्रहृष्टा सा कन्या सखीवदनमुत्तमम्। लज्जाजडं वीक्षमाणा किंचिन्नोवाच भामिनी ५५ ततस्तां पुनरप्येनां प्रहृष्टा प्रत्युवाच ह। यथावत्कथितं तेन सुरभ्या वचनानुगम् ५६ कुण्डलोवाच॥ वीर सत्यमसंदिग्धं भवताभिहितं वचः। नान्यत्र हृदयं ह्यस्या दृष्ट्वा स्थैर्यं प्रयास्यति ५७ चन्द्रमेवाधिका कान्तिः समुपैति रविं प्रभा। भूतिर्धन्यं धृतिर्धीरं क्षान्तिरभ्येति चोत्तमम् ५८ त्वयैव विद्धोऽसंदिग्धं स पापो दानवाधमः। सुरभिः सा गवां माता कथं मिथ्या वदिष्यति ५९ तदन्येयं सभाग्या च त्वत्संबन्धमवेत्य वै। कुरुष्व वीर यत्कार्यं विधिनैव समाहितम् ६० पुत्रावूचतुः॥ परवानहमित्याह राजपुत्रः सदा पितुः। सा च तं चिन्तयामास तुम्बुरुं तत्कुले गुरुम् ६१

---

आहे. धर्मनिष्ठ मुनींचें मी रक्षण करीत असतांना ४८ सूकरदेह धारण करून विघ्न करण्याकरितां जो कोणी आला होता त्याला अर्धचंद्राकार बाणानें मी वेध केला ४९; तेव्हां तो अति वेगानें पळाला असतां मी अश्वारूढ होऊन त्याच्या मागोमाग गेलों तो एकाएकीं मी व माझा वृद्ध अश्व असे खड्डयांत पडलों ५०. तो मी अश्वारूढ होऊन अंधकारामध्यें एकटा हिंडत असतांना प्रकाशांत आलों व तुझें मला दर्शन झालें ५१. परंतु, मीं विचारिलें असतां जेव्हां तू कांहींच उत्तर दिलें नाहींस, तेव्हां तुझ्याच मागोमाग मी ह्या उत्कृष्ट राजवाड्यांत आलों" ५२. हे सुहास्यवदने, हें मीं सत्य कथन केलें आहे. मी देव, दानव, पन्नग, गंधर्व व किन्नर ह्यांपैकीं कोणीही नाहीं ५३. हे कुंडले, देवादि सर्व मला पूज्य आहेत व मी मनुष्य आहें. तूं ह्याविषयीं कसलीही शंका धरूं नको ५४. पुत्र ह्मणतात:—तदनंतर ती कन्या आनंदित झाली आणि लज्जेमुळें कांहींएक न बोलतां हळूंच सखीचें उत्कृष्ट वदन पाहूं लागली ५५. तेव्हां तिची सखी पुनरपि आनंदित होऊन तिला ह्मणाली 'सुरभीच्या वचनाप्रमाणें ह्यानें सर्व कांहीं कथन केलें आहे' ५६. कुंडला ह्मणते:—हे वीरा, आपलें भाषण निःसंशय सत्य आहे. आपलें दर्शन झाल्यापासून हिचें चित्त दुसरीकडे स्थिर होणार नाहीं ५७. उत्कृष्ट कांति चंद्राला, प्रभा सूर्याला, ऐश्वर्य धन्याला, धैर्य धीराला व क्षमा उत्तमालाच माळ घालीत असते ५८. निःसंशय त्या पापी दानवाधमाला तूंच वेध केला आहेस; ती गोमाता सुरभि असत्य बोलेल कशी? ५९. तस्मात्, तुझा समागम झाल्यामुळें ही धन्य व भाग्यवती आहे. आतां, हे वीरा, जें कांहीं कर्तव्य आहे तें विधायानेंच सांगितलें आहे ६०. पुत्र ह्मणतात:—मी सर्वदा पित्याच्या अधीन आहें असें राजकुमारानें सांगितलें असतां तिनें

प्राप्तोपि चार्थो मनुजैरानीतोपि निजं गृहम् ७४ क्षयमेति विना भार्यां कुभार्यासंग्रहेपि वा । कामस्तु तस्य नैवास्ति प्रत्यक्षेणोपलक्ष्यते ७५ दम्पत्योः सहधर्मेण त्रयीधर्ममवाप्नुयात् । पुत्राणां योनिरन्या वै नान्यतो भार्यया विना । पितॄन्पुत्रैस्तथैवान्नसाधनैरतिथीनपि ७६ पूजाभिरमरांस्तद्वत्साध्वी भार्या नरोऽवति । त्रियाश्चापि विना भर्त्रा धर्मकामार्थसंततिः ७७ नैव तस्मात्त्रिवर्गोयं दाम्पत्यमधिगच्छति। एतन्मयोक्तं युवयोर्गमिष्यामि यथेप्सितम् ७८ धनं त्वमनया सार्द्धं धनपुत्रसुखायुषा। पुत्रा ऊचतुः॥ इत्युक्त्वा संपरिष्वज्य स्वसखीं तं नमस्य च ७९ जगाम दिव्यया गत्या यथाभिप्रेतमात्मनः। सोपि शत्रुजितः पुत्रस्तामारोप्य तुरंगमम् ८० निर्गन्तुकामः पातालाद्विज्ञातो दनुसंभवैः। ततस्तैः सहसोत्कुष्टं ह्रियते ह्रियते त्विति ८१ कन्यारत्नं यदानीतं दिवः पातालकेतुना । ततः परिघनिस्त्रिंशगदाशूलशरायुधम् ८२ दानवानां बलं प्राप्तं सह पातालकेतुना। तिष्ठतिष्ठेति जल्पन्तस्ते तदा दानवोत्तमाः ८३ शरवर्षैस्तथा शूलैर्ववृषुर्नृपनन्दनम्। स तु शत्रुजितः पुत्रस्ततस्तान्प्रति वीर्यवान् ८४ चिच्छेद शरजालेन प्रहसन्निव लीलया। क्षणेन पातालतलमसिशक्त्यृष्टिसायकैः ८५ छिन्नैः संछन्नमभवद्भूतध्वजशरोत्करैः। ततस्त्वं त्वाष्ट्रमादाय चिक्षेप प्रति दानवान् ८६ तेन ते दानवाः सर्वे सह पाताल-

---

शक्य नाहीं. मनुष्यांनीं द्रव्य मिळवून जरी घरांत आणिलें तरी ७४ भार्या नसल्यास अथवा ती वाईट असल्यास तें नष्ट होतें; आणि काम तर त्याचा परिपूर्ण होत नाहीं हें प्रत्यक्षच दिसत आहे ७५. तात्पर्य, स्त्रीपुरुष उभयतां मिळून धर्मानें वागूं लागले असतां वेदप्रतिपाद्य धर्माचें फळ प्राप्त होत असतें. पुत्रोत्पत्तीचें स्थान भार्येशिवाय दुसऱ्या ठिकाणीं नाहीं. पुरुष पुत्रांच्या योगानें पितरांचें अथवा अन्नसाधनांच्या योगानें अतिथींचें ज्याप्रमाणें संतर्पण करीत असतो ७६ किंवा पूजनामुळें ज्याप्रमाणें तो देवांचें रक्षण करीत असतो त्याचप्रमाणें साध्वी स्त्रीचेंही तो रक्षण करीत असतो. स्त्रीलाही भर्त्याशिवाय धर्म, अर्थ अथवा काम प्राप्त होत नाहीं. तस्मात् हा त्रिवर्ग दांपत्यावर अवलंबून आहे, हें मी तुह्मांला सांगितलें. आतां मी यथेष्ट गमन करितें ७७, ७८. हिच्यासह आपणाला धन, पुत्र, सुख व आयुष्य ह्यांची विपुलता प्राप्त होवो. पुत्र ह्मणतात:—असें बोलून ती कुंडला सखीला भेटली आणि त्या राजपुत्राला नमस्कार करून ७९ दिव्यगतीनें यथेष्ट निघून गेली. नंतर तोही शत्रुजिताचा पुत्र तिला घोड्यावर बसवून ८० पातालांतून निघाला असतां दानवांना बातमी लागली. तेव्हां, पातालकेतूनें स्वर्गापासून आणिलेलें कन्यारत्न हरण झालें, हरण झालें, अशी एकदम दानवांनीं आरोळी ठोकिली असतां परिघ, खड्ग, गदा, शूल व धनुष्य घेऊन ८१, ८२ दानवसैन्य पातालकेतूसह प्राप्त झालें. नंतर थांब थांब असें ह्मणत ह्मणत त्या श्रेष्ठ दानवांनीं ८३ बाण व शूल ह्यांची त्या राजकुमारावर वृष्टि केली; परंतु, त्या शत्रुजिताच्या वीर्यवान् पुत्रानें ८४ हंसत हंसत सहजच बाणसमुदायानें ती छेदून टाकिली. तेव्हां छिन्नभिन्न तरवारी, शक्ति, ऋष्टि व बाण ह्यांच्यायोगानें व ऋतध्वजाच्या शरसमुदायांनीं पातालतल अत्यंत आच्छादित होऊन गेलें. तदनंतर त्वाष्ट्र अस्त्र घेऊन त्यानें दानवां-

केतुना। ज्वालामालातितीव्रेण स्फुटद्दानवचयास्तदा ८७ निर्दग्धाः कापिलं तेजः समासाद्य सागराः। ततः स राजपुत्रोऽसौ निहत्यासुरसत्तमान् ८८ स्त्रीरत्नेन समं तेन समागच्छत्पितुः पुरम्। प्रणिपत्य च तत्सर्वं स तु पित्रे न्यवेदयत् ८९ पातालगमनं चैव कुण्डलायाश्च दर्शनम्। तद्वन्मदालसाप्राप्तिं दानवैश्चापि संगरम् ९० वधश्च तेषां क्रमेण पुनरागमनं तथा। इति श्रुत्वा पिता तस्य चरितं चारुचेतसः ९१ प्रीतिमानभवच्चैनं परिष्वज्याह चात्मजम्। सत्पुत्रेण त्वया पुत्र तारितोऽहं महात्मना ९२ भयेभ्यो मुनयस्त्राता येन सद्धर्मचारिणा। मत्पूर्वैः ख्यातिमानीतं मया विस्तारितं पुनः ९३ पराक्रमवता वीर त्वया तद्बहुलीकृतम्। यदुपात्तं यशः पित्रा धनं वीर्यमथापि वा ९४ तन्न ह्रापयते यस्तु स नरो मध्यमः स्मृतः। तद्वीर्यादधिकं यस्तु पुनरन्यत्स्वशक्तितः ९५ निष्पादयति तं प्राज्ञा वदन्ति नरमुत्तमम्। यः पित्रा समुपात्तानि धनवीर्ययशांसि वै ९६ न्यूनतां नयति प्राज्ञास्तमाहुः पुरुषाधमम्। तन्मया ब्राह्मणत्राणं कृतमासीद्यथा त्वया ९७ पातालगमनं यच्च यच्चासुरविनाशनम्। एतदभ्यधिकं वत्स तेन त्वं पुरुषोत्तमः ९८ तद्धन्योऽस्म्यथ वा न त्वमहमेव गुणाधिकः। त्वां पुत्रमीदृशं प्राप्य श्लाघ्यं पुण्यवतामपि ९९ न सत्पुत्रकृतां प्रीतिमन्यः प्राप्नोति मानवः। पुत्रेण नातिशयितो यः प्रज्ञादानविक्रमैः १०० धिक्तस्य जन्म यः पित्रा लोके विज्ञायते नरः। यत्पुत्रात्ख्यातिमभ्येति तस्य जन्म सुज-

---

वर टाकिलें ८५,८६. ज्वालांच्या समुदायानें अति तीव्र झालेल्या त्या अस्त्राच्या योगानें पाताळकेतुसह त्या सर्व दानवांचीं हाडें फुटूं लागलीं ८७ आणि, कपिलतेजाची गांठ पडतांक्षणीं दग्ध होऊन जाणाऱ्या सगरपुत्रांप्रमाणें ते दग्ध झाले, ह्याप्रमाणें त्या अश्वारूढ राजपुत्रानें मोठे मोठे दैत्य मारिले ८८; त्या स्त्रीरत्नाबरोबर तो पित्याच्या नगरामध्यें गेला आणि प्रणिपातपूर्वक त्यानें तें सर्व पित्याला निवेदन केलें ८९. पाताळांत गमन, कुंडलेचें दर्शन, मदालसेची प्राप्ति, दानवांशीं संग्राम ९०, अस्त्रानें त्यांचा वध व पुनरागमन असें त्या महाशय पुत्राचें चरित्र श्रवण करितांक्षणीं पिता ९१ संतुष्ट झाला आणि त्या पुत्राला कवटाळून ह्मणाला "हे पुत्रा, तुज महात्म्या सत्पुत्रामुळें माझा उद्धार झाला आहे ९२. कारण, तूं सद्धर्मानें वागून मुनींचें भयापासून रक्षण केलें आहेस. माझ्या पूर्वजांनीं गाजविलेलें व मीं विस्तारिलेलें यश ९३, हे वीरा, तूं पराक्रम करून अक्षय्य केलें आहेस. पित्यानें मिळविलेलें यश, धन, अथवा वीर्य ९४ जो नाहींसें करीत नाहीं तो मध्यम पुरुष होय; पित्याच्या वीर्यापेक्षां अधिक असलेल्या आपल्या शक्तीनें ९५ जो पुत्र अधिक पराक्रम करीत असतो त्याला प्राज्ञजन उत्कृष्ट पुरुष ह्मणतात. पित्यानें मिळविलेलें धन, वीर्य अथवा यश ९६ जो कमी करितो त्याला प्राज्ञ पुरुष नराधम ह्मणतात. तुझ्याप्रमाणें मी ब्राह्मणांचें रक्षण केलें आहे ९७; परंतु, हे वत्सा, पातालगमन व असुरवध हें तुझें अधिक असल्याळें तूं उत्तम पुरुष आहेस ९८. तस्मात् मी धन्य आहें. अथवा मीच तुझ्यापेक्षां गुणांनीं अधिक आहें; कारण, पुण्यवानांच्याही स्तुतीस पात्र असा तूं माझा पुत्र आहेस ९९. सत्पुत्रामुळें सामान्य मनुष्याला आनंद प्राप्त होत नाहीं. बुद्धि, दान व पराक्रम ह्यांत ज्याला

स्मनः १०१ आत्मज्ञानी यतो धन्यो मध्यः पितृपितामहैः । मातृपक्षेण मात्रा च ख्यातिं याति नराधमः १०२ तत्पुत्रधनवीर्यैस्त्वं विवर्धस्व सुखेन च । गन्धर्वतनया चेयं मा वियुज्यतु वै त्वया १०३ इति पित्रा बहुविधं प्रियमुक्त्वा पुनः पुनः । परिष्वज्य स्वमावासं सभार्यः स विसर्जितः १०४ स तया भार्यया सार्धं रेमे तत्र पितुः पुरे । अन्येषु चाथोद्यानवनपर्वतसानुषु १०५ श्वश्रूश्वशुरयोः पादौ प्रणिपत्य च सा शुभा । प्रातः प्रातस्ततस्तेन प्रणिपत्य सुमध्यमा १०६ (१४८९)

इति श्रीमार्कण्डेयपुराणे कुवलयाश्वीये एकोनविंशोऽध्यायः ॥ १९ ॥

पुत्रावूचतुः ॥ ततः काले बहुतिथे गते राजा पुनः सुतम् । प्राह गच्छाशु विप्राणां त्राणाय चर मेदिनीम् १ अश्वमेतं समारुह्य प्रातः प्रातर्दिने दिने । आबाधा द्विजमुख्यानामन्वेष्टव्या सदैव हि २ दुर्वृत्ताः सन्ति शतशो दानवाः पापबुद्धयः । तेभ्यो न स्याद्यथा बाधा मुनीनां त्वं तथा कुरु ३ स तथोक्तस्तदा पित्रा तथा चक्रे नृपात्मजः । परिक्रम्य महीं कृत्स्नां ववन्दे चरणौ पितुः ४ अहन्यहनि संप्राप्ते पूर्वाह्णे नृपनन्दनः । ततश्च शेषं दिवसं तया रेमे सुमध्यया ५ एकदा तु चरन्सोऽथ ददर्श यमुनातटे । पातालकेतोरनुजं तालकेतुं कृताश्रमम् ६ मायावी दानवः सोऽथ मुनिरूपं समाश्रितः । स प्राह राजपुत्रं तं पूर्ववैरमनुस्मरन् ७ राजपुत्र ब्रवीमि त्वां

---

पुत्रानें मागें टाकिलें नाहीं १०० त्याच्या जन्माला धिक्कार असो; आणि जो बापाच्या नांवानें विकला जातो त्याच्याही जन्मास धिक्कार असो. पुत्रामुळें जो प्रसिद्धीला येतो त्याचा जन्म सफल होय १. आत्मज्ञानी पुरुष धन्य होय. बापआजामुळें प्रसिद्धीस येणारा मध्यम होय, आणि अजोळामुळें व मातेमुळें माहित होणारा अधम होय २. ह्यास्तव; पुत्र, धन, वीर्य व सुख ह्यांची तुला समृद्धि होवो आणि ही गंधर्वकन्या तुझ्यापासून वियुक्त न होवो" ३. ह्याप्रमाणें पित्यानें अनेक प्रकारचें वारंवार प्रिय भाषण करून व त्याला आलिंगन देऊन भार्येसह स्वगृहीं पाठविलें असतां ४ ह्या भार्येसह तो पित्याच्या नगरांत आणि इतर उपवनें, वनें व पर्वतशिखरें ह्यांचे ठिकाणीं रममाण होऊं लागला ५. ती कल्याणी गंधर्वकन्या प्रत्यहीं प्रातःकालीं सासूसासऱ्यांच्या चरणीं वंदन करूं लागली; व वंदन केल्यानंतर ती सुंदरी त्या पतीसह क्रीडा करूं लागली १०६. (१४८९) ह्याप्रमाणें श्रीमार्कंडेयपुराणांतर्गत मदालसोपाख्यानसंबंधीं एकोणिसावा अध्याय समाप्त झाला ॥ १९ ॥

पुत्र ह्मणतातः—नंतर बराच काळ लोटल्यावर राजा पुनरपि पुत्राला ह्मणाला "! सत्वर जा आणि विप्ररक्षणार्थ पृथ्वीवर संचार कर १. ह्या अश्वावर बसून प्रत्यहीं प्रातःकालीं तूं ब्राह्मणांना काय पीडा होत आहे हें सर्वदा हुडकीत जा २. पापबुद्धि दुष्ट दानव शेकडो आहेत. तेव्हां त्यांच्यापासून मुनींना पीडा न होईल असें तूं कर" ३. असें पित्यानें सांगितलें असतां त्या राजपुत्रानें सर्व पृथ्वीवर संचार करून पितृचरणांना वंदन केलें ४. प्रत्यहीं प्रातःकालीं तो राजपुत्र पित्याच्या आज्ञेप्रमाणें हिंडत असे आणि नंतर अवशिष्ट दिवस त्या सुंदरीसह क्रीडा करण्यांत तो घालवीत असे ५. एकदां यमुनातीरीं संचार करीत असतांना पातालकेतूचा कनिष्ठ भ्राता तालकेतु

तत्कुरुष्व यदीच्छसि । न च ते प्रार्थनाभंगः कार्यः सत्यप्रतिश्रव ८ यक्ष्ये यज्ञेन धर्मार्थं कर्तव्याश्च मयेष्टयः । चिन्तये तत्र कर्तव्या नास्ति मे दक्षिणा यतः ९ ततः प्रयच्छ मे वीर दक्षिणार्थे स्वभूषणम् । यदेतत्कण्ठलग्नं ते रक्ष चेमं ममाश्रमम् १० यावदन्तर्जले देवं वरुणं यादसां पतिम् । वैदिकैर्वारुणैर्मन्त्रैः प्रजानां पुष्टिहेतुकैः ११ अभिष्टूय त्वरायुक्तः समभ्येमीति वादिनम् । तं प्रणम्य ततः प्रादात्स तस्मै कण्ठभूषणम् १२ प्राह चैनं भवान्यातु निर्व्यलीकेन चेतसा । स्थास्यामि तावदत्रैव तवाश्रमसमीपतः १३ तवादेशान्महाभाग यावदागमनं तव । न तेत्र कश्चिदाबाधां करिष्यति मयि स्थिते १४ विश्रब्धस्त्वं मुनिश्रेष्ठ कुरुष्व च मनोगतम् । एवमुक्तस्ततस्तेन स ममज्ज नदीजले १५ अरक्षत्सोपि तस्यैव मायाविहितमाश्रमम् । गत्वा जलाशयात्तस्मात्तालकेतुश्च तत्पुरम् १६ मदालसायाः प्रत्यक्षमन्येषां चैतदुक्तवान् । वीरः कुवलयाश्वोसौ ममाश्रमसमीपतः १७ केनापि दुष्टदैत्येन कुर्वन्रक्षां तपस्विनाम् । युध्यमानो यथाशक्ति निघ्नन्ब्रह्मद्विषो युधि १८ मायामाश्रित्य पापेन भिन्नः शूलेन वक्षसि । म्रियमाणेन तेनेदं दत्तं मे कण्ठभूषणम् १९ प्रापितश्चाग्निसंयोगं तद्वेहमस्तत्तापसैः । कृतार्तहेषायन्द्रो वै त्रस्तः साश्रुविलोचनः २० नीतः सोऽश्वश्च तेनैव दानवेन दुरात्मना । एतन्मया नृशंसेन दृष्टं

तेथें राहिल्याचें त्यानें पाहिलें ६. तो मायावी दानव मुनिरूप घेऊन व पूर्वीचें वैर आठवून त्या राजपुत्राला ह्मणाला ७ " हे राजपुत्रा, इच्छा असल्यास माझें बोलणें ऐक. हे सत्यप्रतिज्ञ, तूं माझ्या प्रार्थनेचा अव्हेर करूं नकोस ८. मला धर्माकरितां यज्ञ व इष्टि करावयाच्या आहेत; परंतु, त्यांत अवश्य असलेली दक्षिणा माझ्यापाशीं नाहीं व त्या काळजींत मी आहें ९. ह्यास्तव, हे वीरा, तुझ्या गळ्यांत असलेलें हें भूषण दक्षिणेकरितां मला देऊन मी उदकामध्यें जलचराधिपति वरुणाचें प्रजापुष्टिकारक व वरुणविषयक वैदिक मंत्रांनीं स्तवन करून सत्वर येईपर्यंत ह्या माझ्या आश्रमाचें रक्षण कर " १०, ११. असें बोलणाऱ्या त्या दानवाला प्रणाम करून त्यानें त्याला कंठभूषण दिलें १२ आणि त्याला तो ह्मणाला "आपण निःशंकमनानें जा. हे महाशय, आपण येईपर्यंत आपल्या आज्ञेप्रमाणें मी आपल्या आश्रमासमीप येथंच राहीन १३; मी असतांना येथें कोणीही आपणांला पीडा करणार नाहीं १४. हे मुनिश्रेष्ठ, तूं माझ्यावर विश्वास ठेवून मनांत आलेलें उरकून घे. " असें राजपुत्रानें सांगितलें असतां त्यानें नदीच्या उदकांत बुडी मारिली १५ व तोही मायेनें निर्माण केलेला त्याचा आश्रम राखीत राहिला. त्या उदकांतून तो तालकेतु त्या नगरांत गेला १६ आणि मदालसेसमक्ष व इतरांचे समक्ष ह्मणाला "हा वीर कुवलयाश्व माझ्या आश्रमासमीप १७ तपोनिष्ठांचें रक्षण करण्याकरितां यथाशक्ति संग्रामामध्यें ब्रह्मद्वेष्ट्यांचा वध करीत असतांना कोणी दुष्ट व पापी दैत्यानें युद्ध करितां करितां १८ त्याच्या वक्षस्थलावर शूलाचा प्रहार केला. तेव्हां वक्षस्थल विदीर्ण होऊन मरतां मरतां त्यानें हें कंठभूषण मला दिलें आहे १९. त्याचें दहन इतर तापसांनीं केलें. नंतर तो अश्व नेत्रांत अश्रु आणून खिंकाळत असतांना २० त्या दुरात्म्या दानवानें त्यालाही हरण केलें. हें मज दुष्ट पाप्याच्या दृष्टीस पडलें

दुष्कृतकारिणां २१ यदत्रानन्तरं कृत्यं कुरुध्वोत्तरकालिकम्। हृदयाश्वासनं चैतद्भूषणं कण्ठभूषणम् २२ नास्माकं हि सुवर्णेन कृत्यमस्ति तपस्विनाम्। इत्युक्त्वोत्सृज्य तद्भूमौ स जगाम यथा गतम् २३ निपपात जनः सोथ शोकार्तो मूर्च्छयातुरः। क्षणेन चेतनां प्राप्य सर्वास्ता नृपयोषितः २४ राजपत्न्यश्च राजा च विलेपुरतिदुःखिताः। मदालसा तु तद्दृष्ट्वा तदीयं कण्ठभूषणम् २५ तत्याज सुप्रियान्प्राणाञ्श्रुत्वा विनिहतं प्रियम्। ततः पुरे महाक्रन्दः पौराणां भवनेष्वभूत् २६ यथैव तस्य नृपतेः स्वगृहे समवर्तत। राजा च तां मृतां दृष्ट्वा विना भर्त्रा मदालसाम् २७ प्रत्युवाच जनं सर्वं विमृश्य स्वस्थमानसः। न रोदितव्यं पश्यामि भवतामात्मनस्तथा २८ सर्वेषामेव संचिन्त्य संबन्धानामनित्यताम्। किं नु शोचामि तनयं किं नु शोचाम्यहं स्नुषाम् २९ विमृश्य कृतकृत्यत्वान्मन्ये शोच्यावुभावपि। मच्छुश्रूषुर्मद्वचनाद्द्विजरक्षणतत्परः ३० प्राप्तो मेऽद्य सुतो मृत्युं कथं शोच्यः स धीमताम्। अवश्यं याति यद्देहं तद्द्विजानां कृते यदि ३१ मम पुत्रेण संत्यक्तं नन्वभ्युदयकारि तत्। इयं च सत्कुलोत्पन्ना भर्तर्येवम् नुव्रता ३२ कथं तु शोच्या नारीणां भर्तुरन्यन्न दैवतम्। अस्माकं बान्धवानां च तथान्येषां दयावताम् ३३ शोच्या ह्येषा भवेदेवं यदि भर्त्रा वियोगिनी। या तु भर्तृवधं श्रुत्वा तत्क्षणादेव भामिनी ३४ भर्तारमनुयातेयं न शोच्याऽतो विपश्चिताम्। ताः शोच्या या वियोगिन्यः

२१. आतां पुढें काय करावयाचें तें कर आणि मनाला खात्री पटण्याकरितां हें कंठभूषण घे २२. आह्मां तपोनिष्ठांना सुवर्णाशीं कांहींएक कर्तव्य नाहीं." असें बोलून तें कंठभूषण त्यानें तेथें भूमीवर टाकून आल्या मार्गानें गमन केलें २३. इतक्यांत तेथें असलेले लोक शोकाकुल व दुःखित होऊन मूर्च्छित झाले. कांहीं वेळानें सावध झाल्यावर त्या सर्व राजस्त्रिया २४ व राजपत्न्या राजासह अतिदुःखित होऊन विलाप करूं लागल्या. तें कंठभूषण पाहून २५ व प्रियाचा वध झाल्याचें ऐकून मदालसेनें तर अत्यंत प्रिय असलेल्या प्राणांचाच त्याग केला. तेव्हां त्या नगरांत लोकांच्या घरांतून मोठा आक्रोश राजवाड्याप्रमाणेंच सुरूं झाला. मदालसा पतिरहित व मृत झाल्याचें पाहून राजा २६, २७ स्वस्थ मनानें विचार करून सर्वांना ह्मणाला " रडूं नका, तुमची व माझी स्थिति पाहिली असतां २८ सर्व संबंध मला अनित्य दिसत आहेत. तेव्हां पुत्राकरितां अथवा स्नुषेकरितां मी कां बरें शोक करावा २९ ? विचार करून पाहिलें असतां कृतकृत्य झाल्यामुळें ते दोघेही शोच्य नाहींत. माझी शुश्रूषा करणारा व माझ्या आज्ञेप्रमाणें द्विजरक्षणाविषयीं दक्ष असलेला ३० माझा पुत्र जर आज मृत झाला आहे तर विवेकी लोकांनीं शोक करण्याचें प्रयोजन काय ? अवश्य नष्ट होणाऱ्या देहाचा ब्राह्मणांकरितां जर ३१ माझ्या पुत्रानें त्याग केला आहे तर हें कृत्य खरोखर अभ्युदयकारक होय. ही कुलीन मदालसा जरी ह्याप्रमाणें पतिव्रता होती ३२ तरी स्त्रियांनीं तिच्याबद्दल शोक कशाकरितां करावयाचा ? भर्त्याहून इतर दैवत स्त्रीला नाहीं. ही जर पतीच्या मागें राहिली असती तर आह्मां बांधवांच्या व इतरही दयावानांच्या ३३ शोकास ही पात्र झाली असती. जी स्त्री पतिवध ऐकतांक्षणीं ३४

सह भर्त्रा कुलाङ्गनाः ३५ कष्टभान्त्या न गच्छन्ति कष्टदाः स्युः कुलात्मनोः । भर्तुर्वियोगदुःखं मयां प्राप्तभूतः कृतज्ञया ३६ दातारं सर्वसौख्यानामिह चामुत्र चोभयोः । लोकयोः का हि भर्तारं नारी मन्येत मानुषम् ३७ न स शोच्यो न चैवेयं नाहं तज्जननी न च । त्यजता ब्राह्मणार्थाय प्राणान्सर्वे स्म तारिताः ३८ विप्राणां मम धर्मस्य गतः स तु महामतिः । आनृण्यमर्धभुक्तस्य त्यागो देहस्य मे सुतः ३९ मातुः सतीत्वं मद्वंशनैर्मल्यं शौर्यमात्मनः । संग्रामे संत्यजन्प्राणान्सोऽविन्दद्द्विजरक्षणात् ४० ततः कुवलयाश्वस्य माता भर्तुरनन्तरम् । श्रुत्वा पुत्रवधं तादृक्प्राह दृष्ट्वा तु तं पतिम् ४१ न मे मात्रा न मे स्वस्रा प्राप्ता प्रीतिर्नृपेदृशी । श्रुत्वा मुनिपरित्राणे हतं पुत्रं यथा मया ४२ शोचतां ब्राह्मणानां ये निःश्वसेनातिदुःखिताः । म्रियन्ते व्याधिना क्लिष्टास्तेषां माता वृथाप्रजा ४३ संग्रामे युध्यमाना ये ऽभीता गोद्विजरक्षणे । क्षुण्णाः शस्त्रैर्विपद्यन्ते त एव भुवि मानवाः ४४ अर्थिनां मित्रवर्गस्य विद्विषां च पराङ्मुखः । यो न याति पिता तेन पुत्री माता च वीरसूः ४५ गर्भक्लेशः स्त्रियो मन्ये साफल्यं भजते तदा । यदारिविजयी वा स्यात्संग्रामे वा हतः सुतः ४६ पुत्रा ऊचुः ॥ ततः स राजा संस्कारं पुत्रपत्नीमलम्भयत् । निर्गम्य च बहिः स्नातो ददौ पुत्राय चोदकम् ४७ तालकेतुश्च निर्गम्य तथैव यमुनाजलात् । राजपुत्रमुवाचेदं प्रणयान्मधुरं वचः ४८ गच्छ

त्यांच्या मागोमाग गेली तिच्याबद्दल शिवकी लोकांनी शोक करण्याचें कारण नाहीं ३५. दुःखभ्रमानें ज्या कुलस्त्रिया पतीच्या मागें रहात असतील त्या स्वतःला व कुलाला दुःखप्रद असल्यामुळें शोच्य होत. ह्या कृतज्ञ स्त्रीला पतिवियोगदुःख झालें नाहीं ३६. इहलोकीं व परलोकीं सर्व प्रकारचें सौख्य देणाऱ्या भर्त्याला कोणतें स्त्री मनुष्य समजेल? ३७. सारांश, तो, ही, मी व त्याची माता हीं मुळींच शोच्य नाहींत. कारण, ब्राह्मणांकरितां प्राण सोडणाऱ्यानें आह्मां सर्वांचा उद्धार केला आहे ३८. अर्धवट भोगिलेल्या देहाचा त्याग करून माझा महाविचारी पुत्र विप्राच्या व धर्माच्या ऋणांतून मुक्त झाला आहे ३९. द्विजरक्षणार्थ संग्रामांत प्राण सोडणाऱ्या त्या माझ्या पुत्रानें मातेचें सतीत्व, माझ्या वंशाची निर्मलता व आपलें शौर्य ह्यांचें रक्षण केलें आहे ४०. ह्या भर्त्याच्या भाषणानंतर कुवलयाश्वाची माता तसा पुत्रवध श्रवण करून आनंदानें त्या पतीला ह्मणाली ४१. " मुनिरक्षणार्थ पुत्र मेल्याचें ऐकून जसा मला आनंद झाला आहे तसा, माझ्या मातेला अथवा भगिनीला आनंद झाला नाहीं ४२. शोक करणाऱ्या विप्रांच्या स्वरानें अतिदुःखित होऊन किंवा व्याधिग्रस्त होऊन जे मरतात त्यांची जी माता तिचें संतान व्यर्थ होय ४३. गोब्राह्मणरक्षणार्थ निर्भयपणें संग्रामांत युद्ध करितां करितां, जे शस्त्रांनीं विदीर्ण होऊन मरतात तेच पृथ्वीवर खरोखर मानव होत ४४. याचक, मित्रवर्ग व शत्रु ह्यांच्यापासून जो विमुख होत नाहीं त्याच्याच योगानें पिता पुत्रवान् व माता वीरसू होते ४५. पुत्र जेव्हां शत्रुविजयी होतो किंवा संग्रामांत वध पावतो तेव्हांच स्त्रीच्या गर्भारपणाचे क्लेश सफल होतात असें मी समजतें ४६. पुत्र ह्मणतातः— नंतर त्या राजानें स्नुषेचा अग्निसंस्कार केला आणि स्नान

भूपालपुत्र त्वं कृतार्थोऽहं कृतस्त्वया। वाञ्छितं तु कृतं कार्यं त्वय्यत्राविचलं स्थिते ५९ वारुणं यज्ञकार्यं च जलेशस्य महात्मनः। तन्मया साधितं सर्वं यन्ममासीदमीप्सितम् ६० प्रणिपत्य स तं प्रागा[illegible] पुरं पितुः। समारुह्य तमेवाश्वं सुपर्णानिलविक्रमम् ६१ (१६४०)
इति श्रीमार्कण्डेयपुराणे कुवलयाश्वीये विंशोऽध्यायः ॥ २० ॥

पुत्रावूचतुः॥ स राजपुत्रः संप्राप्य वेगादात्मपुरं ततः। पित्रोर्ववन्दिषुः पादौ दिदृक्षुश्च मदालसाम् १ स ददर्श तदुद्विग्नमप्रहृष्टमुखं पुरम्। पुनश्च विस्मिताकारं प्रहृष्टवदनं पुनः २ अन्यमुत्फुल्लनयनं दिष्ट्या दिष्ट्येति वादिनम्। परिष्वजन्तमन्योन्यमतिकौतूहलान्वितम् ३ स राजपुत्रो मित्रं तु उत्फुल्लनयनं शुभम्। आलिलिङ्ग तदा काले सौहृदेन परेण च ४ ततः पौरास्तदालोक्य दिष्ट्या दिष्ट्येति वादिनः। चिरंजीवोरुकल्याण हतास्ते परिपन्थिनः५ पित्रोः प्रह्लादय मनस्तथास्माकमकण्टकः। इत्येवंवादिभिः पौरैः पुरः पृष्ठे च संवृतः६ तत्क्षणप्रभवानन्दः प्रविवेश पितुर्गृहम्। पिता च तं परिष्वज्य माता चान्ये च बान्धवाः ७ चिरंजीवोरुकल्याण ददौ चास्मै तदाशिषः। प्रणिपत्य ततः सोऽयं किमेतदिति विस्मितः८ पप्रच्छ पितरं

करून बाहेर निघाल्यावर त्यानें पुत्राला उद्देशून उदक दिलें ४७. इकडे तालकेतु तसाच यमुनाजलांतून बाहेर पडून विनयपूर्वक मधुर शब्दांनीं त्या राजपुत्राला ह्मणाला ४८ " हे राजपुत्रा, तूं जा; तूं मला कृतार्थ केलें आहेस. तूं येथें निश्चल राहिल्यामुळें मीं मनांत आणिलेलें कार्य शेवटास नेलें ४९. महात्म्या जलाधिपतीला उद्देशून जें वारुण यज्ञकार्य मीं योजिलें होतें तें सर्व मीं शेवटास नेलें" ५०. ह्यावर त्याला प्रणाम करून आणि वेगामध्यें गरुडाची व वायूची बरोबरी करणाऱ्या त्याच अश्वावर आरूढ होऊन तो राजपुत्र पित्याच्या नगराला गेला ५१. [१६४०] ह्याप्रमाणें मार्कंडेयपुराणांतील विसावा अध्याय समाप्त झाला ॥ २० ॥

पुत्र ह्मणतात:—नंतर पितृचरणांना वंदन करण्याविषयीं व मदालसेला पाहण्याविषयीं उत्सुक होऊन तो राजपुत्र वेगानें आपल्या नगरांत आला असतां १ उद्विग्न व आनंदरहित नगर त्याच्या दृष्टीं पडलें व पुनरपि तें विस्मयचकित व आनंदितही त्यानें पाहिलें २. प्रफुल्लित नेत्रकमलांनीं युक्त व भाग्य भाग्य असें ह्मणत ह्मणत जो तो अति उत्सुकतेनें परस्पराला आलिंगन देत आहे असेंही त्यानें पाहिलें ३. त्या राजपुत्रानें त्यावेळीं प्रफुल्लित नेत्रकमलांनीं युक्त असलेल्या आपल्या शुभ मित्राला मोठ्या प्रेमानें आलिंगन दिलें ४. तदनंतर तें पाहून पौरजन उत्तम उत्तम असे उद्गार काढीत काढीत त्याला ह्मणाले " हे महाकल्याणरूपं, तूं चिरकाल रहा; तुझे शत्रु नष्ट होवोत ५; मातापितरांच्या व आमच्या मनाला तूं निष्कपट राहून आनंद दे. " ह्याप्रमाणें बोलत असलेल्या नागरिकांनीं पुढून व मागून परिवेष्टिलेला तो राजपुत्र ६ तत्क्षणीं आनंदित होऊन पितृगृहांत प्रविष्ट झाला असतां मातापितर व इतर बांधव ह्यांनीं आलिंगन देऊन त्याला ७ " हे महाकल्याणसंपन्न, तूं चिरकाल रहा" असे आशीर्वाद दिले. नंतर हें काय ह्मणून विस्मित झालेला तो राजपुत्र प्रणाम करून ८ पित्याला

पाप सोऽस्मै सर्वं तदुक्तवान्। स भार्यां तां मृतां श्रुत्वा हृदयेष्टां मदालसाम् ९ पितरौ च पुरो दृष्ट्वा लज्जाशोकविमध्यगः। चिन्तयामास सा बाला मां श्रुत्वा निधनं गतम् १० तत्याज जीवितं साध्वी धिङ्मां निष्ठुरमानसम्। नृशंसोऽहमनार्योऽहं विना तां मृगलोचनाम् ११ मत्कृते निधनं प्राप्तां यज्जीवाम्यतिनिर्घृणः। पुनः स चिन्तयामास परिसंस्तभ्य मानसम् १२ मोहोद्गममपास्यैवं निःश्वस्योच्छ्वस्य चातुरः। मृतेति मां मन्निमित्तं त्यजामि यदि जीवितम् १३ किं मयोपकृतं तस्याः श्लाघ्यमेतत्तु योषिताम्। यदि रोदिमि वा दीनं हा प्रियेति वदन्मुहुः १४ तथाप्यश्लाघ्यमेतन्नो वयं हि पुरुषाः किल। अथ शोकजडो दीनोऽमृजादीनो बलान्वितः १५ विपक्षस्य भविष्यामि ततः परिभवास्पदम्। मयारिशातनात्कार्यं राज्ञः शुश्रूषणं पितुः १६ जीवितं तस्य चायत्तं संत्याज्यं तत्कथं मया। किं त्वत्र मेऽन्यत्कर्तव्यं त्यागो भोगस्य योषितः १७ स चापि नोपकाराय तन्वंग्याः किं तु सर्वथा। मयानृशंस्यं कर्तव्यं नापकार्युपकारि वा १८ या मदर्थेऽत्यजत्प्राणांस्तदर्थेऽल्पमिदं मम। पुत्रावूचतुः॥ इति कृत्वा मतिं सोऽप निष्पापोदकदा निकम् १९ क्रियाश्चानन्तरं कृत्वा प्रत्युवाच ऋतध्वजः। यदि सा मम तन्वंगी न स्याद्भार्या मदालसा २० अस्मिञ्जन्मनि नान्या मे भवित्री सहचारिणी। तामृते मृगशावाक्षीं

विचारूं लागला असतां पित्यानें सर्व वृत्तांत त्याला कथन केला. मनाला प्रिय असलेली ती भार्या मदालसा मृत झाल्याचें ऐकून ९ व पुढें मातापितर पाहून तो शोकाकुल व लज्जित झाला आणि मनांत ह्मणाला " ती साध्वी बाला, मी मृत झाल्याचें श्रवण करितांक्षणीं, परलोकीं गेली. तस्मात् निष्ठुरमनानें युक्त असलेल्या मला धिक्कार असो. माझ्याकरितां मेलेल्या त्या मृगनयनेवांचून ज्याअर्थी मी जिवंत राहिलों आहें त्याअर्थी मी अति निर्दय, दुष्ट व अनार्य आहें." नंतर मन आवरून धरून, मोह दूर करून व श्वासोच्छ्वास सोडून व्याकुळ झालेला तो राजपुत्र पुनरपि मनांत ह्मणाला " माझ्याकरितां ती मेली ह्मणून जर मीं जीव दिला १०, ११, १२, १३ तर तिच्यावर उपकार तो माझ्या हातून काय होणार आहे? हें करणें स्त्रियांना योग्य आहे. हे प्रिये, असें दीनवाणीनें वारंवार ह्मणत ह्मणत जर मी रडूं लागलों १४ तर तें आह्मांला योग्य नव्हे. आह्मी पुरुष आहों. मी बलाढ्य असतांना शोकाकुल व दीन होऊन जर रक्तहीन झालों १५ तर शत्रु माझा पराजय करतील. शत्रुनाश करून मला प्रजाधिपति पित्याची शुश्रूषा केली पाहिजे १६. माझें जीवित जर त्याच्या अधीन आहे तर तें मीं टाकावें कसें? आतां स्त्रीसंभोगाचा त्याग हें एक माझें कर्तव्य आहे १७. त्यामुळें जरी माझ्या सुंदरीला कांहीं उपयोग होणार नाहीं तरी हें करणें अपकारक असो किंवा उपकारक असो, मला तिच्यासंबंधानें सरळपणानें वागलें पाहिजे १८. कारण, जिनें माझ्याकरितां प्राणत्याग केला तिच्याकरितां मीं असें वागणें हें अगदीं अल्प आहे. पुत्र ह्मणतातः—असा विचार करून, तिला उदक देऊन १९ व नंतर क्रिया करून ऋतध्वज ह्मणाला " ती सुंदरी मदालसा माझी भार्या जर आतां नाहींशी झाली आहे २० तर ह्या जन्मांत माझी सहचारिणी दुसरी होणार नाहीं. त्या मृगलो-

गन्धर्वतनयामहम् २१ न भोक्ष्ये योषितं कांचिदिति सत्यं मयोदितम्। स धर्मचारिणीं पत्नीं तां मुक्त्वा गजगामिनीम् २२ कांचिदन्यां करिष्यामि तेन सत्यं मयोदितम्। एवं सर्वान्परित्यज्य स्त्रीभोगांस्तात सर्वदा २३ क्रीडन्नास्ते समं तुल्यैर्वयस्यैः शीलसंपदा। एतत्तस्य परं कार्यं तात तत्केन साध्यते २४ कर्तुमत्यन्तदुष्प्राप्यमीश्वरैः किमुतेतरैः। जड उवाच॥ इति वाक्यं तयोः श्रुत्वा विमर्शमगमत्पिता २५ विमृश्य चाह तौ पुत्रौ नागराट् प्रहसन्निव। यदशक्यमिति श्रुत्वा न करिष्यन्ति मानवाः २६ कर्मण्युद्यमस्तुद्योगहान्या हानिस्ततः परम्। आरभेत नरः कर्म स्वपौरुषमहापयन् २७ निष्पत्तिः कर्मणां दैवे पौरुषे च व्यवस्थिता। तस्मादहं तथा यत्नं करिष्ये पुत्रकार्यतः २८ तपश्चर्यां समास्थाय यथैतत्साध्यतेऽचिरात्। पुत्र उवाच। एवमुक्त्वा स नागेन्द्रः प्लक्षावतरणं गिरेः २९ तीर्थं हिमवतो गत्वा तपस्तेपे सुदुश्चरम्। तुष्टाव वाग्भिरिष्टाभिस्तत्र देवीं सरस्वतीम् ३० तन्मना नियताहारो भूत्वा त्रिषवणाप्लुतः। अश्वतर उवाच। जगद्धात्रीमहं देवीमारिराधयिषुः शुभाम् ३१ स्तोष्ये प्रणम्य शिरसा ब्रह्मयोनिं सरस्वतीम्। सदसद्देवि यत्किंचिन्मोक्षवन्धार्थवत्पदम् ३२ तत्सर्वं त्वय्यसंयोगं योगवद्देवि संस्थितम्। त्वमक्षरं परं देवि यत्र सर्वं प्रतिष्ठितम् ३३ अक्षरं परमं ब्रह्म जगच्चैतत्क्षरात्मकम्। दारुण्यवस्थितो वह्निर्भौमाश्च परमाणवः ३४

चना गंधर्वकन्येशिवाय मी २१ कोणत्याही स्त्रीचा उपभोग घेणार नाहीं हें मी सत्य सांगतों. ती गजगामिनी सहधर्मचारिणी पत्नी सोडून २२ मी दुसरी भार्या करणार नाहीं हें मीं सत्य सांगितलें आहे." हे तात, ह्याप्रमाणें सर्व स्त्रीभोग सोडून देऊन २३ तो बरोबरीच्या मित्रांशीं सुशीलपणानें क्रीडा करूं लागला. हे तात, हें त्याचें मोठें कार्य आहे; परंतु, हें घडणार कसें? २४. ईश्वरांनाही हें अति दुर्घट आहे, मग इतरांची काय कथा! जड ह्मणतोः—हें त्यांचें भाषण ऐकून पिता विचार करूं लागला २५ आणि विचार करून तो नागराज हंसत हंसत त्या पुत्रांना ह्मणाला "अशक्य असें समजून जर मानव २६ कार्याविषयीं उद्योग सोडून देतील तर उद्योग नाहींसा होऊन मोठीच हानि होईल. पुरुषानें उद्योग न सोडितां कार्याला आरंभ करावा २७. कार्यसिद्धि दैवावर व उद्योगावर अवलंबून आहे. तस्मात्, मी तपश्चर्येचें अवलंबन करून पुत्रकार्याकरितां तसा यत्न करीन. ह्मणजे हें लवकरच घडून येईल." पुत्र ह्मणतोः—असें बोलून तो नागराज हिमालय पर्वताच्या प्लक्षावतरणनामक तीर्थाला जाऊन दुर्घट तप करूं लागला आणि त्रिकाल स्नान करून व नियमित आहार करून सरस्वती देवीचें इष्ट शब्दांनीं मनापासून स्तवन करूं लागला. अश्वतर ह्मणतोः—जगद्रक्षक शुभदेवीचें आराधन करण्याकरितां ब्रह्मकुमारी सरस्वतीला मस्तकानें प्रणाम करून मी तिचें स्तवन करीत आहें. हे देवि, मोक्ष व बंध दर्शविणारें जें कांहीं बरें अथवा वाईट पद आहे २८, २९, ३०, ३१, ३२ तें जरी संयोगरहित आहे तरी, हे देवि, तुझ्या ठिकाणीं तें सर्व युक्त आहे. हे देवि, सर्व जगताला आधारभूत असलेलें अविनाशी तत्त्व तूंच आहेस ३३. परब्रह्म अविनाशी असून हें जगत् नश्वर आहे. ज्याप्रमाणें काष्ठामध्यें अग्नि

ये च सूक्ष्माश्च सूक्ष्माः ये वा भूमौ येन्तरिक्षेऽन्यतो वा तेषां सत्यं त्वत्त एवोपलब्धिः ४७ यच्चा-मूर्तं यच्च मूर्तं समस्तं यद्वा भूतेष्वेकमेकं च किंचित् । यद्दिव्योऽस्ति क्ष्मातले खेऽन्यतो वा तत्संबन्धं त्वत्स्वरैर्व्यञ्जनैश्च. ४८ जड उवाच ॥ एवं स्तुता तदा देवी विष्णोर्जिह्वा सरस्वती । प्रत्युवाच महात्मानं नागमश्वतरं ततः ४९ सरस्वत्युवाच ॥ वरं ते कंबलभ्रातः प्रयच्छाम्युरगाधिप । तदुच्यतां प्रदास्यामि यत्ते मनसि वर्तते ५० अश्वतर उवाच ॥ साहाय्यं देवि देहि त्वं पूर्वं कंबलमेव च । समस्तस्वरसंबद्धमुभयोः संप्रयच्छ च ५१ सरस्वत्युवाच ॥ सप्त स्वरा ग्रामरागाः सप्त पन्नगसत्तम । गीतकानि च सप्तैव तावत्यश्चापि मूर्छनाः ५२ तानाश्चैकोनपञ्चाशत्तथा ग्रामत्रयं च यत् । एतत्सर्वं भवान्वेत्ता कंबलश्चैव तेऽनघ ५३ ज्ञास्यते मत्प्रसादेन भुजगेन्द्र परं तथा । चतुर्विधं पदं तालं त्रिप्रकारं लयत्रयम् ५४ गतित्रयं तथा तालं मया दत्तं चतुर्विधम् । एतद्भवान्मत्प्रसादात्पन्नगेन्द्रापरं च यत् ५५ आस्यान्तर्गतमायत्तं स्वरव्यञ्जनयोश्च यत् । तदशेषं मया दत्तं भवतः कंबलस्य च ५६ यथा नान्यस्य भूर्लोके पाताले चापि पन्नग । प्रणेतारौ भवन्तौ च सर्वस्यास्य भविष्यतः ५७ पाताले देवलोके च भूर्लोके चैव पन्नगौ । जड उवाच ॥ इत्युक्त्वा सा तदा देवी सर्वजिह्वा सरस्वती ५८ अगमाददर्शनं सद्यो नागस्य कमलेक्षणा । तयोश्च तयया दत्तं भ्रात्रोः सर्वमजायत ५९ विज्ञानमुभयोरग्र्यं पदतालस्वरादि-

आहेत आणि भूमींत, अंतरिक्षांत व इतर ठिकाणीं ज्या आहेत त्यांचा प्रत्यय खरोखर तुझ्यामुळेंच येत असतो ४७. अमूर्त व मूर्त असें सर्व जें कांहीं आहे, भूतांचे ठिकाणीं जें कांहीं एकरूप व अनेकरूप आहे, स्वर्ग, भूतळ व अंतरिक्ष ह्यांत व इतर ठिकाणीं जें आहे तें तुझ्याशीं संबद्ध असून त्वद्रूपस्वरांनीं व व्यंजनांनीं तें निर्दिष्ट होत आहे ४८. जड ह्मणतोः—ह्याप्रमाणें स्तवन केलें असतां विष्णुजिव्हा सरस्वती देवी महात्म्या अश्वतरनागाला ह्मणाली ४९ "हे कंबलबंधो नागराजा, तुला मी काय वर देऊं? तुझ्या मनांत जें असेल तें माग; ह्मणजे तें मी तुला देतें" ५०, अश्वतर ह्मणतोः—हे देवि, प्रथमतः तूं मला साहाय्यकर्ता कंबल दे; आणि आह्मां उभयतांना संपूर्ण स्वरांनीं संबद्ध अशी गायनविद्या दे ५१. सरस्वती ह्मणतेः— हे श्रेष्ट नागा, स्वर, ग्राम, राग, गीतें व मूर्छना हीं सात सातच आहेत ५२. हीं, एकुणपन्नास तान व तीन ग्राम हें सर्व, हे निष्पापा, तुला व कंबलाला अवगत होईल ५३. माझ्या प्रसादानें तुला दुसरेंही विदित होईल. चार प्रकारचे ताल, तीन तीन प्रकारचे तीन लय ५४, तीन गति व चतुर्विध ताल हीं मीं तुला दिलीं आहेत. हे नागराजा, माझ्या प्रसादामुळें हें व इतर तुला विदित होईल ५५. स्वर व व्यंजनें ह्यांवर अवलंबून असलेलें असें जें कांहीं माझ्या मुखांत आहे तें सर्व मीं तुला व कंबलाला दिलें आहे ५६. हे भुजंगा, भूलोकीं अथवा पातालामध्यें मी हें दुसऱ्या कोणाला दिलेलें नाहीं. हे भुजंगहो, स्वर्ग, मृत्यु व पाताळ ह्यांत आज ह्या सर्वांचे प्रणेते तुह्मींच व्हाल. जड ह्मणतोः— ती विष्णुजिव्हा सरस्वती देवी असें बोलली ५७, ५८ आणि लगेच ती कमलनयना नागाला दिसेनाशी झाली. नंतर देवीनें सांगित-

कम्। ततः कैलासशैलेन्द्रशिखरस्थितमीश्वरम् ६० गीतकैः सप्तभिर्नागौ तन्त्रीलयसमन्वितैः। आरिराधयिषू देवमनंगांगहरं हरम् ६१ प्रचक्रतुः परं यत्नमुभौ संहतवाक्यौ। प्रातर्निशायां मध्याह्ने सन्ध्ययोश्चापि तत्परौ ६२ ततः काळेन महता स्तूयमानो वृषध्वजः। तुतोष गीतकैस्तौ च प्राह संगृह्यतां वरः ६३ ततः प्रणम्याश्वतरः कंबलेन समं तदा। विज्ञापयन्महादेवं शितिकण्ठमुमापतिम् ६४ यदि नौ भगवन्प्रीतो देवदेव त्रिलोचन। ततो यथाभिलषितं वरमेनं प्रयच्छ नौ ६५ मृता कुवलयाश्वस्य पत्नी देव मदालसा। तेनैव वयसा सद्यो दुहितृत्वं प्रयातु मे ६६ जातिस्मरा यथापूर्वं तद्वत्कान्तिसमन्विता। योगिनी योगमाता च जायतां वचनात्तव ६७ ईश्वर उवाच॥ यथोक्तं पन्नगश्रेष्ठ सर्वमेतद्भविष्यति। मत्प्रसादादसंदिग्धं शृणु चेदं भुजंगम ६८ श्राद्धावसाने प्राप्ते त्वं मध्यमं पिण्डमात्मना। कामं चेमामभिध्यायन्कुरु त्वं पितृपूजनम् ६९ तत्क्षणादेव सा सुभ्रूर्भवतो मध्यमात्फणात्। समुत्पत्स्यति कल्याणी तथारूपा यथा मृता ७० स्वयमेवोपभुञ्जस्व ततः सर्वं भविष्यति। उत्पत्स्यते ततः सा तु सत्यं वै मध्यमात्फणात् ७१ एतच्छ्रुत्वा ततस्तौ तु प्रणिपत्य महेश्वरम्। रसातलमनुप्राप्तौ परितोषसमन्वितौ ७२ तथा च कृतवाञ्छ्राद्धं स नागः कम्बलानुजः। पिण्डं

---

त्याप्रमाणें त्या भ्रात्यांना पदें, ताल, स्वर इत्यादिविषयक सर्व श्रेष्ठ ज्ञान प्राप्त झालें. तदनंतर कैलासपर्वताच्या शिखरावर असलेल्या मदनारि शंकराचें आराधन करण्याविषयीं ते उभयतां नाग उत्सुक झाले आणि तंत्रीलययुक्त अशा सात प्रकारच्या गीतांनीं ईश्वराला संतुष्ट करण्याचा त्यांनीं मोठा प्रयत्न केला. ते नाग प्रातःकालीं, रात्रीं, मध्यान्हसमयीं व संधिकालींही तत्पर राहून बरोबर गायन करूं लागले ५९, ६०, ६१, ६२. तदनंतर शंकराचें स्तवन होतां होतां बराच काळ लोटला असतां तो वृषध्वज गायनांनीं संतुष्ट होऊन त्यांना "वर मागा" असें ह्मणाला ६३. तेव्हां कंबलासह, उमापति शितिकंठ महादेवाला प्रणाम करून अश्वतर ह्मणालाः ६४. "हे भगवन्, हे देवाधिदेव, हे त्रिलोचन, आपण आह्मांवर प्रसन्न असल्यास आह्मांला आमच्या मनांत असलेला वर आपण द्या ६५. कुवलयाश्वाची पत्नी मदालसा, हे देवा, मृत झाली आहे; ती आतांच्या आतांच तितक्याच वयाची माझी कन्या होवो ६६. तिला पूर्वीप्रमाणें पूर्वजन्माचें स्मरण राहो व तिचे ठिकाणीं क्षमाही तशीच असो; इतकेंच नव्हे परंतु, ती आपल्या वचनानें योगिनी व योगमाता होवो" ६७. ईश्वर ह्मणतोः—हे श्रेष्ठ भुजंगा, माझ्या प्रसादानें हें सर्व तुझ्या ह्मणण्याप्रमाणें निःसंशय होईल. हे भुजंगा, हें ऐकून घे ६८. श्राद्धसमाप्तिसमयीं तूं मधला पिंड भक्षण कर आणि ही कामना मनांत आणून तूं पितरांचें पूजन कर ६९. ह्मणजे ती सुंदरी कल्याणी तत्क्षणीं मरणसमयीं जशी होती तशीच तुझ्या मधल्या फणापासून उत्पन्न होईल ७०. तूं स्वतःच पिंड सेवन कर; ह्मणजे सर्व कांहीं होईल आणि ती खरोखर मधल्या फणापासून उत्पन्न होईल ७१. हें ऐकून त्यांनीं महेश्वराला प्रणिपात केला व आनंदानें ते रसातलाला गेले ७२. त्याप्रमाणें त्या अश्वतर नागानें श्राद्ध केलें आणि मधला पिंड याम-

च मध्यमं तद्रूपथावदुपभुक्तवान् ७३ उपभुक्ते ततः पिण्डे तस्य सा तनुमध्यमा । जज्ञे
निःश्वसतः सद्यस्तद्रूपा मध्यमात्फणात् ७४ न चापि कथयामास कस्यचित्स भुजंगमः ।
अन्तर्गृहे तां सुदतीं स्त्रीभिर्गुप्तामधारयत् ७५ तौ चाहरहरागत्य पुत्रौ नागपतेः सुखम् ।
ऋतध्वजेन सहितौ चिक्रीडातेऽमराविव ७६ एकदा तु स तौ प्राह स नागोऽश्वतरो मुदा ।
तन्मया पूर्वमुक्तं तु क्रियते किं नु तत्तथा ७७ स राजपुत्रो युवयोरुपकारी ममान्तिकम् ।
किं तु नानीयते वत्सावुपकाराय मानदः ७८ एवमुक्तौ पुनस्तेन पुत्रौ स्नेहवता तु तौ । गत्वा
तस्य पुरं सख्यू रेमाते तेन धीमता ७९ ततः कुवलयाश्वं तं कृत्वा किंचित्कथान्तरम् ।
अब्रूतां प्रणिपातेन स्वगृहागमनं प्रति ८० तावाह नृपपुत्रोऽसौ नन्विदं भवतोर्गृहम् । धन-
वाहनवस्त्रादि यन्मदीयं तदेव वाम् ८१ यस्य वां वाञ्छितं दातुं धनं रत्नमथापि वा । तदी-
यतां द्विजसुतौ यदि वां प्रणयो मयि ८२ एतावताहं दैवेन वञ्चितोऽस्मि दुरात्मना । यद्भ-
वद्भ्यां ममत्वं नो मदीये क्रियतां गृहे ८३ यदि वां मे प्रियं कार्यमनुग्राह्योऽस्मि वां यदि ।
तद्धने मम गेहे च ममत्वमनुकल्प्यताम् ८४ युवयोर्यन्मदीयं तन्मामकं युवयोः स्वयम् ।
एतत्सर्वं विजानीथ सखा प्राणो बहिश्चरः ८५ पुनर्नैवं विभिन्नार्थं वक्तव्यं द्विजसत्तमौ ।
मत्प्रसादपरौ प्रीत्या शापितौ हृदयेन मे ८६ ततः स्नेहार्द्रवदनौ तावुभौ नागनन्दनौ । ऊच-
तुर्नृपतेः पुत्रं किंचित्प्रणयकोपितम् ८७ ऋतुध्वज न संदेहो यथैवाह भवानिदम् । तथैव

माणें यथाविधि भक्षण केला ७३. तो पिंड खातांक्षणीं ती कृशोदरी त्याच रूपानें मध्यम फणापासून निःश्वासाबरोबर उत्पन्न झाली ७४; परंतु, त्या भुजंगानें कोणा-लाही न सांगतां त्या सुंदरीला स्त्रियांच्या योगानें घरांत गुप्त ठेविली ७५. इकडे ते नागराजाचे पुत्र प्रत्यहीं येऊन ऋतध्वजासह देवांप्रमाणें सुखानें क्रीडा करीत असत ७६. एकदां तो अश्वतर नाग आनंदानें त्यांना ह्मणाला "मीं पूर्वी सांगितलेलें कां बरें करूं नये ? ७७. वत्सहो, तुह्मांवर उपकार करणाऱ्या त्या राजपुत्राला प्रत्युपकारार्थ तुह्मी माझ्याजवळ कां आणीत नाहीं ?" ७८. असें त्यानें प्रेमानें सांगितलें असतां ते पुत्र त्या मित्राच्या नगरांत जाऊन त्या बुद्धिमानासह रममाण झाले ७९. तेव्हां भाषणामध्यें थोडेंसें विषयांतर करून स्वगृहीं येण्याविषयीं त्यांनीं प्रणिपातपूर्वक त्या कुवलयाश्वाची प्रार्थना केली असतां ८० त्यांना तो राजपुत्र ह्मणाला "खरोखर हें तुमचें घर आहे. धन, वाहन, वस्त्र इत्यादि जें माझें तेंच तुमचें ८१. हे द्विजपुत्र हो, माझ्यावर तुमचें प्रेम असेल तर तुह्मांपैकीं ज्याला धन, अथवा रत्न देण्याची इच्छा असेल त्यानें तें घ्यावें. तुह्मी माझ्या गृहाचे ठिकाणीं ममत्व करीत नाहीं हें माझें दुर्दैव होय ८२, ८३. तुह्मांला जर माझें प्रिय कर्तव्य असेल, आणि जर माझ्यावर अनुग्रह करा-वयाचा असेल तर माझें घर व धन तुह्मी आपलें समजा ८४. जें तुमचें तें माझें व जें माझें तें तुमचें हें सर्व समजून ठेवा. मित्र हा बाह्य प्राण आहे ८५. हे द्विजश्रेष्ठ, पुन-रपि तुह्मी असें तुटक भाषण करूं नका. प्रेमानें तुह्मी माझी मर्जी राखण्याविषयीं दक्ष असल्यामुळें मी तुह्मांला गळ्याची शपथ घालून हें सांगत आहें." ८६. नंतर प्रेमाश्रूंनीं

चास्मन्मनसि नात्र चिन्त्यमतोऽन्यथा ८८ किं त्वावयोः समं पित्रा प्रोक्तमेतन्महात्मना। द्रष्टुं कुवलयाश्वं तमिच्छामीति पुनःपुनः ८९ ततः कुवलयाश्वोऽपि समुत्थाय वरासनात्। यथाऽऽह तातेति वदन्प्रणाममकरोद्भुवि ९० कुवलयाश्व उवाच ॥ धन्योऽहमतिपुण्योऽहं कोऽन्योऽस्ति सदृशो मया। यत्तातो मामभिद्रष्टुं करोति प्रवणं मनः ९१ तदुत्तिष्ठत गच्छाम तातार्ज्ञां क्षणमप्यहम्। नातिक्रान्तुमिहेच्छामि पद्भ्यां तस्य शपाम्यहम् ९२ जड उवाच ॥ एवमुक्त्वा ययौ सोऽथ ताभ्यां नृपात्मजः। प्राप्तश्च गौतमीं पुण्यां निर्गम्य नगराद्बहिः ९३ तन्मध्येन ययुस्ते वै नागेन्द्रनृपनन्दनाः। मेने च राजपुत्रोऽसौ पारे तस्यास्तयोर्गृहम् ९४ ततश्चाकृष्य पातालं ताभ्यां नीतो नृपात्मजः। पाताले ददृशे चोभौ स पन्नगकुमारकौ ९५ फणामणिकृतोद्योतौ व्यक्तस्वस्तिकलक्षणौ। विलोक्य तौ सुरूपांगौ विस्मयोत्फुल्ललोचनः ९६ विहस्य चाब्रवीत्प्रेम्णा साधु भो द्विजसत्तमौ। कथयामासतुस्तौ तु पितरं पन्नगेश्वरम् ९७ शान्तम भ्यतरं नागं माननीयं दिवौकसाम्। रमणीयं ततोऽपश्यत्पातालं स नृपात्मजः ९८ कुमारैस्तरुणैर्वृद्धैरुरगैरुपशोभितम्। तथैव नागकन्याभिः क्रीडन्तीभिरितस्ततः ९९ चारुकुण्डलहाराभिस्ताराभिर्गगनं यथा। गीतवाद्यैस्तथान्यत्र वीणावेणुस्वरानुगैः १०० मृदंगपणवातोद्यहारि वेश्मशताकुलम्। वीक्ष-

अभिवंदन झालेले ते उभयतां नागकुमार प्रेमानें क्रुद्ध झालेल्या राजपुत्राला ह्मणाले ८७ "हे ऋतुध्वज, हें तुझ्या ह्मणण्याप्रमाणेंच निःसंशय आमच्या मनांत आहे; ह्याविषयीं तूं भलती कल्पना करूं नकोस ८८. परंतु,— कुवलयाश्वाच्या दर्शनाची मला इच्छा आहे—असें वारंवार महात्म्या पित्यानें आह्मांपाशीं सांगितलें आहे" ८९. नंतर कुवलयाश्व श्रेष्ठ आसनावरून उठला आणि " बाबा ह्मणतात त्याप्रमाणें " असें ह्मणत ह्मणत त्यानें भूमीवर प्रणाम केला ९०. कुवलयाश्व ह्मणतो:—ज्याअर्थी तातानें मला पाहण्याचें मनांत आणिलें आहे त्याअर्थी माझ्यासारखा दुसरा कोण धन्य व पुण्यवान् आहे ? ९१. तस्मात्, उठा; क्षणभर देखील ताताची आज्ञा उलंघणीवर टाकण्याची माझी इच्छा नाहीं, हें त्याच्या पायांशपथ मी तुह्मांला सांगत आहें ९२. जड ह्मणतो:— असें सांगून तो राजपुत्र त्यांच्या बरोबर निघाला आणि नगराबाहेर पडून तो पवित्र गोदावरीवर प्राप्त झाला असतां ९३ तिच्यांतून ते नागकुमार व राजकुमार चालले. तिच्या परतीरीं त्यांचें घर आहे असें त्या राजपुत्राला वाटलें ९४. नंतर त्यांनीं राजपुत्राला तेथून पातालांत नेलें असतां ते उभयतां नागकुमार ९५ फणांतील मणीनें प्रकाश पाडणारे व स्पष्ट स्वस्तिक चिन्हानें युक्त असे त्यानें अवलोकन केले. त्यांना सुरूप अवलोकन करून राजपुत्राचे नेत्र विस्मयानें प्रफुल्लित झाले ९६; आणि तो प्रेमानें हंसून ह्मणाला " हे द्विजश्रेष्ठ; उत्तम. " त्यांनीं पिता नागराजाला ९७ ह्मणजे देवमान्य व शांत अश्वतर नागाला तें सांगितल्यावर रमणीय पाताळ त्या राजपुत्रानें अवलोकन केलें ९८. कुमार, तरुण व वृद्ध भुजंगांनीं व इकडे तिकडे क्रीडा करणाऱ्या नागकन्यांनीं तें सुशोभित झालेलें होतें ९९. ताऱ्यांप्रमाणें भूषित झालेल्या गगनाप्रमाणें तें, मनोहर कुंडलें व हार धारण करणाऱ्या

माणः स पातालं ययौ शत्रुजितः सुतः १ सह ताभ्यामभीष्टाभ्यां पन्नगाभ्यामरिंदमः । ततः प्रविश्य ते सर्वे नागराजनिवेशनम् २ददृशुस्ते महात्मानमुरगाधिपतिं स्थितम् ।दिव्यमाल्याम्बरधरं मणिकुण्डलभूषणम् ३ स्वच्छमुक्ताफललताहारिहारोपशोभितम् । केयूरिणं महाभागमासने सर्वकाञ्चने ४मणिविद्रुमवैडूर्यजालान्तरितरुपर्दे । स ताभ्यां दर्शितस्तस्य तातोस्माकमसाविति ५ वीरः कुवलयाश्वोयं पित्रे चासौ निवेदितः।ततो ननाम चरणौ नागेन्द्रस्य ऋतुध्वजः६ समुत्थाप्य बलाद्गाढं स नागः परिषस्वजे । मूर्ध्नि चैवमुपाघ्राय चिरंजीवेत्युवाच ह ७ निहतामित्रवर्गश्च पित्रोः शुश्रूषणं कुरु । वत्स धन्यस्य कथ्यन्ते परोक्षस्यापि ते गुणाः ८ भवतो मम पुत्राभ्यामाभ्यां ये मे निवेदिताः । तदेतैरेव वर्द्धेथा मनोवाक्कायचेष्टितैः९ जीवितं गुणिनः श्लाघ्यं जीवन्नपि मृतोऽगुणी । गुणवान्निर्वृतिं पित्रोः शत्रूणां हृदये ज्वरम् १० करोत्यात्मनि तं कुर्वन्विश्वासं च महाजने ११देवताः पितरो विप्रा मित्रार्थिविभवादयः। बान्धवाश्च तथेच्छन्ति जीवितं गुणिनश्चिरम् १२ परवादनिवृत्तानां दुर्गतेषु दयावताम् । गुणिनां सफलं जन्म संश्रितानां विपद्गतैः१३ पुत्र उवाच ॥ एवमुक्त्वा स तं वीरं पुत्राविदमथाब्रवीत् । पूजां कुवलयाश्वस्य कर्तुकामो भुजंगमः १४ स्नानादिकक्रमं कृत्वा सर्वमेव यथाक्रमम् । मधु-

गकन्यांनीं भूषित झालेलें होतें. वीणा व वल्गुन ह्यांच्या ध्वनींशीं तुलणाऱ्या गीतशब्दांनीं १०० आणि मृदंग, पणव व आतोद्य ह्या वाद्यांच्या ध्वनींनीं तें त्रिसवेधवा असून तें कडी घरांनीं गजबजलेलें होतें. तो शत्रुजिताचा पुत्र शत्रुंजय ऋतध्वज पाताळ पहात पहात त्या प्रिय नागांसह चालला असतां ते सर्व नागराजाच्या गृहांत शिरले १, २. तेथें हिरे, पोवळीं व वैडूर्यमणि ह्यांच्या जाळ्या असल्यानुळें झांकून गेलेल्या सुवर्णमय सिंहासनावर—दिव्यमाला, वस्त्रें, रत्नकुंडलें, भूषणें, स्वच्छ मोत्यांचा मनोहर हार व बाहूभूषणें ह्यांनीं युक्त असा—महाशय व महात्मा नागराज स्थित असल्याचें त्यांनीं अवलोकन केलें; हा आमचा तात ह्मणून त्यांनीं त्याला सांगितलें ३, ४, ५ व हा वीर कुवलयाश्व ह्मणून त्यांनीं पित्यालाही कळविलें असता ऋतुध्वजानें नागराजाच्या चरणांना वंदन केलें ६. तेव्हां बलानें त्याला उठवून नागराज कडकडून भेटला आणि मस्तक हुंगून ह्मणाला " दीर्घायु हो ७; शत्रुवर्ग नष्ट होऊन तूं मातापितराची सेवा कर. हे वत्सा, तूं धन्य असल्यामुळें तुझ्या गुणांची प्रशंसा तुझ्या मागेंही होत असते ८. माझ्या ह्या पुत्रांनीं जे तुझे गुण मला सांगितले आहेत त्याच मानसिक, वाचिक व शारीरिक गुणांनीं तूं वृद्धिंगत हो ९. गुणवानाचेंच जीवित श्लाघ्य आहे आणि निर्गुणी पुरुष जिवंत असूनही मेलेलाच आहे. गुणवान् पुत्र मातापितरांना सुख, शत्रूच्या चित्तांत भय आणि आत्मनिष्ठ विश्वासाकरितां मोठ्या लोकांच्या ठिकाणीं विश्वास उत्पन्न करीत असतो १०, ११. देव, पितर, विप्र, मित्र, याचक, मुमुक्षु, व बांधव गुणी पुरुषाला दीर्घायुष्य चिंतीत असतात १२. परनिंदेपासून निवृत्त, दुःखितांवर दया करणाऱ्या आणि विपत्तींमध्ये सांपडलेल्यांना आश्रय देणाऱ्या गुणी पुरुषांचाच जन्म सफल होय " १३. पुत्र

कथं याच्ञां मम जिह्वा करिष्यति ९ येन चिन्त्यं धनं किं चिन्मम गेहेऽस्ति नास्ति वा । पितृबाहुतरुच्छायां संश्रिताः सुखिनो हि ते १० ये तु बाल्यात्प्रभृत्येव विना पित्रा कुटुम्बिनः । ते सुखास्वादविभ्रंशान्मन्ये धात्रैव वञ्चिताः ११ तद्वयं तत्प्रसादेन धनरत्नादिसंचयम् । पितृभक्ताः प्रयच्छामः कामतो नित्यमर्थिनाम् १२ तत्सर्वमिह संप्राप्तं यदंघ्रियुगलं तव । मच्चूडामणिना घृष्टं यच्चांगस्पर्शमस्तवान् १३ पुत्र उवाच । इत्येवं प्रश्रितं वाक्यमुक्तः पन्नगसत्तमः । प्राह राजसुतं प्रीत्या पुत्रयोरुपकारिणम् १४ यदि रत्नसुवर्णादि मत्तोऽवाप्तुं न ते मनः । यदन्यन्मनसः प्रीत्यै ब्रूहि तत्ते ददाम्यहम् १५ कुवलयाश्व उवाच । भगवंस्त्वत्प्रसादेन प्रार्थितस्य गृहे मम । सर्वमस्ति विशेषेण संप्राप्तं तव दर्शनात् १६ कृतकृत्योऽस्मि चैतेन सफलं जीवितं मम । यदंगसंश्लेषमितस्तव देवस्य मानुषः १७ ममोत्तमांगे त्वत्पादरजसा यदिहास्पदम् । कृतं तेनैव न प्राप्तं किं मया पन्नगेश्वर १८ यदि त्ववश्यं दातव्यो वरो मे मनसेप्सितः । तत्पुण्यकर्मसंस्कारो हृदयान्मा व्यपैतु मे १९ सुवर्णमणिरत्नादि वाहनं गृहमासनम् । स्त्रियोऽन्नपानं पुत्राश्च चारुमाल्यानुलेपनम् २० एते च विविधा भोगा गीतवाद्यादिकं च यत् । सर्वमेतन्मम मतं फलं पुण्यवनस्पतेः २१ तस्मा-

---

मेलों आहें ७,८. द्रव्य नसेल तर पुरुषांचें मन याचनाभिमुख होतें; परंतु, सर्व कांहीं असतांना माझी जिव्हा याचना करील कशी ? ९. पितृबाहुरूपवृक्षच्छायेचा आश्रय असल्यामुळें "माझ्या घरांत कांहीं धन आहे किंवा नाहीं" ह्याविषयीं ज्यांना मुळींच काळजी नसते तेच सुखी होत १०; आणि पित्याचा वियोग झाल्यामुळें बाल्यावस्थे- पासूनच जे कुटुंबाची काळजी करीत असतात ते सुखास्वादापासून भ्रष्ट झाल्यामुळें विधात्यानेंच फसविले आहेत असें मी समजतों ११. आह्मी पितृभक्त त्याच्या कृपेनें धनरत्नादिकांचा संचय याचकांना यथेष्ट नित्य अर्पण करीत असतों १२. माझ्या मस्तकांतील चूडामणीनें आपलें चरणसंपुट घासलें व आपल्या शरीराचा स्पर्श मला प्राप्त झाला ह्यांत सर्वच कांहीं मला मिळालें १३. पुत्र ह्मणतो:—असें नम्र भाषण राजपुत्रानें केल्यावर तो नागराज पुत्रांवर उपकार करणाऱ्या त्या राज- पुत्राला ह्मणाला १४ "रत्न, सुवर्ण इत्यादि माझ्यापासून घेण्याची तुझी इच्छा नस- ल्यास तुझ्या मनाला जें कांहीं दुसरें आवडत असेल तें सांग; मी तें तुला देईन" १५. कुवलयाश्व ह्मणतो:—हे भगवन्, आपण जरी मला मागण्याविषयीं आज्ञा केली आहे तरी आपल्या कृपेनें माझ्या घरीं सर्व आहे आणि विशेषतः आपल्या दर्शनानें सर्व कांहीं प्राप्त झालें आहे १६. तुज देवाच्या आलिंगनानें मी मानव कृतकृत्य झालों आहें आणि एवढ्यानें माझें जीवित सफल झालें आहे १७. हे नागराज, माझ्या मस्तकावर आपल्या चरणांची धूळ झडली एवढयानें मला काय वरें मिळालें नाहीं ? १८ मनाप्र- माणें मला वर देणेंच असेल तर माझ्या चित्तांतून पुण्यकर्मसंस्कार नष्ट होऊं नये १९. सुवर्ण, हिरे, रत्नें, वाहन, गृह, आसन, स्त्रिया, अन्न,पान, पुत्र, मनोहर पुष्पें व उटी हे नानाप्रकारचे भोग आणि गीतवाद्य वगैरे हें सर्व कांहीं पुण्यवृक्षाचें फळ

नरेण तन्मूलसेके यत्नः कृतात्मना। कर्तव्यः पुण्यसक्तानां न किंचिद्भुवि दुर्लभम् २२ अश्वतर उवाच ॥ एवं भविष्यति प्राज्ञ यथ धर्माश्रिता मतिः। सत्यं चैतत्फलं सर्वं धर्मस्यैव यथा त्वया २३ तथाप्यवश्यं मद्गेहमागतेन त्वयाधुना। यद्यं यन्मनुपे लोके दुष्प्रापं भवतो मतम् २४ पुत्र उवाच ॥ तस्य तद्वचनं श्रुत्वा स तदा नृपनन्दनः। मुखावलोकनं चक्रे पन्नोभरपुत्रयोः २५ ततस्तौ प्रणिपत्योभौ राजपुत्रस्य यन्मतम्। तत्पितुः सकलं वीरौ कथयामासतुः स्फुटम् २६ तातास्य पत्नी दयिता श्रुत्वेमं विनिपातितम्। अन्यमस्यित्वान्प्राणान्विप्रलब्धा दुरात्मना २७ केनापि कृतवैरेण दानवेन कुबुद्धिना। गान्धर्वराजस्य सुता नाम्ना ख्याता मदालसा २८ कृतज्ञोयं ततस्तात प्रतिज्ञां कृतवानिमाम्। नान्या भार्या भवित्री मे वर्जयित्वा मदालसाम् २९ द्रष्टुं तां चारुसर्वांगीमयं वीरो ऋतध्वजः। तात वाञ्छति यदि तत्क्रियते तत्कृतं भवेत् ३० अश्वतर उवाच ॥ भूतैर्वियोगि नो योगस्तादृशैरेव मानुषः। कथमेतद्विना स्वप्नं मायां वा शंबरोदिताम् ३१ पुत्र उवाच ॥ प्रणिपत्य भुजंगेशं पुत्रः शत्रुजितस्ततः। प्रत्युवाच महात्मानं प्रेमलज्जासमन्वितः ३२ मायामयीमप्यधुना मम तात मदालसाम्। यदि दर्शयसे मन्ये परं कृतमनुग्रहम् ३३ अश्वतर उवाच ॥ तस्मात्पश्येह वत्स त्वं मायां चेद्द्रष्टुमिच्छसि। अनुग्राह्यो भवान्गेहे बालोप्यभ्यागतो गुरुः ३४ पुत्र उवाच ॥ आनयामास

---

होय असें मला वाटतें २०, २१. तस्मात्, जितेंद्रिय पुरुषानें त्या वृक्षाच्या मुळाशीं पाणी घालण्याचा यत्न केला पाहिजे. कारण, पुण्यासक्त पुरुषांना जगतामध्यें कांहीं- एक दुर्लभ नाहीं २२. अश्वतर ह्मणतोः-हे प्राज्ञ, ह्याप्रमाणें तुझी मति धर्माकडेच राहील. तुझ्या ह्मणण्याप्रमाणें खरोखर हें सर्व धर्माचेंच फल आहे २३. तथापि सांप्रत माझ्या घरीं ज्याअर्थी तूं आला आहेस त्याअर्थी मनुष्यलोकीं जें कांहीं तुला दुर्मिळ वाटत असेल तें तूं माझ्यापासून घे २४. पुत्र ह्मणतोः-तें ऐकून राजपुत्रानें नागराजपुत्रांच्या मुखाकडे पाहिलें असतां २५ त्या उभयतां वीरपुत्रांनीं प्रणाम करून राजपुत्राला संमत असलेलें सर्व कांहीं स्पष्टपणें पित्याला कथन केलें २६. (ते ह्मणाले) "हे तात, ह्याचा वध ऐकून ह्याची प्रिय पत्नी मृत झाली. कोणी वैरी दुरात्म्या व दुष्टबुद्धि दानवानें तिला फ.विलें. ती गंधर्वराजकन्या मदालसा होय २७, २८. हे तात, त्यामुळें ---मदालसेशिवाय माझी दुसरी भार्या होणार नाहीं--- अशी ह्या कृतज्ञानें प्रतिज्ञा केली आहे २९ व वीर ऋतध्वज त्या सर्वांगसुंदरीला पाहूं इच्छीत आहे. तेव्हां हे तात, असें झाल्यास त्याच्या मनाप्रमाणें होईल" ३०. अश्वतर ह्मणतोः--- ज्या भूतांचा वियोग झाला आहे त्याच भूतांचा तशाच प्रकारचा संयोग होणें ही गोष्ट स्वप्नाशिवाय अथवा शंबरविहित मायेशिवाय शक्य कशी? ३१ पुत्र ह्मणतोः---नंतर प्रेम व लज्जा ह्यांनीं युक्त असलेला शत्रुजिताचा पुत्र महात्म्या नागराजाला प्रणाम करून ह्मणाला ३२ "बाबांनीं सांप्रत जरी मायामयी मदालसा मला दर्शविली तरी मी मोठा अनुग्रह समजेन" ३३. अश्वतर ह्मणतोः---तस्मात्, हे वत्सा, मायाच पाहण्याची इच्छा असल्यास पहा; घरीं आलेल्या तुझ्यावर अनुग्रह करणें भाग आहे.

नागेन्द्रो गृहे गुप्तां मदालसाम् । दर्शयामास च तदा राजपुत्राय तां शुभाम् ३५ तेषां संमो-हनार्थाय जजल्प च ततः स्फुटम् । सेयं न वेति ते भार्या राजपुत्र मदालसा ३६ जड उवाच ॥ स दृष्ट्वा तां तदा तन्वीं तत्क्षणाद्विगतत्रपः । प्रियेति तामभिमुखं ययौ वाचमुदीरयन् ३७ निवारयामास च तं नागः सोऽश्वतरस्त्वरन् । अश्वतर उवाच ॥ मायेयं पुत्र मा स्प्राक्षीः प्रागेव कथितं तव ३८ अन्तर्धानमुपैत्याशु माया संस्पर्शनादिभिः । ततः पपात मेदिन्यां स तु मूर्छा-परिप्लुतः ३९ हा प्रियेति वदन्सोऽथ चिन्तयामास भामिनीम् । मोहो ममायं नो वेति नालं प्रत्य-क्षवानहम् ४० अहो ममेत्यहं चेति चलं प्रत्यययोनिहन् । येनाहं पातनोऽरीणां विना शस्त्रं निपा-तितः ४१ ममेति दर्शितानेन मिथ्यामायेति विस्फुटम् । वाय्वम्बुतेजसां भूमेराकाशस्य च चेष्टया ४२ पुत्र उवाच ॥ ततः कुवलयाश्वं स समाश्वास्य भुजंगमः । कथयामास तत्सर्वं मृतसंजीवनादिकम् ४३ ततः प्रहृष्टः प्रतिलभ्य कान्तां प्रणम्य नागं निजमाजगाम । संस्तू-यमानः स्वपुरं तमश्वमारुह्य संचिन्तितमभ्युपेतम् ४४ शृणुयाद्भक्तिपूर्वं यो नैरन्तर्येण मान-वः । वेदघोषफलं तेन प्राप्तं वै भुवि दुर्लभम् ४५ संप्राप्नोति सुखं नित्यं सर्वकामसमन्वितः । लोके च दुर्लभं तस्य नास्ति किंचिन्न विद्यते ४६ [ १७०४ ] इति श्रीमार्कंडेयपुराणे मदा-लसोपाख्याने पुनर्मदालसां प्राप्य पातालान्निर्गमो नाम द्वाविंशोऽध्यायः ॥ २२ ॥

कारण, अभ्यागत बाल असला तरी गुरु होय ३४. पुत्र ह्मणतोः—नागराजानें घरा-मध्यें गुप्त ठेविलेली ती कल्याणी मदालसा आणवून राजपुत्राला दर्शविली ३५ आणि त्याला मोह पाडण्याकरितां "हे राजपुत्रा, तीही तुझी भार्या मदालसा आहे किंवा नाहीं?" असें त्यानें स्पष्ट विचारिलें ३६. पुत्र ह्मणतोः—त्या सुंदरीला पाहतांक्षणीं लाज बाजूला ठेवून प्रिये, असें ह्मणत ह्मणत तो तिच्याकडे जाऊं लागला असतां ३७ त्या अश्वतर नागानें त्याचें सत्वर निवारण केलें. अश्वतर ह्मणतोः—हे पुत्रा, स्पर्श करूं नको; ही माया ह्मणून तुला पूर्वी सांगितलें आहे ३८. स्पर्श वगैरे करितांक्षणीं माया गुप्त होत असते. हें ऐकून तो राजपुत्र, हे प्रिये, असें ह्मणत ह्मणत मूर्च्छित होऊन भूमीवर पडला आणि स्त्रीचें चिंतन करीत ह्मणाला "मला हा मोह आहे किंवा नाहीं हें बरोबर समजत नाहीं ३९, ४०. अहो, हें माझें हा मी ह्या समजुतीचें सामर्थ्य फार मोठें आहे व त्याच्याच योगानें शत्रूंचा वध करणारा मी शस्त्रावांचून हाणून पडलों आहें ४१. पृथ्वी, उदक, तेज, वायु आणि आकाश ह्यांच्या हालचालीनें हें माझें अशी मिथ्या माया ह्या सामर्थ्यानें दर्श-विली आहे "४२. पुत्र ह्मणतोः—नंतर त्या नागानें कुवलयाश्वाला धीर देऊन तें मृत-संजीवन वगैरे सर्व कांहीं कथन केलें ४३. नंतर स्त्री परत मिळाल्यामुळें तो राजपुत्र आनंदित झाला आणि मनांत आणितांक्षणीं प्राप्त झालेल्या त्या अश्वावर आरूढ होऊन लोक स्तुति करीत असतांना नागाला प्रणाम करून तो आपल्या नगरांत गेला ४४. जो मानव हें आख्यान निरंतर श्रवण करील त्याला भूमीवर दुर्लभ असलेलें वेदघोष-फल प्राप्त होईल ४५; सर्व मनोरथ पूर्ण होऊन त्याला प्रत्यहीं सुख होईल आणि जगतांत त्याला कांहीं एक दुर्लभ रहाणार नाहीं ४६. ह्याप्रमाणें श्रीमार्कंडेयपुराणांतर्गत

पुत्र उवाच ॥ आगम्य स्वपुरं सोथ पित्रोः सर्वमशेषतः । कथयामास तन्वंगी यथा प्राप्ता पुनर्मृता १ ननाम सापि चरणौ श्वश्रूश्वशुरयोः शुभा । स्वजनं च यथापूर्वं वन्दनाश्लेषणादिभिः २ पूजयामास तन्वंगी यथान्यायं यथा वयः । ततो महोत्सवो जज्ञे पौराणां तत्र वै पुरे ३ ऋतध्वजश्च सुचिरं तया रेमे सुमध्यया । निर्झरेषु च शैलानां निम्नगापुलिनेषु च ४ काननेषु च रम्येषु वनेषूपवनेषु च । पुण्यक्षयं वांछमाना सापि कामोपभोगतः ५ सह तेनातिकान्तासु रेमे रम्यासु भूमिषु । ततः कालेन महता शत्रुजित्स नराधिपः ६ सम्यक्प्रशास्य वसुधां कालधर्ममुपेयिवान् । ततः पौरा महात्मानं पुत्रं तस्य ऋतध्वजम् ७ अभ्यषिञ्चन्त राजानमुदाराचारचेष्टितम् । सम्यक्पालयतस्तस्य प्रजाः पुत्रानिवौरसान् ८ मदालसायाः संजज्ञे पुत्रः प्रथमजस्ततः । तस्य चक्रे पिता नाम विक्रान्त इति धीमतः ९ तुतुषुस्तेन वै भृत्या जहास च मदालसा । सा वै मदालसा पुत्रं बालमुत्तानशायिनम् १० उल्लापनच्छलेनाह रुदमानमविस्वरम् ११ शुद्धोऽसि रे तात न तेऽस्ति नाम कृतं च ते कल्पनयाधुनैव । पञ्चात्मकं देहमिदं न तेऽस्ति नैवास्य त्वं रोदिषि कस्य हेतोः १२ न वा भवान्रोदिति वै स्वजन्मा शब्दोयमासाद्य महीसमूहम् । विकल्प्यमानो विविधैर्गुणार्थैर्गुणाश्च भौताः

---

मदालसोपाख्यानांतील पुनरपि मदलसा प्राप्त होऊन पातालांतून बाहेर पडण्याविषयीं बाविसावा अध्याय समाप्त झाला. ॥ २२ ॥

पुत्र ह्मणतोः—आपल्या नगरांत येऊन त्यानें मृत झालेली सुंदरी परत कशी मिळाली हें सर्व आईबापांना सांगितलें १. त्या कल्याणीनेंही सासूसासऱ्यांच्या चरणीं वंदन केलें आणि इतरांचीही पूर्वीच्या पद्धतीप्रमाणें वंदन, आलिंगन इत्यादिकांच्या योगानें भेट घेतली २.त्या सुंदरीनें वयाप्रमाणें ज्याचा त्याचा यथान्याय सत्कार केल्यानंतर त्या नगरांत लोकांमध्यें मोठा उत्सव झाला ३. ऋतध्वज त्या सुंदरीसह नद्यांचीं वाळवंटें, पर्वतावरील झरे, रम्य अरण्यें, वनें व उपवनें ह्या ठिकाणीं चिरंकाल क्रीडा करूं लागला; व तीही कामोपभोगानें पुण्यक्षय करण्याकरितां ४, ५ त्याच्या बरोबर अतिमनोहर व रम्य प्रदेशांत क्रीडा करूं लागली. नंतर बराच काळ लोटल्यावर तो शत्रुजित राजा ६ उत्तम रीतीनें पृथ्वीचें राज्य करून परलोकीं गेला असतां पौरजनांनीं त्याच्या उदार आचरण व चेष्टित ह्यांनीं युक्त असलेल्या त्या महात्म्या ऋतध्वजसंज्ञक पुत्राला राज्याभिषेक केला. औरस पुत्रांप्रमाणें तो प्रजांचें पालन करीत असतांना ७,८ मदालसेला पहिला पुत्र झाला व त्या बुद्धिमान् पुत्राचें नांव पित्यानें विक्रांत असें ठेविलें ९. त्याच्या योगानें मदालसेला हर्ष होऊन सेवकजनही आनंदित झाले.एकदां तो लहान मुलगा रडतांना पडून उच्च स्वरानें रडत असतांना त्याची समजूत घालण्याचे मिषानें मदालसा त्याला ह्मणाली १०,११ "बाबारे, तूं शुद्ध आहेस; तुझें नांव नसून कल्पनेनेंच सांप्रत तें ठेविलें आहे. हें पंचभूतात्मक शरीर तुझें नाहीं व तूंही त्याचा नाहींस. मग कां रडतोस ? १२. पृथ्वीवर गेऊन तूं रडूं नकोस. तुझा हा जन्म शुद्ध आहे. नानाप्रकारच्या गुणांनीं हा देह निर्माण झा-

सकलेन्द्रियेषु १३ भूतानि भूतैः परिदुर्बलानि वृद्धिं समायाति यथेह पुंसः। अन्नाम्बुपानादि-भिरेव कस्य न तेऽस्ति वृद्धिर्न च तेऽस्ति हानिः १४ त्वं कञ्चुके शीर्यमाणे निजेऽस्मिंस्तस्मिन्स्वदेहे मूढतां मा व्रजेथाः। शुभाशुभैः कर्मभिर्देहमेतन्मदादिमूढैः कञ्चुकस्ते पिनद्धः १५ तातेति किंचित्तनयेति किंचिदम्बेति किंचिद्दयितेति किंचित्। ममेति किंचिन्न ममेति किंचिद्भौतं संघं बहुधा मा लपेथाः। १६ दुःखानि दुःखोपगमाय भोगान्सुखाय जानाति विमूढचेताः। तान्येव दुःखानि पुनः सुखानि जानाति विद्वानविमूढचेताः १७ हासोऽस्थिसंदर्शनमक्षियुग्ममत्यु-ज्ज्वलं यत्कलुषं वसायाः। कुचादिपीनं पिशितं घनं तत्स्थानं रतेः किं नरको न योषित् १८ यानं क्षितौ यानगतश्च देहो देहेऽपि चान्यः पुरुषो निविष्टः। ममत्वमुर्व्यां न तथा यथा स्वे देहेऽतिमात्रं च विमूढतैषा १९ त्यज धर्ममधर्मं च उभे सत्यानृते त्यज। उभे सत्यानृते त्यक्त्वा येन त्यजसि तत्त्यज २० वर्धमानं सुतं सा तु राजपत्नी दिने दिने। त्वन्नामादिना बोधमनयन्निर्ममात्मकम् २१ यथा यथा बलं लेभे यथा लेभे मतिं पितुः। तथा तथात्मबोधं च सोवापन्मातृभाषितैः २२ इत्थं तया स तनयो जन्मप्रभृति बोधितः।

ठेला आहे; सर्व इंद्रियांचे ठिकाणीं भौतिक गुण आहेत १३. भूतांच्याच योगानें दुर्बल भूतें वृद्धिंगत होत असतात आणि कोणत्याही पुरुषाचे ठिकाणीं अन्नोदकादि सेवनानें भूतेंच वृद्धिंगत होतात. वास्तविक तुला वृद्धिही नाहीं व हानिही नाहीं १४. हे आपलें आंगडें फाटूं लागलें असतां तूं त्या स्वशरीराचे ठिकाणीं मोहित होऊन जाऊं नको. हें शरीर शुभाशुभ कर्मांनीं प्राप्त झालेलें आहे आणि मदादिसंप्राप्ति आशीं मूढांनीं तुला आंगडें घातलें आहे १५. वास्तव, पंचभूतांच्या समुदायापैकींच कोणाला तात, कोणाला पुत्र, कोणाला माता, कोणाला भार्या, कोणाला आपलें व कोणाला परकें असें तूं अनेक प्रकारचें भाषण व्यर्थ करूं नकोस १६. परिणामीं भोग दुःखदायक असल्यामुळें वास्तविक दुःखरूपच असतांना मूढ पुरुष त्यांच्या योगानें सुख होईल असें समजत असतो; परंतु, मोहरहित ज्ञानी पुरुष त्या दुःखांना सुख मानीत असतो १७. हास्य म्हणजे हाडकें दाखविणें, अतितेजस्वी डोळे म्हणजे वसेचें कलुषित स्थान आणि स्तनादि पुष्ट अवयव म्हणजे घट्ट मांस. तस्मात्, शरीरामध्यें क्रीडेचें स्थान आहे तरी कोणतें ? स्त्री नरक नव्हे काय ? १८. भूमीवर वाहन असून त्यांत देह व देहांत दुसरा पुरुष बसलेला असतो. तस्मात्, भूमीच्या ठिकाणीं जसें ममत्व योग्य नाहीं तसें स्वदेहाचे ठिकाणींही योग्य नाहीं. असें असूनही ममत्व असणें हा अतिशय मूढपणा होय १९. धर्म व अधर्म सोडून सत्य व अनृत सोडून दे आणि उभयतां सत्यानृत सोडिल्यानंतर ज्याच्या योगानें तूं सोडीत आहेस तेंही सोड" २०. याप्रमाणें प्रत्यहीं वृद्धिंगत होत असलेल्या त्या राजपुत्राला ती राजपत्नी त्याच्याशीं बोलण्याच्या मिषानें निर्मम बोध करूं लागली २१. हे तात, जसा जसा तो बलयुक्त होऊं लागला व जशी जशी त्याला मति प्राप्त होऊं लागली तसें तसें आत्मज्ञानही त्याला मातृभाषणामुळें होऊं लागलें २२. याप्रमाणें जन्मापासून तिनें पुत्राला बोध केला असतां त्या मन-

यनेचराणाम् ६१ राज्यं कुर्वन्सुहृदो नन्दयेथाः साधूनरक्षंस्तात यज्ञैर्यजेथाः । दुष्टाश्निघ्नन्वैरिणश्चाजिमध्ये गोविप्रार्थे वत्स मृत्युं भजेथाः ६२ [ १७६६ ] इति श्रीमार्कण्डेयपुराणे प्रवृत्तिमार्गोपदेशानं नाम त्रयोविंशोऽध्यायः ॥ २३ ॥

पुत्र उवाच॥ एवमुल्लाप्यमानस्तु स तु मात्रा दिने दिने । वधृधे वयसा बालो बुद्ध्या चालर्कसंज्ञितः१ स कौमारकमासाद्य ऋतध्वजसुतस्तदा। कृतोपनयनः प्राज्ञः प्रणिपत्याह मातरम्२मया यदम्ब कर्तव्यमैहिकामुष्मिकाय वै। सुखाय वद तत्सर्वं प्रश्रयावनतस्य मे३ममार्थं धर्मार्थं प्रजानां चैव यद्धितम्। श्रेयसे यच्च तत्सर्वं प्रजारञ्जनमादितः ४मदालसोवाच ॥ वत्स राज्याभिषिक्तेन प्रजारञ्जनमादितः। कर्तव्यमविरोधेन स्वधर्मश्च महीभृताम् ५ व्यसनानि परित्यज्य सप्तमूलहराणि वै। आत्मा रिपुभ्यः संरक्ष्यो बहिर्मन्त्रविनिर्गमात्६दुष्टादुष्टांश्च जानीयात्यानरिदोषतः। अष्टधा नाशमाप्नोति स्वचक्रात्स्यन्दनाद्यथा७ तथा राजाप्यसंदिग्धं मन्त्रविनिर्गमात्। चरैश्चरास्तथा शत्रोरन्वेष्टव्याः प्रयत्नतः८विश्वासो न तु कर्तव्यो राज्ञा मित्राप्तबन्धुषु। कार्ययोगादमित्रेषु विश्वसीत नराधिपः९स्थानवृद्धिक्षयज्ञेन षाड्गुण्यविदितात्मना। भवितव्यं नरेन्द्रेण न कामवशवर्तिना १० प्रागात्ममन्त्रिणश्चैव ततो भृत्या महीभृता।

आनंदित कर ६१. बाबारे, राज्य करीत असतांना मित्रांना आनंद दे; साधूंचें रक्षण होण्याकरितां यज्ञयाग कर; दुष्ट व वैरी ह्यांचा संग्रामांत वध कर; आणि, हे वत्सा, गोब्राह्मणांकरितां आयुष्य खर्ची घाल ६२. ह्याप्रमाणें श्रीमार्कंडेयपुराणांतील प्रवृत्तिमार्गोपदेशाविषयीं तेविसावा अध्याय समाप्त झाला ॥ २३ ॥

पुत्र ह्मणतोः—ह्याप्रमाणें माता प्रत्यहीं त्याच्याशीं बोलूं लागली असतांना तो बालक अलर्क वयानें व बुद्धीनें मोठा होऊं लागला १. कौमारावस्था प्राप्त होऊन उपनयन झाल्यावर तो ऋतध्वजाचा प्राज्ञ पुत्र मातेला प्रणाम करून ह्मणाला २ "हे माते, ऐहिक व पारलौकिक सुखाकरितां जें मला कर्तव्य असेल तें सर्व विनयानें नम्र झालेल्या मला तूं सांग ३. माझ्याकरितां, धर्माकरितां, प्रजाजनांच्या हिताकरितां, कल्याणाकरितां, आणि प्रजारंजनाकरितां जें कांहीं कर्तव्य असेल तें मला तूं आरंभापासून कथन कर ४. मदालसा ह्मणतेः—हे वत्सा, राज्याभिषिक्त पुरुषानें प्रथम इतर राजांशीं विरोध न होईल अशा रीतीनें प्रजारंजन प्रथम करून स्वधर्मावलंबन करावें ५. सप्तरूप मूल नष्ट करणारीं व्यसनें सोडून देऊन व मसलत बाहेर न फुटण्याची खबरदारी घेऊन शत्रूपासून आपलें रक्षण करावें ६. अष्टप्रधानामध्यें दुष्ट कोण ते व अदुष्ट कोण ते हें जाणावें. कारण, वक्र रथामुळें ज्याप्रमाणें नाश होतो त्याचप्रमाणें अमात्यांचे ठिकाणीं आपल्याविषयीं शत्रुबुद्धि असल्यास मसलत बाहेर फुटून राजाचा निःसंशय नाश होतो ७. हेरांच्या योगानें शत्रूचे हेर हुडकून काढावे. राजानें प्रसंगविशेषीं मित्र, आप्त, बांधव ह्यांच्यावरही विश्वास ठेवितां उपयोगी नाहीं. व प्रसंगविशेषीं शत्रूंवरही विश्वास ठेवणें भाग आहे ८, ९. राजानें कधींही कामाधीन होतां उपयोगी नाहीं. सद्गुण ओळखून असावें आणि राष्ट्र अभ्युदयस्थितींत किंवा ऱ्हासस्थितींत आहे हें

ज्ञेयांश्चानन्तरं पौरा विरुध्येत ततोऽरिभिः ११ यस्त्वेतानविनिर्जित्य वैरिणो विजिगीषते । सोऽजितात्माजितामात्यः शत्रुवर्गेण बाध्यते १२ तस्मात्कामादयः पूर्वं जेयाः पुत्र महीभृता। तज्जये हि जयो राज्ञो राजा नश्यति तैर्जितः १३ कामः क्रोधश्च लोभश्च मदो मानस्तथैव च। हर्षश्च शत्रवो ह्येते नाशाय कुमहीभृताम् १४ कामप्रसक्तमात्मानं स्मृत्वा पाण्डुं निपातितम्। निवर्तयेत्तथा क्रोधादनुह्रादं हतात्मजम् १५ हतमैलं तथा लोभान्मदाद्वेनं द्विजैर्हतम्। मानादनायुषः पुत्रं हतं हर्षात्पुरञ्जयम् १६ एभिर्जितैर्जितं सर्वं मरुत्तेन महात्मना। स्मृत्वा विवर्जयेदेतान्दोषांश्च महीपतिः १७ काककोकिलभृङ्गाणां बकव्यालशिखण्डिनाम्। हंसकुक्कुटलोहानां शिक्षेत चरितं नृपः १८ कौशिकस्य क्रियां कुर्याद्विपक्षे मनुजेश्वरः। चेष्टां पिपीलिकानां च काले भूपः प्रदर्शयेत् १९ ज्ञेयाग्निविस्फुलिङ्गानां बीजचेष्टा च शाल्मलेः। चन्द्रसूर्यस्वरूपं च नीत्यर्थे पृथिवीक्षिता २० बन्धकी पद्मशरभशूलिकागुर्विणीस्तनात्। एवं साम्ना च भेदेन प्रदानेन च पार्थिव २१ दण्डेन च प्रकुर्वीत नीत्यर्थं पृथिवीक्षिता। प्रज्ञा नृपेण चादेया तथा चण्डालयोषितः २२ शक्रार्कयमसोमानां तद्वद्वायोर्महीपतिः। रूपाणि पञ्च कुर्वीत महीपालनकर्मणि २३ यथेन्द्रश्चतुरो मासान्वार्योघेणैव भूतलम्। आप्या-

---

असावें १०. राजानें प्रथमतः आपले मंत्री, नंतर सेवक आणि नंतर प्रजाजन यांस-खून नंतर शत्रूंशीं विरोध करावा ११. ह्यांना आपलेसे करून घेतल्याशिवाय जो शत्रु जिंकण्याचें मनांत आणितो त्या अजितेंद्रिय व स्वाधीन नसलेल्या अमात्यांनीं युक्त असलेल्या राजाला शत्रुवर्गापासून पीडा होते १२. तस्मात्, हे पुत्रा, राजानें पूर्वी कामादिशत्रु जिंकावे. कारण, ते जिंकिले गेल्यास राजाचा जय होतो; परंतु, राजाला त्यांनीं जिंकिल्यास त्याचा नाश होतो १३. काम, क्रोध, लोभ, मद, मान व हर्ष हे शत्रु राजाच्या नाशाला कारण होतात १४. पांडु कामासक्त झाल्यामुळें मेल्याचें स्मरण करून राजानें कामापासून निवृत्त व्हावें; क्रोधानें अनुन्हाद निपुत्रिक झाला हें लक्ष्यांत आणून क्रोधाचा त्याग करावा १५; लोभानें ऐल राजाला मृत्यु आल्याचें मनांत आणून लोभ सोडावा; वेन राजाला मदामुळें ब्राह्मणांच्या हातून मृत्यु आला ही गोष्ट लक्ष्यांत ठेवून मदापासून पराङ्मुख व्हावें; मानामुळें अनायुषाचा पुत्र मेल्याचें मनांत बागवून निरभिमानी असावें आणि हर्षामुळें पुरंजयाचा वध झाल्याचें अंतःकरणांत बागवून पुरुष नें हर्ष होऊं देऊं नये १६. ह्यांचा पराजय झाल्यामुळें महात्म्या मरुत्तानें सर्व कांहीं जिंकिलें. यास्तव, ही आठवण ठेवून भूपतीनें हे सहा दोष वर्ज्य करावे १७. काक, कोकिल, भृंग, बक, व्याल, मयूर, हंस, कुक्कुट व लोह ह्यांचें अनुकरण राजानें करावें १८. शत्रूंशीं उलूकपक्ष्याप्रमाणें वर्तन करावें; व प्रसंगविशेषीं मुंगीप्रमाणेंही राजानें वागावें १९. राजानें नीतीकरितां ठिणग्या, सांवरीचें बीं व चंद्रसूर्याचें स्वरूप जाणावें २०. हे राजा, वेश्या, कमल, शरभ, शूलिका, आणि गर्भिणीस्तन लक्ष्यांत घेऊन राजानें साम, दान, भेद व दंड हे चार उपाय नीतीकरितां योजावे आणि चंडालस्त्रीपासूनही राजानें बुद्धिग्रहण करावी २१, २२. इंद्र, सूर्य, यम, चंद्र

पर्जन्यस्तथा लोकान्परिचारैर्महीपतिः २४ मासानष्टौ यथा सूर्यस्तोयं हरति रश्मिभिः । सूक्ष्मेणै-वाम्बुपायेन तथा शुल्कादिना नृपः २५ यथा यमः प्रियद्वेष्यौ प्राप्ते काले नियच्छति । तथा प्रियाप्रिये राजा दुष्टादुष्टे समो भवेत् २६ पूर्णेन्दुमालोक्य यथा प्रीतिमाञ्जायते नरः । एवं यत्र प्रजाः सर्वा निर्वृतास्तच्छशिव्रतम् २७ मारुतः सर्वभूतेषु निगूढश्चरते यथा । एवं चरे-न्नृपश्चारैः पौरामात्यारिबन्धुषु २८ न लोभार्थैर्न कामार्थैर्नार्थार्थैर्यस्य मानसम् । पदार्थैः कृष्यते धर्मात्स राजा स्वर्गमृच्छति २९ उत्पथग्राहिणो मूढान्स्वधर्माच्चलितान्नरान् । यः करोति निजे धर्मे स राजा स्वर्गमृच्छति ३० वर्णधर्मा न सीदन्ति यस्य राष्ट्रे तथाश्रमाः । राजंस्तस्य सुखं तात परत्रेह च शाश्वतम् ३१ एतद्राज्ञः परं कृत्यं तथैतद्वृद्धिकारणम् । स्व-धर्मे स्थापनं नृणां चाल्यते न कुबुद्धिभिः ३२ पालनेनैव भूतानां कृतकृत्यो महीपतिः । सम्यक्पालयिता भागं धर्मस्याप्नोति वै यतः ३३ एवमाचरते राजा चातुर्वर्ण्यस्य रक्षणम् । स सुखी विहरत्येष शक्रस्यैति सलोकताम् ३४ [ १८०० ] इति श्रीमार्कण्डेयपुराणे मदा-लसोपाख्याने चतुर्विंशोऽध्यायः ॥ २४ ॥

---

वें वायु ह्यांचीं स्वरूपें पृथ्वीचें परिपालन करीत असतांना राजानें धारण करावीं २३. ज्याप्रमाणें इंद्र चार महिने पर्जन्य वृष्टि करून भूतळ तृप्त करितो त्याप्रमाणें भूपतीनें प्रजाजन आपल्या कर्मांनीं तृप्त करावें २४. आठ महिनेपर्यंत ज्याप्रमाणें किरणांच्या योगानें सूर्य उदक हरण करीत असतो व पुनरपि वृष्टीच्या रूपानें परत देतो त्याचप्र-माणें राजानें सूक्ष्म कर वगैरेंच्या रूपानें प्रजेपासून द्रव्य हरण करावें व त्याच्या अभ्युद-याकरितां खर्च करावें २५. ज्याप्रमाणें वेळ आली असतां प्रिय आणि शत्रु ह्या दोहोंचाही निग्रह यम करितो त्याचप्रमाणें राजानें सज्जन व दुर्जन ह्या दोहोंशींही सारखें असावें २६. पूर्णचंद्र पाहून प्रसन्न होणाऱ्या पुरुषाप्रमाणें राजाला पाहून सर्व प्रजा सुखी होणें हें चंद्रव्रत होय २७. ज्याप्रमाणें वायु सर्व भूतांचे ठिकाणीं गुप्त संचार करितो त्याच-प्रमाणें हेरांच्या योगानें नागरिक जन, अमात्य, शत्रु व बंधु ह्यांच्या ठिकाणीं राजानें गुप्त संचार करावा २८. ज्याचें मन धर्मापासून लोभमूलक, काममूलक अथवा अर्थ-मूलक गोष्टींनीं ओढिलें जात नाहीं त्या राजाला स्वर्ग प्राप्त होतो २९. स्वधर्मच्युत होऊन भलत्या मार्गाला लागलेल्या मूढ जनांना जो स्वधर्माबद्दल प्रवृत्त करितो तो राजा स्वर्गाला जातो ३०. बाबारे, ज्याच्या राष्ट्रांत वर्णाश्रमधर्माचा ऱ्हास होत नाहीं त्या राजाला ऐहिक व पारलौकिक सुख अक्षय्य प्राप्त होतें ३१. प्रजाजनांची प्रवृत्ति स्वधर्माकडे करून दुष्ट लोकांच्या योगानें त्यांना स्वधर्मभ्रष्ट न होऊं देणें हें राजाचें अभ्युदयकारक श्रेष्ठ कर्म होय ३२. उत्तम रीतीनें परिपालन करणाऱ्या राजाला ज्याअर्थी प्रजेच्या पुण्याचा विभाग मिळतो त्याअर्थी तिचें परिपालन करूनच स्वतःला राजानें कृतकृत्य मानावें ३३. ह्याप्रमाणें जो राजा चारवर्णांचें रक्षण करितो तो सुखी होऊन इंद्रलोकीं जातो ३४. ह्याप्रमाणें श्रीमार्कंडेयपुराणांतर्गत मदालसोपाख्या-नासंबंधीं चोविसावा अध्याय समाप्त झाला ॥ २४ ॥

अनुज्ञातो वरां दत्त्वा दक्षिणां गुरवे ततः १४ गार्हस्थ्याश्रमकामस्तु गृहस्थाश्रममावसेत् । वानप्रस्थाश्रमं वापि चतुर्थं वेच्छयात्मनः १५ तत्रैव वा गुरोर्गेहे द्विजो निष्ठामवाप्नुयात् । गुरोरभावे तत्पुत्रे तच्छिष्ये तत्सुतं विना १६ शुश्रूषुर्निरभीमानो ब्रह्मचर्याश्रमं वसेत् । उपा-रतस्ततस्तस्माद्गृहस्थाश्रमकाम्यया १७ ततोऽसमानर्षिकुलां तुल्यां भार्यामरोगिणीम् । उद्वहेन्न्यायतोऽव्यंगां गृहस्थाश्रमकारणात् १८ स्वकर्मणा धनं लब्ध्वा पितृदेवातिथींस्तथा । सम्यक्संप्रीणयेद्भक्त्या पोषयेच्चाश्रितांस्तथा १९ भृत्यात्मजस्नुषायोष दीनार्थपतितानपि । यथाशक्त्यन्नदानेन वयांसि पशवस्तथा २० एष धर्मो गृहस्थस्य ऋतावभिगमस्तथा । पञ्चय-ज्ञविधानं तु यथाशक्ति न हापयेत् २१ पितृदेवातिथिज्ञातिभुक्तशेषं स्वयं नरः । भुञ्जीत च समं भृत्यैर्यथाविभवमात्मनः २२ एष तूद्देशतः प्रोक्तो गृहस्थस्याश्रमो मया । वानप्रस्थस्य धर्मं ते कथयाम्यवधार्यताम् २३ अपत्यसंततिं दृष्ट्वा प्राज्ञो देहस्य चानतिम् । वानप्रस्थाश्रमं गच्छेदात्मनः शुद्धिकारणात् २४ तत्रारण्योपभोगश्च तपोभिश्चात्मकर्षणम् । भूमौ शय्या ब्र-ह्मचर्यं पितृदेवातिथिक्रियाः २५ होमस्त्रिषवणं स्नानं जटावल्कलधारणम् । मौनादिकरणं चैव वन्यस्नेहनिषेवणम् २६ इत्येष पापशुद्ध्यर्थमात्मनश्चोपकारकः । वानप्रस्थाश्रमस्तस्माद्भिक्षो-स्तु धर्मोऽपरः २७ चतुर्थस्य स्वरूपं तु श्रूयतामाश्रमस्य मत् । यश्च धर्मोऽस्य धर्मज्ञैः प्रोक्तस्ता-

---

श्रेष्ठ दक्षिणा द्यावी आणि त्याची अनुज्ञा घेऊन १४ गृहस्थाश्रमाची इच्छा असल्यास तो आश्रम स्वीकारावा. किंवा आपल्या इच्छेप्रमाणें वानप्रस्थाश्रम अथवा संन्यासाश्रम ग्रहण करावा १५. किंवा द्विजानें गुरुगृहींच आयुष्य काढावें; आणि गुरु नसल्यास त्याच्या पुत्रापाशीं व तोही नसल्यास शिष्यापाशीं रहावें १६. अभिमानरहित होऊन व गुरुशु-श्रूषेविषयीं तत्पर राहून ब्रह्मचर्याश्रमाचें अवलंबन करावें. नंतर गृहस्थाश्रमाची इच्छा झाल्यास तो आश्रम संपवून १७ गृहस्थाश्रमाकरितां भिन्नगोत्रप्रवरांतील, रोगरहित, अव्यंग व योग्यतेनें बरोबरीची भार्या न्यायतः करावी १८. स्वकर्मानें द्रव्य मिळवून पि-तर, देव आणि अतिथि तृप्त करावे; भक्तीनें आश्रितांचें पोषण करावें १९ आणि भृत्य, पु-त्र, स्नुषा, दीन, याचक, पतित, पक्षी व पशु ह्यांचेंही यथाशक्ति अन्नदानानें पोषण करावें २०. हा व ऋतुकालीं स्त्रीसमागम हा गृहस्थाचा धर्म होय. पंचमहायज्ञ न टाकितां ते यथा-शक्ति करावे २१. पितर, देव, अतिथि व ज्ञाति ह्यांनीं सेवन करून उरलेलें अन्न आपल्या वैभवाप्रमाणें पोष्यवर्गासह सेवन करावें २२. हा गृहस्थाश्रम मी तुला संक्षेपतः सांगि-तला आहे. आतां वानप्रस्थधर्म तुला सांगतो तो ऐक २३. अपत्य संतति व देहाची दुर्दशा पाहून आत्मशुद्धीकरितां विचारी पुरुषानें वानप्रस्थाश्रमधर्म स्वीकारावा २४. तेथें वन्य वस्तु सेवन करून तपश्चर्येनें देह राखावा. भूमीवर शयन, ब्रह्मचर्य, पितर, देव व अतिथि ह्यांचें संतर्पण २५, होम, त्रिकालस्नान, जटाधारण, वल्कलपरिधान, मौनादिसेवन आणि वन्य स्नेहाचा स्वीकार २६ हा पापक्षालनार्थ आत्मोपकारक वा-नप्रस्थाश्रम होय. ह्यानंतर भिक्षूचा वेगळा आश्रम होय २७. त्या चतुर्थाश्रमाचें स्वरूप म्हणजे, हे तात, महात्म्या धर्मवेत्त्यांनीं जो त्या आश्रमाचा धर्म सांगितला तो, मत्स्ना-

त महात्मभिः २८ सर्वसंगपरित्यागो ब्रह्मचर्यमकोपता । जितेन्द्रियत्वमावासे नैकस्मिन्वस तिश्चिरम् २९ अनारम्भस्तथाहारे भिक्षान्नं चैककालिकम् । आत्मज्ञानावबोधश्च तथा चात्मावलोकनम् ३० चतुर्थे स्वाश्रमे धर्मो मयायं ते निवेदितः । सामान्यमन्यवर्णानामाश्रमाणां च मे शृणु ३१ सत्यं शौचमहिंसा च अनसूया तथा क्षमा । आनृशंस्यमकार्पण्यं संतोषश्चाष्टमो गुणः ३२ एते संक्षेपतः प्रोक्ता धर्मा वर्णाश्रमेषु च । एतेषु नित्यधर्मेषु नित्यं तिष्ठ समन्ततः ३३ स याति ब्रह्मलोकं हि यावदिन्द्राश्चतुर्दश ३४ यश्चोल्लंघ्य स्वकं धर्मं स्ववर्णाश्रमसंश्रितम् । नरोन्यथा प्रवर्तेत स दण्ड्यो भूभृतो भवेत् ३५ ये च स्वधर्मसंत्यागात्पापं कुर्वन्ति मानवाः । उपेक्षतस्तान्भूपतेरिष्टापूर्तं प्रणश्यति ३६ तस्माद्राज्ञा प्रयत्नेन सर्वे वर्णाः स्वधर्मतः । प्रवर्तन्तोन्यथा दण्ड्याः स्थाप्याश्चैव स्वकर्मसु ३७ ( १८२७ ) इति श्रीमार्कण्डेयपुराणे मदालसानुशासनं नाम पञ्चविंशोऽध्यायः ॥ २५ ॥

अलर्क उवाच ॥ यत्कार्यं पुरुषेणेह गार्हस्थ्यमनुवर्तता । बन्धश्च स्यादकरणे क्रियायां यस्य चोच्छ्रितिः १ उपकाराय यच्चॄणां यच्च वर्ज्यं गृहे सताम् । यथा च क्रियते तन्मे यथावत्पृच्छतो वद २ मदालसोवाच ॥ वत्स गार्हस्थ्यमास्थाय नरः सर्वमिदं जगत् । पुष्णाति तेन लोकांश्च स जयत्यभिवाञ्छितान् ३ पितरो मुनयो देवा भूतानि मनुजास्तथा । कृमिकीटपतंगाश्च वयांसि पशवोऽसुराः ४ गृहस्थमुपजीवन्ति ततस्तृप्तिं प्रयान्ति च । मुखं चास्य

पासून तूं ऐक २८. सर्वसंगपरित्याग, ब्रह्मचर्य, अक्रोध, जितेंद्रियत्व, एके ठिकाणीं चिरकाल वास्तव्य नसणें २९, भोजनार्थ अन्न तयार न करणें, एकवेळ भिक्षान्न, आत्मज्ञानोपदेश व आत्मचिंतन ३० हा चतुर्थाश्रमधर्म मीं तुला सांगितला आहे. आतां इतर वर्णाश्रमांना साधारण असलेला धर्म तूं माझ्यापासून ऐक ३१. सत्य, शौच, अहिंसा, अनसूया, क्षमा, आनृशंस्य, औदार्य व आठवा गुण संतोष ३२ हे संक्षेपतः (सर्वसाधारण) वर्णाश्रमधर्म होत. हे नित्य धर्म सर्वदा आचरणारा ३३ चवदा इंद्र होईपर्यंत ब्रह्मलोकीं राहतो ३४. परंतु, जो स्वकीय वर्णाश्रमधर्म सोडून अन्य मार्गानें वागतो तो राजदंडास पात्र होतो ३५. कारण, धर्मत्यागानें जे मानव पाप करितात त्यांची उपेक्षा करणाऱ्या राजाचें इष्टापूर्तकर्म व्यर्थ होतें ३६. तस्मात्, राजानें सर्व वर्णांची प्रयत्नानें स्वधर्माकडे प्रवृत्ति करवावी आणि जे अशा मार्गानें वागणारे असतील त्यांना दंड करून स्वधर्मनिष्ठ करावें ३७. ह्याप्रमाणें श्रीमार्कंडेयपुराणांतील मदालसानुशासननामक पंचविसावा अध्याय समाप्त झाला ॥ २५ ॥

अलर्क ह्मणतोः—जें केल्यानें अभ्युदय व न केल्यानें बंध प्राप्त होतो व जें पुरुषांच्या कल्याणाला कारण होतें असें गृहस्थाश्रमी पुरुषानें येथें काय करावें ? कसें करावें ? आणि सज्जनांनीं घरांत काय वर्ज्य करावें ? हें तूं मला इत्थंभूत कथन कर १, २. मदालसा ह्मणतेः—हे वत्सा, गृहस्थाश्रमी पुरुष ह्या सर्व जगताचें पोषण करीत असल्यामुळें इहलोक प्राप्त करून घेतो ३. पितर, मुनि, देव, भूतें, मानव, कृमि, कीटक, पतंग, पक्षी, पशु व असुर ४ हे गृहस्थावर उपजीविका करीत असून तृप्त

निरीक्षन्ते अपि नो दास्यतीति वै ५ सर्वस्याधारभूतेयं वत्स धेनुस्त्रयीमयी । यस्यां प्रतिष्ठितं विश्वं विश्वहेतुश्च या मता ६ ऋक्पृष्ठासौ यजुर्मध्या सामवक्त्रशिरोधरा । इष्टापूर्तविषाणा च साधुसूक्ततनूरुहा ७ शान्तिपुष्टिशकृन्मूत्रा वर्णपादप्रतिष्ठिता । आजीव्यमाना जगतां साऽक्षया नापचीयते ८ स्वाहाकारः स्वधाकारो वषट्कारश्च पुत्रक । हन्तकारस्तथैवान्यस्तस्याः स्तनचतुष्टयम् ९ स्वाहाकारस्तनं देवाः पितरश्च स्वधामयम् । मुनयश्च वषट्कारं देवभूतसुरेतराः १० हन्तकारं मनुष्याश्च पिबन्ति सततं स्तनम् । एवमाप्याययत्येषा देवादीनखिलांस्त्रयी ११ एतद्वत्सचतुष्कं तु नरस्तनचतुष्टये । न नियुञ्ज्याद्यथाकालं तेन स्युस्ते विमानिताः १२ देवादीनखिलान्येषु संतर्पयति मानवः । तेषामुच्छेदकर्ता यः पुरुषोऽत्यन्तपापकृत् १३ स तमस्यन्धतामिस्रे तामिस्रे च निमज्जति । यस्त्वेतां मानवो धेनुं स्वैर्वत्सैरमरादिभिः १४ प्रापयत्युचिते काले स स्वर्गायोपपद्यते । तस्मात्पुत्र मनुष्येण देवर्षिपितृमानवाः १५ भूतानि चाद्यदिवसं पोष्याणि स्वतनुर्यथा । तस्मात्स्नातः शुचिर्भूत्वा देवर्षिपितृतर्पणम् १६ प्रजापतेस्तथैवाद्भिः काले कुर्यात्समाहितः । सुमनोगन्धधूपैश्च देवानभ्यर्च्य मानवः १७ ततोऽग्नेस्तर्पणं कुर्यात्ततश्च बलिमित्यथ । ब्रह्मणे गृहमध्ये तु विश्वेदेवेभ्य एव च १८ धन्वन्तरिं समुद्दिश्य प्रागुदीच्यां बलिं क्षिपेत् । प्राच्यां शक्राय याम्यायां यमाय बलिमाहरेत् १९ प्रतीच्यां वरुणाय

होत असतात आणि " आह्मांला देईल काय ! " ह्मणून त्याच्या मुखाकडे पहात असतात ५. हे वत्सा, ही वेदत्रयमय धेनु सर्व जगताचा आधार असून तिच्यावर जगत् राहिलें आहे व तीच जगताचें कारण आहे ६. ऋक्, यजु व साम हे वेद अनुक्रमें तिचा पृष्ठभाग, मध्यभाग व मुखसहित मान असुन इष्ट व पूर्त हीं तिचीं शिंगें आहेत; उत्कृष्ट सूक्तें हे तिचे केंस आहेत ७; शांतिक व पौष्टिक कर्म हें अनुक्रमें गोमय व गोमूत्र होय; आणि ब्राह्मणादि वर्ण हे तिचे पाय होत. जगतें तिच्यावर उपजीविका करीत आहेत तरी ती अक्षय्य धेनु ऱ्हास पावत नाहीं ८. हे पुत्रा, स्वाहाकार, स्वधाकार, वषटकार व हंतकार हे तिचे चार स्तन होत ९. पहिल्याचें देव, दुसऱ्याचें पितर, तिसऱ्याचें मुनि, देव, भूतें व असुर १० आणि चवथ्याचें मानव सर्वदां पान करीत असतात; आणि ह्याप्रमाणें ही वेदत्रयरूप धेनु सर्व देवादिकांचें पोषण करीत असते ११. ह्या चार वत्सांना चार स्तन वेळेवर पुरुषानें न पाजिल्यामुळें त्यांचा अपमान होतो १२. ह्यास्तव, ह्या स्तनांच्या योगानें सर्व देवादिक मानवानें तृप्त करावे. त्यांचा उच्छेद करणारा अत्यंत पापी पुरुष १३ तामिस्र व अंधतामिस्र नरकांत पडतो; आणि जो मानव ह्या धेनूला तिचीं देवादि वासरें योग्य वेळीं पाजितो तो स्वर्गवासाला पात्र होतो. तस्मात्, हे पुत्रा, मनुष्यानें, देव, ऋषि, पितर, मानव १४, १५ आणि भूतें ह्यांचें प्रत्यहीं स्वदेहाप्रमाणें पोषण करावें. ह्यास्तव, स्नान करून शुचि व्हावें आणि देव, ऋषि, पितर व प्रजापति ह्यांचें उदकानें वेळेवर स्वस्थमनानें संतर्पण करून गंध, पुष्पें, धूप इत्यादि उपचारांनीं देवांचें पूजन करावें १६, १७; नंतर अग्नि तृप्त करून ह्याप्रमाणें बलिदान करावें. ब्रह्मा व विश्वेदेव ह्यांना गृह-

फलदानेन येषाम्यभाति स स्वयम् । पूजयेत नरः भक्त्या तेनैवातिथिमादरात् ३४ कुर्याचाहरहः श्राद्धमन्नाद्येनोदकेन च । पितृनुद्दिश्य विप्रांश्च भोजयेद्विप्रमेव वा ३५ अन्नस्याग्रं तदुद्धृत्य ब्राह्मणायोपपादयेत् । भिक्षां च याचितां दद्यात्परिव्राड्ब्रह्मचारिणाम् ३६ ग्रासप्रमाणा भिक्षा स्यादग्रं ग्रासचतुष्टयम् । अग्रं चतुर्गुणं प्राहुर्हन्तकारं द्विजोत्तमाः ३७ भोजनं हन्तकारं वा अग्रं भिक्षामथापि वा । अदत्त्वा तु न भोक्तव्यं यथाविभवमात्मनः ३८ पूजयित्वातिथीनिष्टाञ्ज्ञातीन्बन्धूंस्तथार्थिनः । विकलान्बालवृद्धांश्च भोजयेच्चातुरांस्तथा ३९ वाञ्छते क्षुत्परीतात्मा यश्चान्योऽन्नमकिंचनः । कुटुम्बिना भोजनीयः स्वसमं विभवे सति ४० श्रीमन्तं ज्ञातिमासाद्य यो ज्ञातिरवसीदति । सीदता यत्कृतं तेन तत्पापं स समश्नुते ४१ सायं चैष विधिः कार्यः पूर्वोक्तं तत्र चातिथिम् । पूजयेच्च यथाशक्ति शयनासनभोजनैः ४२ एवमुद्वहतस्तात गार्हस्थ्यं भारमास्थितम् । स्कन्धे विधाता देवाश्च पितरश्च महर्षयः ४३ श्रेयोभिवर्षिणः सर्वे भवन्त्यतिथिबान्धवाः । पशुपक्षिमृगास्तृप्ता ये चान्ये सूक्ष्मकीटकाः ४४ गाथाश्चात्र महाभाग स्वयमत्रिरगायत । ताः शृणुष्व महाभाग गृहस्थाश्रमसंस्थिताः ४५ देवान्पितॄंश्चातिथींश्च तद्वत्संपूज्य बान्धवान् । जामयश्च गुरूंश्चैव गृहस्थो विभवे सति ४६ श्वभ्यश्च श्वपचेभ्यश्च वयोभ्यश्चावपेद्भुवि । वैश्वदेवं हि नामैतत्कुर्यात्सायं तथा दिने ४७ मांसमन्नं

---

निराश होऊन ज्याच्या घरांतून अतिथि परत फिरतो त्याला आपलें पातक देऊन व त्याचें पुण्य घेऊन तो जातो ३३. पुरुष स्वतः जें सेवन करीत असेल तेंच उदक व शाक यथाशक्ति अतिथीला देऊन त्याचें आदरानें पूजन करावें ३४. प्रत्यहीं पितरांना उद्देशून अन्नोदकानें श्राद्ध करावें आणि एक अथवा अनेक ब्राह्मण जेऊं घालावे ३५; किंवा अन्नाचे चार घास काढून ब्राह्मणाला द्यावे आणि संन्यासी व ब्रह्मचारी ह्यांनीं मागितल्यावर त्यांना अन्नभिक्षा घालावी ३६. एक घास हें भिक्षेचें प्रमाण होय. चार घास ह्मणजे एक अग्र आणि चार अग्रें ह्मणजे एक हंतकार असें द्विजश्रेष्ठांचें ह्मणणें आहे ३७. भोजन, हंतकार, अग्र किंवा भिक्षा यथाशक्ति न देतां भोजन करूं नये ३८. अतिथि व इष्ट ह्यांचें पूजन करून ज्ञाति, बंधु, याचक, पंगु, बाल, वृद्ध व आतुर ह्यांना भोजन घालावें ३९. क्षुधेनें व्याकुळ झालेला जो कोणी दुसराही जवळ कांहींएक नसून अन्नाची इच्छा करीत असेल त्यालाही सामर्थ्य असल्यास कुटुंबी पुरुषानें आपल्याप्रमाणें भोजन घालावें ४०. नातेवाईक श्रीमान् असतांना जो अन्नाला महाग झालेला असतो त्यानें अन्नाकरितां केलेलें पातक त्या श्रीमानालाही लागतें ४१. सायंकाळींही हा विधि करावा आणि शयन, आसन व भोजन यांच्या योगानें यथाशक्ति अतिथीचा सत्कार करावा ४२. बाबारे, ह्याप्रमाणें खांद्यावर ठेविलेला गार्हस्थ्यभार वाहणाऱ्या पुरुषाचे विधाता, देव, पितर व महर्षि ४३ हे सर्व अतिथिबांधव, पशु, पक्षी, मृग व इतरही तृप्त झालेले सूक्ष्म कीटक असे सर्व कल्याण करीत असतात ४४. हे महाशय, गृहस्थाश्रमसंबंधानें स्वतः अत्रिमुनींचें जें ह्मणणें आहे तें तूं ऐक ४५. देव, पितर, अतिथि, बांधव, स्नुषा व गुरु यांचा आदर,

तथा शाकं गृहे यथोपसाधितम् । न च तत्स्वयमभीयाद्विधिवत्तन्न निर्वपेत् ४८( १८८९)
इति श्रीमार्कण्डेयपुराणे मदालसोपाख्याने षड्विंशतितमोऽध्यायः ॥ २६ ॥

मदालसोवाच ॥ नित्यं नैमित्तिकं चैव नित्यनैमित्तिकं तथा । गृहस्थस्य त्रिधा कर्म तन्निशामय पुत्रक १ पञ्चयज्ञाश्रितं नित्यं यदेतत्कथितं तव । नैमित्तिकं तथा चान्यत्पुत्रजन्मक्रियादिकम् २ नित्यनैमित्तिकं ज्ञेयं पर्वश्राद्धादि पण्डितैः । तत्र नैमित्तिकं वक्ष्ये श्राद्धमाभ्युदयं तव ३ पुत्रजन्मनि यत्कार्यं जातकर्म समं नरैः । विवाहादौ च कर्तव्यं सर्वं सम्यक्क्रमोदितम् ४ पितरश्चात्र संपूज्याः ख्याता नान्दीमुखास्तु ये । पिण्डांश्च दधिसंमिश्रान्दद्याद्यवसमन्वितान् ५ उदङ्मुखः प्राङ्मुखो वा यजमानः समाहितः । वैश्वदेवविहीनं तत्केचिदिच्छन्ति मानवाः ६ युग्माश्चात्र द्विजाः कार्यास्ते पूज्याश्च प्रदक्षिणम् । एतं नैमित्तिकं वृद्धौ तथान्यच्चौर्ध्वदैहिकम् ७ मृताहनि तु कर्तव्यमेकोद्दिष्टं शृणुष्व तत् । दैवहीनं तथैकार्घ्यं तथैवैकपवित्रकम् ८ आवाहनं न कर्तव्यमग्नौकरणवर्जितम् । प्रेतस्य पिण्डमेकं च दद्यादुच्छिष्टसंनिधौ ९ तिलोदकं चापसव्यं तन्नामस्मरणान्वितम् । अक्षय्यममुकस्येति स्थाने विप्रविसर्जने १० अभिरम्यतामितिब्रूयाद्ब्रूयुस्तेऽभिरताः स्म ह । प्रतिमासं भवेदेतत्कार्यमासंवत्सरान्नरैः ११ अथ संव-

---

सामर्थ्य असल्यास, गृहस्थानें करून ४६ श्वान, चांडाल व पक्षी ह्यांना भूमीवर अन्न घालावें. हा वैश्वदेव सकाळसंध्याकाळ करावा ४७. मांस, अन्न अथवा शाक असें जें कांहीं घरीं तयार केलेलें असेल तें यथाविधि देवादिकांना अर्पण केल्याशिवाय स्वतः सेवन करूं नये ४८. [ १८८९ ] ह्याप्रमाणें *श्रीमार्कंडेयपुराणांतर्गत मदालसोपा*ख्यानसंबंधी सव्विसावा अध्याय समाप्त झाला ॥ २६ ॥

मदालसा ह्मणते:— हे पुत्रा, गृहस्थाचें नित्य, नैमित्तिक व नित्यनैमित्तिक असें त्रिविध कर्म ऐक १. हें तुला सांगितलेलें पंचमहायज्ञसंबंधीं जें कर्म तें नित्य; पुत्रजन्म संस्कारादिक हें *नैमित्तिक* २ आणि *पर्वश्राद्ध वगैरे* हें *नित्यनैमित्तिक* कर्म पंडितांनीं जाणावें. पैकीं मी तुला आभ्युदय नैमित्तिक श्राद्ध सांगतें ३. पुत्र झाल्यावर जातकर्मसमयीं आणि विवाहादि मंगलसमयीं हें श्राद्ध करावें लागतें; तें सर्व क्रमानें शास्त्रांत सांगितलें आहे ४. नांदीमुखसंज्ञक पितरांचें ह्या श्राद्धांत पूजन करावें लागतें. यजमानानें उत्तरेस किंवा पूर्वेस तोंड करून स्वस्थ मनानें यव व दधि ह्यांनीं युक्त असे पिंड ह्या श्राद्धांत द्यावे. हें श्राद्ध वैश्वदेवरहित कांहीं लोक करीत असतात ५, ६. ह्या श्राद्धांत युग्म ब्राह्मण असावे व त्यांचें प्रदक्षिणिक पूजन करावें. हें नैमित्तिक श्राद्ध वृद्धिप्रसंगीं करावें. और्ध्वदेहिक ह्मणून दुसरें एक श्राद्ध आहे ७. मृतदिवशीं करावयाचें एकोद्दिष्ट श्राद्ध तूं ऐक. ह्या श्राद्धांत देव नसून अर्घ्य व पवित्रक एकेकच आहे ८. आवाहन व अग्नौकरण न करितां उच्छिष्टसंनिध प्रेताला एक पिंड द्यावा ९ आणि त्याच्या नांवाचें स्मरण करून अपसव्यानें अमुकस्य अक्षय्यं असें ह्मणून त्या ठिकाणीं तिलोदक द्यावें. विप्रविसर्जनसमयीं १० "अभिरम्यताम्" असें ह्मणावें व त्या विप्रांनींही "अभिरताः स्मः" असें ह्मणावें. हें श्राद्ध संवत्सर होई-

त्सरे पूर्णे यदा वा क्रियते नरैः । सपिण्डीकरणं कार्यं तस्यापि विधिरुच्यते १२तत्रापि दैवरहितमेकार्घ्यैकपवित्रकम् । नैवाग्नौकरणं तत्र तथावाहनवर्जितम् १३ अपसव्यं च तत्रापि भोजयेदयुजो द्विजान् । विशेषस्तत्र चान्योऽस्ति प्रतिमासं क्रियाधिकः १४तं कथ्यमानमेकाग्रो वदन्त्या मे निशामय । तिलगन्धोदकैर्युक्तं कुर्यात्पात्रचतुष्टयम् १५ कुर्यात्पितॄणां त्रितयमेकं प्रेतस्य पुत्रक । पात्रत्रये प्रेतपात्रमर्घ्यं चैव प्रसेचयेत् १६ ये समाना इति जपन्पूर्ववच्छेषमाचरेत् । स्त्रीणामप्येवमेवैतदेकोद्दिष्टमुदाहृतम् १७ सपिण्डीकरणं तासां पुत्राभावे न विद्यते । प्रतिसंवत्सरं कार्यमेकोद्दिष्टं नरैः स्त्रियाः १८मृताहनि यथान्यायं नृणां यद्वदिहोदितम् । पुत्राभावे सपिण्डास्तु तदभावे सहोदकाः १९मातुः सपिण्डा ये च स्युर्येऽन्ये मातुः सहोदकाः । कुर्युरेवं विधिं सम्यगपुत्रस्य सुतासुताः २०कुर्युर्मातामहायैवं पुत्रिकास्तनयास्तथा । द्व्यामुष्यायणसंज्ञास्तु मातामहपितामहान् २१पूजयेयुर्यथान्यायं श्राद्धैर्नैमित्तिकैरपि । सर्वाभावे स्त्रियः कुर्युः स्वभर्तॄणाममन्त्रकम् २२ तदभावे च नृपतिः कारयेत्स्वकुटुम्बिना । तज्जातीयैर्नरैः सम्यग्दाहाद्याः सकलाः क्रियाः २३ सर्वेषामेव वर्णानां बान्धवो नृपतिर्यतः । एतास्ते कथिता वत्स नित्या नैमित्तिकाः क्रियाः २४ क्रियां श्राद्धाश्रयामन्यां नित्यनैमित्तिकीं शृणु । दर्शस्तत्र निमित्तं वै कालश्चन्द्रक्षयात्मकः । नित्यतां नियतः कालस्तस्य संसूचयत्यथ २५ [ १९१० ]

---

पर्यंत प्रत्येक महिन्यास करावें ११. वर्ष संपल्यावर किंवा इतर वेळीं सपिंडीकरण करावें. त्याचा विधिही सांगतें १२. त्यांतही अर्घ्य व पवित्रक एकेकच असून देव, अग्नौकरण व आवाहन हीं नाहींत १३. तेथेंही अपसव्य ठेवून अयुग्म ब्राह्मण जेवूं घालावे. ह्या और्ध्वदेहिकांत प्रत्येक महिन्याला जें विशेष कर्म आहे १४ तें माझ्या मुखांतून तूं एकाग्र राहून ऐक. तिल, गंध व उदक ह्यांनीं युक्त अशीं चार पात्रें करावीं १५; पितरांना तीन व, हे पुत्रा, प्रेताला एक, तीन पात्रांत प्रेतपात्र व अर्घ्य ओतावें १६ आणि 'ये समानाः' ह्या मंत्राचा जप करून पूर्वीप्रमाणें अवशिष्ट विधि करावा. स्त्रियांनाही असेंच एकोद्दिष्ट विहित आहे १७. त्यांना पुत्र नसल्यास सपिंडी नाहीं. प्रतिवर्षी मृतदिवशीं स्त्रीला उद्देशून पुरुषांनीं एकोद्दिष्ट श्राद्ध पुरुषांना येथें सांगितल्याप्रमाणें यथाविधि करावें; आणि पुत्र नसल्यास पिंडांनीं व तेही नसल्यास सोदकांनीं सपिंडीश्राद्ध करावें १८,१९. ते नसल्यास मातृसपिंडांनीं अथवा मातृसोदकांनीं श्राद्ध करावें. निपुत्रिकाचें श्राद्ध दौहित्रानेंही करावें २०. पुत्रिकापुत्रांनीं ह्याप्रमाणें मातामहाला उद्देशून श्राद्ध करावें. द्व्यामुष्यायणांनीं मातामह व पितामह ह्यांना उद्देशून २१ यथाविधि नैमित्तिक श्राद्धेंही करावीं. श्राद्ध करणारा कोणीच नसल्यास पतिश्राद्ध स्त्रियांनीं अमंत्रक करावें २२. परंतु, स्त्री नसल्यास राजानें कुटुंबी पुरुषाकडून श्राद्ध करवावें. वारस नसल्यास राजानें तज्जातीय लोकांकडून दहनादि सर्व क्रिया करवाव्या २३. कारण, राजा सर्व वर्णांचा बांधव होय. हे वत्सा, हीं तुला नित्य व नैमित्तिक कर्में कथन केलीं २४. आतां नित्यनैमित्तिक श्राद्ध तूं श्रवण कर. दर्श हें निमित्त असून चंद्रक्षयात्मक काल आहे आणि हा नियत काल त्या श्राद्धाची नित्यता दर्शवीत

इति श्रीमार्कण्डेयपुराणे मदालसोपाख्यानेऽलर्कानुशासने नैमित्तिकादिश्राद्धकल्पो नाम सप्तविंशोऽध्यायः॥ २७ ॥

मदालसोवाच ॥ सपिण्डीकरणादूर्ध्वं पितुर्यः प्रपितामहः। स तु लेपभुजो याति प्रलुप्तः पितृपिण्डतः १ तेषामन्यश्चतुर्थो यः पुत्र लेपभुजां भुवि। सोऽपि संबन्धतो हीनमुपभोगं प्रपद्यते २ पिता पितामहश्चैव तथैव प्रपितामहः। पिण्डसंबन्धिनो ह्येते विज्ञेयाः पुरुषास्त्रयः ३ लेपसंबन्धिनश्चान्ये पितामहपितामहात्। प्रभृत्युक्तास्त्रयस्तेषां यजमानश्च सप्तमः ४ इत्येष मुनिभिः प्रोक्तः संबन्धः साप्तपौरुषः। यजमानात्प्रभृत्यूर्ध्वमनुलेपभुजस्तथा। ५ ततोऽन्ये पूर्वजाः स्वर्गे ये चान्ये नरकौकसः। ये च तिर्यक्त्वमापन्ना ये च भूतादिसंस्थिताः ६ तान्सर्वान्यजमानो वै श्राद्धं कुर्वन्यथाविधि। समाप्याययते वत्स येन येन शृणुष्व तत् ७ अन्नप्रकिरणं यत्तु मनुष्यैः क्रियते भुवि। तेन तृप्तिमुपायान्ति ये पिशाचत्वमागताः ८ यदम्बु स्नानवस्त्रोत्थं भूमौ पतति पुत्रक। तेन ये तरुतां प्राप्तास्तेषां तृप्तिः प्रजायते ९ यास्तु गात्राम्बुकणिकाः पतन्ति धरणीतले। ताभिराप्यायनं तेषां ये देवत्वं कुले गताः १० उद्धृतेष्वथ पिण्डेषु याश्चान्नकणिका भुवि। ताभिराप्यायनं तेषां ये तिर्यक्त्वं कुले गताः ११ ये वा दग्धाः कुले बालाः क्रियायोग्या ह्यसंस्कृताः। विपन्नास्तेऽन्नविकिरसंमार्जनजलाशिनः १२ भुक्त्वा चाचामतां यच्च जलं यच्चाङ्घ्रिशोधने। ब्राह्मणानां तथैवान्ये तेन तृप्तिं प्रयान्ति वै। पिशाचत्वमनुप्राप्ताः कृमिकीटत्वमेव ये १३ एवं यो यजमानस्य यश्च तेषां द्विजन्मनाम्। कश्चि-

आहे २९.(१९१७) ह्याप्रमाणें श्रीमार्कंडेयपुराणांतर्गत मदालसोपाख्यानांतील अलर्कोपदेशासंबंधीं नैमित्तिकादिश्राद्धकल्पनामक सत्ताविसावा अध्याय समाप्त झाला ॥ २७ ॥

मदालसा ह्मणते:— हे पुत्रा, सपिंडीकरणानंतर पित्याचा जो पणजा तो पितृपिंड लुप्त झाल्यामुळें लेपभाजांमध्यें जाऊन मिळतो १. हे पुत्रा, लेपभाजांपैकीं जो चवथा पूर्वज त्यालाही, संबंध दूर झाल्यामुळें श्राद्धाचा उपभोग कमी मिळूं लागतो २. बाप, आजा व पणजा हे तीन पुरुष पिंडसंबंधीं ३; निपणजापासूनचे तीन लेपसंबंधी; आणि त्यांना उद्देशून श्राद्ध करणारा सातवा ४ हा साप्तपौरुषसंबंध मुनिप्रोक्त होय. यजमानापासून वरचे अनुलेपभाज ५ व त्यांहून इतर स्वर्गांत आणि नरकांत रहाणारे, तिर्यग्योनींत गेलेले व भूतादि योनींत प्राप्त झालेले पूर्वज ६ त्या सर्वांना, यथाविधि श्राद्ध करणारा यजमान ज्याच्या ज्याच्या योगानें तृप्त करितो, तें तूं, हे वत्सा, ऐक ७. भूमीवर जें प्रकिरान्न दिलें जातें त्यानें पिशाचयोनींत गेलेले तृप्त होतात ८; हे पुत्रा, स्नानाच्या वस्त्रांतून भूमीवर गळणाऱ्या उदकानें वृक्षयोनींत गेलेले तृप्त होतात ९; शरीरापासुन भूतलावर पडणाऱ्या शितोडयांनीं देवयोनींत गेलेले पितर तृप्त होतात १०; पिंड उचलल्यावर भूमीवर पडणाऱ्या शितांनीं तिर्यग्योनींत गेलेले तृप्त होतात ११; कुळामध्यें ज्या मृत बालकांचें दहन झालेलें नसतें व जे असंस्कृत असल्यामुळें क्रियेला अपात्र असतात ते विकिरान्नावर दिलेलें उदक सेवन करितात १२. भोजनानंतर आचवणाऱ्या ब्राह्मणांचें जें उच्छिष्ट उदक आणि जें त्यांच्या पादप्रक्षालनाचें

जलाभ्युक्षेपः शुचिरुच्छिष्ट एव वा १४ तेन तेन कुले तत्र तत्तद्योन्यन्तरं गताः । प्रयान्त्या-प्यायनं वत्स सम्यक्छ्राद्धक्रियावताम् १५ अन्यायोपार्जितैरर्थैर्यच्छ्राद्धं क्रियते नरैः । तृप्यन्ते तेन चाण्डालपुल्कसाद्यासु योनिषु १६ एवमाप्यायनं वत्स बहूनामपि बान्धवैः । श्राद्धं कुर्व-द्भिरन्नाद्यैः शाकैरपि हि जायते १७ तस्माच्छ्राद्धं नरो भक्त्या शाकैरपि यथाविधि । कुर्वीत कुर्वतः श्राद्धं कुले कश्चिन्न सीदति १८ तस्य कालानहं वक्ष्ये नित्यनैमित्तिकात्मकान् । विधिना येन च नरैः क्रियते तन्निबोध मे १९ कार्यं श्राद्धममावास्यां मासि मास्युडुपक्षये । तथा-ष्टकास्वप्यवश्यमिष्टकालान्निबोध मे २० विशिष्टब्राह्मणप्राप्तौ सूर्येन्दुग्रहणेऽयने । विषुवद्-व्यतिसंक्रान्तिव्यतीपातेषु पुत्रक २१ श्राद्धार्हद्रव्यसंपत्तौ तथा दुःस्वप्नदर्शने । जन्मर्क्षग्रहपीडासु श्राद्धं कुर्वीत चेच्छया २२ विशिष्टः श्रोत्रियो योगी वेदविज्ज्येष्ठसामगः २३ त्रिणाचिकेत-स्त्रिमधुस्त्रिसुपर्णः षडंगवित् । दौहित्रऋत्विग्जामाता स्वस्रीयः श्वशुरस्तथा २४ पञ्चाग्निकर्म-निष्ठश्च तपोनिष्ठोऽथ मातुलः । मातापितृपराश्चैव शिष्यसंबन्धिबान्धवाः २५ एते द्विजोत्तमाः श्राद्धे समस्ताः केतनक्षमाः । अवकीर्णी तथा रोगी न्यूनांगस्त्वधिकांगकः २६ पौनर्भ-वस्तथा काणः कुण्डो गोलोऽथ पुत्रक । मित्रध्रुक्कुनखी कुष्ठी श्यावदन्तो निराकृतिः २७ अभि-शस्तस्तथा स्तेयः पिशुनः सोमविक्रयी । कन्यादूषयिता वैद्यो गुरुपित्रोस्त्यजकः २८ मृत-

---

उदक त्यांच्या योगानें पिशाचयोनींत गेलेले आणि कृमी व कीटक बनलेले पितर तृप्त होतात १३. ह्याप्रमाणें यजमानाचें व ह्या ब्राह्मणांचें जें कांहीं शुद्ध अथवा उच्छिष्ट अन्नो-दक पडतें १४ त्याच्या योगानें भिन्न भिन्न योनींत गेलेले पितर तृप्त होतात. हे वत्सा, यथाविधि श्राद्ध करणाऱ्या लोकांची गोष्ट अशी आहे १५. अन्यायोपार्जित वित्तानें जें श्राद्ध केलें जातें त्याच्या योगानें चांडाळ, पुल्कस इत्यादि योनींत गेलेले पितर तृप्त होतात १६; हे वत्सा, ह्याप्रमाणें अन्न, उदक व शाक एवढ्याच पदार्थांनींही श्राद्ध करणाऱ्या बांधवांमुळें असंख्य पितर तृप्त होतात १७. तस्मात्, पुरुषानें भक्तिपूर्वक शाकांनींही यथाविधि श्राद्ध करावें. श्राद्ध करणाऱ्याच्या कुलांत कोणाची कधींच दशा होत नाहीं १८. त्याचे नित्यनैमित्तिक काल मी सांगतें; आणि कोणत्या रीतीनें लोक श्राद्ध करीत असतात तें तूं माझ्यापासून ऐक १९. प्रत्येक महिन्यास चंद्रक्षय असतांना अमावास्येला व त्याचप्रमाणें अष्टकांना अवश्य श्राद्ध करावें. इष्ट काल माझ्यापासून ऐक २०. हे पुत्रा, विशिष्ट ब्राह्मणप्राप्ति, चंद्रसूर्यग्रहण, अयन, संक्रांति, व्यतिपात २१, श्राद्धो-पयोगी पदार्थांची प्राप्ति, दुःस्वप्न, जन्मनक्षत्र व ग्रहपीडा असल्यास व वाटेल तेव्हां श्राद्ध करावें २२. विशिष्ट श्रोत्रिय, योगी, वेदवेत्ता, ज्येष्ठसामग २३, त्रिणाचिकेत, त्रिमधु, त्रिसुपर्ण, षडंगवेत्ता, दौहित्र, ऋत्विज्, जामाता, भगिनीपुत्र, श्वशुर २४, पंचाग्नि-कर्मनिष्ठ, तपोनिष्ठ, मातुल, मातापितृसेवक, शिष्यसंबंधी व बांधव २५ हे सर्व ब्राह्मण श्राद्धाला बोलावण्यास योग्य आहेत. खीसमागम घडलेला ब्रह्मचारी, न्यून अथवा अधिक अवयव असलेला २६, पुनर्विवाहित स्त्रीचा पुत्र, काण, कुंड, गोळक, मित्रद्रोही, कुनखी, कुष्ठी, कृष्णदंती, वेदाध्ययनशून्य २७, अभिशस्त, चोर, चहा-

कान्यापको मित्रं परदुष्टापतिस्तथा । वेदोज्झश्चाग्निसंत्यागी हृषलापत्यदूषितः २९ तथान्ये च विकर्मस्था वर्ज्याः पैत्र्येषु वै द्विजाः । निमन्त्रयेत पूर्वेद्युः पूर्वोक्तान्द्विजसत्तमान् ३० दैवे नियोगे पित्र्ये च तांस्तथैवोपकल्पयेत् । तैश्च संयमिभिर्भाव्यं यश्च श्राद्धं करिष्यति ३१ श्राद्धं दत्वा च भुक्त्वा च मैथुनं योऽनुगच्छति । पितरस्तु तयोर्मासं तस्मिन्रेतसि शेरते ३२ गत्वा च योषितं श्राद्धे यो भुंक्ते यस्तु गच्छति । रेतोमूत्रकृताहारास्तं मासं पितरस्तयोः ३३ तस्मात्तु प्रथमं कार्यं प्राज्ञेनोपनिमन्त्रणम् । अप्राप्तौ तद्दिने चापि वर्ज्या योषित्प्रसंगिनः ३४ भिक्षार्थमागतान्वापि काले संयमिनो यतीन् । भोजयेत्प्रणिपाताद्यैः प्रसाद्य यतमानसः ३५ यथैव शुक्लपक्षाद्धि पितॄणामसितः प्रियः । तथापराह्णः पूर्वाह्णात्पितॄणामतिरिच्यते ३६ संपूज्य स्वागतेनैतानभ्युपेतान्गृहे द्विजान् । पवित्रपाणिराचान्तानासनेषूपवेशयेत् ३७ पितॄणामयुजः कामं युग्मान्दैवे द्विजोत्तमान् । एकैकं वा पितॄणां च देवानां च स्वशक्तितः ३८ तथा मातामहानां च तुल्यं वा वैश्वदैविकम् । पृथक्तयोस्तथा चान्ये केचिदिच्छन्ति मानवाः ३९ प्राङ्मुखान्दैवसंकल्पान्पित्र्यान्कुर्यादुदङ्मुखान् । तथा मातामहानां च विधिरुक्तो मनीषिभिः ४० विष्टरार्थे कुशान्दत्वा संपूज्यार्घ्यादिना ततः । पवित्रकाणि दत्वा वै

डखोर, सोम विकणारा, कन्यादूषक, वैद्य, गुरु व पिता ह्यांचा त्याग करणारा २८; वेतन घेऊन वेद पढविणारा, मित्र, परोपभुक्त स्त्रीचा पति, वेद सोडणारा, अग्नित्यागी, शूद्रजातीय अपत्यानें दूषित झालेला २९, व इतरही निंद्यकर्म करणारे ब्राह्मण श्राद्धाला वर्ज्य होत. पूर्वोक्त ब्राह्मणांना पूर्व दिवशीं निमंत्रण करावें ३०; आणि देवस्थानीं व पितृस्थानीं त्यांना निमंत्रण केल्याप्रमाणेंच बसवावें. त्यांनीं व श्राद्धकर्त्यानें जितेंद्रिय रहावें ३१. जो श्राद्ध करून अथवा श्राद्धीं जेवून स्त्रीसमागम करितो त्याचे पितर एक महिनाभर त्याच्या रेतांत डुबून राहतात ३२; आणि स्त्रीसमागम करून जो श्राद्ध करितो अथवा जो श्राद्धाला बसतो त्याचे पितर एक महिनाभर त्याचें रेत व मूत्र सेवन करून राहतात ३३. तस्मात् प्राज्ञ पुरुषानें ब्राह्मणांना प्रथम निमंत्रण करावें; पूर्वदिवशीं ब्राह्मण न मिळाल्यास श्राद्धदिवशीं निमंत्रण करावें; परंतु, श्राद्धदिवशींच निमंत्रण करणें झाल्यास स्त्रीसक्त पुरुष वर्ज्य करावे ३४. वेळेवर भिक्षार्थ आलेल्या जितेंद्रिय यतींना प्रणिपातादिकांनीं प्रसन्न करून घेऊन शुद्ध मनानें भोजन घालावें ३५. पितरांना ज्याप्रमाणें शुक्लपक्षापेक्षां कृष्णपक्ष प्रिय त्याचप्रमाणें त्यांना पूर्वाह्णापेक्षां अपराह्ण प्रिय ३६. घरीं आलेल्या द्विजाचें स्वागतपूर्वक पूजन करावें आणि पवित्रकें धारण करून त्या आचमन केलेल्या ब्राह्मणांना आसनावर बसवावें ३७. आपल्या शक्तीप्रमाणें पितरांकडे विषम व देवांकडे सम ब्राह्मण बसवावे; किंवा दोहोंकडे एकेक तरी बसवावा ३८. मातामहस्थानींही ब्राह्मणव्यवस्था अशीच समजावी; देवांचें पूजन एके ठिकाणीं करावें; किंवा दोन देव कोणी पृथकही करीत असतात ३९. देवांकडील ब्राह्मण पूर्वाभिमुख व पितरांकडील आणि मातामहादिकांकडील ब्राह्मण उदङ्मुख बसवावे असा विधि विद्वानांनीं सांगितला आहे ४०. आसनांकरितां कुश देऊन अर्घ्यादि उप-

तेभ्योऽनुज्ञामवाप्य च ४१ कुर्यादावाहनं प्राज्ञो देवानां मन्त्रतो द्विजः । यवाम्भोभिस्ततश्चार्घ्यं दत्त्वा वै वैश्वदेविकम् ४२ गन्धमाल्यादिधूपं च दत्त्वा सम्यक्सदीपकम् । अपसव्यं पितॄणां च सर्वमेवोपकल्पयेत् ४३ दर्भांश्च द्विगुणान्दत्त्वा तेभ्योऽनुज्ञामवाप्य च । मन्त्रपूर्वं पितॄणां च कुर्यादावाहनं बुधः ४४ अपसव्यं तथैवार्घ्यं यवार्थे च तथा तिलैः । निष्पादयेन्महाभाग पितॄणां प्रीणने रतः ४५ अग्नौकार्यमनुज्ञातः कुरुष्वेति ततो द्विजैः । जुहुयाद्व्यञ्जनक्षारवर्जमन्नं यथाविधि ४६ अग्नये कव्यवाहनाय स्वाहेति प्रथमाहुतिः । सोमाय वै पितृमते स्वाहेत्यन्या तथा भवेत् ४७ यमाय प्रेतपतये स्वाहेति तृतीयाहुतिः । हुतावशिष्टं दद्याच्च भाजनेषु द्विजन्मनाम् ४८ भाजनालम्भनं कृत्वा दत्त्वा चान्नं यथाविधि । यथासुखं जुषध्वं भोरिति वाच्यमनिष्ठुरम् ४९ भुञ्जीरंश्च ततस्तेऽपि तच्चित्ता मौनिनः सुखम् । यद्यदिष्टतमं तेषां तत्तदन्नमसत्वरम् ५० अक्रुध्यंश्च नरो दद्यात्संस्तवेन प्रलोभयेत् । रक्षोघ्नांश्च जपेन्मन्त्रांस्तिलैश्च विकिरेन्महीम् ५१ सिद्धार्थकैश्च रक्षार्थं श्राद्धं हि प्रचुरच्छलम् । पृष्टैस्तैश्च तृप्ताःस्थ तृप्ताः स्म इति वादिभिः ५२ अनुज्ञातो नरस्त्वन्नं विकिरेद्भुवि सर्वतः । तद्वदाचमनार्थाय दद्यादम्भः सकृत्सकृत् ५३ अनुज्ञां च ततः प्राप्य यतवाक्कायमानसः । सतिलेन ततोऽन्नेन पिण्डान्सर्वेण पुत्रक ५४ पितृभ्यस्तद्वदिय दर्भेषु दद्यादुच्छिष्टसंनिधौ । पितृतीर्थन

---

त्यांनीं ब्राह्मणांचें पूजन करावें. नंतर पवित्रकें देऊन त्यांच्या अनुज्ञेनें ४१ विचारी द्विजानें देवांचें समंत्रक आवाहन करावें. नंतर यवोदकानें विश्वेदेवांना अर्घ्य देऊन ४२ गंध, पुष्पें, धूप, दीप इत्यादि उपचार अर्पण करावे आणि अपसव्यानें पितरांना सर्व अर्पण करावें ४३. नंतर दुहेरी दर्भ देऊन त्यांच्या अनुज्ञेनें श्राद्धपुरुषानें पितरांचें समंत्रक आवाहन करावें ४४. तदनंतर, हे महाशय, अपसव्यानें अर्घ्य देऊन पितृतृप्तीविषयीं दक्ष असलेल्या पुरुषानें यवस्थानीं तिळांची योजना करावी ४५. नंतर कुरुष्व ह्मणून ब्राह्मणांनीं अनुज्ञा दिली असतां अग्नौकरण करावें आणि भाजा, कोशिंबिरी इत्यादि क्षारयुक्त पदार्थ वर्ज्य करून इतर अन्नाचें यथाविधि हवन करावें ४६. **अग्नये कव्यवाहनाय स्वाहा** ही पहिली, **सोमाय पितृमते स्वाहा** ही दुसरी ४७ व **यमाय प्रेतपतये स्वाहा** ही तिसरी आहुति घालून हुतशेष अन्न ब्राह्मणांच्या पात्रांवर घालावें ४८. तदनंतर पात्रस्पर्श करून यथाविधि अन्ननिवेदन करावें; **यथासुखं जुषध्वं** अशी नम्रपणानें प्रार्थना करावी ४९ व त्यांनींही त्वरा न करितां मौन धारण करून लक्ष्यपूर्वक जें जें अन्न अति प्रिय असेल तें तें सुखानें सेवन करावें ५०. श्राद्धकर्त्या पुरुषानें क्रुद्ध न होतां ब्राह्मणांना प्रिय अन्न वाढावें; स्तुतीनें तें स्वीकारण्याविषयीं त्यांचें मन वळवावें; रक्षोघ्न मंत्रांचा जप करावा आणि भूमीवर तिळ व मोहऱ्या फेकाव्या. कारण, श्राद्धांत विघ्नें फार असतात. **तृप्ताः स्थ** असा प्रश्न झाल्यावर **तृप्ताः स्म** असें ह्मणणाऱ्या ब्राह्मणांनीं ५१, ५२ अनुज्ञा दिल्यानंतर भूमीवर विकिरान्न घालावें. त्याचप्रमाणें आपोशनार्थ एकेकदां उदक ब्राह्मणांना देऊन त्यांची अनुज्ञा झाली असतां वाणी, देह व मन यांचें संयमन करून, हे पुत्रा, उष्टयांचे शेजारीं तिलमिश्र सर्व अन्नानें

तोयं च दद्यात्तेभ्यः समाहितः ५५ पितॄन्संचिन्त्य तद्भक्त्या यजमानो नृपात्मज । मा
न्मातामहानां च दद्यात्पिण्डान्यथाविधि ५६ गन्धमाल्यादिसंयुक्तान्दद्यादाचमनं ततः
दत्त्वा च दक्षिणां शक्त्या सुस्वधास्त्विति तान्वदेत् ५७ तैश्च तुष्टैस्तथेत्युक्त्वा वाचयेद्वै
दैविकान् । प्रीयन्तामिति भद्रं वो विश्वेदेवा इतीरयेत् ५८ तथेति चोक्ते तैर्विप्रैः प्रार्थनी
यास्तदाशिषः । विसर्जयेत्प्रियाण्युक्त्वा प्रणिपत्य च भक्तितः ५९ आद्वारमनुगच्छेच्च आ
गच्छेच्चानुमोदितः । ततो नित्यक्रियां कुर्याद्भोजयेच्च तथातिथीन् ६० नित्यक्रियां पितॄ
ंश्च केचिदिच्छन्ति सत्तमाः । न पितॄणां तथैवान्ये शेषं पूर्ववदाचरेत् ६१ पृथक्पाकेन नेत्य
केचित्पूर्वं च पूर्ववत् । ततस्तदन्नं भुञ्जीत सह भृत्यादिभिर्नरः ६२ एवं कुर्वीत धर्मज्ञः श्रा
द्धं पित्र्यं समाहितः । यथा वा द्विजमुख्यानां परितोषोऽभिजायते ६३ त्रीणि श्राद्धे पवित्राणि
दौहित्रं कुतपस्तिलाः । वर्ज्यानि चाहुर्विप्रेन्द्र कोपोऽध्वगमनं त्वरा ६४ राजतं च तथा पा
शस्तं श्राद्धेषु पुत्रक । रजतस्य तथा कार्यं दर्शनं दानमेव वा ६५ राजते हि स्वधा दुग्
पितृभिः श्रूयते मही । तस्मात्पितॄणां रजतमभीष्टं प्रीतिवर्धनम् ६६ (१९७६) इ
श्रीमार्कण्डेयपुराणेऽलर्कानुशासने श्राद्धकल्पो नामाष्टविंशोऽध्यायः ॥ २८ ॥

---

पितरांना उद्देशून दर्भांवर पिंडदान करावें; हे राजपुत्रा, यजमानानें पितरांचें चिंत
न करावें आणि पितृभक्तीनें व पितृतीर्थानें त्यांना स्वस्थांतःकरणपूर्वक उदक द्यावें. त्याच
प्रमाणें मातामहांना गंधपुष्पादियुक्त पिंड यथाविधि द्यावे. नंतर आचमन देऊन यथा
शक्ति दक्षिणा दिल्यावर **सुस्वधास्तु** असें त्या ब्राह्मणांना उद्देशून ह्मणावें ५३; ५४
५५.५६,५७. त्यांनीं संतुष्ट होऊन **तथास्तु** ह्मटल्यानंतर **विश्वेदेवाः प्रीयन्तामिति
भवन्तो ब्रुवन्तु** अशी दैवस्थानीं असलेल्या ब्राह्मणांची प्रार्थना करावी ५८ व त्यांनीं
**प्रीयन्तां विश्वेदेवाः** असें ह्मटलें असतां त्यांचे आशीर्वाद मागावे. नंतर प्रिय बोलून
भक्तिपूर्वक प्रणाम करून ब्राह्मणांचें विसर्जन करावें ५९ आणि द्वारापर्यंत त्यांना पोंच
वीत जाऊन त्यांच्या अनुमोदनानें परत यावें. तदनंतर नित्यक्रिया करून अतिथींना
भोजन घालावें ६०. कांहीं सज्जन पितरांना उद्देशून नित्यक्रिया करीत असतात; परंतु
कांहीं करीत नाहींत. असो. अवशिष्ट कर्म पूर्वीप्रमाणें करावें ६१. भिन्न पाकानें अव
शिष्ट कर्म करावें असें कांहीं ह्मणतात व वैश्वदेवकर्म पूर्वीच पूर्वीप्रमाणें करावें, असेंहि
कांहींचें मत आहे. नंतर भृत्यादिकांसह कर्त्यानें तें अन्न सेवन करावें ६२. ह्याप्रमाणें धर्म
वेत्त्या पुरुषानें स्वस्थ मन ठेवून ब्राह्मणांचा संतोष होईल अशा रीतीनें पितृश्राद्ध करावें
६३. दौहित्र, कुतपकाल व तिल ह्या तीन गोष्टी श्राद्धांत पवित्र असून विप्रमतानें
कोप, त्वरा व प्रवास—वर्ज्य आहे ६४. हे पुत्रा, त्याचप्रमाणें रौप्यपात्र श्राद्धांत प्रशस्त
होय. श्राद्धसमयीं रौप्यदर्शन व रौप्यदान करावें ६५. पितरांनीं रौप्यपात्रांत पृथ्वीचें
स्वधारूप धार काढिल्याचें श्रुत आहे व ह्मणूनच पितरांना रौप्य अभीष्ट व संतोषका
रक आहे ६६. (१९७६) ह्याप्रमाणें श्रीमार्कंडेयपुराणांतर्गत अलर्कोपदेशसंबंधीं
श्राद्धकल्पनामक अठ्ठाविसावा अध्याय समाप्त झाला ॥ २८ ॥

मदालसोवाच॥ अतः परं शृणुष्वेमं पुत्र भक्त्या यदाहृतम् । पितॄणां प्रीतये यद्द्रव्यं प्रीतिकारकम् १. मासं तृप्तिः पितॄणां च हविष्यान्नेन जायते । मासद्वयं मत्स्यमांसैस्तृप्तिं [illegible]ाति पितामहाः २ त्रीन्मासान्हारिणं मांसं विज्ञेयं पितृतृप्तये । पुष्णाति चतुरो मासाञ्छ[illegible]स्य पिशितं पितॄन् ३ शाकुनं पञ्च वै मासान्षण्मासान्सूकरामिषम् । छागलं सप्त वै [illegible]सानैणेयं चाष्टमासिकीम् ४ करोति तृप्तिं नव वै रुरोर्मांसं न संशयः । गवयस्यामिषं [illegible]तिं करोति दशमासिकीम् ५ तथैकादशमासांस्तु औरभ्रं पितृतृप्तिदम् । संवत्सरं तथा [illegible]व्यं पयः पायसमेव वा ६ वार्ध्रीणसामिषं लोहं कालशाकं तथा मधु । दौहित्रामिषमन्यच [illegible]तमात्मकुलोद्भवैः ७ अनन्तां वै प्रयच्छन्ति तृप्तिं गौरीसुतस्तथा । पितॄणां नात्र संदे[illegible] [illegible]याश्राद्धं च पुत्रक ८ राजश्यामाकश्यामाकौ तद्वच्चैव प्रशातिका । नीवाराः पौष्कराणि [illegible]न्यानि पितृतृप्तये ९ यवव्रीहिसगोधूमतिलमुद्गाः ससर्षपाः । प्रियंगवः कोद्रवाश्च निष्पा[illegible]श्चातिशोभनाः १० वर्ज्या मर्कटकाः श्राद्धे राजमाषास्तथाणवः । विप्रुषिका मसूराश्च श्राद्धकर्मणि गर्हिताः ११ लशुनं गृञ्जनं चैव पलाण्डुः पिण्डमूलकम् । करम्भं यानि [illegible]न्यानि हीनानि रसवर्णतः १२ गान्धारिकमलाबूनि लवणान्यूषराणि च । आरक्ता[illegible] च निर्यासाः प्रत्यक्षलवणानि च १३ वर्जयेत्तानि वै श्राद्धे यच्च वाचा न शस्यते । [illegible]पण्युत्कोचतः प्राप्तं पतिताद्यदुपार्जितम् १४ अन्यायकन्यायल्कोत्थं द्रव्यं चात्र निग[illegible]र्हितम् । दुर्गन्धि फेनिलं चाम्बु तथैवाल्पतरोदकम् १५ न लभेद्यत्र गौस्तृप्तिं नक्तं यद्या-

मदालसा ह्मणतेः—हे पुत्रा, पितरांना प्रिय, वर्ज्य व अप्रिय ह्मणून जें सांगितलें आहे तें हें तूं भक्तीनें श्रवण कर १. पितर हविष्यान्नानें एक महिना, मत्स्यमांसानें दोन महिने २, हरिणमांसानें तीन, शशमांसानें चार ३, पक्षिमांसानें पांच, सूकरमांसानें सहा, बोकडाच्या मांसानें सात, ऐणमृगाच्या मांसानें आठ ४, रुरुमृगाच्या मांसानें निःसंशय नऊ, गव्याच्या मांसानें दहा ५, मेंढ्याच्या मांसानें अकरा व गाईच्या दुधानें किंवा खिरीनें बारा महिने तृप्त होतात ६. वार्ध्रीणससंज्ञक बोकडाचें मांस, लोह, काळाची भाजी, मध, दौहित्रानें दिलेलें मांस व स्वकुलोत्पन्न पुरुषांनीं अर्पण केलेलें इतर द्रव्य ह्यांच्यायोगानें ७, आठवे वर्षी विवाह झालेल्या स्त्रीपासून झालेल्या पुत्राच्या योगानें व, हे पुत्रा, गयाश्राद्धानें पितर निःसंशय अनंत काळपर्यंत तृप्त होतात ८. रानसावे, सावे, प्रशातिका, देवभात, नीळ कमळें व वन्य द्रव्यें पितरांना तृप्त होत ९. सातु, साळी, गहू, तीळ, मूग, मोहऱ्या, प्रियंगु, कोद्रु व पावटे हीं धान्यें अतिप्रशस्त होत १०. मटकी, चवळी, अणु, विप्रुषिका व मसूर हीं धान्यें श्राद्धाला वर्ज्य होत ११. लसूण, गाजर, कांदा, मुळा, दधिमिश्र सातू, रसहीन व वर्णहीन पदार्थ १२, गांधारि, कमळ, भोंपळा, भूमिसंबंधीं मीठ, आरक्तवर्ण चीक वगैरे दिक, प्रत्यक्ष लवण १३ व शब्दानें अप्रशस्त असलेले पदार्थ श्राद्धाला वर्ज्य होत. [illegible]टाचानें अथवा पतितादिकांपासून मिळविलेलें १४, अन्यायानें संपादिलेलें व कन्याविक्रयानें प्राप्त झालेलें द्रव्य श्राद्धाला निंद्य होय. दुर्गंधि, फेनयुक्त, अति अल्प १५,

त्पुपाहृतम् । यत्र एवांपयोस्तूनं यथाभोज्यनिपानजम् १६ तद्वर्ज्यं सलिलं तात सदैव पितृकर्मणि । मार्गमाविकमौष्ट्रं च सर्वमेकशफं च यत् १७ माहिषं चामरं चैव धेन्वा गोश्चाप्यनिर्दशम् । पित्रर्थं मे प्रपच्छस्वेत्युक्त्वा यथाप्युपाहृतम् १८ वर्जनीयं सदा सद्भिः स्तत्पयः श्राद्धकर्मणि । वर्ज्या जन्तुमती रूक्षा क्षितिः प्लुष्टा तथाग्निना १९ अनिष्टा दुष्टशब्दोग्रा दुर्गन्धा श्राद्धकर्मणि । कुलापमानकाः श्राद्धे व्यापाद्य कुलहिंसकाः २० कुलाधमो मद्यहा च तथा वै रोगिणोऽन्त्यजाः । नग्नाः पातकिनश्चैव घ्नन्ति दृष्ट्या पितृक्रियाम् २१ अपमानपविद्धश्च कुक्कुटो ग्रामसूकरः । श्वा चैव हन्ति श्राद्धानि यातुधानाश्च दर्शनात् २२ तस्मात्सुसंवृतो दद्यात्तिलैश्च विकिरेन्महीम् । एवं रक्षा भवेच्छ्राद्धे कृता तातोभयोरपि २३ शावसूतकिसंस्पृष्टं दीर्घरोगिभिरेव च । पतितैर्मलिनैश्चैव पुष्णाति न पितामहान् २४ वर्जनीयं तथा श्राद्धे सदोदक्यादिदर्शनम् । चण्डशौण्डसमा भाषा यजमानेन चादरात् २५ केशकीटावपन्नं च तथा श्वभिरवेक्षितम् । पूति पर्युषितं चैव वार्ताक्यभिषवास्तथा २६ वर्जनीया हि वै श्राद्धे तथा वस्त्रानिलाहतम् । श्रद्धया परया दत्तं पितॄणां नामगोत्रतः २७ यदाहारास्तु ते जातास्तदाहारत्वमेति तत् । तस्माच्छ्रद्धायुतं पात्रे यच्छ त्वं पितृकर्मणि २८ तथा तथैव दातव्यं पितॄणां तृप्तिमिच्छता । योगिनश्च सदा श्राद्धे भोजनीया विपश्चिता २९

गाईचीही ताहान न भागविणारें, रात्रीं आणिलेलें; चांडालादिकांनीं उत्सर्ग केलेलें व अभोज्य मनुष्याच्या जलाशयांतील असलेलें १६ उदक, बाबारे, श्राद्धाला सर्वदा वर्ज्य होय. मृग, मेंढी, उंट, (अश्वगर्दभादि) एकनखी पशु १७, हैस, चामर, प्रसूत होऊन दहा दिवस झालेली गाय ह्यांचें व पितरांकरितां मागून आणिलेलें १८ दूध श्राद्धाला वर्ज्य होय. कृमिकीटकादिकांनीं युक्त, रूक्ष, अग्निदग्ध १९, अनिष्ट, संज्ञादुष्ट, उग्र व सर्वदा दुर्गंधयुक्त भूमि श्राद्धाला वर्ज्य होय. कुलाचा अपमान करणारे, कुलामध्यें भेद उत्पन्न करून कुलाचा नाश करणारे २०, कुलाधम, मद्यघातकी, रोगी, अंत्यज, नग्न व पातकी, दृष्टीनें श्राद्धघात करितात २१. नपुंसक, तिरस्कृत, कुक्कुट, ग्रामसूकर, श्वान व यातुधान हेही दर्शनानेंच श्राद्धघात करितात २२. तस्मात्, हे तात, अतिबंदोबस्तांत राहून श्राद्ध करावें आणि भूमीवर तीळ पसरून टाकावे. ह्मणजे श्राद्धामध्यें यजमान व ब्राह्मण ह्या उभयतांचेंही रक्षण होतें २३. मृताशौच अथवा जननाशौच असलेला, दीर्घरोगी, पतित व घामट ह्यांनीं स्पर्श केलेलें द्रव्य पितरांना अप्रिय आहे २४. त्याचप्रमाणें रजस्वलादिदर्शन आणि तामसी व मद्यपी ह्यांच्याशीं भाषण श्राद्धकर्त्यानें प्रयत्नपूर्वक वर्ज्य करावें २५. केश व कीटक ह्यांनीं युक्त; श्वानांनीं पाहिलेलें; दुर्गंधयुक्त व शिळें अन्न श्राद्धाला वर्ज्य होय. वांगें, कुटून काढिलेले रस २६ व वस्त्राचा वारा लागलेले पदार्थ श्राद्धाला वर्ज्य होत. नामगोत्राचा उच्चार करून पितरांना परमश्रद्धेनें जें अर्पण केलें जातें २७ तें पितरांना प्रिय असलेलें अन्न बनतें. तस्मात्, श्राद्धामध्यें तूं, जें अर्पण करणें असेल तें श्रद्धेनें सत्पात्रीं अर्पण करीत जा २८ व पितृतृप्तीच्छु पुरुषानेंही तेंच अर्पण करावें. विचारी पुरुषानें श्राद्धसमयीं योग्यांना सर्वदा

योगाधारा हि पितरस्तस्मात्तान्भोजयेत्सदा । ब्राह्मणानां सहस्रस्य योगी त्वग्रतनी यदि ३०
यजमानं च भोक्तृंश्च नौरिवाम्भसि तारयेत् । पितृगाथास्तथैवात्र श्रूयन्ते ब्रह्मवादिभिः ३१
या गीताः पितृभिः पूर्वमैलस्यासन्महीपतेः । कदा नः संततावग्र्यः कस्यचिद्भविता सुतः ३२
यो योगिभुक्तशेषान्नो भुवि पिण्डं प्रदास्यति । गयायामथवा पिण्डं खड्गमांसं महाहविः ३३
कालशाकं तिलाढ्यं वा कृसरं मासतृप्तये । वैश्वदेव्यं च सौम्यं च खड्गमांसं परं हविः ३४
विषाणवर्ज्यं खड्गाप्त्या आसूर्यं चाशयामहे । तथा वर्षात्रयोदश्यां मघासु च यथाविधि ३५
मधुसर्पिःसमायुक्तं पायसं दक्षिणायने । तस्मात्संपूजयेद्भक्त्या स्वपितॄन्प्रयतमानसः ।
कामानभीप्सन्सकलान्पापादात्मविमोचनम् ३६ वसून्रुद्रांस्तथादित्यान्नक्षत्रग्रहतारकाः ।
प्रीणयन्ति मनुष्याणां पितरः श्राद्धतर्पिताः ३७ आयुः प्रजां धनं विद्यां स्वर्गं मोक्षं सुखानि
च । प्रयच्छन्ति तथा राज्यं पितरः श्राद्धतर्पिताः ३८ एतत्ते कथितं पुत्र श्राद्धकर्म यथो-
दितम् । काम्यानां श्रूयतां वत्स श्राद्धानां तिथिकीर्तनम् ३९ [२०१६] इति श्रीमार्कण्डे-
यपुराणेऽलर्कोपदेशे श्राद्धकल्पो नामैकोनत्रिंशोऽध्यायः ॥ २९ ॥
मदालसोवाच ॥ प्रतिपद्धनलाभाय द्वितीया द्विपदप्रदा । वरार्थिनी तृतीया तु चतुर्थी शत्रु-

भोजन घालावें २९. कारण, पितरांना योगाचाच आधार आहे. तस्मात्, योग्यांना सर्वदा श्राद्धीं भोजन घालावें. हजार ब्राह्मणांमध्यें जर एक योगी अग्रस्थानीं असेल तर तो, ३० उदकांतून तारून नेणाऱ्या नौकेप्रमाणें यजमान व भोजन करणारे ह्यांना तारितो. ऐलराजाला पूर्वी पितरांनीं सांगून ठेविलेल्या गाथा ब्रह्मवेत्ते ऐकवीत असतात, त्या येणेंप्रमाणें " योग्यांनीं सेवन करून अवशिष्ट राहिलेल्या अन्नांनीं भूमीवर पिंडदान करणारा श्रेष्ठ पुत्र कोणाला तरी आमच्या संततीमध्यें कधीं वरें होईल ? आणि त्याचप्रमाणें महाहवि असलेलें खड्गमांस, काळाची भाजी अथवा महिनाभर तृप्ति देणारें तिलयुक्त कृसरान्न तो आह्मांला कधीं वरें अर्पण करील ? किंवा गयेमध्यें पिंडदान करणारा पुरुष आमच्या कुळांत केव्हां वरें निपजेल ? उत्कृष्ट हविर्द्रव्य असलेलें खड्गमांस सोम व विश्वेदेव ह्यांना प्रिय आहे ३१, ३२, ३३, ३४. शृंगरहित खड्गाचें मांस प्राप्त झालें असतां सूर्य आहे तोंपर्यंत आह्मी नष्ट होणार नाहीं आणि त्याचप्रमाणें दक्षिणायनामध्यें मध व तूप ह्यांनीं युक्त असें पायस वर्षात्रयोदशीला व मघानक्षत्रीं आह्मांला यथाविधि अर्पण केल्यानें अक्षय्य तृप्ति होते. " ह्यास्तव, सर्व कामना पूर्ण होऊन पापानिर्मुक्त होण्याची इच्छा करणाऱ्यानें मनोनिग्रह करून भक्तीनें आपल्या पितरांचें पूजन करावें ३५, ३६. श्राद्धानें पितर तृप्त झाले असतां वसु, रुद्र, आदित्य, नक्षत्रें, ग्रह व तारका मनुष्यांवर प्रसन्न होतात ३७; आणि श्राद्धानें पितर तृप्त झाले असतां आयुष्य, संतति, धन, विद्या, स्वर्ग, मोक्ष, सुखें व राज्य देतात ३८. हे पुत्रा, हें तुला यथोक्त श्राद्धकर्म कथन केलें. आतां, हे वत्सा, काम्य श्राद्धांना हे उक्त तिथि कोणत्या हें श्रवण कर ३९. [२०१६] ह्याप्रमाणें श्रीमार्कंडेयपुराणांतर्गत अलर्कोपदेशाविषयीं श्राद्धकल्पनामक एकूणतिसावा अध्याय समाप्त झाला ॥२९॥

नाशिनी २ श्रियं प्राप्नोति पञ्चम्यां षष्ठ्यां पूज्यो भवेन्नरः। राजाधिपत्यं सप्तम्यामष्टम्यां वृद्धिमुत्तमाम् २ स्त्रियो नवम्यां प्राप्नोति दशम्यां पूर्णकामताम्। वेदांस्तथाप्नुयात्सर्वानेकादश्यां क्रियापरः ३ द्वादश्यां जयलाभं च प्राप्नोति पितृपूजकः। प्रजां बुद्धिं पशून्वृद्धिं स्वातन्त्र्यं पुष्टिमुत्तमाम् ४ दीर्घमायुस्तथैश्वर्यं कुर्वाणस्तु त्रयोदशीम्। अवाप्नोति न संदेहो श्राद्धं श्रद्धापरो नरः ५ यथासंभावितान्नेन श्रद्धासंपत्समन्वितः ६ त्रिकृत्या पितरो यस्य मृताः शस्त्रेण वा हताः। तेन कार्यं चतुर्दश्यां तेषां तृप्तिमभीप्सता ७ श्राद्धं कुर्वन्नमावास्यां यत्नेन पुरुषः शुचिः। सर्वान्कामानवाप्नोति स्वर्गं चानन्त्यमश्नुते ८ कृत्तिकासु पितॄनर्च्य स्वर्गं प्राप्नोति मानवः। अपत्यकामो रोहिण्यां सौम्ये तेजस्वितां लभेत् ९ शौर्यमार्द्रासु चाप्नोति क्षेत्रादि च पुनर्वसौ। पुष्टिं पुष्ये सदाभ्यर्च्य आश्लेषासु वरान्सुतान् १० मघासु स्वजनश्रैष्ठ्यं सौभाग्यं फल्गुनीषु च। प्रदानशीलो भवति सापत्यश्चोत्तरासु वै ११ प्रयाति श्रेष्ठतां सत्सु हस्ते श्राद्धप्रदो नरः। रूपद्युतस्तु चित्रासु तथापत्यान्यवाप्नुयात् १२ वाणिज्यलाभदा स्वाति-र्विशाखा पुत्रकामदा। कुर्वन्तश्चानुराधासु लभन्ते चक्रवर्तिताम् १३ आधिपत्यं च ज्येष्ठासु मूले चारोग्यमुत्तमम्। आषाढासु यशः प्राप्तिरुत्तरासु विशोकताम् १४ श्रवणेन शुभाँल्लोकान्धनिष्ठासु धनं महत्। वेदविद्यां चाभिजिति भिषक्सिद्धिं च वारुणे १५ अजाविकं प्रोष्ठपदे विद्या गावस्तथोत्तरे। रेवतीषु तथा कुप्यमश्विनीषु तुरंगमान् १६ श्राद्धं कुर्वंस्तथाप्नोति भरणीष्वायुरुत्तमम्। तस्मात्काम्यानि कुर्वीत ऋक्षेष्वेतेषु तत्त्ववित् १७ [२०३३] इति

मदालसा ह्मणतेः— प्रतिपदेपासून त्रयोदशीसुद्धां ज्या तेरा तिथि त्या तिथींस श्राद्ध केलें असतां अनुक्रमें १ धनलाभ, २ द्विपदप्राप्ति, ३ वरप्राप्ति, ४ शत्रुनाश, ५ लक्ष्मीप्राप्ति, ६ पूज्यता, ७ राज्य, ८ उत्कृष्ट वृद्धि, ९ स्त्रीप्राप्ति, १० मनोरथपूर्ति व सर्ववेदप्राप्ति, ११ कर्मनिष्ठता, १२ विजयप्राप्ति आणि १३ प्रजा, बुद्धि, पशु, वृद्धि, स्वातंत्र्य, उत्कृष्ट पुष्टि, दीर्घायुष्य व ऐश्वर्य ह्यांची प्राप्ति श्रद्धापूर्वक मिळेल त्या अन्नानें श्राद्ध करणाऱ्या श्रद्धानिष्ठ पुरुषास होते १, २, ३, ४, ५, ६. ज्याचे पितर अपघातानें अथवा शस्त्रानें मेलेले असतील त्यानें त्यांच्या तृप्तीकरितां चतुर्दशीला श्राद्ध करावें ७. अमावास्येला शुचि होऊन यत्नानें श्राद्ध करणाऱ्या पुरुषाला सर्व कामना, स्वर्ग व मोक्ष ह्यांची प्राप्ति होते ८. कृत्तिका, रोहिणी, मृग, आर्द्रा, पुनर्वसु, पुष्य, आश्लेषा, मघा, पूर्वा, उत्तरा, हस्त, चित्रा, स्वाती, विशाखा, अनूराधा, ज्येष्ठा, मूळ, पूर्वाषाढा, उत्तराषाढा, अभिजित्, श्रवण, धनिष्ठा, शततारका, पूर्वाभाद्रपदा, उत्तराभाद्रपदा, रेवती, अश्विनी व भरणी ह्या नक्षत्रांवर श्राद्ध करणाऱ्या पुरुषाला अनुक्रमें स्वर्ग, अपत्य, तेजस्विता, शौर्य, शेत वगैरे, पुष्टि, उत्कृष्ट पुत्र, स्वजनांत श्रेष्ठता, सौभाग्य, औदार्य, संतति, विद्वन्मान्यता, सौंदर्य व अपत्यें, व्यापारांत नफा, पुत्र, चक्रवर्तित्व, आधिपत्य, उत्कृष्ट आरोग्य, यश, शोकराहित्य, वेदविद्या शुभ लोक, विपुल धन, वैद्यक्रियेंत यश, शेळ्यामेंढ्या, विद्या व पशु, धातु, अश्व व उत्कृष्ट आयुष्य प्राप्त होतें. त्यास्तव, शास्त्रज्ञवेत्त्यानें ह्या नक्षत्रांवर काम्य श्राद्धें करावीं ९, १०, ११, १२, १३,

श्रीमार्कण्डेयपुराणे मदालसोपाख्यानेऽलर्कानुशासने श्राद्धकल्पो नाम त्रिंशोऽध्यायः॥३०॥

मदालसोवाच ॥ एवं पुत्र गृहस्थेन देवताः पितरस्तथा। संपूज्य हव्यकव्याभ्यामन्नेनातिथिबान्धवाः १ भूतानि भृत्या विकलाः पशुपक्षिपिपीलिकाः। भिक्षवो याचमानास्तु ये चान्ये वसता गृहे २ सदाचारवता तात साधुना गृहमेधिना। पापं भुंक्ते समुल्लंघ्य नित्यनैमित्तिकीः क्रियाः ३ अलर्क उवाच ॥ कथितं मे त्वया मातर्नित्यं नैमित्तिकं च यत्। नित्यं नैमित्तिकं चैव त्रिविधं कर्म पौरुषम् ४ सदाचारमहं श्रोतुमिच्छामि कुलनन्दिनि। यं कुर्वन्सुखमाप्नोति परत्रेह च मानवः ५ मदालसोवाच ॥ गृहस्थेन सदा कार्यमाचारपरिपालनम्। न ह्याचारविहीनस्य सुखमत्र परत्र वा ६ यज्ञदानतपांसीह पुरुषस्य न भूतये। भवन्ति यः सदाचारं समुल्लंघ्य प्रवर्तते ७ दुराचारो हि पुरुषो नेहायुर्विन्दते महत्। कार्यो यत्नः सदाचारे आचारो हन्त्यलक्षणम् ८ तस्य स्वरूपं वक्ष्यामि सदाचारस्य पुत्रक। समाहितमनाः श्रुत्वा तथैव परिपालय ९ त्रिवर्गसाधने यत्नः कर्तव्यो गृहमेधिना। तत्संसिद्धौ गृहस्थस्य सिद्धिरत्र परत्र च १० पादेनार्थस्य पारत्र्यं कुर्यात्संचयमात्मवान्। अर्धेन चात्मभरणं नित्यनैमित्तिकान्वितम् ११ पादं चात्मार्थमायस्य मूलभूतं विवर्धयेत्। एवमाचरतः पुत्र अर्थः साफल्यमृच्छति १२ तद्वत्पापनिषेधार्थं धर्मः कार्यो विपश्चिता। परत्रार्थं तथा चान्यः काम्योऽत्रैव

१४,१५,१६,१७. (२०३२) ह्याप्रमाणें श्रीमार्कंडेयपुराणांतर्गत मदालसोपाख्यानांतील अलर्कोपदेशासंबंधीं श्राद्धकल्पनामक तिसावा अध्याय समाप्त झाला ॥ ३० ॥

मदालसा ह्मणते:—हे पुत्रा, ह्याप्रमाणें सदाचारसंपन्न व घरांत रहाणाऱ्या सज्जन गृहस्थाश्रम्यानें देवता व पितर ह्यांना हव्यकव्यानें तृप्त करून अन्नाच्या योगानें अतिथि, बांधव, भूतें, भृत्य, पंगु, पशु, पक्षी, पिपीलिका, भिक्षु व इतरही याचक ह्यांना तृप्त करावें. नित्यनैमित्तिक कर्में न करणारा पाप भक्षण करितो १, २, ३. अलर्क ह्मणतो:—हे माते, नित्य, नैमित्तिक, आणि नित्यनैमित्तिक असें पुरुषाचें त्रिविध कर्म तूं सांगितलेंस ४. आतां हे कुलनंदिनि, मनुष्याला ऐहिक व पारलौकिक सुख देणारा सदाचार श्रवण करण्याची माझी इच्छा आहे ५. मदालसा ह्मणते:—गृहस्थानें सर्वदां आचाररक्षण करावें. आचारहीनाला येथें अथवा परलोकीं सुख होत नाहीं ६. सदाचार सोडून वागणाऱ्या पुरुषाचीं यज्ञदानतपें कल्याणाला कारण होत नाहींत ७. दुराचारी पुरुषास दीर्घायुष्य प्राप्त होत नाहीं; ह्यास्तव, सदाचारानें वागण्याचा यत्न करावा; आचारामुळें कुलक्षणही नाहींसें होतें ८. हे पुत्रा, त्या सदाचाराचें स्वरूप मी सांगतें तें स्वस्थ मनानें ऐकून तूं तसा वाग ९. गृहस्थाश्रम्यानें धर्म, अर्थ व काम ह्यांच्या संपादनाविषयीं यत्न करावा. ह्या त्रिवर्गाच्या सिद्धीमुळें गृहस्थाला इहलोकीं व परलोकीं सुख प्राप्त होतें १०. मनोनिग्रही पुरुषानें चतुर्थांश द्रव्य परलोकार्थ धर्मद्वारा संचय करून ठेवावें. अर्ध्या द्रव्याचा विनियोग नित्यनैमित्तिक कर्में व आत्मपोषण ह्यांच्याकडे करावा ११; आणि चतुर्थांश स्वतःकरितां मुद्दल राखून इच्छित करावें. हे पुत्रा, ह्याप्रमाणें वागणाऱ्याच्या द्रव्याचें साफल्य होतें १२. त्याचप्रमाणें विवेकी पुरु-

फलप्रदः १३ प्रत्यवायभयात्कामस्तथान्यश्चाविरोधवान्। द्विधा कामो निगदितस्त्रिवर्गा-
स्याविरोधतः १४ परस्परानुबन्धांश्च सर्वानेतान्विचिन्तयेत्। विपरीतानुबन्धांश्च धर्मा-
दींस्तान्बुध्यस्व मे १५ धर्मो धर्मानुबन्धार्थो धर्मो नात्मार्थबाधकः। उभाभ्यां च द्विधा
कामस्तेन तौ च द्विधा पुनः १६ ब्राह्मे मुहूर्ते बुध्येत धर्मार्थौ चानुचिन्तयेत्। कायक्लेशांश्च
तन्मूलान्वेदतत्त्वार्थमेव च १७ उत्थायावश्यकं कृत्वा कृतशौचः समाहितः। सम्यक्स्थाय तथा-
चम्य प्राङ्मुखो नियतः शुचिः १८ पूर्वां सन्ध्यां सनक्षत्रां पश्चिमां सदिवाकराम्। उपासीत
यथान्यायं नैनां जह्यादनापदि १९ असत्प्रलापमनृतं वाक्पारुष्यं च वर्जयेत्। असच्छास्त्रम-
सद्वादमसत्सेवां च पुत्रक २० सायंप्रातस्तथा होमं कुर्वीत नियतात्मवान्। नोदयास्तमये
बिम्बमुदीक्षेत विवस्वतः २१ केशप्रसाधनादर्शदर्शनं दन्तधावनम्। पूर्वाह्ण एव कुर्वीत देव-
तानां च तर्पणम् २२ ग्रामावसथतीर्थानां क्षेत्राणां चैव वर्त्मनि। न मूत्रमवतिष्ठेत न कृष्टे न
च गोव्रजे २३ नग्नां परस्त्रियं नेक्षेत पश्येदात्मनः शकृत्। उदक्यादर्शनं स्पर्शो वर्ज्यं संभाषणं
तथा २४ नाप्सु मूत्रं पुरीषं वा निष्ठीवं वा समाचरेत्। नाधितिष्ठेच्छकृन्मूत्रं केशभस्मकपा-
लिकाः २५ तुषांगारास्थिचूर्णानि रज्जोवस्त्राणि कानिचित्। नाधितिष्ठेत्तथा प्राज्ञः पथि
चर्वापिवा भुवि २६ पितृदेवमनुष्याणां भूतानां च तथार्चनम्। कृत्वा विभवतः पश्चाद्गृहस्थो

---

याने पापक्षालनार्थ व पारलौकिक सुखार्थ धर्म करावा; कारण, धर्माचें फळ इहलोकींच मिळत असतें १३. प्रत्यवाय त्यागूं नये एतदर्थ व परलोकार्थ कामसेवनही करावें. काम धर्माशीं विरुद्ध नसावा. काम दोन प्रकारचा सांगितला आहे. एक ऐहिक व एक पारलौकिक. धर्म, अर्थ व काम ह्यांत विरोध नसावा १४. हे सर्व परस्परानुबंधी व परस्परविरोधी आहेत असें समजावें. ते तूं ऐक १५. काम व अर्थ ह्यांच्याशीं धर्म विरुद्ध नसावा; आणि अर्थही धर्माशीं विरुद्ध नसावा. धर्म व अर्थ ह्यांच्याशीं अविरुद्ध असा ऐहिक व पारलौकिक काम असावा व कामाशींही अविरुद्ध असे धर्म व अर्थ ऐहिक व पारलौकिक असावे १६. ब्राह्म मुहूर्तावर उठून धर्म व अर्थ ह्यांचें चिंतन करावें आणि तन्मूलक कायक्लेश व वेदतत्त्वार्थ ह्यांचेंही चिंतन करावें १७. आवश्यक कृत्य उठल्यावर करून शौच झाल्यानंतर पूर्वाभिमुख होऊन जितेंद्रिय पुरुषानें शुद्ध होऊन आचमन करावें १८; आणि प्रातःसंध्या नक्षत्रें दिसत असतांना व सायंसंध्या सूर्य असतांना यथाविधि करावी. संकट नसतांना संध्या सोडूं नये १९. हे पुत्रा, निंद्य, अनृत, निष्ठुर, शास्त्रविरुद्ध व दुष्टाशीं भाषण आणि दुर्जनाची सेवा करूं नये २०. जितेंद्रिय पुरुषानें सकाळसंध्याकाळ होम द्यावा; उदयास्तसमयीं सूर्यबिंब पाहूं नये २१. केशसंस्कार, आरसा पाहणें, दांत घासणें व देवतासंतर्पण हीं कृत्यें पूर्वाह्णांतच करावीं २२. गांवें, घरें, तीर्थें, शेतें ह्यांच्या मार्गांत, गोठ्यांत व नांगरटींत मूत्रोत्सर्ग करूं नये २३. नग्न परस्त्री व स्वतःची विष्ठा पाहूं नये. रजस्वलेचें दर्शन, स्पर्शन व संभाषण वर्ज्य करावें २४. उदकांत मूत्रपुरीषोत्सर्ग करूं नये व थुंकूं नये. पुरीष, मूत्र, केश, राख व खापरें ह्यांवर पाय ठेवूं नये २५. त्याचप्रमाणें मार्गावर अथवा भूमीवर असलेला कोंडा,

वैरस्य बालस्य पतितस्य च। देवालयं चैत्यतरुं तथैव च चतुष्पथम् ४२ विद्याधिकं गुरुं चैव बुधः कुर्यात्प्रदक्षिणम्। उपानद्वस्त्रमाल्यादि धृतमन्यैर्न धारयेत् ४३ उपवीतमलंकारं करकं चैव वर्जयेत्। प्रशस्तानि च कर्माणि कुर्वाणा दीर्घजीविनः ४४ चतुर्दश्यां तथाष्टम्यां पञ्चदश्यां च पर्वसु। तैलाभ्यङ्गं तथा भोगं योषितश्च विवर्जयेत् ४५ न क्षिप्तपादजङ्घश्च प्राज्ञस्तिष्ठेत्कदाचन। न चापि विक्षिपेत्पादौ पादं पादेन नाक्रमेत् ४६ मर्माभिघातमाक्रोशं पैशुन्यं च विवर्जयेत्। दम्भाभिमानतैक्ष्ण्यानि न कुर्वीत विचक्षणः ४७ मूर्खोन्मत्तव्यसनिनो विरूपान्मायिनस्तथा। न्यूनाङ्गांश्चाधिकाङ्गांश्च नोपहासेन दूषयेत्। परस्य दण्डं नोद्यच्छेच्छिक्षार्थं पुत्रशिष्ययोः ४८ तद्वन्नोपविशेत्प्राज्ञः पादेनाकृष्य चासनम्। संयावं कृसरं मांसं नात्मार्थमुपसाधयेत् ४९ सायंप्रातश्च भोक्तव्यं कृत्वा चातिथिपूजनम्। उदङ्मुखः प्राङ्मुखो वा वाग्यतो दन्तधावनम् ५० कुर्वीत सततं वत्स वर्जयेद्वर्ज्यवीरुधः। नोदक्शिराः स्वपेज्जातु न च प्रत्यक्शिरा नरः ५१ शिरस्यगस्त्यमास्थाय शयीताथ पुरन्दरम्। न तु गन्धवतीष्वप्सु स्नायीत न तथा निशि ५२ उपरागे परं स्नानमृते दिनमुदाहृतम्। अपमृज्यान्न चास्नातो गात्राण्यम्बरपाणिभिः ५३ न चापि धूनयेत्केशान्वाससी न च धूनयेत्। नानुलेपनमादद्यादस्नातः कर्हिचिद्बुधः ५४ न चापि रक्तवासाः स्याच्चित्रासितधरोऽपि वा। न च कुर्याद्विपर्यासं वाससोर्नापि भूषणे ५५

आपण ऐकूं नये. ब्राह्मण, राजा, दुःखाकुल ४०, ज्ञानवृद्ध, गर्भिणी स्त्री, भारवाहक, अल्पवयी, मूक, अंध, बधिर, मत्त, उन्मत्त ४१, जारिणी, वैरी, बाल व पतित ह्यांना वाट द्यावी. देवालय, चैत्यवृक्ष, चतुष्पथ ४२, ज्ञानवृद्ध व गुरु ह्यांना विचारी पुरुषानें उजवी घालावी. पादत्राण, वस्त्र, पुष्प, जानवें, अलंकार व काष्ठपात्र दुसऱ्याचें वर्ज्य करावें. प्रशस्त कर्में करणारे दीर्घायुषी होत असल्यामुळें तींच करावीं ४३,४४. चतुर्दशी, अष्टमी, पौर्णिमा व पर्वें ह्या दिवशीं तैलाभ्यंग व स्त्रीसंभोग वर्ज्य होय ४५. पायावर अढी टाकूं नये, अढी असतांना उभें राहूं नये व पायावर पाय ठेवूं नये ४६. मर्मावर प्रहार, निंदा व चहाडी हीं वर्ज्य होत. दंभ, अहंकार व क्रूरता विचारी पुरुषानें कधींही करूं नये ४७. मूर्ख, उन्मत्त, व्यसनी, कुरूप, मायिक, हीनांग व अधिकांग ह्यांचा उपहास करूं नये. पुत्र व शिष्य ह्यांशिवाय दुसऱ्याला ताडण करूं नये व त्यांनाही तें शिक्षणार्थच करावें ४८. आसनावर पाय ठेवून बसूं नये. सांजा, खिचडी अथवा मांस स्वतःकरितां तयार करूं नये ४९. अतिथिपूजन करून सकाळसंध्याकाळ पूर्वेस अथवा उत्तरेस तोंड करून न बोलतां भोजन करावें. दंतधावन ५०, हे वत्सा, प्रत्यहीं करावें आणि वर्ज्य काष्टें कधींही घेऊं नयेत. उत्तरेस अथवा पश्चिमेस मस्तक करून कधीं शयन करूं नये ५१; दक्षिणेस अथवा पूर्वेस उसें करून शयन करावें. दुर्गंधी उदकांत व रात्रीं स्नान करूं नये ५२. ग्रहणाला रात्रींही स्नान करावें. अस्नात असतांना वस्त्रानें अथवा हातांनीं अंग पुसूं नये ५३. केस व वस्त्रें झाडूं नयेत आणि पाऱोशानें कधीं गंध लावूं नये ५४. रंगीत, चित्रविचित्र अथवा कृष्णवस्त्र धारण करूं नये आणि वस्त्रांची व भूषणांची उलटापालट करूं नये ५५.

कुर्वीत सततं नरः। क्षुत्वा निष्ठीव्य वासश्च परिधायाचमेद्बुधः ७० क्षुतेऽवलीढे वान्ते च तथा निष्ठीवनादिषु । कुर्यादाचमनं स्पर्शं गोपृष्ठस्यार्कदर्शनम् ७१ कुर्वीतालम्भनं चापि दक्षिणश्रवणस्य वै। यथाविभवतो ह्येतत्पूर्वाभावे ततः परम् ७२ अविद्यमाने पूर्वोक्ते उत्तरप्राप्तिरिष्यते। न कुर्याद्दन्तसंघर्षं नात्मनो देहताडनम् ७३ स्वप्नाध्यापनभोज्यानि स्वाध्यायं च विवर्जयेत्। सन्ध्यायां मैथुनं चापि तथा प्रस्थानमेव च ७४ पूर्वाह्णे तात देवानां मनुष्याणां च मध्यमे। भक्त्या तथापराह्णे च कुर्वीत पितृपूजनम् ७५ शिरःस्नातश्च कुर्वीत दैवं पैत्र्यमथापि वा। प्राङ्मुखोदङ्मुखो वापि श्मश्रुकर्म च कारयेत् ७६ व्यङ्गां विवर्जयेत्कन्यामकुलां चापि रोगिणीम्। विकृतां पिंगलां चैव वाचालां सर्वदूषिताम् ७७ अव्यंगांगीं सौम्यनाम्नीं सर्वलक्षणलक्षिताम्। तादृशीमुद्वहेत्कन्यां श्रेयस्कामो नरः सदा ७८ उद्वहेत्पितृमात्रोश्च सप्तमीं पञ्चमीं तथा। रक्षेद्दारांस्त्यजेदीर्षां दिवा च स्वप्नमैथुने ७९ परोपतापकं कर्म जन्तुपीडां च वर्जयेत्। उदक्या सर्ववर्णानां वर्ज्या रात्रिचतुष्टयम् ८० स्त्रीजन्मपरिहारार्थं पञ्चमीमपि वर्जयेत्। ततः षष्ठ्यां व्रजेद्रात्र्यां श्रेष्ठा युग्मासु पुत्रक ८१ पर्वाणि वर्जयेन्नित्यमृतुकालेऽपि योषितः। तस्मान्नित्यं नरो गच्छेच्छेषयुग्मासु पुत्रक ८२ युग्मासु पुत्रा जायन्ते स्त्रियोऽयुग्मासु रात्रिषु। तस्माद्युग्मासु पुत्रार्थी संविशेत सदा नरः ८३ विधर्मि

---

स्वस्थ मनानें देव, ऋषि व पितर ह्यांना उद्देशून सर्वदां कर्म करावें. शिंकल्यावर, थुंकल्यावर व वस्त्र नेसल्यावर आचमन करावें ६९,७०. शिंक, चाटण, वांती, थुंकी इत्यादिकांनंतर आचमन गोपृष्ठस्पर्श, सूर्यदर्शन ७१ व दक्षिणकर्णस्पर्श यथासंभव अवश्य होय; व पहिल्याच्या अभावीं पुढलें अवश्य होय ७२. पहिलें अशक्य असेल तर दुसरें अनुज्ञात आहे. दांत खाऊं नये व स्वदेहाला ताडण करूं नये ७३. निद्रा, अध्यापन, अध्ययन, भोजन, मैथुन व प्रस्थान संधिसमयीं करूं नये ७४. बाबारे, दैविक, मानुष व पैतृक कर्म अनुक्रमें पूर्वाह्णीं, मध्यान्हीं व अपराह्णीं भक्तीनें करावें ७५. दैविक अथवा पैतृक कर्म शिरस्नान केल्यानंतर करावें. श्मश्रुकर्म पूर्वेस अथवा उत्तरेस तोंड करून करवावें ७६. व्यंग, कुलहीन, रोगट, विकृत, पिंगट, वाचाळ व सर्वांनीं दोष लाविलेली कन्या वरूं नये ७७. नांवानें सौम्य, शरीरानें अव्यंग व सर्व लक्षणांनीं संपन्न असलेल्या कन्येशीं कल्याणेच्छु पुरुषानें सर्वदां विवाह करावा ७८. पित्याच्या बाजूनें सात व मातेच्या बाजूनें पांच पिढ्या सोडून कन्या वरावी आणि स्त्रीचें रक्षण करावें. ईर्षा आणि दिवसा निद्रा व मैथुन हीं कर्में वर्ज्य करावीं ७९. परदुःखदायक कर्म व प्राण्यांना पीडा हीं वर्ज्य करावीं. चारी वर्णांनीं रजस्वला चार रात्रीं वर्ज्य करावी ८०; आणि मुलगी होऊं नये म्हणून पांचवी रात्रही वर्ज्य करावी. नंतर हे पुत्रा, सहाव्या रात्रीं व इतरही श्रेष्ठसमरात्रीं गमन करावें ८१. पर्व असल्यास ऋतुकालींसुद्धां स्त्रीसमागम करूं नये; तस्मात्, हे पुत्रा, अवशिष्ट समरात्रीं सर्वदां पुरुषानें स्त्रीसमागम करावा ८२. समरात्रीं पुत्र व विषमरात्रीं कन्या होत असतात. म्हणून, पुत्रेच्छु पुरुषानें समरात्रीं स्त्रीसमागम करावा ८३.

योनौ हि पूर्वाह्णे सन्ध्याकाले च षण्ढकाः। क्षुरकर्मणि वान्ते च स्त्रीसंभोगे च पुत्रक ८५ स्नायीत चैलवान्प्राज्ञः कटभूमिमुपेत्य च। देववेदद्विजातीनां साधुसभ्यमहात्मनाम् ८६ गुरोः पतिव्रतानां च तथा यज्वितपस्विनाम्। परीवादं न कुर्वीत परिहासं च पुत्रक ८६ कुर्वतामविनीतानां न श्रोतव्यं कथंचन। देवपित्र्यातिथेयाश्च क्रियाः कुर्वीत वै बुधः ८७ स्वाध्यायं चापि कुर्वीत यथाशक्त्या ह्यतन्द्रितः। नोत्कृष्टशय्यासनयोर्नापकृष्टस्य चारुहेत् ८८ न चामङ्गल्यवेषः स्यान्न चामङ्गल्यवाग्भवेत्। धवलाम्बरसंवीतः सितपुष्पविभूषितः ८९ नोद्धतोन्मत्तमूढैश्च नाविनीतैश्च पण्डितः। गच्छेन्मैत्रीं न चाशीलैर्न च चौर्यादिदूषितैः ९० न चातिव्ययशीलैश्च न लुब्धैर्नापि वैरिभिः। नानृतकैस्तथा क्रूरैः सहासीत कदाचन। न बन्धकीभिर्न न्यूनैर्बन्धकीपतिभिस्तथा ९१ सार्द्धं न बलिभिः कुर्यान्न च न्यूनैर्न निन्दितैः। न सर्वशङ्किभिर्नित्यं न च दैवपरैर्नरैः ९२ कुर्वीत साधुभिर्मैत्रीं सदाचारावलम्बिभिः। प्राज्ञैरपिशुनैः शक्तैः कर्मण्युद्योगभागिभिः ९३ वेदविद्याव्रतस्नातैः सहासीत सदा बुधः। सुहृद्दीक्षितभूपालस्नातकश्वशुरैः सह। ऋत्विगादीन्षडर्घार्हानर्चयेच्च गृहागतान् ९४ यथा विभवतः पुत्र द्विजान्संवत्सरोषितान्। अर्चयेन्मधुपर्केण यथाकालमतन्द्रितः ९५ तिष्ठेच्च शासने तेषां श्रेयस्कामो द्विजोत्तमः। न च तान्विवदेद्धीमानाक्रुष्टश्चापि तैः सदा ९६ सम्यग्गृहार्चनं कृत्वा यथास्थानमनुक्रमात्। संपूजयेत्ततो वह्निं दद्याच्चैवाहुतीः क्रमात् ९७ प्रथमां

---

पूर्वाह्णांत समागम केल्यानें विधर्मी व संधिकालीं समागम केल्यानें षंढ प्रजा निपजते. हे पुत्रा, क्षौरकर्म, वांति, स्त्रीसंभोग व गवतानें भरलेल्या जमिनींत गमन झाल्यावर प्राज्ञ पुरुषानें सचैल स्नान करावें. देव, द्विज, साधु, सभ्य महात्मे ८४, ८५ गुरु, पतिव्रता, यज्ञयाग करणारा व तपस्वी ह्यांची निंदा व उपहास करूं नये आणि, हे पुत्रा ८६, कोणी दुर्जन करूं लागल्यास ऐकूं नये. देव, पितर व अतिथि ह्यांचें पूजन ८७ व वेदाध्ययन दक्ष राहून यथाशक्ति करावें. श्रेष्ठाच्या व निकृष्टाच्या शय्येवर किंवा आसनावर आरोहण करूं नये ८८. अशुभ वेष व भाषण वर्ज्य करून शुभ्र वस्त्र धारण करावें आणि शुभ्र पुष्पांनीं भूषित व्हावें ८९. उद्धत, उन्मत्त, मूढ, अशिक्षित, दुःशील, चौरादि कर्मे करणारे, अतिखर्चिक, लोभी, द्वेषी, अनृतभाषणी, क्रूर, जारिणी, हलकट, जारिणीपति, बलाढ्य, दुर्बल, निंदित, ज्यास्या ठिकाणीं शंका घेणारे व सर्वदां दैवाकडेच पाहिलेले ह्यांच्यांशीं मैत्री अथवा सहासन कधीं करूं नये ९०,९१,९२. साधु, सदाचारसंपन्न, प्राज्ञ, चहाडी न सांगणारे, समर्थ, व उद्योगी ह्यांच्यांशीं मैत्री करावी९३. वेदाध्ययन करून ब्रह्मचर्यव्रतानें गुरुगृहीं राहिल्यानंतर गृहस्थाश्रमी झालेले, सुहृद, दीक्षित, भूपाल, स्नातक व श्वशुर ह्यांच्यांशीं समागम करावा. ऋत्विक्प्रभृति पूज्य असलेले सहा घरीं आले असतां त्यांचें पूजन करावें ९४. हे पुत्रा, संवत्सरपर्यंत राहिलेल्या द्विजांचेंही मधुपर्कानें वेळेवर विभवानुसार दक्ष राहून पूजन करावें ९५ आणि कल्याणेच्छु द्विजोत्तमानें त्यांच्या आज्ञेंत रहावें. त्यांनीं शिव्या दिल्या तरी त्यांच्यांशीं कधींही विचारी पुरुषानें विवाद करूं नये ९६. (संमार्जनादिकांनीं)

ब्रह्मणे दद्यात्प्रजानां पतये ततः । तृतीयां चैव गुह्येभ्यः कश्यपाय तथापराम् ९८ ततोऽनुमतये दत्त्वा दद्याद्गृहबलिं ततः । पूर्वं ख्यातो मया यस्ते नित्यकर्मक्रियाविधिः ९९ वैश्वदेवं ततः कुर्याद्बलयस्तत्र मे शृणु । यथास्थानविभागं तु देवानुद्दिश्य वै पृथक् १०० पर्जन्याद्भ्यो धरित्र्यै च दद्यात्र मणिके त्रयम् । ततो धातुर्विधातुश्च दद्याद्द्वारे गृहस्य तु । वायवे च प्रतिदिशं दिग्भ्यः प्राच्यादितः क्रमात् १०१ ब्रह्मणे चान्तरिक्षाय सूर्याय च यथाक्रमम् । विश्वेभ्यश्चैव देवेभ्यो विश्वभूतेभ्य एव च २ उषसे भूतपतये दद्याच्चोत्तरतस्ततः । स्वधा नम इत्तिरयुक्त्वा पितृभ्यश्चापि दक्षिणे ३ कृत्वापसव्यं वायव्यां यक्ष्मैतत्तेति भाजनात् । अन्नावशेषमिच्छन्वै तोयं दद्याद्यथाविधि ४ ततोऽन्नाग्रं समुद्धृत्य हन्तकारोपकल्पनम् । यथाविधि यथान्यायं ब्राह्मणायोपपादयेत् ५ कुर्यात्कर्माणि तीर्थेन स्वेन स्वेन यथाविधि । देवादीनां तथा कुर्याद्ब्राह्मेणाचमनक्रियाम् ६ अंगुष्ठोत्तरतो रेखा पाणेर्या दक्षिणस्य तु । एतद्ब्राह्ममिति ख्यातं तीर्थमाचमनाय वै ७ तर्जन्यङ्गुष्ठयोरन्तः पैत्रं तीर्थमुदाहृतम् । पितॄणां तेन तोयादि दद्यान्नान्दीमुखादृते ८ अंगुल्यग्रे तथा दैवं तेन दिव्यक्रियाविधिः । तीर्थं कनिष्ठिकामूले कायं तेन प्रजापतेः ९ एवमेभिः सदा तीर्थैर्देवानां पितृभिः सह । सदा कार्याणि कुर्वीत नान्यतीर्थेन कर्हिचित् ११० ब्राह्मेणाचमनं शस्तं पित्र्यं पैत्रेण सर्वदा । देवतीर्थेन देवानां प्राजापत्यं निजेन

---

गृहार्चन अनुक्रमें नीट झाल्यानंतर अग्नीचें पूजन करून क्रमानें आहुति द्याव्या ९७. पहिली ब्रह्मदेवतेला, दुसरी प्रजापतीला, तिसरी गुह्यांना, चवथी कश्यपाला ९८ व पांचवी अनुमतीला देऊन गृहबलि द्यावा. नंतर मी पूर्वी सांगितल्याप्रमाणें नित्यकर्मानुष्ठान करावें ९९. नंतर वैश्वदेवकर्म करावें. त्यांतील बलि तूं एक. देवाना उद्देशून हे बलि विवक्षित ठिकाणीं वेगळे वेगळे द्यावयाचे असतात १००. पर्जन्य, उदक व धरित्री ह्यांना तीन बलि पाणी भरून ठेवण्याचे ठिकाणीं द्यावे. नंतर गृहद्वारासमीप धाता व विधाता ह्यांना बलि द्यावे. नंतर पूर्वेपासून क्रमानें प्रत्येक दिशेस वायु १, ब्रह्मा, अंतरिक्ष, सूर्य, विश्वेदेव, विश्वभूत २ ह्याना बलि देऊन उषस् व भूतपति ह्याना उत्तरेस बलि द्यावे. नंतर **स्वधानमः** असें ह्मणून अपसव्यानें दक्षिणेस पितराना व वायव्येस **यक्ष्मै तत्ते** असें ह्मणून यक्ष्मदेवतेला बलि द्यावा. अन्न अवशिष्ट ठेवून यथाविधि उदक द्यावें ३,४. तदनंतर हंतकाराकरितां चार घास अन्न वेगळें काढून यथाविधि व यथान्याय ब्राह्मणाला द्यावें ५. ज्याच्या त्याच्या तीर्थानें ज्याचें त्याचें कर्म करावें. देवादिकांचें आचमनादि कर्म ब्राह्मतीर्थानें करावें ६. उजव्या हाताच्या आंगठ्याचे उत्तरेस जी रेषा आहे तें आचमनार्थ ब्राह्मतीर्थ होय ७. तर्जनी व अंगुष्ठ ह्यांचे मध्यभागीं पित्र्यतीर्थ आहे. त्याच्या योगानें नांदीश्राद्धाशिवाय उदक वगैरे द्यावें ८. अंगुलींचे अग्रभागीं असलेल्या देवतीर्थानें देवकर्म करावें आणि कनिष्ठिकेच्या मुळाशीं कायतीर्थ आहे; त्यानें प्रजापतीला उद्देशून उदक वगैरे द्यावें ९. ह्याप्रमाणें देवांपितरांचीं कर्में त्या त्या तीर्थानेंच सर्वदा करावीं; इतर तीर्थानें कधींही करूं नयेत १०. आचमन ब्राह्मतीर्थानें प्रशस्त होय. पित्र्यकर्म पित्र्यतीर्थानें, देवकर्म देवतीर्थानें व प्रजापतिकर्म काय-

च ११ नान्दीमुखानां कुर्वीत प्राज्ञः पिण्डोदकक्रियाम् । प्राजापत्येन तीर्थेन यच्च किंचित्प्रजा-
पतेः १२ युगपज्जलमग्निं च बिभृयान्न विचक्षणः । गुरुदेवान्प्रति तथा न च पादौ प्रसार-
येत् १३ नाचक्षीत धयन्तीं गां जलं नाञ्जलिना पिबेत् । शौचकालेषु सर्वेषु गुरुष्वल्पेषु वा पुनः
१४ न विलम्बेत शौचार्थं न मुखेनानलं धमेत् । तत्र पुत्र न वस्तव्यं यत्र नास्ति चतुष्टयम् १५
ऋणप्रदाता वैद्यश्च श्रोत्रियः सजला नदी । जितामित्रो नृपो यत्र बलवान्धर्मतत्परः १६ तत्र
नित्यं वसेत्प्राज्ञः कुतः कुनृपतेः सुखम् । यत्राप्रधृष्यो नृपतिर्यत्र सस्यवती मही १७ पौराः
सुसंयता यत्र सततं न्यायवर्तिनः । यत्रामत्सरिणो लोकास्तत्र वासः सुखोदयः १८ यस्मि-
न्कृषीवला राष्ट्रे प्रायशो नातिभोगिनः । यत्रौषधान्यशेषाणि वसेत्तत्र विचक्षणः १९ तत्र पुत्र
न वस्तव्यं यत्रैतत्त्रितयं सदा । जिगीषुः पूर्ववैरश्च जनश्च सततोत्सवः १२० वसेन्नित्यं सुशीलेषु
सहवासिषु पण्डितः । इत्येतत्कथितं पुत्र मया ते हितकाम्यया १२१ (२१६३) इति
श्रीमार्कण्डेयपुराणेऽलर्कानुशासने सदाचारवर्णनं नामैकत्रिंशोऽध्यायः ॥ ३१ ॥

मदालसोवाच ॥ अतःपरं शृणुष्व त्वं वर्ज्यावर्ज्यप्रतिक्रियाम् । भोज्यमन्नं पर्युषितं स्नेहाक्तं
चिरसंभृतम् १ अस्नेहाश्चापि गोधूमयवगोरसविक्रियाः । शशकः कच्छपो गोधा श्वाविस्च-

---

तीर्थानें करावें ११: नांदीश्राद्धामध्यें प्राज्ञ पुरुषानें प्राजापत्यतीर्थानें पिंडोदकदानादि
कर्म करावें आणि प्रजापतिसंबंधी कर्मही त्याच तीर्थानें करावें १२. उदक व अग्नि
बरोबर विचारी पुरुषानें धारण करूं नये. गुरु व देव ह्यांच्याकडे पाय पसरूं नये १३;
गाय, खात असल्यास सांगूं नये; ओंजळीनें पाणी पिऊं नये, मूत्रोत्सर्गादि कोणत्याही
प्रकारच्या लहान मोठया शौचाचा प्रसंग प्राप्त झाला असतां १४ शौचाला विलंब करूं
नये; मुखानें अग्नीला फुंकर घालूं नये. ऋण देणारा, वैद्य, श्रोत्रिय व सजळ नदी हीं
चार जेथें नसतील तेथें, हे पुत्रा, राहूं नये. शत्रुविजयी, बलाढय व धर्मनिष्ठ राजा जेथें
असेल १५,१६ तेथेंच विचारी पुरुषानें सर्वदां रहावें; दुष्ट राजापासून सुख कोठून
होणार ! अजिंक्य राजा, सुपीक जमीन १७, राजधानींतील लोक सुव्यवस्थित राहून
सर्वदां न्यायानें वागणारे आणि प्रजाजन मत्सररहित जेथें असतील तेथें वास्तव्य सुख-
कारक होतें १८. ज्या राष्ट्रांतील शेतकरी प्रायः विशेष चैनी नसतील आणि जेथें सर्व
धान्यें पिकत असतील तेथें विचारी पुरुषानें रहावें १९. हे पुत्रा, इतरांना जिकण्याची
इच्छा करणारा राजा, पूर्वी आपलें ज्याच्याशीं वैर पडलेलें आहे असा मनुष्य आणि
नेहमीं चैन करणारे लोक ह्या तीन गोष्टी जेथें असतील तेथें हे पुत्रा, राहूं नये १२०.
सुशील व एकत्र राहणारे लोक ह्यांच्यामध्यें सर्वदां वास्तव्य करावें. हे पुत्रा, हें मी
तुला हितबुद्धीनें कथन केलें आहे १२१.(२१६३) ह्याप्रमाणें श्रीमार्कंडेयपुराणांतर्गत
अलर्कोपदेशसंबंधी सदाचारवर्णननामक एकतिसावा अध्याय समाप्त झाला ॥ ३१ ॥

मदालसा म्हणते:—ह्यानंतर तूं वर्ज्य व वर्ज्य नसलेलें कर्म ऐक. स्नेहाक्त अन्न
शिळें व पुष्कळ काळ लोटलेलें असलें तरी खावें १ व गहूं; सातू आणि गोरस
ह्यांचे पदार्थ स्नेहरहित असले तरीमुद्दां शिळे खावे. हे पुत्रा, ससा, कासव, घोरपड,

स्तनन्धयप्रसूताः स्त्रियः १६ अभ्यस्य च तथा वाचः स्रवन्त्योऽनन्यबुद्बुदाः । भूमिर्विशुध्यते कालादाहमार्जनगोक्रमैः १७ लेपादुल्लेखनात्सेकाद्वेश्म संमार्जनार्चनात् । केशकीटावपन्नेऽभे गोघ्राते मक्षिकान्विते १८ मृदम्बुभस्मना तात प्रोक्षितव्यं विशुद्धये । औदुम्बराणामम्लेन क्षारेण त्रपुसीसयोः १९ भस्माम्बुभिश्च कांस्यानां शुद्धिः प्लावो द्रवस्य च । अमेध्याक्तस्य मृत्तोयैर्गन्धापहरणेन च २० अन्येषां चैव तद्व्यैर्वर्णगन्धापहारतः । चाण्डालैरन्त्यजैश्चैव म्लेच्छैरस्पृश्यजातिभिः २१ स्पृष्टमधावितं धान्यमनर्हं सर्वकर्मणि । द्रोणादधस्तु यद्धान्यं तस्यायं विधिरुच्यते २२ द्रोणादूर्ध्वं तु यद्धान्यं प्रोक्षणादेव शुध्यति । रथ्यासु पतितं धान्यं दृष्ट्वा यत्नेन वन्दयेत् २३ उद्धृत्य मूर्ध्ना चादद्यात्लक्ष्मीर्नश्यति चान्यथा । शुचिगोतृप्तिकृत्तोयं प्रकृतिस्थं महीगतम् २४ तथा मांसं च चण्डालक्रव्यादादिनिपातितम् । रथ्यागतं च चैलादि तात वाताच्छुचि स्मृतम् २५ गजोऽश्वोऽग्निरद्वो गौश्छायारश्मयः पवनो मही । विप्रुषो मक्षिकाश्च दुष्टसङ्गाददोषिणः २६ अजाश्वौ मुखतो मेध्यौ न गोर्वत्सस्य चाननम् । मातुः प्रस्रवणं मेध्यं शकुनिः फलपातने २७ आसनं शयनं यानं नावः पथि तृणानि च । सोमसूर्यांशुपवनैः शुध्यन्ते तानि पण्यवत् २८ रथ्याप्रसर्पणे स्नाने क्षुतपानान्नकर्मसु । आचामेत यथा-

---

अग्नि, धर्मशाळा, स्तनपान करीत असलेलीं मुलें ज्यांचीं आहेत अशा स्त्रिया १६, अभ्यासांतील भाषा, उदकप्रवाह व स्वच्छ बुडबुडे शुद्ध होत. काळ, दाह, संमार्जन, गोसंचार, सारवण, खणणें व सडा ह्यांच्या योगानें भूमि शुद्ध होते. घर संमार्जनानें व रांगोळी वगैरे घालून शुद्ध होतें. गुंतवळ व कीटक ह्यांनीं दूषित, गाईनें हुंगलेलें व माशीपडलेलें अन्न १७,१८, बाबारे, शुद्धीकरितां मृत्तिका, उदक व भस्म ह्यांनीं प्रोक्षण करावें. ताम्रपात्रें अम्लानें, कथील व शिसें क्षारानें १९, कासें, भस्म व उदकं ह्यांनीं, द्रव वाहून गेल्यानें, अपवित्र पदार्थानें, बरबटलेलें पात्र, मृत्तिका व उदक ह्यांनीं गंध नाहींसा केल्यानें २० आणि इतरही पात्रें त्याच द्रव्यांनीं डाग व गंध नष्ट केल्यानें शुद्ध होतात. चांडाळ, अंत्यज, म्लेच्छ व इतर अस्पर्श जाति ह्यांचा २१ स्पर्श झालेलें धान्य धुतल्या शिवाय कोणत्याही कर्माला योग्य नाहीं. परंतु, चार पायलीपेक्षां कमी असलेल्या धान्याची ही गोष्ट होय २२. त्यापेक्षां ह्मणजे द्रोणापेक्षां अधिक असलेलें धान्य प्रोक्षणानें शुद्ध होतें. रस्त्यांत पडलेलें धान्य दिसतांक्षणीं यत्नानें त्याला वंदन करावें २३ आणि वेंचून डोक्यावर ठेवून आणावें; नाहींतर लक्ष्मी नाहींशी होते. भूमिगत उदक—विकाररहित व गाईची तहान भागण्याइतकें असल्यास—शुद्ध होय २४. चंडाल, मांसभक्षक प्राणी इत्यादिकांनीं शिकार करून आणिलेलें मांस शुद्ध होय. रस्त्यांत पडलेलें वस्त्र वगैरे, बाबारे, वाऱ्यानें शुद्ध होतें २५. गज, अश्व, गाय, अग्नि, सावली, किरणें, वायु, पृथ्वी, शिंतोडे व मक्षिकादिक दुष्ट स्पर्शानेंही अशुद्ध होत नाहींत २६. शेळी व अश्व ह्यांचें तोंड पवित्र; परंतु, गाईचें अपवित्र. वासराचें तोंड पान्हवण्याच्या वेळेला पवित्र आणि पक्षी फळ पाडण्याला पवित्र २७. बैठक, अंथरूण, वाहन, नौका व मार्गांतील तृण हीं बाजारांतील पदार्थांप्रमाणें

तद्वच्च सूतिकाशौचदूषितौ पुरुषावपि ४२ अतःपरं शृणुष्व त्वं स्त्रीधर्मांस्तु विस्तरात् ४३ उदुम्बरे वसेन्नित्यं भवानी सर्वदेवता । ततः सा प्रत्यहं पूज्या गन्धपुष्पाक्षतादिभिः ४४ अशून्या देहली कार्या प्रातःकाले विशेषतः । यस्य शून्या भवेत्सा तु शून्यं तस्य कुलं भवेत् ४५ पादस्य स्पर्शने तत्र असंपूज्य च लंघनम् । कुर्वन्नरकमाप्नोति तस्मात्तत्परिवर्जयेत् ४६ प्रातःकाले स्त्रिया कार्यं गोमयेनानुलेपनम् । प्रत्यहं सदने तस्मान्नैव दुःखानि पश्यति ४७ स्पृशन्ति रश्मयो यस्य गृहं संमार्जनादृते । भवन्ति विमुखास्तस्य पितरो देवमातरः ४८ निशायाः पश्चिमे यामे धान्यसंस्करणादिकम् । कुरुते यातु मोहेन वन्ध्या जन्मनि जन्मनि ४९ सन्ध्याकाले तु सम्प्राप्ते मार्जनं न करोति या । भर्तृहीना भवेत्सा तु निःस्वा जन्मनि जन्मनि ५० अकृतस्वस्तिकां या तु कामदिग्धां च मेदिनीम् । तस्याः स्त्रिया विनश्यन्ति वित्तमायुर्यशस्तथा ५१ मार्जनीचुल्लिकाशीवदृषदश्चोपलं तथा । नाक्रामेदंघ्रिणा जातु पुत्रदारधनक्षयात् ५२ उदूखलं च मुसलं तथा चैव तु घर्षणम् । पदाक्रम्य तु पापीयान्नाप्नोत्युत्तमां गतिम् ५३ भिन्नासनं योगपट्टं तथैव मृगचर्म च । कृष्णाविकं तथा तात वर्जयेत्पुत्रवान्गृही ५४ दक्षिणाभिमुखो यस्तु विदिङ्मुख एव च । केशान्संस्कुरुते मर्त्यो धननाशं च विन्दति ५५ अनढस्तु न कुर्वीत भुक्त्वा दन्तविशोधनम् । पादुकारोहणं चैव तिलैश्चापि स तर्पणम् ५६ न जीवत्पितृकः कुर्यादेकश्चोत्तरीयकम् । दर्शश्राद्धं न कुर्वीत दर्शस्नानं

---

कुक्कुट, पतित, अपविद्ध, चांडाल, प्रेतवाहक ४१, रजस्वला व ग्राममूकर आणि त्याचप्रमाणें सोहेर व सुतक असलेले लोक ह्यांचा स्पर्श झाला असतां स्नान करावें ४२. आतां तूं स्त्रीधर्म संक्षेपतः श्रवण कर ४३. उदुंबराचे ठिकाणीं सर्वदेवता भवानी नित्य रहात असते; ह्यास्तव, तिचें तेथें प्रत्यहीं गंधपुष्पाक्षतादिकांनीं पूजन करावें ४४. विशेषतः प्रातःकालीं उंबरठा मोकळा ठेवूं नये. ज्याचा मोकळा राहील त्याचें कुल शून्य होतें ४५. त्याला पादस्पर्श करणारा व पूजनाशिवाय ओलांडून जाणारा नरकांत जातो. तस्मात्, तें करूं नये ४६. प्रातःकालीं प्रत्यहीं स्त्रीनें घरामध्यें शेणानें सारवावें; म्हणजे ती दुःखें पहात नाहीं ४७. संमार्जनशिवाय ज्याच्या घरांत किरणें पडतात त्याच्यापासून पितर, देव आणि मातृगण पराङ्मुख होतात ४८. रात्रीच्या शेटल्या प्रहरीं जी मोहानें धान्य नीट वगैरे करिते ती प्रत्येकजन्मीं वंध्या होते ४९. संध्याकाळीं जी केर काढीत नाहीं ती प्रत्येक जन्मीं विधवा व दरिद्री होते ५०. यथेष्ट सारवण घालून त्यावर जी स्वस्तिक काढीत नाहीं तिचें वित्त व आयुष्य नष्ट होतें ५१. केरसुणी, चूल, तस्त, वरवंटा व पाटा ह्यांना कधींही पुत्र, स्त्री व धन ह्यांचा क्षय होईल म्हणून पाय लावूं नये ५२. उखळाला, मुसळाला व जात्याला पाय लावणाऱ्या पाप्याला उत्तम गति प्राप्त होत नाहीं ५३. फाटकें आसन, योगपट्ट, कृष्णाजिन, काळ्या लोकरीचें वस्त्र, हीं पुत्रवान् गृहस्थाश्रम्यानें, हे पुत्रा, वर्ज्य करावीं ५४. दक्षिणेस अथवा विदिशेस तोंड करून केशसंस्कार करणाऱ्याचें धन नाहींसें होतें ५५. अविवाहित पुरुषानें भोजनानंतर दंतशोधन, पादुका व तिलतर्पण करूं नये ५६. जीवत्पितृकानें हात बाहेर काढून वस्त्र पांघरूं

यो नित्यकर्मणो हानिं कुर्यान्नैमित्तिकस्य च। भुक्त्वान्नं तस्य शुद्ध्यै च त्रिरात्रोपोषितो नरः ७२ यस्य चावदिनं हानिर्गृहे नित्यस्य कर्मणः। स च ब्राह्मणसन्त्यक्तः किल्बिषी स नराधमः ७३ नित्यस्य कर्मणो हानिं न कुर्वीत कदाचन। तस्य त्वकरणे बन्धः केवलं मृतजन्मसु ७४ दशाहं ब्राह्मणस्तिष्ठेद्दानहोमादिवर्जितः। क्षत्रियो द्वादशाहं च वैश्यो मासार्धमेव च ७५ शूद्रस्तु मासमासीत नित्यकर्मविवर्जितः। रोगापस्मारादिविधिना नित्यकर्मविधिच्युतः ७६ पादकृच्छ्रं ततः कृत्वा गां दत्त्वा शुद्धिमाप्नुयात्। ततः परं निजं कर्म कुर्युः सर्वे यथोदितम् ७७ प्रेताय सलिलं देयं बहिर्गेहाच्च गोत्रिकैः। प्रथमेऽह्नि तृतीये वा सप्तमे नवमे तथा ७८ भस्मास्थिचयनं कार्यं चतुर्थे गोत्रिकैर्दिने। ऊर्ध्वं संचयनात्तेषामङ्गस्पर्शो विधीयते ७९ सोदकैस्तु क्रियाः सर्वाः कार्याः संचयनात्परम्। स्पर्श एव सपिण्डानां मृताहनि तयोर्मयोः ८० वृक्षादिगोदंष्ट्रिशस्त्रतोयोद्बन्धनवह्निषु। विषप्रपातादिमृते प्रायो नाशकयोरपि ८१ बाले देशान्तरस्थे च तथा प्रव्रजिते मृते। सद्यः शौचमथान्यैश्च त्र्यहस्तु कमशौचकम् ८२ नैवौर्ध्वदैहिकं कार्यं न च कार्योदकक्रिया। गर्भस्रावे तदेवोक्तं पूर्णकाले न शुध्यति ८३ ब्राह्मणानामहोरात्रं क्षत्रियाणां दिनत्रयम्। षड्रात्रमपि वैश्यानां शूद्राणां द्वादशाह्निकम् ८४ सपिण्डानां सपिण्डस्तु मृतेऽन्यस्मिन्मृतो यदि। पूर्वाशौचसमाख्यातैः कार्या तस्य दिनैः क्रिया ८५

---

नित्यनैमित्तिक कर्मे न करणाऱ्याचें अन्न सेवन केल्यास शुद्धीकारितां त्रिरात्र उपोषण करावें ७२. ज्याच्या घरीं नित्यकर्म कधींच होत नाहीं आणि ज्याला ब्राह्मणांनीं सोडिलें आहे तो पापी व नराधम होय ७३. नित्यकर्म कधींही टाळूं नये; तें न केल्यानें पुरुष केवळ जन्ममरणामध्येंच जखडून राहतो ७४. अशौच असल्यास ब्राह्मणानें दहा, क्षत्रियानें बारा व वैश्यानें पंधरा दिवस दान होमादि कर्मे करूं नयेत ७५, आणि शूद्रानें महिनाभर नित्यकर्म वर्ज्य करावें. रोग, अपस्मार इत्यादिकांमुळें नित्यकर्माचा लोप झाला असल्यास ७६ पादकृच्छ्र व गोप्रदान केल्यानें शुद्धि होते. वर निर्दिष्ट केलेल्या दिवसांनंतर सर्व वर्णांनीं आपलें विहित कर्म करावें ७७. प्रेताला गोत्रजांनीं घरावाहेर उदक द्यावें. १,३,४,७ अथवा ९ व्या दिवशीं गोत्रजांनीं राख भरावी ७८. राख व अस्थि भरल्यानंतर गोत्रजांना स्पर्शनिषेध नाहीं ७९. सोदकांनीं सर्व क्रिया अस्थि व राख भरल्यानंतर कराव्या. सपिंडांना मृतदिवशीं व राख भरण्याचे दिवशींही स्पर्शाचा निषेध नाहीं ८०. वृक्ष, सर्प, पशु, श्वापद, शस्त्र, उदक, फास, विष, कडेलोट, प्रायोपवेशन व उपोषण ह्यांनीं मरण आल्यास ८१, आणि त्याचप्रमाणें मृतमनुष्य, बाल, देशांतरीं राहणारे व संन्यस्त असल्यास केवल स्नानानें शुद्धि होते; इतरांना तीन दिवस अशौच सांगितलें आहे ८२. ह्यांचें और्ध्वदेहिक अथवा उदककर्म करूं नये. गर्भस्रावाविषयींही असेंच सांगितलें आहे. दिवस पूर्ण होऊन जर स्त्री प्रसूत झाली तर मात्र जननाशौच आहेच ८३. हें अशौच ब्राह्मणांना एकरात्र, क्षत्रियांना तीन दिवस, वैश्यांना सहा दिवस व शूद्रांना १२ दिवस आहे ८४. एक मेल्यानंतर दुसरा सपिंड मेल्यास सपिंडांनीं पूर्वीचें जें अशौच त्याचे दिवस गणून त्यांचीं

एष एव विधिर्दृष्टो जन्मन्यपि हि सूतके । सपिण्डानां सपिण्डेषु यथावत्सोदकेषु च ८६ जाते पुत्रे पितुः स्नानं सचैलं तु विधीयते। मृते हि सर्वे बन्धूनामित्याह भगवान्भृगुः ८७ तत्रापि यदि चान्यस्मिञ्जाते जायेत चापरः । तत्रापि शुद्धिरुद्दिष्टा पूर्वजन्मवतो दिनैः ८८ दश द्वादशमासार्धमाससंख्यैर्दिनैर्गतैः । स्वाः स्वाः कर्मक्रियाः कुर्युः सर्वे वर्णा यथाविधि ८९ प्रेतमुद्दिश्य कर्तव्यमेकोद्दिष्टं ततः परम् । सपिण्डीकरणं चैव कार्यमावत्सरान्तरैः ९० ततः पितृत्वमापन्ने दर्शपूर्णादिभिर्विधिभिः । प्रीणयंस्तस्य कर्तव्यं यथाश्रुतिनिदर्शनम् । दानानि चैव देयानि ब्राह्मणेभ्यो मनीषिभिः ९१ यद्यदिष्टतमं लोके यच्चास्य दयितं गृहे । तत्तद्गुणवते देयं तदेवाक्षयमिच्छता ९२ प्रेतं प्रेत समुद्दिश्य भूमिर्धेन्वादिकं स्वकम् । दद्याद्येनास्य संप्रीताः पितरः सन्ति पुत्रक ९३ पूर्णैस्तु दिवसैः स्पृष्ट्वा सलिलं वाहनायुधम् । प्रतोदं दण्डौ च तथा सम्यग्वर्णाः कृतक्रियाः ९४ स्ववर्णधर्मनिर्दिष्टमुपादानं तथा क्रियाः । कुर्युः समस्ताः शुचिनः परत्रेह च भूतिदाः ९५ अध्येतव्या त्रयी नित्यं भवितव्यं विपश्चिता । धर्मतो धनमाहार्यं यष्टव्यं चापि यत्नतः ९६ यच्चापि कुर्वतो नात्मा जुगुप्सामेति पुत्रक । तत्कर्तव्यमशङ्केन यन्न गोप्यं महाजने ९७ एवमाचरतो वत्स पुरुषस्य गृहे सतः । धर्मार्थकामसंप्राप्त्या परत्रेह च शोभनम् ९८ [ १२६१ ] इति श्रीमार्कण्डेयपुराणेऽलर्कानुशासने धर्माधर्मनिरूपणं नाम द्वात्रिंशोऽध्यायः ॥ ३२ ॥

क्रिया करावी ८५. सपिंडांनीं सपिंडांचें व सोदकांनीं सोदकांचें जननाशौच व मृताशौच हाच न्यायानें मानावें ८६. पुत्र जन्मल्यावर पित्यानें सचैल स्नान करावें; परंतु, कोणी मृत झाल्यास सर्व बांधवांनीं तें करावें असें भगवान् भृगूचें ह्मणणें आहे ८७. एक जन्मल्यानंतर दुसरा जन्मल्यास प्रथम जन्मलेल्याच्याच दिवसांनीं त्याचेंही जननाशौच संपतें ८८. दहा, बारा, पंधरा व तीस दिवसांनीं सर्व वर्णांनीं आपापलीं कर्में यथाविधि करूं लागावें ८९. नंतर प्रेताला उद्देशून एकोद्दिष्ट करावें; आणि संवत्सरानंतर सपिंडीकरण करावें ९०. नंतर पितृत्व प्राप्त झाल्यावर त्याला उद्देशून दर्शप्रभृति श्राद्ध त्याच्यासह तीन पुरुष धरून श्रुतींत सांगितल्याप्रमाणें तत्प्रीत्यर्थ करावें; आणि ब्राह्मणांना विचारी पुरुषानें दानें द्यावीं ९१; व जें जें जगतामध्यें अत्यंत प्रिय व जें जें त्याच्या घरांत आवडीचें असेल तें तें त्याला उद्देशून अक्षय्यफलेच्छु पुरुषानें सत्पात्रीं द्यावें ९२. हे पुत्रा, जो जो मृत होईल त्याला उद्देशून भूमि, धेनु इत्यादि स्वकीय धन अर्पण करावें. ह्मणजे त्याच्यावर पितर संतुष्ट होतात ९३. अशौचाचे दिवस संपल्यानंतर उदक, वाहन, आयुध, चाबूक व दंड ह्यांना स्पर्श करून और्ध्वदेहिक केलेल्या ९४ सर्व वर्णांनीं वर्णाश्रमविहित धर्म व इतरही ऐहिक व पारलौकिक सुख देणारीं कर्में शुद्ध झाल्यावर करावीं ९५. तीन वेदांचें अध्ययन करावें, विवेकाचें अवलंबन करावें; धर्मानें द्रव्य मिळवून यत्नानें यजन करावें ९६ आणि, हे पुत्रा, जें केल्यानें निंदा होत नाहीं व जें मोठ्या लोकांपाशींही गुप्त ठेवण्याचें कारण पडत नाहीं तें निःशंकपणें करावें ९७. हे वत्सा, ह्याप्रमाणें वागणाऱ्या सत्पुरुषाचें घरीं

जड उवाच ॥ स एवमनुशिष्टः सन्मात्रा संप्राप्य यौवनम् । ऋतध्वजसुतश्चक्रे सम्यग्दारपरिग्रहम् १ पुत्रांश्चोत्पादयामास यज्ञैश्चाप्ययजद्विभुः । पितुश्च सर्वकालेषु चकाराज्ञानुपालनम् २ ततः कालेन महता संप्राप्य चरमं वयः । चक्रेऽभिषेकं पुत्रस्य तस्य राज्ये ऋतध्वजः ३ भार्यया सह धर्मात्मा यियासुस्तपसे वनम् । अवतीर्णो महीरक्षो महाभागो महीपतिः ४ मदालसा च तनयं प्राहेदं पश्चिमं वचः । कामोपभोगसंसर्गप्रहाणाय सुतस्य वै ५ मदालसोवाच ॥ यदा दुःखमसह्यं ते प्रियबन्धुवियोगजम् । शत्रुबाधोद्भवं वापि वित्तनाशात्मसंभवम् ६ भवेत्तत्कुर्वतो राज्यं गृहधर्मावलम्बिनः । दुःखायतनभूतो हि ममत्वालम्बनो गृही ७ तदास्मात्पुत्र निष्कृष्य मद्दत्तादङ्गुलीयकात् । वाच्यं ते शासनं पट्टे सूक्ष्माक्षरनिवेशितम् ८ जड उवाच । इत्युक्त्वा प्रददौ तस्मै सौवर्णं साङ्गुलीयकम् । आशिषश्चापि या योग्याः पुरुषस्य गृहे सतः ९ ततः कुवलयाश्वोऽसौ सा च देवी मदालसा । पुत्राय दत्त्वा तद्राज्यं तपसे काननं गतौ १० [२२६१] इति श्रीमार्कण्डेयपुराणे मदालसोपाख्यानं नाम त्रयस्त्रिंशोऽध्यायः ॥ ३३ ॥

जड उवाच ॥ सोऽप्यलर्को यथान्यायं पुत्रवन्मुदिताः प्रजाः । पालयामास धर्मात्मा

---

धर्म, अर्थ व काम ह्यांची संमृद्धि होते व त्याचें इहलोकीं व परलोकीं कल्याण होतें ९८ (२२५१) ह्याप्रमाणें श्रीमार्कंडेयपुराणांतील अलर्कोपदेशाविषयीं धर्माधर्मनिरूपणनामक बत्तिसावा अध्याय समाप्त झाला ॥ ३२ ॥

जड ह्मणतोः—ह्याप्रमाणें मातेनें उपदेश केला असतां यौवन प्राप्त झाल्यावर ऋतध्वजाच्या पुत्रानें यथाविधि विवाह केला १; पुत्रोत्पादन केलें; यज्ञयाग केले व त्या समर्थ अलर्कानें सर्वदा पित्याच्या आज्ञेचें परिपालन केलें २. तदनंतर बराच काळ लोटल्यावर वार्धक्य आलें असतां ऋतध्वजानें पुत्राला राज्याभिषेक केला ३; आणि तपश्चर्या करण्याकरितां भार्येसह वनांत जाण्याच्या उद्देशानें तो धर्मनिष्ठ, महाशय व पृथ्वीचें रक्षण करणारा राजा सिंहासनावरून उतरला ४. त्यावेळीं विषयोपभोगापासून पुत्राचें मन निवृत्त व्हावें एतदर्थ मदालसेनें त्याला शेवटला उपदेश केला ५. मदालसा ह्मणतेः—ममत्वबुद्धि धारण करणारा गृहस्थाश्रमी पुरुष दुःखाचें निधान आहे. ह्यास्तव, गृहस्थाश्रमाचें अवलंबन करून राज्य करीत असतांना इष्टबंधुवियोग, शत्रुबाधा, द्रव्यनाश व देहपीडा ह्यांपासून जर तुला असह्य दुःख प्राप्त झालें तर ६, ७, हे पुत्रा, मीं दिलेल्या अंगठींतून तूं सूक्ष्म अक्षरांनीं पट्टावर लिहिलेलें आज्ञापत्र काढून वाच ८. जड ह्मणतोः—असें बोलून मदालसेनें त्याला सोन्याची अंगठी दिली; गृहस्थाश्रमी पुरुषाला योग्य असे आशीर्वाद दिले ९ आणि तदनंतर तो कुवलयाश्व व ती देवी मदालसा हे उभयतां, पुत्राला तें राज्य देऊन तपश्चर्येकरितां वनांत गेले १०. (२२६१) ह्याप्रमाणें श्रीमार्कंडेयपुराणांतर्गत मदालसोपाख्याननामक तेहेतिसावा अध्याय समाप्त झाला ॥ ३३ ॥

जड ह्मणतोः—त्या धर्मात्म्या अलर्कानेंही आपआपल्या धर्मांत वागणाऱ्या आनं-

स्वे स्वे कर्मण्यवस्थिताः १ दुष्टेषु दण्डं शिष्टेषु सम्यक्च परिपालनम्। कुर्वन्परां मुदं लेभे इयाज च महामखैः २ अजायन्त सुताश्चास्य महाबलपराक्रमाः। धर्मात्मानो महात्मानो विमार्गपरिपन्थिनः ३ चकार सोऽर्थं धर्मेण धर्ममर्थेन वा पुनः। तयोश्चैवाविरोधेन बुभुजे विषयानपि ४ एवं बहूनि वर्षाणि तस्य पालयतो महीम्। धर्मार्थकामसक्तस्य जग्मुरेकमहर्यथा ५ वैराग्यं नास्य संजज्ञे भुञ्जतो विषयान्प्रियान्। न चाप्यलमभूत्तस्य धर्मार्थोपार्जनं प्रति ६ तं तथा भोगसंसर्गप्रमत्तमजितेन्द्रियम्। सुबाहुर्नाम शुश्राव भ्राता तस्य वनेचरः ७ तं बुबोधयिषुः सोऽथ चिरं ध्यात्वा महामतिः। तद्वैरिसंश्रयं तस्य श्रेयोऽमन्यत भूपतेः ८ ततः स काशिभूपालमुदीर्णबलवाहनम्। स्वराज्यमाप्तुमागच्छद्बहुशः शरणं कृती ९ सोऽपि चक्रे बलोद्योगमलर्कं प्रति पार्थिवः। दूतं च प्रेषयामास राज्यमस्मै प्रदीयताम् १० सोऽपि नैच्छत्तदा दातुमाज्ञा पूर्वं स्वधर्मवित्। प्रत्युवाच च तं दूतमलर्कः काशिभूभृतः ११ मामेवाभ्येत्य हार्देन याचतां राज्यमग्रजः। नाक्रान्त्या संप्रदास्यामि भयेनाल्पामपि क्षितिम् १२ सुबाहुरपि नो याच्ञां चकार मतिमांस्तदा। न धर्मः क्षत्रियस्येति याच्ञावीर्यधनो हि सः १३ ततः समस्तसैन्येन काशीशः परिवारितः। आक्रान्तुमभ्यगाद्राष्ट्रमलर्कस्य महीपतेः १४

दिले प्रजाजनांचें पुत्राप्रमाणें परिपालन केलें १. दुष्टांचें शासन व साधूंचें रक्षण करीत असतांना त्याला उत्कृष्ट आनंद झाला व त्यानें मोठे यागही केले २. त्याला धर्मात्मे, महात्मे व कुमार्गाचे शत्रु असे महाबलाढ्य व महापराक्रमी पुत्र झाले ३. त्यानें अर्थसंचय धर्मानें केला; द्रव्याच्या योगानें त्यानें धर्मसंपादन केलें आणि धर्म व अर्थ ह्यांना विरोध न आणितां त्यानें विषयांचाही उपभोग घेतला ४. ह्याप्रमाणें धर्म, अर्थ व काम ह्यांविषयीं तत्पर असलेला तो अलर्क राज्य करीत असतांना अनेक वर्षे एका दिवसाप्रमाणें गेलीं ५. प्रिय विषयांचा उपभोग घेत असतांना त्याला वैराग्य प्राप्त झालें नाहीं आणि अर्थ व धर्म संपादन करण्याविषयींही त्याची तृप्ति झाली नाहीं ६. ह्याप्रमाणें तो विषयोपभोगांत दंग असून इंद्रियांच्या अधीन झाला आहे असें, वनामध्यें संचार करणाऱ्या त्याच्या सुबाहुसंज्ञक भ्रात्याला समजलें ७. तेव्हां त्याला बोध करण्याचा उद्देश मनांत धरून त्या महाविचारी सुबाहूनें पुष्कळ वेळपर्यंत विचार केला आणि शत्रूचा आश्रय करण्यांतच त्याचें कल्याण आहे असें त्याला वाटलें ८. तदनंतर प्रचंड सैन्य व वाहनें ह्यांनीं युक्त असलेल्या काशिराजाकडे, स्वराज्य मागण्याच्या उद्देशानें तो पुण्यवान् सुबाहु अनेकवेळां शरण गेला असतां ९ त्या राजानें अलर्काचे विरुद्ध सैन्याची तयारी केली आणि "सुबाहूला राज्य दे" म्हणून त्यानें त्याला दूत पाठवून कळविलें १०. परंतु, तो स्वधर्मवेत्ता अलर्क आज्ञा समजून तें कबूल करण्याचें मनांत न आणितां काशिराजाला उद्देशून तो दूताला म्हणाला ११ "ज्येष्ठ भ्रात्यानें माझ्याकडे येऊन प्रेमपूर्वक राज्ययाचना करावी. आ।पल्यावर स्वारी होणार म्हणून भीतीनें मी अल्प देखील पृथ्वी देणार नाहीं १२. परंतु, वीर्य हेंच क्षत्रियाचें धन असून याचना हा क्षत्रियाचा धर्म नव्हे असें समजून

अनन्तरैश्च संश्लेषमभ्येत्य तदनन्तरम् । तेषामन्यतमैर्भूत्यैः समाक्रम्यानयद्वशम् १८ अपीड्यंश्च सामन्तांस्तस्य राष्ट्रोपरोधनैः । तथा दुर्गान्तपालांश्च चक्रे चाटविकान्वशे १६ कांश्चिच्चोपप्रदानेन कांश्चिद्भेदेन पार्थिवान् । साम्नैवान्यान्वशं निन्ये निभृतास्तस्य येऽभवन् १७ ततः सोऽल्पबलो राजा परचक्रावपीडितः । कोशक्षयमवापोच्चैः पुरं चावरुद्धतारिणा १८ इत्थं संपीड्यमानस्तु क्षीणकोशो दिने दिने । विषादमागात्परमं व्याकुलत्वं च चेतसः १९ आर्तिं स परमां प्राप्य तत्सस्मारांगुलीयकम् । यदुद्दिश्य पुरा प्राह माता तस्य मदालसा २० ततः स्नातः शुचिर्भूत्वा वाचयित्वा द्विजोत्तमान् । निकृष्य शासनं तस्माद्ददृशे प्रस्फुटाक्षरम् २१ तत्रैव लिखितं मात्रा वाचयामास पार्थिवः । प्रकाशपुलकांगोऽसौ प्रहर्षोत्फुल्ललोचनः २२ संगः सर्वात्मना त्याज्यः स चेत्त्यक्तुं न शक्यते । स सद्भिः सह कर्तव्यः सतां संगो हि भेषजम् २३ कामः सर्वात्मना हेयो हातुं चेच्छक्यते न सः । मुमुक्षां प्रति तत्कार्यं सैव तस्यापि भेषजम् २४ वाचयित्वा तु बहुशो नृणां श्रेयः कथं त्विति । मुमुक्षयेति निश्चित्य सा च तत्सङ्गतो यतः २५ ततः स साधुसम्पर्कं चिन्तयन्पृथिवीपतिः । दत्तात्रेयं

विवेकी सुबाहूनेंही याचना केली नाहीं १३. तेव्हां सर्व सैन्य बरोबर घेऊन काशिराज अलर्कराजाच्या राष्ट्रावर स्वारी करण्यास निघाला १४. प्रथम त्यानें जवळच्या मांडलिकांना फवटाळिलें आणि त्याचे कांहीं सेवक घेऊन त्यांच्या कडून त्यानें स्वारी करवून अलर्काला ताब्यांत आणिलें १५. मांडलिकांना पीडा न देता अलर्काच्या राष्ट्राला त्यानें वेढा दिला आणि त्याचे किल्ले व सरहद्दी राखणारे रानटी लोक त्यानें वश करून घेतले १६. अलर्काचे विश्वासु मित्र ह्मणून जे राजे होते त्यांपैकीं कांहीं लाचानें, कांहीं फंदफितुरीनें व कांहीं मधुर शब्दांनीं त्यानें वश करून घेतले १७. तेव्हां राजधानीला शत्रूचा वेढा पडून परचक्रानें पीडित झालेल्या व अल्पसैन्यानें युक्त असलेल्या त्या राजाचा खजिना अगदीं रिक्त झाला १८. ह्याप्रमाणें पीडा होत असतांना निर्धन बनलेला तो अलर्क प्रत्यहीं खिन्न होऊं लागला व त्याचें अंतःकरण व्याकुळ होऊं लागलें १९. एकदां पराकाष्ठेचें दुःख झालें असतां जिच्यासंबंधानें माता मदालसेनें पूर्वी सांगून ठेविलें होतें त्या अंगठीची अलर्काला आठवण झाली २०. तेव्हां स्नान करून व शुचि होऊन त्यानें ब्राह्मणांकडून स्वस्तिवाचन करविलें; स्पष्टाक्षरांनीं युक्त असलेलें आज्ञापत्र त्या अंगठींतून बाहेर काढून पाहिलें २१ आणि आनंदानें नेत्र विकसित होऊन शरीर रोमांचयुक्त झालें असतां मातेनें त्यांत लिहून ठेविलेलें, तो राजा पुढीलप्रमाणें वाचूं लागला २२. "संग सर्वस्वीं त्याज्य होय; तथापि तो सुटणें अशक्य असेल तर साधूंशीं करावा. कारण, साधुसंग हें औषध आहे २३. काम सर्वस्वीं त्याज्य होय; तथापि सुटणें अशक्य असल्यास मुमुक्षेसंबंधानें तो असूं द्यावा. कारण, मुक्तीची इच्छा हें कामाचेंही औषध आहे" २४. हें अनेक वेळां वाचून पुरुषांचें कल्याण कसें होईल ह्यासंबंधानें अलर्क विचार करूं लागला असतां "मोक्षाच्या इच्छेनें होईल" असा त्याचा निश्चय झाला. परंतु, मोक्षाची इच्छा साधुसमागमावर

महाभागमगच्छत्परमार्तिमान् २६ तं समेत्य महात्मानमकल्मषमसङ्गिनम्। प्रणिपत्याभिसंपूज्य यथान्यायमभाषत २७ प्रसन्कुरु प्रसादं मे शरण्यः शरणार्थिनाम् । दुःखापहारं कुरु मे दुःखार्तस्यातिकामिनः २८ दत्तात्रेय उवाच ॥ दुःखापहारमद्यैव करोमि तव पार्थिव । सत्यं ब्रूहि किमर्थं ते दुःखं तत्पृथिवीपते २९ कस्य त्वं कस्य वा दुःखं तत्पमेवं विचार्यताम् । अंगान्यंगी निरंगं च सर्वांगानि विचिन्तय ३० जड उवाच ॥ इत्युक्तश्चिन्तयामास स राजा तेन धीमता। त्रिविधस्यापि दुःखस्य स्थानमात्मानमेव च ३१ स विमृश्य चिरं राजा पुनः पुनरुदारधीः। आत्मानमात्मना धीरः प्रहस्येदमथाब्रवीत् ३२ नाहमुर्वी न सलिलं न ज्योतिरनिलो न च। नाकाशं किं तु शारीरं समेत्य छत्रमिष्यते ३३ न्यूनातिरिक्ततां याति पञ्चकेऽस्मिन्सुखासुखम् । यदि स्यान्मम किं न स्यादन्यस्थेऽपि हितं मयि ३४ नित्यप्रभूतसद्भावन्यूनाधिक्याच्ततोऽस्ते। तथा च ममता त्यक्ता विशेषो नोपलभ्यते ३५ तन्मात्रावस्थिते सूक्ष्मे तृतीयांशे च पश्यतः । तथैव भूतसद्भावं शारीरं किं सुखासुखम् ३६ मनस्यवस्थितं दुःखं सुखं वा मानसं च यत् । यतस्ततो न मे दुःखं सुखं वा

अवलंबून असल्यामुळें २९ अत्यंत खिन्न झालेला तो राजा साधुसमागमाविषयीं चिंतन करूं लागला आणि महाभाग्यवान् दत्तात्रेयांकडे गेला २६. निष्पाप व निःसंग अशा त्या महात्म्याकडे जाऊन त्यानें प्रणाम केला आणि आदरपूर्वक योग्यतेनुरूप त्यांना ह्मणाला २७ " हे ब्रह्मनिष्ठ, आपण माझ्यावर कृपा करा. शरण येणाऱ्याचें रक्षण करणारे आपण आहां. ह्यास्तव, अत्यंत कामी व दुःखाकुल असलेल्या माझ्या दुःखाचा आपण परिहार करा" २८. दत्तात्रेय ह्मणतातः— हे राजा, तुझें दुःख मी आजच दूर करितों. हे राजा, तुला कशाकरितां तें दुःख होत आहे हें तूं सत्य सांग २९. तूं कोणाचा ? व दुःख कोणाला होत आहे ? ह्याविषयीं तूं खरा खरा विचार कर आणि अंगें, अंगी, निरंग व सर्वांगें ह्यांचेंही तूं मनन कर ३०. जड ह्मणतोः—त्या ज्ञानी दत्तात्रेयांनीं असें सांगितलें असतां त्रिविध दुःखस्थानांविषयीं व स्वतःविषयीं तो राजा विचार करूं लागला ३१. तो प्राज्ञ व महाबुद्धिमान् अलर्क राजा एकसारखें पुनः पुनः मनामध्यें आपल्याविषयीं चिंतन केल्यावर हंसून ह्मणाला ३२. " पृथ्वी, उदक, तेज, वायु अथवा आकाश मी नाहीं; शरीराचें अवलंबन करून मी सुखाची इच्छा करणारा आहे ३३. ह्या पंचभूतसमुदायात्मक शरीरामध्यें सुखदुःख कमी अधिक होत असतें. परंतु, त्या शरीरांत असलेल्या मला जर तें होऊं लागेल तर काय होणार नाहीं ? ३४. नित्य जीं पंचमहाभूतें त्यांत कमी अधिक झाल्यामुळें कृश अथवा पुष्ट जें शरीर त्याचे ठिकाणीं असलेली ममत्वबुद्धि एकदां सोडिली ह्मणजे विशेष प्रकार कोठेंही उपलब्ध होत नाहीं ३५. पंचमहाभूतांचीं जीं तन्मात्रें ह्मणजे सूक्ष्म रूपें त्यांच्या ठिकाणीं असलेला जो विषयसमुदाय त्याचे ठिकाणींही जरी पाहूं गेलें तरी भूतांशिवाय तेथें दुसरें कांहीं एक दिसत नाहीं. सारांश, शरीररूप बनलेला जो भूतसमुदाय त्याला होणाऱ्या सुखदुःखांशीं माझा संबंध काय आहे ? ३६. सुख

न अहं मनः ३७ नाहङ्कारो न च मनो बुद्धिर्नाहं यतस्ततः। अन्तःकरणजं दुःखं पारक्यं मम तत्कथम् ३८ नाहं शरीरं न मनो यतोऽहं पृथक्छरीरान्मनसस्तथाहम्। ततस्तु चेतस्यथवापि देहे सुखानि दुःखानि च किं ममात्र ३९ राज्यस्य वाञ्छां कुरुतेऽग्रजोऽस्य देहस्य चैतत्पञ्चमयः स राशिः। गुणप्रवृत्त्या मम किं नु तत्र तत्स्थः स चाहं च शरीरतोऽन्यः ४० न यस्य हस्तादिकमप्यशेषं मांसं न चास्थीनि शिराविभागः। कस्तस्य नागाश्वरथादिकोशैः स्वल्पोपि संबन्ध इहास्ति पुंसः ४१ तस्मान्नमेऽरिर्न च मेऽस्ति दुःखं न मे सुखं नापि पुरं न कोशम्। न चाश्वनागादिबलं न तस्य नान्यस्य वा कस्यचिद्वा ममास्ति ४२ यथा घटीकुम्भकमण्डलुस्थमाकाशमेकं बहुधा हि दृष्टम्। तथा सुबाहुः स च काशिपोऽहं मन्ये च देहेषु शरीरभेदैः ४३ [ २२०४ ] इति श्रीमार्कण्डेयपुराणे पितापुत्रसंवादे आत्मविवेको नाम चतुस्त्रिंशोऽध्यायः ॥ ३४ ॥

जड उवाच ॥ दत्तात्रेयं ततो विप्रं प्रणिपत्य स पार्थिवः। प्रत्युवाच महात्मानं प्रश्रयावनतो वचः १ सम्यक्प्रपश्यतो ब्रह्मन्मम दुःखं न किंचन। असम्यग्दर्शिनो मग्नाः सर्वे दैवार्णवे २ यस्मिन्यस्मिन्ममत्वेन बुद्धिः पुंसः प्रजायते। ततस्ततः समादाय दुःखा-

---

अथवा दुःख हें मानसिक असणार व त्यांचा संबंध मनाशीं असणार. परंतु, मी मन नसल्यामुळें त्या सुखाचा अथवा दुःखाचा संबंध माझ्याशीं नाहीं ३७. मन, बुद्धि अथवा अहंकार जर मी नाहीं तर अंतःकरणजन्य आणि ह्मणूनच परकीय जें दुःख तें मला होईल कसें ? ३८. मी शरीर अथवा मन नसून शरीराहून व मनाहून भिन्न आहें; तेव्हां सुखदुःखें शरीरांत असलीं किंवा मनांत असलीं तरी त्यांचा संबंध माझ्याशीं काय आहे ? ३९. ह्या देहाचा जो ज्येष्ट बंधु तो राज्याची इच्छा करीत आहे; परंतु, तोही पंचभूतात्मकच ढीग आहे. तेव्हां गौण अर्थानें त्या भूतसमुदायाचे ठिकाणीं ममत्वबुद्धि धारण करून मला उपयोग काय आहे ? तो व मी असे उभयतांही भूतमय राशींचे ठिकाणीं असून उभयतांही शरीरांहून भिन्न आहों ४०. हस्तादिक अवयवांपैकीं ज्याचें कांहीं एक नाहीं आणि त्या अवयवांत असलेल्या मांसाशीं, अस्थीशीं अथवा भिन्न भिन्न शिरांशीं ज्याचा संबंध नाहीं त्या पुरुषाचा गज, अश्व, रथ इत्यादि कोशांशीं अल्प तरी संबंध असणार कोठून ? ४१ तस्मात्, शत्रु, दुःख, सुख, नगर, खजिना व गजाश्वादि सैन्य ह्यांपैकीं मला कांहीं एक नाहीं; त्याचप्रमाणें त्या सुबाहूलाही नाहीं व दुसऱ्याही कोणाला नाहीं ४२. घागर, डेरा, कमंडलु ह्यांत असलेलें एकच आकाश ज्याप्रमाणें अनेक प्रकारांनीं दिसतें त्याप्रमाणें सुबाहु, काशिराज व मी देहांचे ठिकाणीं वस्तुतः एकच असून शरीरभेदामुळें भिन्न भिन्न भासत आहों ४३. ( २२०४ ) ह्याप्रमाणें श्रीमार्कंडेयपुराणांतील आत्मविवेकनामक चौतिसावा अध्याय समाप्त झाला ॥ ३४ ॥

जड ह्मणतोः—नंतर विनयानें नम्र झालेला तो राजा महात्म्या विप्र दत्तात्रेयाला प्रणिपात करून ह्मणाला १ "हे ब्रह्मन्, मी विचार करूं लागलों असतां मला

ऽयेव प्रयच्छति ३ मार्जारभक्षिते दुःखं यादृशं गृहकुक्कुटे। न तादृङ्ममताशून्ये कलविङ्केऽथ मूषिके ४ सोऽहं न दुःखी न सुखी यतोऽहं प्रकृतेः परः। यो भूताभिभवो भूतैः सुखदुःखात्मको हि सः ५ दत्तात्रेय उवाच ॥ एवमेतन्नरव्याघ्र यथैतद्व्याहृतं त्वया। ममेति मूलं दुःखस्य न ममेति च निर्वृतिः ६ मत्प्रसादेव ते ज्ञानमुत्पन्नमिदमुत्तमम्। ममेति प्रत्ययो येन क्षिप्तः शाल्मलितूलवत् ७ अहमित्यंकुरोत्पन्नो ममेति स्कन्धवान्महान्। गृहक्षेत्रोच्चशाखश्च पुत्रदारादिपल्लवः ८ धनधान्यमहापत्रो नैककालप्रवर्धितः। पुण्यापुण्याग्रपुष्पश्च सुखदुःखमहाफलः ९ अपवर्गपथव्यापी मूढसम्पर्कसेचनः। विधित्साभृङ्गमालाढ्योऽकृत्यज्ञानमहातरुः १० संसाराध्वपरिश्रान्ता ये तच्छायां समाश्रिताः। भ्रान्तिज्ञानसुखाधीनास्तेषामात्यन्तिकं कुतः ११ यैस्तु सत्सङ्गपाषाणशितेन ममतातरुः। छिन्नो विद्याकुठारेण ते गतास्तेन वर्त्मना १२ प्राप्य ब्रह्मवनं शीतं नीरजस्कमकण्टकम्। प्राप्नुवन्ति परां प्राज्ञा निर्वृतिं वृत्तिवर्जिताः १३ भूतेन्द्रियमयं स्थूलं न त्वं राजन्नचाप्यहम्। न तन्मात्रं मया वाच्यं नैवान्तःकरणात्मकौ १४ कं वा पश्यामि राजेन्द्र प्रधानमिदमावयोः। यतः

काहींएक दुःख नाहीं; दुःखसागरांत सर्वदां अविचारीच मग्न झालेले आहेत २. ज्या ज्या ठिकाणीं पुरुषाची ममत्वबुद्धि होते त्या त्या ठिकाणापासून ती पुरुषाला दुःखच देते ३. घरांतील कोंबडें मांजरानें मारिल्यास जसें दुःख होतें तसें ममत्वबुद्धिरहित चिमणी अथवा उंदीर मांजरानें मारिल्यास होत नाहीं ४. मी प्रकृतीहून पर असल्यामुळें दुःखी नाहीं व सुखीही नाहीं; जो भूतांच्या कचाट्यांत सांपडलेला असतो झणजे पंचभूतात्मक शरीराचे ठिकाणीं जो ममत्वबुद्धि धारण करीत असतो तो सुखदुःखात्मकच असतो ५. दत्तात्रेय झणतातः— हे पुरुषश्रेष्ठा, हें तुझ्या ह्मणण्याप्रमाणेंच आहे. माझें ही बुद्धि दुःखाचें मूळ असून त्या बुद्धीचा अभाव हें सुख होय ६. माझ्या प्रसादामुळेंच तुला हें उत्कृष्ट ज्ञान प्राप्त झालें आहे व त्यानें सुयरीच्या कापसाप्रमाणें ममत्वबुद्धि उडवून टाकिली आहे ७. मी ह्या अंकुरापासून अज्ञानरूप महावृक्ष उत्पन्न झालेला आहे. माझें हें खोड; घर व शेत ह्या मोठ्या मोठ्या शाखा; पुत्र, स्त्री इत्यादि पल्लव ८; धन व धान्य हीं मोठीं मोठीं पानें; पुण्यपाप हीं पुष्पें व सुखदुःख हीं फळें असून अनेक काळपर्यंत तो वृद्धिंगत झालेला आहे; मोक्षमार्ग त्यानें अडवून धरिला आहे; मूढसंपर्करूप उदक त्याला मिळत आहे; आणि कर्तव्यबुद्धिरूप भृंगसमुदायांनीं तो भरलेला आहे ९,१०. संसाररूप प्रवासानें श्रांत होऊन जे, भ्रांतिमूलक ज्ञान व सुख ह्यांच्या अधीन झाल्यामुळें त्याच्या छायेचा आश्रय करितात त्यांना मोक्ष होणार कोठून ?११. सत्संगरूप निसण्यावर धार लाविलेल्या ज्ञानरूप कुऱ्हाडीनें ज्यांनीं तो ममत्वरूप वृक्ष तोडून टाकिला आहे ते त्या मोक्षमार्गाला लागलेले आहेत १२; आणि ममत्वबुद्धिरहित असलेल्या त्याच प्राज्ञ लोकांना रज व कांटे ह्यांनीं शून्य असलेलें शीतळ ब्रह्मवन प्राप्त झाल्यावर उत्कृष्ट सुख होत असतें १३. हे राजा, भूतें व इंद्रियें ह्यांच्या समुदायरूप असलेलें हें स्थूळ शरीर ह्मणजे तूं नव्हेस व मीही नव्हे. त्याचप्रमाणें

परो हि क्षेत्रज्ञसंघातो हि गुणात्मकः १९ मशकोदुम्बरेषीकामुञ्जमत्स्याम्भसां यथा । एकत्वेऽपि पृथग्भावस्तथा क्षेत्रात्मनोर्नृप १६ अलर्क उवाच ॥ भगवंस्त्वत्प्रसादेन ममाविर्भूतमुत्तमम् । ज्ञानं प्रधानचिच्छक्तिविवेककरमीदृशम् १७ किं त्वत्र विषयाक्रान्ते स्थैर्यं वस्त्वं न चेतसि । न चापि वेद्मि मुच्येयं कथं प्रकृतिबन्धनात् १८ कथं न भूयां भूयश्च कथं निर्गुणतामियाम् । कथं च ब्रह्मणैकत्वं व्रजेयं शाश्वतेन वै १९ तन्मे योगं तथा ब्रह्मन्प्रणतायाभियाचते । सम्यग्ब्रूहि महाप्राज्ञ सत्सङ्गो ह्युपकृन्नृणाम् २० [ २३२४ ] इति श्रीमार्कण्डेयपुराणे दत्तात्रेयालर्कसंवादे पञ्चत्रिंशोऽध्यायः ॥ ३५ ॥

दत्तात्रेय उवाच ॥ ज्ञानपूर्वो वियोगो योऽज्ञानेन सह योगिनः । सा मुक्तिर्ब्रह्मणा चैक्यमनैक्यं प्राकृतैर्गुणैः १ योगे च शक्तिर्विदुषां येन श्रेयः परं भवेत् । मुक्तिर्योगात्तथा योगः सम्यग्ज्ञानान्महीपते । संगदोषोद्भवं दुःखं ममत्वासक्तचेतसाम् २ तस्मात्सङ्गं प्रयत्नेन मुमुक्षुः संत्यजेन्नरः । सङ्गाभावे ममेत्यस्याः ख्यातेर्हानिः प्रजायते ३ निर्ममत्वं सुखायैव वैराग्याद्दोषदर्शनम् । ज्ञानादेव च वैराग्यं ज्ञानं वैराग्यपूर्वकम् ४ तद्गृहं यत्र वसतिस्तद्भोज्यं येन जीवति । यन्मुक्तये तदेवोक्तं ज्ञानमज्ञानमन्यथा ६ उपभोगेन पुण्यानामपुण्यानां च पार्थिव । कर्तव्य-

---

भूततन्मात्रांचे ठिकाणींही मी ही बुद्धि असणें उपयोगी नाहीं व आपण अंतःकरणरूपही नाहीं १४. हे राजेंद्रा, गुणात्मक क्षेत्रज्ञसमुदाय ज्याअर्थी मायेहून वेगळा आहे त्याअर्थी मी श्रेष्ठ कोणाला पाहूं ? शरीराचे ठिकाणीं ममत्वबुद्धि ही आपली माया आहे १५. उंबर, लव्हाळा, मोळ, मत्स्य व उदक ह्यांचें भूतरूपानें वस्तुतः ऐक्य असूनही भिन्नत्व आहे. त्याचप्रमाणें क्षेत्र व आत्मा ह्यांची गोष्ट आहे १६. अलर्क ह्मणतोः—हे भगवन्, प्रधान व चिच्छक्ति ह्यांची निवड करणारें अशाप्रकारचें ज्ञान मला आपल्या प्रसादानें प्राप्त झालें आहे १७. परंतु, विषयाक्रांत मन स्थिर नाहीं व प्रकृतिबंधनापासून मुक्तता कशी होईल हें मला कळत नाहीं १८. पुनरपि, मी जन्मास कसा येणार नाहीं ? निर्गुण कसा होईन ? आणि शाश्वत ब्रह्माशीं एकरूप कसा होईन ? १९ हें, हे ब्रह्मन्, नम्र होऊन याचना करीत असलेल्या मला आपण नीट सांगा. हे महाप्राज्ञ, सत्संग हा मनुष्यावर उपकार करणारा आहे २०. (२३२४) ह्याप्रमाणें श्रीमार्कंडेयपुराणांतर्गत दत्तात्रेय व अलर्क ह्यांच्या संवादाविषयीं पसतिसावा अध्याय समाप्त झाला ॥ ३५ ॥

दत्तात्रेय ह्मणतोः—योग्याला ज्ञान प्राप्त होऊन अज्ञानाचा वियोग होणें हीच मुक्ति; ह्मणजे ब्रह्माशीं ऐक्य व प्रकृतिगुणाशीं भिन्नता होय १. परमकल्याणकारक सामर्थ्य व मुक्ति विद्वानांना योगानें प्राप्त होत असते. हे भूपते, योग ज्ञानानें प्राप्त होत असतो आणि ममत्वबुद्धि ज्यांच्या अंतःकरणांत खिळून गेलेली आहे त्यांना संगदोषजन्य दुःख होत असतें २. तस्मात्, मुमुक्षु पुरुषानें संग प्रयत्नानें सोडावा; संग नष्ट झाल्यास ममत्वबुद्धि नाहींशी होते ३; व त्यामुळें सुख होतें. वैराग्यामुळें दोष दिसूं लागतात; ज्ञानामुळेंच वैराग्य प्राप्त होतें; वैराग्ययुक्त असेल तेंच ज्ञान होय ४. जेथें वास्तव्य होईल तें घर, ज्यानें जीव जगेल तें अन्न आणि ज्यानें मुक्ति मिळेल तेंच ज्ञान व इतर

मिति निष्कामकर्मकरणात्तथा ६ असंचयादपूर्वस्य क्षयात्पूर्वार्जितस्य च। कर्मणो मोक्षमाप्नोति न शरीरं पुनः पुनः ७ कर्मणा बन्धमाप्नोति वैपरीत्येन तस्य तु ८ एतत्ते कथितं ज्ञानं योगं चेमं निबोध मे। यं प्राप्य ब्रह्मणो योगी शाश्वतान्नान्यतां व्रजेत् ९ प्रागेवात्मात्मना जेयो योगिनां स हि दुर्जयः। कुर्वीत तज्जये यत्नं तस्योपायं शृणुष्व मे १० प्राणायामैर्दहेद्दोषान्धारणाभिश्च किल्बिषम्। प्रत्याहारेण विषयान्ध्यानेनानीश्वरान्गुणान् ११ यथा पर्वतधातूनां ध्मातानां दह्यते मलम्। तथेन्द्रियकृता दोषा दह्यन्ते प्राणनिग्रहात् १२ प्रथमं साधनं कुर्यात्प्राणायामस्य योगवित्। प्राणापाननिरोधस्तु प्राणायाम उदाहृतः १३ लघुमध्योत्तरीयाख्यः प्राणायामस्त्रिधोदितः। तस्य प्रमाणं वक्ष्यामि तदलर्क शृणुष्व मे १४ लघुर्द्वादशमात्रस्तु द्विगुणः स तु मध्यमः। त्रिगुणाभिस्तु मात्राभिरुत्तमः परिकीर्तितः १५ निमेषोन्मेषणे मात्रा कालो लघ्वक्षरस्तथा। प्राणायामस्य संख्यार्थं स्मृतो द्वादशमात्रिकः १६ प्रथमेन जयेत्स्वेदं मध्यमेन च वेपथुम्। विषादं हि तृतीयेन जयेद्दोषाननुक्रमात् १७ मृदुत्वं सेव्यमानास्तु सिंहशार्दूलकुञ्जराः। यथा यान्ति तथा प्राणो वश्यो भवति योगिनः १८ वश्यं मत्तं यथेच्छातो नागं नयति हस्तिपः। तथैव योगी छन्देन प्राणं नयति साधितम् १९ यथा हि साधितः सिंहो मृगान्हन्ति न मानवान्। तद्वन्निरुद्धः

अज्ञान ९. हे राजा, पुण्यपापांच्या उपभोगानें नित्य कर्मे कर्तव्यबुद्धीनें निष्काम केल्यानें ६, पूर्वार्जित कर्माचा उपभोगानें क्षय केल्यानें आणि नूतन कर्माचा संचय न केल्यानें कर्मापासून मोक्ष प्राप्त होतो व वारंवार शरीर प्राप्त होत नाहीं ७. ह्याच्या उलट वागलें असतां बंधन प्राप्त होतें ८. हें तुला ज्ञान कथन केलें. आतां ज्याचें अवलंबन केलें असतां योगी शाश्वत ब्रह्माप्रत जाऊन मिळतो तो हा योग तूं श्रवण कर ९. प्रथम योग्यांनीं आपलें मन जिंकिलें पाहिजे. कारण, तें पराजित होणें दुर्घट आहे; ह्मणून तें जिंकण्याचा यत्न केला पाहिजे. त्याविषयीं यत्न तूं माझ्यापासून ऐक १०. प्राणायामाच्या योगानें दोष दग्ध करावे; धारणांच्या योगानें पातक जाळून टाकावें; प्रत्याहारानें विषयांचा नायनाट करावा आणि ध्यानाच्या योगानें अनीश्वर गुणांचा नाश करावा ११. पर्वतासंबंधीं धातु तावून काढिले असतां ज्याप्रमाणें निर्मल होतात त्याप्रमाणें प्राणायामानें इंद्रियकृत दोष दग्ध होऊन जातात १२. ह्यास्तव, योगवेत्त्यानें प्रथमतः प्राणायाम सिद्ध करावा. प्राणायाम ह्मणजे प्राण व अपान ह्यांचा निरोध १३. लघु, मध्य व उत्तरीय असा तीन प्रकारचा प्राणायाम आहे. हे अलर्का, त्याचें प्रमाण मी सांगतों तें तूं ऐक १४. बारा, चोवीस व छत्तीस ह्या मात्रांनीं अनुक्रमें लघु, मध्यम व उत्तम प्राणायाम होतो १५. पापण्या मिटून उघडण्याला लागणारा किंवा लघु अक्षर उच्चारण्यास लागणारा जो काळ तो मात्राकाळ होय. ह्या बारा मात्रा ह्मणजे प्राणायामाचा काल होय १६. लघु, मध्यम व उत्तम प्राणायामानें अनुक्रमें खेद, कंप व विषाद हे दोष जिंकावे १७. शुश्रूषेच्या योगानें ज्याप्रमाणें सिंह, व्याघ्र व गज मृदु होतात त्याचप्रमाणें योग्याला प्राण वश्य होतो १८. माहूत ज्याप्रमाणें मत्त,

पवनः किल्बिषं न नृणां तनुम् २० तस्माद्युक्तः सदा योगी प्राणायामपरो भवेत्। श्रूयतां मुक्तिफलदं तस्यावस्थाचतुष्टयम् २१ ध्वस्तिः प्राप्तिस्तथा संवित्प्रसादश्च महीपते। स्वरूपं शृणु चैतेषां कथ्यमानमनुक्रमात् २२ कर्मणामिष्टदुष्टानां जायते फलसंक्षयः । चेतसोऽप- कषायत्वं यत्र सा ध्वस्तिरुच्यते २३ ऐहिकामुष्मिकान्कामाँल्लोभमोहात्मकान्स्वयम्। निरु- ध्यास्ते सदा योगी प्राप्तिः सा सार्वकालिकी २४ अतीतानागतानर्थान्विप्रकृष्टतिरोहि- तान्। विजानातीन्दुसूर्यर्क्षग्रहाणां ज्ञानसम्पदा २५ तुल्यप्रभावस्तु यदा योगी प्राप्नोति संविदम्। तदा संविदिति ख्याता प्राणायामस्य सा स्थितिः २६ यान्ति प्रसादं येनास्य मनः पञ्च च वायवः। इन्द्रियाणीन्द्रियार्थाश्च स प्रसाद इति स्मृतः २७ शृणुष्व च मही- पाल प्राणायामस्य लक्षणम्। युञ्जतश्च सदा योगं यादृग्विहितमासनम् २८ पद्मर्धासनं चापि तथा स्वस्तिकमासनम्। आस्थाय योगं युञ्जीत कृत्वा च प्रणवं हृदि २९ समः समा- सनो भूत्वा संहृत्य चरणावुभौ। संवृतास्यस्तथैवोरू सम्यग्विष्टभ्य चाग्रतः ३० पार्ष्णिभ्यां लिङ्गवृषणावस्पृशन्प्रयतः स्थितः। किंचिदुन्नामितशिरा दन्तैर्दन्तान्न संस्पृशेत् ३१ संप- श्यन्नासिकाग्रं स्वं दिशश्चानवलोकयन्। रजसा तमसो वृत्तिं सत्त्वेन रजसस्तथा ३२ सं- छाद्य निर्मले सत्त्वे स्थितो युञ्जीत योगवित्। इन्द्रियाणीन्द्रियार्थेभ्यः प्राणादीन्मन एव

गज इच्छेनुसार ताब्यांत आणितो त्याचप्रमाणें योगी इच्छेनुसार प्राणवायु ताब्यांत आणितो १९. वश करून घेतलेला सिंह ज्याप्रमाणें मानवांचा वध न करितां मृगांचा वध करितो त्याचप्रमाणें निरुद्ध केलेला प्राण मनुष्यदेह दग्ध न करितां पातक दग्ध करितो २०. तस्मात्, योग्यानें सर्वदा प्राणायाम करीत जावें. आतां मोक्षरूप फल देणाऱ्या चार अवस्था तूं ऐक २१. हे भूपते, ध्वस्ति, प्राप्ति, संविद् व प्रसाद ह्या चार अवस्था होत. ह्यांचें स्वरूप तूं अनुक्रमानें ऐक २२. इष्ट व अनिष्ट कर्मांच्या फलाचा क्षय होऊन चित्त निर्मळ होणें ही ध्वस्ति होय २३. ऐहिक व पारलौकिक अशा लोभमोहात्मक भोगांविषयीं योग्यानें सर्वदा निरिच्छ असणें ही सार्वकालिक प्राप्ति होय २४. चंद्र, सूर्य, नक्षत्रें व ग्रह ह्यांसंबंधानें मागल्या, पुढल्या, दूरच्या व अदृश्य गोष्टी—जेव्हां योगसाम- र्थ्यानें संपन्न झालेला योगी—ज्ञानसंपत्तीनें जाणूं लागतो म्हणजे जेव्हां त्याला अतींद्रिय- ज्ञान प्राप्त होतें, तेव्हां प्राणायामाची संविद् ही अवस्था प्राप्त झाली असें समजावें २५, २६. मन, पांच वायु, इंद्रियें व विषय हीं ज्याच्या योगानें प्रसन्न होतात तो प्रसाद होय २७. हे भूपते, योगावलंबन करणाऱ्या पुरुषानें आसन कसें घालावें हें आणि प्राणाया- माचें लक्षण तूं श्रवण कर २८. मनामध्यें प्रणवाचा जप करीत करीत पद्मासन, अर्धासन अथवा स्वस्तिकासन घालून योगसाधन करावें २९. दोन्हीं पाय आखडून व आसन बरोबर घालून समदृष्टि योग्यानें तोंड मिटावें. त्याचप्रमाणें मांड्या पार्ष्णींच्या योगानें पुढून व्यापून लिंग व वृषण ह्यांना स्पर्श न करितां मनोनिग्रह करून रहावें. मस्तक किंचित् वर करावें; दातांनीं दातांना स्पर्श करूं नये ३०, ३१; दिशांकडे न पाहतां नासिकाग्रीं दृष्टि द्यावी. रजोगुणानें तमोवृत्ति व सत्त्वगुणानें रजोवृत्ति ३२ आच्छा-

च ३३ निगृह्य समवायेन प्रत्याहारमुपक्रमेत् । यस्तु प्रत्याहरेत्कामान्सर्वाङ्गानीव कच्छपः ३४ सदात्मरतिरेकस्थः पश्यत्यात्मानमात्मनि । स बाह्याभ्यन्तरं शौचं निष्पाद्याकण्ठनाभितः ३५ पूरयित्वा बुधो देहं प्रत्याहारमुपक्रमेत् । प्राणायामा दश द्वौ च धारणा साभिधीयते ३६ द्वे धारणे स्मृते योगे योगिभिस्तत्त्वदृष्टिभिः । तथा वै योगयुक्तस्य योगिनो नियतात्मनः ३७ सर्वे दोषाः प्रणश्यन्ति स्वस्थश्चैवोपजायते । वीक्षते च परं ब्रह्म प्राकृतांश्च गुणान्पृथक् ३८ व्योमादिपरमाणूंश्च तथात्मानमकल्मषम् । इत्थं योगी यताहारः प्राणायामपरायणः ३९ जितां जितां शनैर्भूमिमारोहेत यथा गृहम् । दोषान्व्याधींस्तथा मोहमाक्रान्ता भूरनिर्जिता ४० विवर्धयति नारोहेत्तस्माद्भूमिमनिर्जिताम् । प्राणानामुपसंरोधात्प्राणायाम इति स्मृतः ४१ धारणेत्युच्यते चेयं धार्यते यन्मनो यया । शब्दादिभ्यः प्रवृत्तानि यदक्षाणि यतात्मभिः ४२ प्रत्याह्रियन्ते योगेन प्रत्याहारस्ततः स्मृतः । उपायश्चात्र कथितो योगिभिः परमर्षिभिः ४३ येन व्याध्यादयो दोषा न जायन्ते हि योगिनः । यथा तोयार्थिनस्तोयं यन्त्रनालादिभिः शनैः ४४ आपिबेयुस्तथा वायुं पिबेद्योगी जितश्रमः । प्राङ्नाभ्यां हृदये चाथ तृतीये च तथोरसि ४५ कण्ठे मुखे नासिकाग्रे नेत्रभ्रूमध्यमूर्धसु । किंच तस्मा-

दित करून योग्यानें निर्मल सत्वगुणावलंबी होऊन योगाभ्यास करावा. विषयांपासून इंद्रियें परावृत्त करून आणि इंद्रियांचा व मनाचा ३३ निग्रह करून प्रत्याहाराचा उपक्रम करावा. कांसव ज्याप्रमाणें सर्व अवयव आंखडून घेतें त्याप्रमाणें जो योगी सर्व काम आवरून घेईल३४ व सर्वदां आत्म्याविषयींच दक्ष राहून जो स्वतःचे ठिकाणीं आत्म्याला अवलोकन करूं लागेल त्या ज्ञानी पुरुषानें बाह्य व आभ्यंतर शौच संपादन करून कंठापासून नाभीपर्यंत देह भरून काढून प्रत्याहाराचा उपक्रम करावा. बारा प्राणायाम ह्मणजे धारणा ३५, ३६. तत्त्वज्ञानी योग्यांनीं योगाला दोन धारणा अवश्य सांगितल्या आहेत; त्याचप्रमाणें योगावलंबी व जितेंद्रिय योग्याचे ३७ सर्व दोष नाहींसे होऊन त्याला स्वस्थता प्राप्त होते; तो परब्रह्म, भिन्न भिन्न प्रकृतिगुण, आकाशादि भूतांचे परमाणु व निर्मल आत्मा अवलोकन करूं लागतो. ह्याप्रमाणें प्राणायामनिष्ठ व नियमित आहार करणारा योगी ३८, ३९ घराप्रमाणें हळूं हळूं स्वाधीन झालेल्या भूमिकेवर आरूढ होऊं लागतो. भूमिका स्वाधीन झाल्याशिवाय तिचें एकसारखें अवलंबन केलें असतां दोष, व्याधि व मोह ह्यांची ४० वृद्धि होते. तस्मात्, जी भूमिका स्वाधीन झालेली नाहीं तिच्यावर आरूढ होऊं नये. प्राणांच्या उपरोधानें प्राणायाम होत असतो ४१. जिच्या योगानें मन निश्चल ठेविलें जातें ती धारणा होय. जितेंद्रिय योगी प्रवृत्त झालेलीं इंद्रियें ज्याच्या योगानें शब्दादि विषयांपासून परावृत्त करितात ४२ त्याला प्रत्याहार असें ह्मणतात. योगी महर्षीनीं हा उपाय कथन केलेला आहे ४३. ह्याच्या योगानें योग्याला व्याध्यादि दोष प्राप्त होत नाहींत. उदकार्थी लोक ज्याप्रमाणें यंत्र, नाल इत्यादिकांनीं हळूं हळूं उदक ४४ सेवन करीत असतात त्याचप्रमाणें श्रांत न होणाऱ्या योग्यानें वायूचें पान करावें. प्रथम नाभीचे

त्पर्यस्मिंश्च धारणा परमा स्मृता ४६ दशैता धारणाः प्राप्य प्राप्नोत्यक्षरसाम्यताम् । नाध्मातः क्षुधितः श्रान्तो न च व्याकुलचेतनः ४७ युञ्जीत योगं राजेन्द्र योगी सिद्ध्यर्थमादृतः । नातिशीते न चोष्णे वै न द्वन्द्वे नानिलात्मके ४८ कालेष्वेतेषु युञ्जीत न योगं ध्यानतत्परः । स शब्दाग्निजलाभ्यासे जीर्णगोष्ठे चतुष्पथे ४९ शुष्कपर्णचये नद्यां श्मशाने ससरीसृपे । सभये कूपतीरे वा चैत्यवल्मीकसंचये ५० देशेष्वेतेषु तत्त्वज्ञो योगाभ्यासं विवर्जयेत् । सत्त्वस्यानुपपत्तौ च देशकालं विवर्जयेत् ५१ नासतो दर्शनं योगे तस्मात्तत्परिवर्जयेत् । दोषानेताननादृत्य मूढत्वाद्यो युनक्ति वै ५२ विघ्नाय तस्य वै दोषा जायन्ते तन्निबोध मे । बाधिर्यं जडता लोपः स्मृतेर्मूकत्वमन्धता ५३ ज्वरश्च जायते सद्यस्तत्तदज्ञानयोगिनः । प्रमादाद्योगिनो दोषा यद्येते स्युश्चिकित्सितम् ५४ तेषां नाशाय कर्तव्यं योगिनां तन्निबोध मे । स्निग्धां यवागूमत्युष्णां भुक्त्वा तत्रैव धारयेत् ५५ वातगुल्मप्रशान्त्यर्थमुदावर्ते तथोदरे । यवागूं वापि पवनं वायुग्रन्थि प्रतिक्षिपेत् ५६ तद्वत्कम्पे महाशैलं स्थिरं मनसि धारयेत् । विघाते वचसो वाचं बाधिर्ये श्रवणेन्द्रियम् ५७ यथैवाम्रफलं ध्यायेत्तृष्णार्तो रसनेन्द्रियम् । यस्मिन्यस्मिन्रुजा देहे तस्मिंस्तदुपकारिणीम् ५८ धारये-

---

ठिकाणीं आणि नंतर अनुक्रमें हृदय, वक्षस्थल ४५, कंठ, मुख, नासिकाग्र, नेत्र, भ्रूमध्य व मस्तक आणि त्याच्याही पलीकडे वायूचें संयमन करावें. ही उत्कृष्ट धारणा होय ४६. ह्या दहा धारणा प्राप्त झाल्या असतां ब्रह्मसाम्य प्राप्त होतें. हे राजेंद्रा, सिद्ध्यर्थ दक्ष असलेल्या योग्यानें पोट फुगल्यावर, इंद्रियें स्वस्थ नसतांना, क्षुधित असतांना व श्रम झाल्यावर योगाभ्यास करूं नये. त्याचप्रमाणें अतिशीत, अत्युष्ण, द्वंद्व आणि वायुरूप ४७,४८ ह्या काळांच्या ठिकाणीं ध्याननिष्ठ पुरुषानें योगावलंबन करूं नये. त्याचप्रमाणें सशब्द अग्नि व उदक ह्यांचे संनिध, जीर्ण गोठा, चतुष्पथ ४९, शुष्क पानांचा ढीग, नदी, स्मशान, सर्पयुक्त अथवा भययुक्त स्थान, कूपतीर, चैत्यवृक्ष व वारूळ ५० ह्या ठिकाणीं तत्त्ववेत्त्यानें योगाभ्यास करूं नये. मन स्थिर होत नसल्यामुळें आणि ज्या ठिकाणीं व ज्या वेळीं मनाची एकाग्रता होत नसेल तो प्रदेश व तो काळ वर्ज्य करावा ५१. योगाला अनिष्टदर्शन घातुक असल्यामुळें तें वर्ज्य करावें. ह्या दोषांची उपेक्षा करून जो मूढपणानें योगाभ्यास करूं लागतो ५२ त्याला कोणते दोष विघ्न आणितात ते ऐक. बाधिर्य, जडता, स्मृतिभ्रंश, मूकत्व, आंध्य ५३ व ज्वर हे दोष तत्क्षणीं अज्ञानामुळें होऊं लागतात. योग्याच्या प्रमादामुळें जर हे दोष झाले तर ते नाहींसे करण्याकरितां योग्यांनीं काय चिकित्सा करावी ती ऐक. स्निग्ध व अत्युष्ण यवागू सेवन करून ५४, ५५ वातगुल्मशांत्यर्थ तेथेंच धारणा करावी. उदावर्त अथवा उदररोग झाल्यास वायुग्रंथीपाशीं यवागू अथवा वायु धारण करावा ५६. त्याचप्रमाणें कंप होऊं लागल्यास मनामध्यें प्रचंड पर्वत स्थिरपणें धारण करून रहावें. मूकत्व आल्यास वाणीचें, बाधिर्य ग्रस्त झाल्यास श्रवणेंद्रियाचें ५७ आणि तृषाक्रांत झाल्यास रसनेंद्रियाचें चिंतन करावें. ज्याप्रमाणें आम्रफलेच्छु पुरुष आम्रफलाचें चिंतन करीत असतो त्याच-

धारणामुष्णे शीतां शीते च दाहिनीम्। कीलं शिरसि संस्थाप्य काष्ठं काष्ठेन ताडयेत् ५९ लुप्तस्मृतेः स्मृतिः सद्यो योगिनस्तेन जायते । द्यावापृथिव्यौ वाय्वग्नी व्यापिनावपि धारयेत् ६० अमानुषात्सत्त्वजाद्वा बाधास्त्विति चिकित्सितम् । अमानुषं सत्त्वमन्तर्योगिनं प्रविशेद्यदि ६१ वाय्वग्निधारणेनैनं देहसंस्थं विनिर्दहेत्। एवं सर्वात्मना रक्षा कार्या योगविदा नृप ६२ धर्मार्थकाममोक्षाणां शरीरं साधनं यतः। प्रवृत्तिलक्षणाख्यानाद्योगिनो विस्मयात्तथा। विज्ञानं विलयं याति तस्माद्गोप्याः प्रवृत्तयः ६३ अलौल्यमारोग्यमनिष्ठुरत्वं गन्धः शुभो मूत्रपुरीषमल्पम्। कान्तिः प्रसादः स्वरसौम्यता च योगप्रवृत्तेः प्रथमं हि चिह्नम् ६४ अनुरागं जनो याति परोक्षे गुणकीर्तनम्। न बिभ्यति च सत्त्वानि सिद्धेर्लक्षणमुत्तमम् ६५ शीतोष्णादिभिरत्युग्रैर्यस्य बाधा न विद्यते। न भीतिमेति चान्येभ्यस्तस्य सिद्धिरुपस्थिता ६६ [ २३९० ] इति श्रीमार्कण्डेयपुराणे जडोपाख्याने योगनिरूपणं नाम षट्त्रिंशोऽध्यायः ॥ ३६ ॥

दत्तात्रेय उवाच ॥ उपसर्गाः प्रवर्तन्ते दृष्टे ह्यात्मनि योगिनः। ये तांस्ते संप्रवक्ष्यामि समासेन निबोध मे १ काम्याः क्रियास्तथा कामान्मानुषानभिवाञ्छति। स्त्रियो दानफलं विद्यां मायां कुप्यं धनं दिवम् २ देवत्वममरेशत्वं रसायनवयःक्रियाम्। मरुत्प्रपतनं यज्ञ

---

प्रमाणें जें जें इंद्रिय पीडेनें विकृत होईल तें तें निर्विकार करण्याकरितां त्याला उपयोगी पडणारी भावना मनामध्यें करावी ५८. उष्ण झाल्यास मनामध्यें शैत्याचें व शैत्य झाल्यास उष्णतेचें चिंतन करावें. मस्तकावर एक खिळा ठेवून काष्ठानें काष्ठावर मारावें ५९; ह्मणजे स्मृतिभ्रंश झालेल्या योग्याला तत्क्षणीं स्मृति प्राप्त होते. अमानुष प्राण्यापासून बाधा होऊं लागल्यास स्वर्ग व पृथ्वी व्यापून टाकणाऱ्या अग्निवायूंचें चिंतन करावें. अमानुष प्राणी योग्यामध्यें प्रविष्ट झाल्यास ६०,६१त्या देहगत प्राण्याला वायु व अग्नि धारण करून दग्ध करावें. हे राजा, ह्याप्रमाणें योगवेत्त्यानें आपलें सर्वस्वीं रक्षण करावें६२. कारण, धर्म, अर्थ, काम व मोक्ष ह्यांच्या प्राप्तीचें साधन शरीर आहे. प्रवृत्तिलक्षण सांगण्यानें व विस्मयानें योग्याचें ज्ञान नष्ट होतें. तस्मात्, प्रवृत्तींचें गोपन करावें ६३. निर्लोभ, आरोग्य, अनिष्ठुरत्व, सुगंध, अल्प मूत्र व पुरीष, कांति, प्रसन्नता व स्वरसौम्यता हें योगप्रवृत्तीचें प्रथम चिन्ह होय ६४. लोकांनीं प्रेम करूं लागणें, मागें गुणवर्णन करणें आणि प्राण्यांना न भिणें हें सिद्धीचें उत्कृष्ट लक्षण होय ६५. अत्युग्र शितोष्णादिकांनीं ज्याला पीडा होत नाहीं व ज्याला इतरांचें भय वाटत नाहीं त्याला सिद्धि प्राप्त झाली असें समजावें ६६. ( २३९० ) ह्याप्रमाणें श्रीमार्कंडेयपुराणांतर्गत जडोपाख्यानांतील योगनिरूपणनामक छत्तिसावा अध्याय समाप्त झाला ॥ ३६ ॥

दत्तात्रेय ह्मणतातः—आत्मदर्शन योग्याला झालें असतां होणारे उपद्रव मी संक्षेपानें सांगतों तें ऐक १. योग्याला उपसर्ग होऊं लागले असतां तो काम्य कर्में व मर्त्यभोग्य-विषय ह्यांची इच्छा करूं लागतो व त्याचप्रमाणें स्त्रिया, दानफल, विद्या, माया, सुवर्णादि धातु, द्रव्य, स्वर्ग २, देवत्व, देवाधिपत्य, रसायनानें तारुण्य आणणें, हवेंतून उडणें,

जलाग्न्यात्रेशनं तथा ३ श्राद्धानां सर्वदानानां फलानि नियमांस्तथा । तथोपवासात्पूर्ताच्च देवताभ्यर्चनादपि ४ तेभ्यस्तेभ्यश्च कर्मभ्य उपसृष्टोऽभिवाञ्छति । चित्तमित्थं वर्तमानं यत्नाद्योगी निवर्तयेत् ५ ब्रह्मसङ्गि मनः कुर्वन्नुपसर्गात्प्रमुच्यते। उपसर्गैर्जितैरेभिरुपसर्गास्ततः पुनः ६ योगिनः संप्रवर्तन्ते सात्त्वराजसतामसाः । प्रातिभः श्रावणो दैवो भ्रमावर्तौ तथापरौ ७ पञ्चैते योगिनां योगविघ्नाय कटुकोदयाः। वेदार्थाः काव्यशास्त्रार्था विद्याशिल्पान्यशेषतः ८ प्रतिभान्ति यदस्येति प्रातिभः स तु योगिनः । शब्दार्थानखिलान्वेत्ति शब्दं गृह्णाति चैव यत् ९ योजनानां सहस्रेभ्यः श्रावणः सोऽभिधीयते । समन्ताद्वीक्षते चाष्टौ स यदा देवयोनयः १० उपसर्गं तमप्याहुर्दैवमुन्मत्तवद्बुधाः । भ्राम्यते यन्निरालम्बं मनो दोषेण योगिनः ११ समस्ताचारविभ्रंशाद्भ्रमः स परिकीर्तितः। आवर्त इव तोयस्य ज्ञानावर्तो यदाकुलः १२ नाशयेच्चित्तमावर्त उपसर्गः स उच्यते। एतैर्नाशितयोगास्तु सकला देवयोनयः १३ उपसर्गैर्महाघोरैरावर्तन्ते पुनः पुनः । प्रावृत्यकम्बलं शुक्लं योगी तस्मान्मनोमयम् १४ चिन्तयेत्परमं ब्रह्म कृत्वा तत्प्रवणं मनः। योगयुक्तः सदा योगी लघ्वाहारो जितेन्द्रियः १५ सूक्ष्मास्तु धारणाः सप्त भूराद्या मूर्ध्नि धारयेत्। धरित्रीं धारयेद्योगी तत्सौक्ष्म्यं प्रतिपद्यते१६ आत्मानं मन्यते चोर्वी तद्गन्धं च जहाति सः। तथैवाप्सु रसं सूक्ष्मं तद्वद्रूपं च तेजसि१७स्पर्शं

---

यज्ञ; जलप्रवेश ३, श्राद्धें व सर्व दानें ह्यांचीं फलें व नियम, उपवास, पूर्त व देवपूजन ह्यांच्या योगानें ४ प्राप्त होण्याची इच्छा करूं लागतो. परंतु, असें होणारें चित्त यत्न करून योग्यानें परत फिरवावें ५. मन ब्रह्मासक्त करणारा योगी उपसर्गांपासून मुक्त होतो. हे उपसर्ग जिंकिल्यानंतर पुनरपि सात्विक, राजस व तामस असे दुसरे उपसर्ग योग्याला प्राप्त होतात. प्रातिभ, श्रावण, दैव, भ्रम व आवर्त ६,७ हे परिणामीं दुःखदायक होणारे पांच उपसर्ग योगविघ्नाकरितां योग्याला प्राप्त होत असतात. वेद, काव्यें व शास्त्रें ह्यांचे अर्थ आणि सर्व प्रकारच्या विद्या व शिल्पें ८ ह्यांची स्फूर्ति ज्याच्या योगानें योग्याला होते तो प्रातिभ उपसर्ग होय. सर्वशब्दार्थज्ञान आणि हजारों योजनांपासून ऐकूं येणें हा श्रावण उपसर्ग होय. तो योगी जेव्हां आठ देवयोनि समोंवतीं दिसूं लागल्यामुळें उन्मत्ताप्रमाणें चोहोंकडे पाहूं लागतो तेव्हां त्याला दैव उपसर्ग झाला असें प्राज्ञ जन ह्मणूं लागतात. दोषामुळें जेव्हां योग्याचें मन आलंबनरहित होऊन भ्रमण करूं लागतें ९,१०,११ तेव्हां सर्व आचारांपासून योगी भ्रष्ट होत असल्यामुळें त्या स्थितीला भ्रम असें ह्मणतात. उदकाच्या भोंवऱ्याप्रमाणें ज्ञानावर्त जेव्हां चित्ताचा नाश करूं लागतो तेव्हां त्या स्थितीस आवर्तउपसर्ग असें ह्मणतात. ह्या महाघोर उपसर्गांच्या योगानें योग्यांचा नाश करणाऱ्या सर्वही देवयोनि योग्याभोंवतीं वारंवार घिरट्या घालूं लागतात. ह्यास्तव, योग्यानें शुक्ल कंबळ पांघरून व मन ब्रह्माचे ठिकाणीं लीन करून त्या परब्रह्माचें चिंतन करीत रहावें; योगनिष्ठ योग्यानें सर्वदा जितेंद्रिय राहून हलका आहार करावा १२,१३,१४,१५; आणि भूप्रभृति सप्त सूक्ष्म धारणा मस्तकीं धारण कराव्या. योग्यानें धरित्री मस्तकाचे ठिकाणीं आहे अशी भावना केली असतां

वायौ तथा तद्वद्विभ्रतस्तस्य धारणाम्। व्योम्नः सूक्ष्मां प्रवृत्तिं च शब्दं तद्वज्जहाति सः १८ मनसा सर्वभूतानां मनस्याविशते यदा। मानसीं धारणां बिभ्रन्मनः सूक्ष्मं च जायते १९ तद्वद्बुद्धिमशेषाणां सत्वानामेत्य योगवित्। परित्यजति संप्राप्य बुद्धिसौक्ष्म्यमनुत्तमम् २० परित्यजति सूक्ष्माणि सप्त त्वेतानि योगवित्। सम्यग्विज्ञाय योऽलर्क तस्यावृत्तिर्न विद्यते २१ एतासां धारणानां तु सप्तानां सौक्ष्म्यमात्मवान्। दृष्ट्वा दृष्ट्वा ततः सिद्धिं त्यक्त्वा त्यक्त्वा परां व्रजेत् २२ यस्मिन्यस्मिंश्च कुरुते भूते रागं महीपते। तस्मिंस्तस्मिन्समासक्तिं संप्राप्य स विनश्यति २३ तस्माद्विदित्वा सूक्ष्माणि संसक्तानि परस्परम्। परित्यजति यो देही स परं प्राप्नुयात्पदम् २४ एतान्येव तु संधाय सप्त सूक्ष्माणि पार्थिव। भूतादीनां विनाशोऽत्र सद्भावज्ञस्य मुक्तये २५ गन्धादिषु समासक्तिं संप्राप्य स विनश्यति। पुनरावर्तते भूप स ब्रह्मापरमानुपम् २६ सप्तैता धारणा योगी समतीत्य यदिच्छति। तस्मिंस्तस्मिँल्लयं सूक्ष्मे भूते याति नरेश्वर २७ देवानामसुराणां वा गन्धर्वोरगरक्षसाम्। देहेषु लयमायाति संगं नाप्नोति च क्वचित् २८ अणिमा लघिमा चैव महिमा प्राप्तिरेव च। प्राकाम्यं च तथेशित्वं वशित्वं च तथापरम् २९

पृथ्वीचें सूक्ष्म रूप त्याला समजूं लागतें १६; स्वतःला तो पृथ्वीरूपच समजूं लागतो आणि तिच्या गंधरूप गुणाचा तो त्याग करितो. त्याचप्रमाणें उदकाच्या ठिकाणीं असलेला सूक्ष्म रस, तेजाचे ठिकाणीं असलेलें सूक्ष्म रूप १७, वायूच्या ठिकाणीं असलेला सूक्ष्म स्पर्श आणि आकाशाच्या ठिकाणीं असलेलें सूक्ष्म रूप धारणेमुळें त्याला समजूं लागतें आणि स्वतःला रसादिरूप मानूं लागून तो-रस, रूप, स्पर्श व शब्द ह्या गुणांचा-त्याग करितो १८. मानसी धारणेचा तो अभ्यास करूं लागला असतां मनाच्या योगानें तो प्राणिमात्राच्या मनामध्यें प्रविष्ट होऊं लागतो व त्याचें मन सूक्ष्म होतें १९. त्याचप्रमाणें योगवेत्ता सर्व प्राण्यांच्या बुद्धीमध्यें शिरून व अनुपम सूक्ष्मरूप प्राप्त करून घेऊन त्याचा त्याग करितो २०. जेव्हां योगवेत्ता ह्या सात सूक्ष्म गुणांचा, ज्ञान झाल्यानंतर त्याग करितो, तेव्हां हे अलर्का, तो पुनरपि जन्ममरणांच्या फेऱ्यांत पडत नाहीं २१. ह्या सात धारणांचें सूक्ष्म स्वरूप अवलोकन करून सोडिल्यानंतर जितेंद्रिय योग्याला उत्कृष्ट सिद्धि प्राप्त होते २२. हे भूपते, ज्या ज्या भूताचे ठिकाणीं योगी प्रेम करूं लागतो त्या त्या भूताविषयीं तो आसक्त होऊन नाश पावतो २३. तस्मात्, परस्पर आसक्त झालेलीं सूक्ष्म भूतें जाणून जो त्यांचा त्याग करितो त्याला उत्तम पद प्राप्त होतें २४. हे राजा, पांच भूतें, मन व बुद्धि ह्यांचीं सूक्ष्म रूपें समजून आल्यानंतर त्यागानें त्यांचा नाश झाला असतां योगतत्त्व जाणणाऱ्याला मुक्ति प्राप्त होते २५. हे राजा, गंधादिकांचे ठिकाणीं आसक्ति उत्पन्न झाल्यास योग्याचा नाश होतो व ब्रह्मासमीप गेलेलाही तो योगी पुनरपि ह्या मर्त्य लोकाप्रत परत येतो २६. हे राजा, ह्या सात धारणांचें उल्लंघन करून इच्छा असल्यास योगी त्या त्या सूक्ष्म भूताचे ठिकाणींही लीन होऊन जातो २७; आणि कोठेंही आसक्त न होतां देव, असुर, गंधर्व, उरग व राक्षस ह्यांच्या देहांतही तो लीन होतो २८. अणिमा, लघिमा, महिमा, प्राप्ति,

यत्र कामावसायित्वं गुणानेतांस्तथैश्वरान् । प्राप्नोत्यष्टौ नरव्याघ्र परं निर्वाणसूचकान् ३० सूक्ष्मात्सूक्ष्मतमोऽणीयाञ्छीघ्रत्वं लघिमा गुणः । महिमाऽशेषपूज्यत्वात्प्राप्तिर्नाप्राप्यमस्य यत् ३१ प्राकाम्यमस्य व्यापित्वादीशित्वं चेश्वरो यतः । वशित्वाद्वशिमा नाम योगिनः सप्तमो गुणः ३२ यत्रेच्छास्थानमप्युक्तं यत्र कामावसायिता । ऐश्वर्यकारणैरेभिर्योगिनः प्रोक्तमष्टधा ३३ मुक्तिसंसूचकं भूप परं निर्वाणमात्मनः । ततो न जायते नैव वर्द्धते न विनश्यति ३४ नापि क्षयमवाप्नोति परिणामं न गच्छति । छेदं क्लेदं तथा दाहं शोषं भूरादितो न च ३५ भूतवर्गादवाप्नोति शब्दाद्यैर्ह्रियते न च । न चास्य सन्ति शब्दाद्यास्तद्भोक्ता तैर्न युज्यते ३६ यथा हि कानकं खण्डमपद्रव्यवदग्निना । दग्धदोषं द्वितीयेन खण्डेनैक्यं व्रजेन्नृप ३७ न विशेषमवाप्नोति तद्वद्योगाग्निना यतिः । निर्दग्धदोषस्तेनैक्यं प्रयाति ब्रह्मणा सह ३८ यथाग्निरग्नौ संक्षिप्तः समानत्वमनुव्रजेत् । तदाख्यस्तन्मयो भूतो न गृह्येत विशेषतः ३९ परेण ब्रह्मणा तद्वत्प्राप्यैक्यं दग्धकिल्बिषः । योगी याति पृथग्भावं न कदाचिन्महीपते ४० यथा जलं जलेनैक्यं निक्षिप्तमुपगच्छति । तथात्मा साम्यमभ्येति योगिनः परमात्मनि ४१ [ २४३० ] इति श्रीमार्कण्डेयपुराणे योगिसिद्धिर्नाम सप्तत्रिंशोऽध्यायः ॥ ३७ ॥

प्राकाम्य, ईशित्व, वशित्व २९ आणि यत्रकामावसायित्व हे उत्कृष्ट रीतीनें मुक्तिसुचविणारे आठ ईश्वरगुण, हे पुरुषश्रेष्ठा, त्याला प्राप्त होतात ३०. अणिमा ह्मणजे सूक्ष्माहूनही अत्यंत सूक्ष्म, लघिमा ह्मणजे शीघ्रत्व, महिमा ह्मणजे सर्वपूज्यत्व, कोणतीही वस्तु अप्राप्य नसणें ही प्राप्ति ३१, व्यापी असल्यामुळें प्राकाम्य, ईश्वर होत असल्यामुळें ईशित्व आणि स्वाधीनता असल्यामुळें वशित्व हा योग्याचा सातवा गुण होय ३२. यत्रकामावसायिता ह्मणजे वाटेल त्या ठिकाणीं स्थिति. ह्या आठ ऐश्वर्यकारणांमुळें योग्याला, हे राजा, आठ प्रकारचें उत्कृष्ट निर्वाण ह्मणजे आत्ममुक्तिसुचक पद प्राप्त होतें; आणि हें प्राप्त झाल्यावर त्याला जन्म, वृद्धि, विनाश ३३, ३४, क्षय, परिणाम इत्यादि विकार प्राप्त होत नाहींत. त्याचप्रमाणें पृथ्वीप्रभृति भूतवर्गामुळें त्याला छेद, क्लेश, दाह व शोष ह्यांचेंही भय उरत नाहीं; व शब्दादि विषयांच्या तावडींत तो सांपडत नाहीं. त्याचे ठिकाणीं बंधक ह्मणून शब्दादि विषयच रहात नाहींत. विषयांचा उपभोग जरी त्याला घडला तरी ते विषय त्याला बंधक होत नाहींत ३५, ३६. हे राजा, हीनद्रव्यमिश्रित सुवर्णाचा तुकडा—अग्नीनें आंतील हीनद्रव्यरूप दोष दग्ध झाल्यावर—ज्याप्रमाणें दुसऱ्या तुकड्याशीं मिळून जातो ३७ व कांहींएक भेद त्यामध्यें उरत नाहीं त्याचप्रमाणें योगाग्नीनें ज्याचें किल्बिष दग्ध झालें आहे असा यति त्या ब्रह्माशीं एकरूप होऊन जातो ३८. अग्नींत टाकिलेल्या अग्नीला समानत्व प्राप्त झाल्यामुळें ज्याप्रमाणें भिन्न करितां येत नाहीं ३९ त्याचप्रमाणें किल्बिष दग्ध झाल्यामुळें परब्रह्माशीं एकरूप बनून गेलेला यति, हे राजा, कधींही त्यापासून भिन्न होत नाहीं ४०. उदकांत टाकिलेलें उदक ज्याप्रमाणें उदकाशीं मिळून जातें त्याचप्रमाणें योग्याचा आत्मा परमात्म्याशीं मिळून जातो ४१. ( २४३० ). ह्याप्रमाणें

अलर्क उवाच ॥ भगवन्योगिनश्चर्यां श्रोतुमिच्छामि तत्त्वतः । ब्रह्मवर्त्मन्यनुसरन्यथा योगी न सीदति १ दत्तात्रेय उवाच ॥ मानापमानौ यावेतौ प्रत्युद्वेगकरौ नृणाम् । तावेव विपरीतार्थौ योगिनः सिद्धिकारकौ २ मानापमानौ यावेतौ तावेवाहुर्विषामृते । अपमानोऽमृतं तत्र मानस्तु विषमं विषम् ३ चक्षुःपूतं न्यसेत्पादं वस्त्रपूतं जलं पिबेत् । सत्यपूतां वदेद्वाणीं बुद्धिपूतं च चिन्तयेत् ४ आतिथ्यश्राद्धयज्ञेषु देवयात्रोत्सवेषु च । महाजनेषु सिद्ध्यर्थं न गच्छेद्योगवित्क्वचित् ५ व्यस्ते विधूमे व्यङ्गारे सर्वस्मिन्भुक्तवज्जने । अटेत योगविद्भैक्ष्यं न तु तेष्वेव नित्यशः ६ यथैवमवमन्यन्ते जनाः परिभवन्ति च । तथा युक्तश्चरेद्योगी सतां वर्त्म न दूषयन् ७ भैक्ष्यं चरेद्गृहस्थेषु यायावरगृहेषु च । श्रेष्ठा तु प्रथमा चेति वृत्तिरस्योपदिश्यते ८ अथ नित्यं गृहस्थेषु शालीनेषु चरेद्यतिः । श्रद्दधानेषु दान्तेषु श्रोत्रियेषु महात्मसु ९ अत ऊर्ध्वं पुनश्चापि अदुष्टापतितेषु च । भैक्ष्यचर्या विवर्णेषु जघन्या वृत्तिरिष्यते १० भैक्ष्यं यवागूं तक्रं वा पयो यावकमेव वा । फलं मूलं प्रियंगुं वा कणपिण्याकसक्तवः ११ इत्येते च शुभाहारा योगिनां सिद्धिकारकाः । तत्प्रयुञ्ज्यान्मुनिर्भक्त्या परमेण समाधिना १२ अपः पूर्वं सकृत्प्राश्य तूष्णीं भूत्वा समाहितः । प्राणायेति ततस्तस्य प्रथमा ह्याहुतिः स्मृता १३ अपानाय द्वितीया तु समानायेति चापरा । उदानाय चतुर्थी स्याद्व्या-

श्रीमार्कंडेयपुराणांतील योगिसिद्धिनामक सदतिसावा अध्याय समाप्त झाला ॥ ३७ ॥

अलर्क ह्मणतोः—हे भगवन्, ब्रह्ममार्गानुसारी यतीचा ज्यांच्या योगानें नाश होणार नाहीं असें योग्याचें आचरण तत्त्वतः श्रवण करण्याची माझी इच्छा आहे १. दत्तात्रेय ह्मणतातः—सामान्य लोकांना उद्वेग उत्पन्न करणारे मानापमानच विपरीत अर्थानें युक्त होऊन योग्याला सिद्धि प्राप्त करून देत असतात २. ह्या मानापमानांनाच योगी विषामृत ह्मणतात. अपमान हें अमृत आणि मान हें जहर विष होय ३. दृष्टीनें स्थान शुद्ध झाल्यानंतर त्यावर पाय टाकावा; वस्त्रपूत उदक सेवन करावें; सत्यपूत वाणीचें अवलंबन करावें आणि बुद्धिपूत चिंतन करावें ४. सिद्धीला अडथळा येईल ह्या भीतीनें आतिथ्य, श्राद्ध, यज्ञ, देवयात्रा, उत्सव व समाज ह्यांचें अवलंबन योगवेत्त्यानें कधींही करूं नये ५. गांवांतील धूर व अंगार शांत होऊन सर्वांचें भोजन झाल्यानंतर योगवेत्त्यानें भिक्षार्थ हिंडावें; परंतु, नित्य त्याच गृहांत जाऊं नये ६. सन्मार्ग दूषित न करितां, लोक अवमान व तिरस्कार करितील अशारीतीनें योग्यानें वर्तन करावें ७. गृहस्थ व फिरते संत ह्यांच्या घरीं भिक्षा मागणें ही योग्याची पहिली व श्रेष्ठ वृत्ति होय ८. श्रद्धालु, जितेंद्रिय, श्रोत्रिय, महात्मे व विनयशील अशा गृहस्थांचे घरीं भिक्षा मागणें ही मध्यम वृत्ति होय ९ आणि अदुष्ट व अपतित अशा हीनवर्णाचेही घरीं भिक्षा मागणें ही कनिष्ट वृत्ति होय १०. भैक्ष्य, यवागू, तक्र, दूध, यावक, फल, मूल, प्रियंगु, कण, पेंड व सातु ११ हे शुभ आहार योग्यांना सिद्धि देणारे आहेत. तस्मात्, ह्यांपैकीं कांहींतरी अतिशांतमनानें व भक्तीनें सेवन करावें १२. प्रथम उदकप्राशन करून कांहींएक न बोलतां स्वस्थमनानें प्राणाय ही

नायेति च प्रथमी १४ प्राणायामैः पृथक्कृत्वा शेषं भुञ्जीत कामतः । अपः पुनः सकृत्प्राश्य आचम्य हृदयं स्पृशेत् १५ अस्तेयं ब्रह्मचर्यं च त्यागोऽलोभस्तथैव च । व्रतानि पञ्च भिक्षूणामहिंसा परमाणि वै १६ अक्रोधो गुरुशुश्रूषा शौचमाहारलाघवम् । नित्यस्वाध्याय इत्येते नियमाः परिकीर्तिताः १७ सारभूतमुपासीत ज्ञानं यत्कार्यसाधकम् । ज्ञानानां बहुता येयं योगविघ्नकरी हि सा १८ इदं ज्ञेयमिदं ज्ञेयमिति यस्तृषितश्चरेत् । अपि कल्पसहस्रेषु नैव ज्ञेयमवाप्नुयात् १९ त्यक्तसङ्गो जितक्रोधो लघ्वाहारी जितेन्द्रियः । विधाय बुद्ध्या द्वाराणि मनो ध्याने निवेशयेत् २० शून्येष्वेवावकाशेषु गुहासु च वनेषु च । नित्ययुक्तः सदा योगी ध्यानं सम्यगुपक्रमेत् २१ वाग्दण्डः कर्मदण्डश्च मनोदण्डश्च ते त्रयः । यस्यैते नियता दण्डाः स त्रिदण्डी महायतिः २२ सर्वमात्ममयं यस्य सदसज्जगदीदृशम् । गुणागुणमयं तस्य कः प्रियः को नृपाप्रियः २३ विशुद्धबुद्धिः समलोष्टकाञ्चनः समस्तभूतेषु समः समाहितः । स्थानं परं शाश्वतमव्ययं च यतिर्हि गत्वा न पुनः प्रजायते २४ वेदाच्छ्रेष्ठाः सर्वयज्ञक्रियाश्च यज्ञाज्जप्यं ज्ञानमार्गश्च जप्यात् । ज्ञानाद्ध्यानं संगरागव्यपेतं तस्मिन्प्राप्ते शाश्वतस्योपलब्धिः २५ समाहितो ब्रह्मपरोऽप्रमादी शुचिस्तथैकान्तरतिर्यतेन्द्रियः । समाप्नुयाद्योगमिमं महात्मा

---

प्रथम आहुति ध्यावी १३; अपानाय ही दुसरी ध्यावी; समानाय म्हणून तिसरी ध्यावी; उदानाय म्हणून चवथी ध्यावी आणि व्यानाय असें म्हणून पांचवी ध्यावी १४. प्रत्येक आहुति प्राणायामानें पृथक् पृथक् करून अवशिष्ट अन्न यथेष्ट सेवन करावें; आणि पुनरपि एकदां उदक प्राशन करून आचमनानंतर हृदयस्पर्श करावा १५. अहिंसा, अस्तेय, ब्रह्मचर्य, त्याग व अलोभ हीं भिक्षूंचीं पांच व्रतें होत १६. अक्रोध, गुरुशुश्रूषा, शौच, आहारलाघव व नित्य वेदाध्ययन हे नियम होत १७. सारभूत असें जें कार्यसाधक ज्ञान त्याचेंच अवलंबन करावें; ज्ञानबाहुल्य योगाला विघ्न करणारें आहे १८. हें जाणण्यासारखें आहे, हें जाणण्यासारखें आहे, असें समजून जो उत्सुकतेनें वागेल त्याला सहस्रकल्प लोटले तरी जाणण्याला जें खरें योग्य आहे तें कधींही प्राप्त होणार नाहीं १९. निःसंग, क्रोधशून्य, जितेंद्रिय व लघु आहार सेवन करणाऱ्या योग्यानें ज्ञानेंद्रियें स्वाधीन करून घे॰न ध्यानाचे ठिकाणीं मनाची स्थापना करावी २०. शून्य स्थलें, गुहा व वनें ह्याठिकाणीं नित्ययुक्त योग्यानें सर्वदां ध्यान करीत असावें २१. वाग्दंड, कर्मदंड व मनोदंड हे तीन दंड ज्याचे नियत आहेत तो त्रिदंडी महायति होय २२. हे नृपा, गुणदोषांनीं भरलेलें हें अशा प्रकारचें बरें वाईट सर्व जगत् ज्याला आत्ममय झालेलें आहे त्याला प्रिय कोण व अप्रिय तरी कोण ? २३. ज्याचें अंतःकरण शुद्ध झालेलें आहे; मृत्तिका व सुवर्ण हीं ज्याला सारखीं झालेलीं आहेत आणि भूतांचे ठिकाणीं ज्याची समदृष्टि झालेली आहे तो यति शाश्वत व अविनाशी अशा उत्कृष्ट स्थानाला पोंचल्यानंतर पुनरपि जन्मास येत नाहीं २४. वेदापेक्षां सर्व यज्ञकर्में, यज्ञापेक्षां जप, जपापेक्षां ज्ञान आणि ज्ञानापेक्षां आसक्ति व अनुराग ह्यांनीं शून्य असलेलें ध्यान श्रेष्ठ होय. कारण, तें प्राप्त झालें असतां शाश्वत ब्रह्माची प्राप्ति होते २५.

विमुक्तिमाप्नोति ततः स्वयोगतः २६ [ २४९६ ] इति श्रीमार्कण्डेयपुराणे योगिचर्याकथनं नामाष्टत्रिंशोऽध्यायः ॥ ३८ ॥

दत्तात्रेय उवाच ॥ एवं यो वर्तते योगी सम्यग्योगव्यवस्थितः । न स व्यावर्तितुं शक्यो जन्मान्तरशतैरपि १ दृष्ट्वा च परमात्मानं प्रत्यक्षं विश्वरूपिणम् । विश्वपादशिरोग्रीवं विश्वेशं विश्वभावनम् २ तत्प्राप्तये महत्पुण्यमोमित्येकाक्षरं जपेत् । तदेवाध्ययनं तस्य स्वरूपं शृण्वतः परम् ३ अकारश्च तथोकारो मकारश्चाक्षरत्रयम् । एतास्तिस्रः स्मृता मात्राः सात्त्वराजसतामसाः ४ निर्गुणा योगिगम्यान्या चार्धमात्रोर्ध्वसंस्थिता । गान्धारीति च विज्ञेया गान्धारस्वरसंश्रया ५ पिपीलिकागतिस्पर्शा प्रयुक्ता मूर्ध्नि लक्ष्यते । यथा प्रयुक्त ओङ्कारः प्रतिनिर्याति मूर्धनि ६ तथोङ्कारमयो योगी त्वक्षरे त्वक्षरो भवेत् ७ प्राणो धनुः शरो ह्यात्मा ब्रह्म वेद्धव्यमनुत्तमम् । अप्रमत्तेन वेद्धव्यं शरवत्तन्मयो भवेत् ८ ओमित्येतत्त्रयो वेदास्त्रयो लोकास्त्रयोऽग्नयः । विष्णुर्ब्रह्मा हरश्चैव ऋक्सामानि यजूंषि च ९ मात्राः सार्धाश्च तिस्रश्च विज्ञेयाः परमार्थतः । तत्र युक्तस्तु यो योगी स तल्लयमवाप्नुयात् १० अकारस्त्वथ भूर्लोक उकारश्चोच्यते भुवः । सव्यञ्जनो मकारश्च स्वर्लोकः परिकल्प्यते ११ व्यक्ता तु प्रथमा मात्रा द्वितीया व्यक्तसंज्ञिता । मात्रा तृतीया चिच्छक्तिरर्धमात्रा परं पदम् १२ अने-

---

स्वस्थ मनानें युक्त, ब्रह्मनिष्ठ, प्रमादरहित, शुद्ध, एकांतसेवी व जितेंद्रिय महात्म्याला हा योग प्राप्त होतो व ह्याच्या योगानें तो मुक्त होतो २६. (२४९६) ह्याप्रमाणें श्रीमार्कंडेयपुराणांतील योगिचर्याकथननामक अडतिसावा अध्याय समाप्त झाला ॥३८॥

दत्तात्रेय ह्मणतातः—ह्याप्रमाणें उत्कृष्ट योगाचें अवलंबन करून जो योगी वागतो तो शेकडों जन्म इतरांचे लोटले तरी परावृत्त होणें शक्य नसतें १. पाय, मस्तक व कंठ इत्यादि अवयव ज्याला अनंत आहेत असा, जो विश्वपालक विश्वाधिपति व विश्वरूप परमात्मा त्याचें प्रत्यक्ष दर्शन झालें असतां २ त्याची प्राप्ति व्हावी एतदर्थ अत्यंत पवित्र अशा प्रणवाक्षराचा जप करावा आणि तेंच अध्ययन समजावें. आतां त्याचें स्वरूप तूं ऐक ३. अकार, उकार व मकार हीं तीन अक्षरें सात्त्विक, राजस व तामस अशा तीन मात्रा होत ४. निर्गुण व ऊर्ध्वभागीं स्थित अशी जी वेगळी अर्धमात्रा आहे ती योग्यालाच समजणें शक्य आहे. ती गांधारस्वराच्या आश्रयाला आहे व गांधारी हें तिचें नांव आहे ५. ती मस्तकार ठेविली असतां तिची गति व स्पर्शहीं मुंगीप्रमाणें भासतात व प्रणवही तसाच भासतो ६. प्रणवमय योगी अक्षरावलंबी झाल्यामुळें अविनाशी होतो ७. योग्यानें प्रणवमय होऊन दक्ष रहावें आणि प्राणरूप धनुष्याला मन हा बाण लावून ब्रह्मरूप अनुपम लक्ष्याचा बाणाप्रमाणें वेध करावा ८. तीन वेद ह्मणजे ऋक्, साम व यजु; तीन लोक, तीन अग्नि आणि ब्रह्मा, विष्णु व महेश्वर प्रणवच असून ९ त्याच्या तत्त्वतः साडेतीन मात्रा आहेत असें जाणावें. त्याचें अवलंबन करणारा जो योगी तो तद्रूप होऊन जाईल १०. अकार, उकार व व्यंजनासहित मकार हे, अनुक्रमें भूमि, अंतरिक्ष व स्वर्ग लोक होत ११. त्याची पहिली

नैव क्रमेणैता विज्ञेया योगभूमयः । ओमित्युच्चारणात्सर्वं गृहीतं सदसद्भवेत् १३ ह्स्वा तु प्रथमा मात्रा द्वितीया दैर्घ्यसंयुता । तृतीया च प्लुतार्धाख्या वचसः सा न गोचरा १४ इत्येतदक्षरं ब्रह्म परमोंकारसंज्ञितम् । यस्तु वेद नरः सम्यक्तथा ध्यायति वा पुनः १५ संसारचक्रमुत्सृज्य त्यक्तत्रिविधबन्धनः । प्राप्नोति ब्रह्मणि लयं परमे परमात्मनि १६ अक्षीणकर्मबन्धश्च ज्ञात्वा मृत्युमरिष्टतः । उत्क्रान्तिकाले संस्मृत्य पुनर्योगित्वमृच्छति १७ तस्मादसिद्धयोगेन सिद्धयोगेन वा पुनः । ज्ञेयान्यरिष्टानि सदा येनोत्क्रान्तौ न सीदति १८ [२४७४] इति श्रीमार्कण्डेयपुराणे योगधर्मे ओंकारवर्णनं नामैकोनचत्वारिंशोऽध्यायः ॥ ३९ ॥

दत्तात्रेय उवाच ॥ अरिष्टानि महाराज शृणु वक्ष्यामि तानि ते । येषामालोकनान्मृत्युं निजं जानाति योगवित् १ देवमार्गं ध्रुवं शुक्रं सोमच्छायामरुन्धतीम् । यो न पश्येन्न जीवेत्स नरः संवत्सरात्परम् २ अरश्मिबिम्बं सूर्यस्य वह्निं चैवांशुमालिनम् । दृष्ट्वैकादशमासेभ्यो नरो नोर्ध्वं तु जीवति ३ वान्ते मूत्रपुरीषे च यः स्वर्णं रजतं तथा । प्रत्यक्षं कुरुते स्वप्ने जीवेत्स दशमासिकम् ४ दृष्ट्वा प्रेतपिशाचादीन्गन्धर्वनगराणि च । सुवर्णवर्णान्वृक्षांश्च नव मासान्स जीवति ५ स्थूलः कृशः कृशः स्थूलो योऽकस्मादेव जायते । प्रकृतेश्च निवर्तेत तस्यायुश्चाष्टमासिकम् ६ खण्डं यस्य पदं पार्ष्ण्यां पादस्याग्रे च वा भवेत् । पांसुकर्दमयोर्मध्ये

---

मात्रा व्यक्त असून दुसरी अव्यक्त आहे आणि तिसरी चिच्छक्ति असून अर्धमात्रा हें परमपद आहे १२. ह्याच क्रमानें ह्या योगभूमि जाणाव्या. प्रणवाचा उच्चार कारितां-क्षणीं स्थूल व सूक्ष्म असें सर्व कांहीं उच्चारिलें जातें १३. पहिली मात्रा ऱ्हस्व, दुसरी दीर्घ, तिसरी प्लुत व अर्धमात्रा वाणीला अगोचर होय १४. हें प्रणवसंज्ञक सर्वोत्कृष्ट अक्षर ब्रह्म ज णून जो पुरुष त्याचें नीट ध्यान करितो १५ तो संसारचक्र सोडून व त्रिविध बंधनांचा त्याग करून सर्वोत्कृष्ट ब्रह्मपरमात्म्याचे ठिकाणीं लय पावतो १६. कारण, त्याचीं कर्मबंधनें क्षीण होऊन जातात. अरिष्टांवरून ह्मणजे मृत्युसूचक चिन्हांवरून त्याला मृत्यूचें ज्ञान होत असतें व मरणसमयीं स्मरण होऊन तो पुनरपि योगी होतो १७. तस्मात्, योग सिद्ध झालेल्या अथवा न झालेल्या पुरुषानें अरिष्टें जाणण्याविषयीं सर्वदां दक्ष असावें; ह्मणजे उत्क्रांतिसमयीं त्याचा नाश होत नाहीं १८. (२४७४) ह्याप्रमाणें श्रीमार्कंडेयपुराणांतर्गत योगधर्मांतील प्रणववर्णननामक एकूणचाळिसावा अध्याय समाप्त झाला ॥ ३९ ॥

दत्तात्रेय ह्मणतातः—हे महाराज, जीं कळल्यानें योगवेत्त्याला स्वतःचा मृत्यु कळतो अशीं अरिष्टें मी सांगतों तीं ऐक १. देवमार्ग, ध्रुव, शुक्र, चांदणें व अरुंधती न पाहणारा वर्षापुढें जगत नाहीं २. सूर्यबिंब किरणरहित व अग्नि किरणयुक्त पाहणारा अकरा महिन्यांनंतर जगत नाहीं ३. स्वप्नांतील वांतींत, मूत्रांत अथवा विष्टेंत ज्याला सोनें रुपें दिसतें तो दहा महिने जगतो ४. प्रेत, पिशाच इत्यादि, गंधर्व नगरें आणि सुवर्णवर्ण वृक्ष अवलोकन करणारा नऊ महिने राहतो ५. जो अकस्मात् स्थूलाचा कृश अथवा कृशाचा स्थूल होऊन स्वभावापासून निवृत्त होतो त्याला आठ महिने

सप्त मासान्स जीवति ७ गृध्रः कपोतः काकोलो वायसो वापि मूर्द्धनि। क्रव्यादो वा खगो नीलः षण्मासायुःप्रदर्शकः ८ हन्यते काकपंक्तिभिः पांसुवर्षेण वा नरः। स्वां छायामन्यथा दृष्ट्वा चतुः पञ्च स जीवति ९ अनभ्रे विद्युतं दृष्ट्वा दक्षिणां दिशमाश्रिताम्। रात्राविन्द्रधनुश्चापि जीवितं हि त्रिमासिकम् १० घृते तैले तथाऽऽदर्शे तोये वा नात्मनस्तनुम्। यः पश्येदशिरस्कां वा मासादूर्ध्वं न जीवति ११ यस्य बस्तसमो गन्धो गात्रे शवसमोऽपि वा। तस्यार्द्धमासिकं ज्ञेयं योगिनो नृप जीवितम् १२ यस्य वै स्नातमात्रस्य हृत्पादमवशुष्यते। पिबतश्च जलं शोषो दशाहं सोऽपि जीवति १३ संभिन्नो मारुतो यस्य मर्मस्थानानि कृन्तति। हृष्यते नाम्बुसंस्पर्शात्तस्य मृत्युरुपस्थितः १४ ऋक्षवानरयानस्थो गायन्यो दक्षिणां दिशम्। स्वप्ने प्रयाति तस्यापि न मृत्युः कालमिच्छति १५ रक्तकृष्णाम्बरधरा गायन्ती हसती च यम्। दक्षिणाशां नयेन्नारी स्वप्ने सोऽपि न जीवति १६ नग्नं क्षपणकं स्वप्ने हसमानं महाबलम्। एवं संवीक्ष्य वल्गन्तं विद्यान्मृत्युमुपस्थितम् १७ आमस्तकतलाद्यस्तु निमग्नं पङ्कसागरे। स्वप्ने पश्यत्यथात्मानं स सद्यो म्रियते नरः १८ केशाङ्गारांस्तथा भस्म भुजङ्गान्निर्जलां नदीम्। दृष्ट्वा स्वप्ने दशाहात्तु मृत्युरेकादशे दिने १९ करालैर्विकटैः कृष्णैः पुरुषैरुद्यतायुधैः। पाषाणैस्ताडितः स्वप्ने सद्यो मृत्युं लभेन्नरः २० सूर्योदये यस्य शिवा क्रोशन्ती याति संमुखम्। विपरीतं परीतं वा स

आयुष्य असतें ६.धुराळ्यांत अथवा चिखलांत ज्याच्या पावलाची टांच अथवा अग्रभाग नीट उठत नाहीं तो सात महिने जगतो ७.गिधाड, कबूतर, वाघूळ, कावळा, मांसभक्षक पक्षी अथवा नीलवर्णपक्षी मस्तकावर बसल्यास आयुष्य सहा महिने असतें ८. काकपंक्तींनीं अथवा धूलिवृष्टीनें ताडित होणारा व आपल्या छायेंत विकार पाहणारा चार किंवा पांच महिने जगतो ९.मेघ नसतांना दक्षिणेस वीज व रात्रीं इंद्रधनुष्य पाहणाऱ्याचें आयुष्य तीन महिन्यांचें असतें १०. घृत, तैल आरसा व उदक ह्यांत आपलें प्रतिबिंब न पाहणारा किंवा मस्तकरहित पाहणारा महिन्यानंतर जगत नाहीं ११. हे राजा, ज्याच्या शरीराला बोकडाची अथवा प्रेताची घाण येते त्या योग्याचें आयुष्य पंधरवडा समजावें १२. स्नान करितांक्षणीं ज्याचें हृदय व पाय शुष्क होत असून पाणी पितांना ज्याला शोष लागतो तो दहा दिवस जगतो १३. वारा सुटला असतां ज्याचीं मर्मस्थानें व्याकुळ होतात व उदकस्पर्शानें ज्याला हुषारी येत नाहीं त्याचा मृत्यु जवळ असतो १४. अस्वल अथवा वानर ह्यांच्या यानांत बसून गात गात दक्षिणेस स्वप्नामध्यें जाणाऱ्यालाही केव्हां मृत्यु येईल हा नियम नसतो १५. तांबडें अथवा काळें वस्त्र नेसलेली स्त्री स्वप्नामध्यें ज्याला हंसत अथवा गात दक्षिणेस नेईल तोही जगत नाहीं १६. महाबलाढ्य व नग्न असा बौद्धभिक्षु हंसतांना अथवा बोलतांना स्वप्नांत दृष्टीं पडल्यास मृत्यु जवळ आहे असें समजावें १७. पायांपासून मस्तकापर्यंत जो स्वतःला स्वप्नांत चिखलामध्यें निमग्न पाहतो तो तत्क्षणीं मरतो १८. गुंतवळ, कोळसे, राख, भुजंग अथवा निर्जल नदी स्वप्नांत पाहणारा दहा दिवसांत अथवा अकराव्या दिवशीं मरतो १९. सशस्त्र असलेल्या कराळ, विकट व कृष्णवर्ण

सद्यो मृत्युमृच्छति २१ यस्य वै भुक्तमात्रस्य हृदयं बाध्यते क्षुधा। जायते दन्तघर्षश्च स गतायुर्न संशयः २२ दीपगन्धं न यो वेत्ति त्रस्यत्यह्नि तथा निशि । नात्मानं परनेत्रस्थं वीक्षते न स जीवति २३ शक्रायुधं चार्धरात्रे दिवा ग्रहगणांस्तथा। दृष्ट्वा मन्येत संक्षीणमात्मजीवितमात्मवित् २४ नासिका वक्रतामेति कर्णयोर्नमनोन्नती। नेत्रं च वामं स्रवति यस्य तस्यायुरुद्गतम् २५ आरक्तता नैति मुखं जिह्वा वा श्यामतां यदा । तदा प्राज्ञो विजानीयान्मृत्युमासन्नमात्मनः २६ उष्ट्ररासभयानेन यः स्वप्ने दक्षिणां दिशम् । प्रयाति तं च जानीयात्सद्यो मृत्युं नरेश्वर २७ पिधाय कर्णौ निर्घोषं न शृणोत्यात्मसंभवम्। नश्यते चक्षुषोर्ज्योतिर्यस्य सोऽपि न जीवति २८ पततो यस्य वै गर्ते स्वप्ने द्वारं पिधीयते । न चोत्तिष्ठति यः श्वभ्रात्तदन्तं तस्य जीवितम् २९ ऊर्ध्वा च दृष्टिर्न च संप्रतिष्ठा रक्ता पुनः संपरिवर्तमाना । मुखस्य चोष्मा शिशिरा च नाभिः शंसन्ति पुंसामपरं शरीरम् ३० स्वप्नेऽग्निं प्रविशेद्यस्तु न च निष्क्रमते पुनः । जलप्रवेशादपि वा तदन्तं तस्य जीवितम् ३१ यश्चाभिहन्यते दुष्टैर्भूतै रात्रावथो दिवा । स मृत्युं सप्तरात्रान्ते नरः प्राप्नोत्यसंशयम् ३२ स्ववस्त्रममलं शुक्लं रक्तं पश्यत्यथोऽसितम् । यः पुमान्मृत्युमासन्नं तस्यापि हि विनिर्दिशेत् ३३ स्वभाववैपरीत्यं तु प्रकृतेश्च विपर्ययः । कथयन्ति मनुष्याणां समासन्नौ यमान्तकौ ३४ येषां विनीतः सततं येऽस्य पूज्य-

---

पुरुषांनीं स्वप्नामध्यें घोडे मारिल्यास तत्क्षणीं मृत्यु येतो २०. सूर्योदयसमयीं उजवीकडून अथवा डावीकडून ज्याच्या संमुख माळू ओरडत येत तो सत्वर मरतो २१. जेवतांक्षणीं ज्याचें हृदय क्षुधेनें पीडित होऊन दंतांनीं घर्षण होऊं लागतें तो निःसंशय गतायु होय २२. दीपगंध ज्याला कळत नाहीं, रात्रंदिवस जो त्रस्त असतो व दुसऱ्याचे नेत्रांत जो आपलें प्रतिबिंब पहात नाहीं तो जगत नाहीं २३. मध्यरात्रीं इंद्रधनुष्य व दिवसां ग्रहगण दृष्टीं पडल्यास आत्मज्ञत्यानें आपलें आयुष्य संपलें असें जाणावें २४. नासिका ज्याची वक्र होते, ज्याचे कान नमतात किंवा उंचट होतात आणि ज्याच्या डाव्या डोळ्यांतून पाणी येऊं लागतें त्याचें आयुष्य संपलें असें समजावें २५. मुख लाल किंवा जीभ काळी पडल्यास आपला मृत्यु जवळ असल्याचें प्राज्ञ पुरुषानें समजावें २६. हे राजा, उंटांच्या अथवा गर्दभाच्या गाडींत बसून स्वप्नामध्यें दक्षिणेस जाणारा सत्वर मरेल असें समजावें २७. कान झांकल्यावर आंतून आवाज न ऐकणारा व नेत्रांचें तेज न पाहणाराही जगत नाहीं २८. स्वप्नामध्यें जो खाड्यांत पडत असतांना दार लोटिलें जातें आणि जो खाड्यातून उठत नाहीं त्याचें आयुष्य संपलें असें समजावें २९. ऊर्ध्व, चंचल व वारंवार फिरणारी दृष्टि, मुख उष्ण आणि नाभि शीत हीं लक्षणें मृत्युसूचक होत ३०. स्वप्नामध्यें अग्नींत अथवा उदकांत शिरून जो बाहेर येत नाहीं त्याचें जीवित संपतें ३१. रात्रीं अथवा दिवसा दुष्ट भूतें ज्याला ताडण करितात त्याला सात दिवसांत निःसंशय मृत्यु येतो ३२. आपलें वस्त्र शुभ्र व निर्मळ असतांना जो स्वप्नांत तांबडें अथवा काळें पहातो त्याचाही मृत्यु संनिध आला असें समजावें ३३. स्वभाव व प्रकृति ह्यांत फेर पडणें हें मृत्यूचें लक्षण होय ३४.

तथा मताः। तांश्चैव चावजानाति तांश्च विनिन्दति ३५ देवार्चनं न कुरुते वृद्धान्गुरून्द्विजांश्च निन्दति। मातापित्रोर्न सत्कारं जामातॄणां करोति च ३६ योगिनां ज्ञानविदुषामन्येषां च महात्मनाम्। प्राप्ते तु काले पुरुषस्तद्विज्ञेयं विचक्षणैः ३७ योगिनां सततं यत्नादरिष्टान्यवनीपते। संवत्सरान्ते तज्ज्ञेयं फलदानि दिवानिशम् ३८ विलोक्या विशदा चैषां फलपङ्क्तिः सुभीषणा। विज्ञाय कार्यो मनसि स च कालो नरेश्वर ३९ ज्ञात्वा कालं च तं सम्यगभयस्थानमाश्रितः। युञ्जीत योगी कालोऽसौ यथा नास्याफलो भवेत् ४० दृष्ट्वारिष्टं तथा योगी त्यक्त्वा मरणजं भयम्। तत्स्वभावं तदालोक्य कालो यावद्विपाकदः ४१ तस्य भागे तथैवाह्नो योगं युञ्जीत योगवित्। पूर्वाह्णे चापराह्णे च मध्याह्ने चापि तद्दिने ४२ यत्र वा रजनीभागे तदरिष्टं निरीक्षितम्। तत्रैव तावद्युञ्जीत यावत्प्राप्तं हि तद्दिनम् ४३ ततस्त्यक्त्वा भयं सर्वं जित्वा तं कालमात्मवान्। तत्रैवावसथे स्थित्वा यत्र वा स्थैर्यमात्मनः ४४ युञ्जीत योगं निर्जित्य त्रीन्गुणान्परमात्मनि। तन्मयश्चात्मना भूत्वा चिद्वृत्तिमपि संत्यजेत् ४५ ततः परमनिर्वाणमतीन्द्रियमगोचरम्। यद्बुद्धेर्यन्न चाख्यातुं शक्यते तत्समश्नुते ४६ एतत्सर्वं समाख्यातं तवालर्क यथार्थवत्। प्राप्स्यसे येन तद्ब्रह्म संक्षेपात्तन्निबोध मे ४७ शशाङ्करश्मिसंयोगाच्चन्द्रकान्तमणिः पयः। समुत्सृजति नायुक्तः सोपमा योगिनः स्मृता ४८ यथार्करश्मिसंयोगादर्ककान्तो हुता-

---

पुरुष ज्यांच्याशीं सर्वदा नम्रपणानें वागत असतो व जे त्याला अत्यंत पूज्य असतात त्यांचीच अपमानपूर्वक निंदा करणें ३५, देवार्चन न करणें, वृद्ध, गुरु, व विप्र ह्यांची निंदा करणें, मातापितर, जावई, योगी व इतरही महात्मे ज्ञानी ह्यांचा सत्कार न करणें हें मृत्यु संनिध आल्याचें लक्षण विवेकी पुरुषांनीं जाणावें ३६, ३७. हे भूपते, रात्रंदिवस सतत यत्न केला असतां हीं अरिष्टें योग्यांना संवत्सरानंतर फल देतात असें समजावें ३८. ही स्पष्ट व भयंकर फलपंक्ति अवलोकन करावी आणि, हे राजा, मनामध्यें त्या मृत्यूची आठवण असूं द्यावी ३९. तो मृत्यु नीट जाणून निर्भय स्थानाचा आश्रय करून योग्यानें समाधि लावून असावें. कारण, मृत्यु ह्याशिवाय कधीं टळत नाहीं ४०. तस्मात्, अरिष्ट दृष्टीं पडल्यावर मरणाचें भय सोडून द्यावें आणि अरिष्टाचें स्वरूप जाणून त्याचें फल येण्याची मुदत संपेपर्यंत ४१ दिवसाच्या ज्या भागांत अरिष्ट समजलें असेल त्याच भागांत योगवेत्त्यानें समाधि लावून असावें. पूर्वाह्ण, अपराह्ण व मध्यान्ह ह्यांपैकीं दिवसाच्या ज्या विभागांत ४२ किंवा त्याचप्रमाणें रात्रीच्या ज्या विभागांत तें अरिष्ट दृष्टीं पडलें असेल त्याच विभागांत तो दिवस येऊन जाईपर्यंत समाधि लावून असावें ४३. तदनंतर सर्व भय सोडून व तो मृत्यु जिंकून जितेंद्रिय योग्यानें त्याचठिकाणीं अथवा जेथें मनाला स्थैर्य प्राप्त होत असेल त्याठिकाणीं ४४ तीन गुणांना जिंकून परमात्म्याचे ठिकाणीं समाधि लावावी आणि मनानें तन्मय होऊन चिद्वृत्तीचाही त्याग करावा ४५. म्हणजे अतींद्रिय आणि मनाला व वाणीला अगोचर असें जें मोक्षसंज्ञक परमनिर्वाण तें त्याला प्राप्त होतें ४६. हे अलर्का, हें सर्व मीं तुला यथार्थ कथन केलें. आतां ज्याच्या योगानें तें ब्रह्म प्राप्त होतें तें संक्षेपतः तूं माझ्यापासून

शनम् । आविष्करोति नैकः सन्नुपमा सापि योगिनः ४९ पिपीलिकाखुनकुलगृहगोधाकपिञ्जलाः । वसन्ति स्वामिवद्गेहे ध्वस्ते यान्ति ततोऽन्यतः ५० दुःखं तु स्वामिनो ध्वंसे तस्य तेषां न किंचन । वेश्मनो यत्र राजेन्द्र सोपमा योगसिद्धये ५१ मृद्देहिकालदेहापि मुखाग्रेणाप्यणीयसा । करोति मृद्धारचयमुपदेशः स योगिनः ५२ पशुपक्षिमनुष्याद्यैः पत्रपुष्पफलान्वितम् । वृक्षं विलुप्यमानं तु दृष्ट्वा सिध्यन्ति योगिनः ५३ रुरुशावविषाणाग्रमालक्ष्य तिलकाकृतिम् । सह तेन विवर्द्धन्तं योगी सिद्धिमवाप्नुयात् ५४ द्रवपूर्णमुपादाय पात्रमारोहतो भुवः । तुङ्गमङ्गं विलोक्योच्चैर्विज्ञातं किं न योगिना ५५ सर्वस्वे जीवनायालं निखाते पुरुषस्य या । चेष्टा तां तत्त्वतो ज्ञात्वा योगिनः कृतकृत्यता ५६ तद्गृहं यत्र वसति तद्भोज्यं येन जीवति । येन संपद्यते चार्थस्तत्सुखं ममतात्र का ५७ अभ्यर्थितोऽपि तैः कार्यं करोति करणैर्यथा । तथा बुद्ध्यादिभिर्योगी पारक्यैः साधयेत्परम् ५८ जड उवाच । ततः प्रणम्यात्रिपुत्रमलर्कः स महीपतिः । प्रश्रयावनतो वाक्यमुवाचातिमुदान्वितः ५९ दिष्ट्या देवैरिदं ब्रह्मन्पराभिभवसंभवम् । उत्पादितमत्युग्रं प्राणसन्देहदं भयम् ६० दिष्ट्या काशिपतेर्भूरि बलसम्पत्पराक्रमः ।

---

एक ४७. चंद्रकिरणसंयोगानें चंद्रकांताला पाझर फुटतात; परंतु, संयोग न झाल्यास पाझर फुटत नाहींत. अशीच योग्याची गोष्ट आहे ४८. सूर्यकिरणांचा संयोग झाल्यास सूर्यकांत अग्नि प्रकट करितो; नाहींतर करीत नाहीं. त्याचप्रमाणें योग्यांचा प्रकार आहे ४९. मुंग्या, उंदीर, मुंगसें, पाली, तित्तिरपक्षी मालकाप्रमाणें घरांत रहात असून घराचा विध्वंस झाल्यावर दुसरीकडे निघून जातात ५०; परंतु, हे राजेंद्रा, त्या घराच्या विध्वंसामुळें मालकालाच दुःख होत असून त्यांना कांहीं एक होत नाहीं, त्याचप्रमाणें देहरूप घराचा विध्वंस झाला असतां दुःख न होणें हेंच योगसिद्धीचें कारण होय ५१. वाळवी शरीरानें जरी अगदीं अल्प असते तरी आपल्या अति सूक्ष्म मुखाग्रानें मातीचा ढीग करून ठेविते; हा उपदेश योग्यानें घ्यावा ५२. पशु, पक्षी, मानव इत्यादिकांच्या योगानें पानें, फुलें व फळें ह्यांनीं युक्त असलेल्या वृक्षाची लूट होत असते; ह्याचा विचार करणारे योगी सिद्धि पावतात ५३. रुरुमृगाच्या पाडसाचें शृंगाग्र तिळाएवढें असून त्याच्या बरोबर वाढत असतें हें पाहून योग्याला सिद्धि प्राप्त होते ५४. द्रवपूर्ण पात्र घेऊन पर्वतावर आरोहण करणाऱ्याला पाहून योग्याला काय बरें समजणें नाहीं ५५ ! सर्वस्व खाड्यांत गेल्यानंतर जीवनाकरितां पुरुषाची जी तडफड होत असते ती तत्त्वतः जाणिल्यानंतर योगी कृतकृत्य होतो ५६. जेथें वास्तव्य होतें तें घर; ज्यानें प्राण वांचतात तें अन्न आणि ज्यानें मनोरथ पूर्ण होतो तें सुख. तेव्हां ह्या प्रपंचात ममत्वबुद्धि पाहिजे कशाला ५७ ? ज्याप्रमाणें एखाद्या कारागिराची प्रार्थना केली असतांही तो वाकस, करणी, इत्यादि अन्यसाधनांनींच कार्य करीत असतो त्याचप्रमाणें योग्यानें परकीयबुद्धिप्रभृतींनीं ब्रह्माची प्राप्ति करून घ्यावी ५८. जड ह्मणतो:—तदनंतर दत्तात्रेयाला प्रणाम करून तो अलर्क राजा आनंदित झाला आणि विनयानें नम्र होऊन ह्मणाला ५९ "हे ब्रह्मन्, परचक्रजन्य व प्राणसंशयप्रद

यद्दुष्टेशादिहायातः स युष्मत्सङ्गदो मम ६१ दिष्ट्या गन्दबलश्चाहं दिष्ट्या भृत्याश्च मे हताः। दिष्ट्या कोपः क्षयं यातो दिष्ट्याहं भीतिमागतः ६२ दिष्ट्या त्वत्पादयुगुळं मम स्मृतिपथं गतम्। दिष्ट्या त्वदुक्तयः सर्वा मम चेतसि संस्थिताः ६३ दिष्ट्या ज्ञानं ममोत्पन्नं भवतश्च समागमात्। भवता चैव कारुण्यं दिष्ट्या ब्रह्मन्कृतं मयि ६४ अनर्थोऽप्यर्थतां याति पुरुषस्य भाग्योदये। तथेदमुपकाराय व्यसनं संगमात्तव ६५ सुबाहुरुपकारी मे स च काशिपतिः प्रभो। तयोः कृतेऽहं संप्राप्तो योगीश भवतोऽन्तिकम् ६६ सोऽहं तव प्रसादाग्निनिर्दग्धाज्ञानकिल्बिषः। तथा यतिष्ये येने दृङ्न भूयां दुःखभाजनम् ६७ परित्यक्ष्ये गार्हस्थ्यमार्तिपादपकाननम्। त्वत्तोऽनुज्ञां समासाद्य ज्ञानदातुर्महात्मनः ६८ दत्तात्रेय उवाच ॥ गच्छ राजेन्द्र भद्रं ते यथा ते कथितं मया। निर्ममो निरहङ्कारस्तथा चर विमुक्तये ६९ जड उवाच ॥ एवमुक्तः प्रणम्यैनमाजगाम त्वरान्वितः। यत्र काशिपतिर्भ्राता सुबाहुश्चास्य सोऽग्रजः ७० समुत्पत्य महाबाहुं सोऽलर्कः काशिभूपतिम्। सुबाहोरग्रतो वीरमुवाच प्रहसन्निव ७१ राज्यकामुक काशीश भुज्यतां राज्यमूर्जितम्। यथा च रोचते तद्वत्सुबाहोः संप्रयच्छ वा ७२ काशिराज उवाच ॥ किमलर्क परित्यक्तं राज्यं ते संयुगं विना। क्षत्रियस्य न धर्मोऽयं भवांश्च क्षत्रधर्मवित् ७३

---

अत्युग्र भय देवांनीं उपस्थित केलें हें भाग्यच समजलें पाहिजे ६०. काशिराजापाशीं असंख्य सैन्य, अनुपम संपत्ति व अतुल पराक्रम आहे हेंही माझें भाग्यच होय. कारण, उच्छेदाकरितां येथें आलेल्या काशिराजानें माझ्यापाशीं आपला समागम करवून दिला ६१. माझें निर्बल सैन्य, भृत्यांचा वध, खजिन्याचा क्षय व मला उत्पन्न झालेली भीति हें सर्व खरोखर मोठें भाग्यच होय ६२. कारण, त्यामुळें आपल्या चरणसंपुटाचें मला स्मरण झालें. आपल्या सर्व उक्ति माझ्या अंतःकरणांत ठसल्या ६३; आपल्या समागमानें मला ज्ञान उत्पन्न झालें आणि, हे ब्रह्मन्, आपण माझ्यावर कृपा केली ६४. पुरुषाच्या भाग्योदयाचा समय आला असतां ज्याप्रमाणें अनर्थ अर्थरूप होतो त्याचप्रमाणें हें संकट आपला समागम झाल्यामुळें मला हितकारकच झालें आहे ६५. हे प्रभो, सुबाहु व तो काशिराज हे उभयतां माझ्यावर उपकारच करणारे आहेत. कारण, हे योगीश्वर, त्यांच्यामुळें मी आपल्या संनिध आलों ६६. तस्मात्, त्वत्प्रसादरूप अग्नीनें माझें अज्ञानरूप किल्बिष दग्ध होऊन गेल्यामुळें, पुनरपि असें दुःखास्पद होण्याचा प्रसंग न येईल असेंच वागण्याचा मी यत्न करीन ६७. सारांश, तुज महात्म्या ज्ञानदात्याची अनुज्ञा घेऊन मी ह्या गार्हस्थ्यरूप दुःखवृक्षवनाचा त्याग करीन" ६८. दत्तात्रेय ह्मणतातः—हे राजेन्द्रा, तुझें कल्याण असो. तूं जा; आणि मी सांगितल्याप्रमाणें मी व माझें ही बुद्धि कोठेंही न ठेवितां वाग; ह्मणजे मुक्त होशील ६९. जड ह्मणतोः—असें दत्तात्रेयांनीं सांगितलें असतां अलर्क त्यांना प्रणाम करून जिकडे काशिराजासह ज्येष्ठ भ्राता सुबाहु होता तिकडे गेला ७०. तो अलर्क महापराक्रमी काशिराजाकडे धांवत गेला आणि सुबाहूचे समोर त्या वीराला हंसत हंसतच कीं काय ह्मणाला ७१ " हे राज्यकामुक काशिराज, तूं ह्या समृद्ध राज्याचा उपभोग घे; किंवा

निर्जितामात्यवर्गस्तु त्यक्त्वा मरणजं भयम् । संदधीत शरं राजा लक्ष्यमुद्दिश्य वैरिणम् ७५ तं जित्वा नृपतिर्भोगान्यथाभिलषितान्वरान् । भुञ्जीत परमं सिद्ध्यै यजेत च महामखैः ७६ अलर्क उवाच ॥ एवमीदृशकं वीर ममाप्यासीन्मनः पुरा । साम्प्रतं विपरीतार्थं शृणु चाप्यत्र कारणम् ७६ यथायं भौतिकः संघस्तथान्तःकरणं नृणाम् । गुणास्तु सकलास्तद्वदशेषेष्वेव जन्तुषु ७७ चिच्छक्तिरेक एवायं यदा नान्योऽस्ति कश्चन । तदा का नृपतेऽज्ञानान्मित्रारिप्रभुभृत्यता ७८ तन्मया दुःखमासाद्य त्वद्भयोद्भवमुत्तमम् । दत्तात्रेयप्रसादेन ज्ञानं प्राप्तं नरेश्वर ७९ निर्जितेन्द्रियवर्गस्तु त्यक्त्वा संगमशेषतः । मनो ब्रह्मणि संधास्ये तज्जये परमो जयः ८० संसाध्यमन्यत्तत्सिद्ध्यै यतः किंचिन्न विद्यते । इन्द्रियाणि च संयम्य ततः सिद्धिं नियच्छति ८१ सोऽहं न तेऽरिर्न ममासि शत्रुः सुबाहुरेषो न ममापकारी । दृष्टं मया सर्वमिदं यथात्मा अन्विष्यतां भूप रिपुस्त्वयान्यः ८२ इत्थं स तेनाभिहितो नरेन्द्रो हृष्टः समुत्थाय ततः सुबाहुः । दिष्ट्येति तं भ्रातरमाभिनन्द्य काशीश्वरं वाक्यमिदं बभाषे ८३ [ २५६७ ] इति श्रीमार्कण्डेयपुराणे अलर्कनिर्वेदो नाम चत्वारिंशोऽध्यायः ॥ ४० ॥

सुबाहुरुवाच ॥ यदर्थं नृपशार्दूल त्वामहं शरणं गतः । तन्मया सकलं प्राप्तं यास्यामि

---

वाटत असल्यास हें सुबाहुला दे ७२. काशिराज ह्मणतोः—हे अलर्का, युद्धाशिवाय तूं राज्य कां सोडिलेंस ? क्षत्रियाचा हा धर्म नाहीं व तूं तर क्षत्रधर्मज्ञ आहेस ७३. अमात्यवर्गाचा जरी पराजय झाला तरी मरणाचें भय न बाळगितां शत्रुरूप निशाणाला उद्देशून राजानें शरसंधान करावें ७४; त्या शत्रूला जिंकून इच्छेप्रमाणें श्रेष्ठ भोग भोगावे आणि अंतःकरणशुद्धीकरितां उत्तम रीतीनें महाक्रतु करावे ७५. अलर्क ह्मणतोः—हे वीरा, पूर्वी माझ्याही मनांत असें होतें; परंतु, सांप्रत तें मला विपरीत वाटत आहे; तूं ह्याचें कारण ऐक ७६. ज्याप्रमाणें हा भूतसंघ आहे त्याचप्रमाणें मनुष्यांचें अंतःकरण (भूतसंघच) आहे. त्याचप्रमाणें सर्व प्राण्यांचे ठिकाणीं सर्व गुणच आहेत ७७. चिच्छक्ति जर एकच असून अन्य मुळींच नाहीं तर, हे राजा, मित्र, शत्रु, प्रभु व भृत्य हें अज्ञानमूलक भिन्नत्व पाहिजे कशाला ७८ ? हे राजा, तुझ्या भयानें मला अतिशय दुःख झालें असतां दत्तात्रेयांच्या प्रसादानें ज्ञान प्राप्त झालें आहे ७९. ह्यास्तव, मी जितेंद्रिय होऊन व सर्व संग सोडून ब्रह्माचे ठिकाणीं मन लावीन. कारण, इंद्रियें जिंकणें हाच मुख्य विजय होय ८०. चित्तैकाग्रतारूप सिद्धि प्राप्त होण्यास दुसऱ्या कशाचीही गरज नाहीं. इंद्रियांचें संयमन केलें असतां ती सिद्धि प्राप्त होते ८१. तस्मात, हे भूपाला, मी तुझा व तूं माझा शत्रु नसून हा सुबाहूही मला अपकार करणारा नव्हे. मला हें सर्व आत्मवत् समजून चुकलें आहे. आतां तूं दुसरा शत्रु हुडकून काढ ८२. ह्याप्रमाणें त्यानें काशिराजाला सांगितलें असतां तो आनंदित झाला. नंतर सुबाहूनें उठून वाहवा ! वाहवा ! ह्मणून त्या भ्रात्याचें अभिनंदन केलें आणि तो काशिराजाला असें ह्मणाला ८३. (२५६७) ह्याप्रमाणें श्रीमार्कंडेयपुराणांतील अलर्कनिर्वेदनामक चाळिसावा अध्याय समाप्त झाला ॥ ४० ॥

त्वं सुखी भव१ काशिराज उवाच ॥ किंनिमित्तं भवान्प्राप्तो निष्पन्नोऽर्थश्च कस्तव । सुबाहो तन्ममाचक्ष्व परं कौतूहलं हि मे २ समाक्रान्तमलर्केण पितृपैतामहं महत् । राज्यं देहीति निर्जित्य त्वयाहमभिचोदितः ३ ततो मया समाक्रम्य राज्यमस्यानुजस्य ते । एतत्ते वर्तमानीतं तद्भुङ्क्ष्व स्वकुलोचितम् ४ सुबाहुरुवाच ॥ काशिराज निबोध त्वं यदर्थमयमुद्यमः । कृतो मया भवांश्चैव कारितोऽत्यन्तमुद्यमम् ५ भ्राता ममायं ग्राम्येषु सक्तो भोगेषु तत्त्ववित् । विमूढौ बोधवन्तौ च भ्रातरावग्रजौ मम ६ तयोर्मम च यन्मात्रा बाल्ये स्तन्यं यथा मुखे । तथावबोधो विन्यस्तः कर्णयोरवनीपते ७ तयोर्मम च विज्ञेयाः पदार्था ये मता नृभिः । प्राकाश्यं मनसो नीतास्ते मात्रा नास्य पार्थिव ८ यथैकमत्ये यातानामेकस्मिन्नवसीदति । दुःखं भवति साधूनां तथास्माकं महीपते ९ गार्हस्थ्यमोहमापन्ने सीदत्यस्मिन्नरेश्वर । संबन्धिन्यस्य देहस्य बिभ्रति भ्रातृकल्पनाम् १० ततो मया विनिश्चित्य दुःखाद्वैराग्यभावना । भविष्यतीत्यस्य भवानित्युद्योगाय संश्रितः ११ तदस्य दुःखाद्वैराग्यं संबोधादवनीपते । समुद्भूतं कृतं कार्यं भद्रं तेऽस्तु व्रजाम्यहम् १२ उष्ट्वा मदालसा गर्भे पीत्वा तस्यास्तथा स्तनम् । नान्यनारीसुतैर्यातं वर्त्म यात्विति पार्थिव १३ विचार्य तन्मया सर्वं युष्मत्संश्रय-

सुबाहु ह्मणतोः— हे नृपश्रेष्ठा, ज्याकरितां मी तुला शरण आलों होतों तें मला सर्व प्राप्त झालें आहे. मी जातों; तूं सुखी हो १. काशिराज ह्मणतोः– हे सुबाहो, तूं कशाकरितां आला होतास ? व तुझा कोणता उद्देश सिद्धीस गेला हें तूं मला सांग; मी अति उत्सुक आहें २. " अलर्कानें वंशपरंपरागत प्रचंड राज्य व ळकाविलें आहे; ह्यास्तव, त्याला जिंकून तूं तें मला दे. " अशी विनंति तूं मला केल्यामुळें ३ मी स्वारी करून तुझ्या कनिष्ठ भ्रात्याचें हें राज्य स्वसामर्थ्यानें आणिलें आहे. तूं ह्या स्वकुलपरंपरागत राज्याचा उपभोग घे ४. सुबाहु ह्मणतोः—हे काशिराजा, ही खटपट मीं कशाकरितां केली व तुझ्याकडून करविली हें तूं ऐक ५. हा माझा भ्राता तत्त्ववेत्ता असूनही मोहित होऊन ग्राम्यभोगांविषयीं आसक्त झालेला आहे; आणि माझे ज्येष्ठ भ्राते ज्ञानसंपन्न आहेत ६. हे भूपते, मुखांत दूध घालण्याप्रमाणें त्यांच्या व माझ्या कानांत मातेनें बोधामृत घातलें आहे ७. त्या उभयतां ज्येष्ठ भ्रात्यांच्या व माझ्या मनाला, मातेनें–पुरुषांना ज्ञेय ह्मणून संमत असलेले पदार्थ– समजावून दिले आहेत; परंतु, हे राजा, ह्याला ते समजावून दिलेले नाहींत ८. हे भूपते, एका मतानें वागणाऱ्या साधूंपैकीं एकाचा नाश होऊं लागला असतां ज्याप्रमाणें इतरांना दुःख होतें त्याप्रमाणें आह्मांला दुःख होत आहे ९. हे राजा, ह्या देहाशीं ज्याचा संबंध आहे असा हा भ्रातृसंज्ञेस पात्र असलेला अलर्क गार्हस्थ्यमोहांत सांपडून बुडूं लागल्यामुळें १० " त्याला दुःखानें वैराग्य होईल " असा माझा निश्चय झाला व ह्मणून मी तुझ्या कडून खटपट करविली ११. हे भूपते, त्याप्रमाणें ह्याला दुःख होऊन बोधामुळें वैराग्य प्राप्त झाल्याकारणानें माझें कार्य झालें आहे. आतां तुझें कल्याण असो; मी जातों १२. हे राजा, मदालसेच्या उदरांत राहून तिचें

पूर्वकम्। कृतं तथापि निष्पन्नं प्रयास्ये सिद्धये पुनः १४ उपेक्ष्यते सीदमानः स्वजनो बान्धवः सुहृद्। यैर्नरेन्द्र न तान्मन्ये सेन्द्रिया विकला हि ते १५ सुहृदि स्वजने बन्धौ समर्थे योऽवसीदति। धर्मार्थकाममोक्षेभ्यो वाच्यास्ते तत्र न त्वसौ १६ एतत्त्वत्सङ्गमाद्भूप मया कार्यं महत्कृतम्। स्वस्ति तेऽस्तु गमिष्यामि ज्ञानभाग्भव सत्तम १७ काशिराज उवाच। उपकारस्त्वया साधोरलर्कस्य कृतो महान्। ममोपकाराय कथं न करोषि स्वमानसम् १८ फलदायी सतां सद्भिः संगमो नाफलो यतः। तस्मात्त्वत्संश्रयायुक्ता मया प्राप्ता समुन्नतिः १९ सुबाहुरुवाच॥ धर्मार्थकाममोक्षाख्यं पुरुषार्थचतुष्टयम्। तत्र धर्मार्थकामास्ते सकलो हीयतेऽपरः २० तत्ते संक्षेपतो वक्ष्ये तदिहैकमनाः शृणु। श्रुत्वा च सम्यगालोच्य यतेथाः श्रेयसे नृप २१ ममेति प्रत्ययो भूप न कार्योऽहमिति त्वया। सम्यगालोच्य धर्मो हि धर्माभावे निराश्रयः २२ को वाहमिति संज्ञेयमित्यालोच्य त्वयात्मना। बाह्यान्तर्गतमालोच्यमालोच्यापररात्रिषु २३ अव्यक्तादिविशेषान्तमविकारमचेतनम्। व्यक्ताव्यक्तं त्वया ज्ञेयं ज्ञाता कश्चाहमित्युत २४ एतस्मिन्नेव विज्ञाते विज्ञातमखिलं त्वया। अनात्मन्यात्मविज्ञानम-

स्तन्य सेवन करून अलर्कानें साधारण स्त्रियांच्या पुत्रांच्या मार्गाचें अनुकरण करूं नये १३. असा विचार मनांत आणून तुझ्या मदतीनें तें सर्व सिद्धीस गेलें आहे. तस्मात्, मी आतां पुनरपि सिद्धीकरितां जातों १४. हे राजा, आपला स्वजन, बांधव व सुहृत् बुडूं लागला असतां जे त्याची उपेक्षा करितात ते इंद्रियसंपन्न नसून पंगु आहेत असें मी समजतों १५. धर्म, अर्थ, काम व मोक्ष ह्यांकरितां जो सुहृद्—स्वजन व बंधु समर्थ असतांना— बुडूं लागतो तो त्याबद्दल निंद्य ठरत नसून ते सुहृदादि निंद्य ठरतात १६. हे भूपते, तुझ्या समागमामुळें माझें हें मोठेंच कार्य झालें आहे; तुझें कल्याण असो; मी जातों. हे सज्जनश्रेष्ठा, तूं ज्ञानी हो १७. काशिराज ह्मणतोः— साधु अलर्कावर तूं मोठा उपकार केला आहेस; परंतु, माझ्यावर उपकार करण्याचें तूं कां मनांत आणीत नाहींस ? १८. सज्जनांचा संतांशीं समागम निष्फळ न होतां सफळच होत असतो. तस्मात्, तुझ्या समागमामुळें माझी उन्नति होणें योग्य आहे १९. सुबाहु ह्मणतोः—धर्म, अर्थ, काम व मोक्ष हे चार पुरुषार्थ असून त्यांपैकीं पहिले तीन तुला प्राप्त झाले आहेत; परंतु, शेवटल्याचा मुळींच पत्ता नाहीं २०. ह्यास्तव, हे राजा, मी संक्षेपतः जें सांगत आहें तें तूं एकाग्र मनानें ऐक; आणि तें ऐकून व त्याचा नीट विचार करून तूं मोक्षार्थ यत्न कर २१. हे राजा, अहंकार व ममता ह्या उभयतांचा तूं त्याग कर; धर्माचा नीट विचार केला पाहिजे. कारण, धर्माचा अभाव झाल्यास कोणताच आधार रहात नाहीं २२. मी ही संज्ञा कोणाला आहे ह्याचा तूं अंतर्बाह्य व्यवहारांत विचार कर आणि पहाटेस तूं ह्याचा विशेष विचार करीत जा २३. अव्यक्तापासून विशेषापर्यंत असलेलें हें स्थूलसूक्ष्म जगत् विकाररहित व अचेतन आहे असें समजून ह्याचा ज्ञाता जो मी तो कोण आहे हें तुला समजलें पाहिजे २४. एवढ्याचेंच ज्ञान झालें असतां तुला सर्व कांहीं समजेल. अनात्म्याचे ठिकाणीं आत्मबुद्धि

स्वे स्वमिति मूढता २५ सोऽहं सर्वगतो भूप लोकसंव्यवहारतः। मयेदमुच्यते सर्वं त्वया पृष्टो व्रजाम्यहम् २६ एवमुक्त्वा ययौ धीमान्सुबाहुः काशिभूमिपम्। काशिराजोऽपि संपूज्य सोऽलर्कं स्वपुरं ययौ २७ अलर्कोऽपि सुतं ज्येष्ठमभिषिच्य नराधिपम्। वनं जगाम संत्यक्तसर्वसङ्गः स्वसिद्धये २८ ततः कालेन महता निर्द्वन्द्वो निष्परिग्रहः। प्राप्य योगर्द्धिमतुलां परं निर्वाणमाप्तवान् २९ पश्यञ्जगदिदं सर्वं सदेवासुरमानुषम्। पाशैर्गुणमयैर्बद्धं वध्यमानं च नित्यशः ३० पुत्रादिभ्रातृपुत्रादिस्वपारक्यादिभावितैः। आकृष्यमाणं करणैर्दुःखार्तं भिन्नदर्शनम् ३१ अज्ञानपङ्कगर्भस्थमनुद्धारं महामतिः। आत्मानं च समुत्तीर्णं गाथामेतामगायत ३२ अहो कष्टं यदस्माभिः पूर्वं राज्यमनुष्ठितम्। इति पश्चान्मया ज्ञातं योगान्नास्ति परं सुखम् ३३ पुत्र उवाच॥ तातैनं त्वं समातिष्ठ मुक्तये योगमुत्तमम्। प्राप्स्यसे येन तद्ब्रह्म यत्र गत्वा न शोचसि ३४ ततोऽहमपि यास्यामि किं यज्ञैः किं जपेन मे। कृतकृत्यस्य करणं ब्रह्मभावाय कल्पते ३५ त्वत्तोऽनुज्ञामवाप्याहं निर्द्वन्द्वो निष्परिग्रहः। प्रयतिष्ये तथा मुक्तौ यथा यास्यामि निर्वृतिम् ३६ पक्षिण ऊचुः॥ एवमुक्त्वा स पितरं प्राप्यानुज्ञां ततश्च सः। ब्रह्मञ्जगाम मेधावी परित्यक्तपरिग्रहः ३७ सोऽपि तस्य पिता तद्वत्क्रमेण सुमहा-

---

व जें स्वकीय नव्हें त्याचे ठिकाणीं ममत्वबुद्धि असणें ही मूढता होय २५. हे भूपाला, मी सर्वव्यापी आहें; परंतु, तूं प्रश्न केल्यामुळें लोकव्यवहारार्थ मी तुला असें सर्व सांगत आहें. आतां मी जातों" २६. असें काशिराजाला सांगून तो विवेकी सुबाहु चालता झाला व काशिराजाही अलर्काचें पूजन करून आपल्या नगराकडे गेला २७. इकडे ज्येष्ठ पुत्राला राज्याभिषेक करून अलर्क निःसंग झाला आणि आत्ममुक्तीकरितां वनांत गेला २८. तदनंतर बराच काळ लोटल्यावर शीतोष्णादि द्वंद्वांची परवा न करितां व कसलाही परिग्रह न करितां तप करणाऱ्या अलर्काला अतुल योगसामर्थ्य प्राप्त झालें व त्यामुळें त्याला उत्कृष्ट मुक्ति मिळाली २९. नंतर देव, असुर व मानव ह्यांनीं युक्त असलेलें हें सर्व जगत गुणमयपाशांनीं बद्ध असून नित्य वध पावत आहे ३०; पुत्र, पुतण्ये इत्यादि स्वकीय व परकीय मानिल्या गेलेल्या लोकांनीं हें खेंचलें जात आहे; भेददर्शनामुळें हें दुःखाकुल झालेलें आहे ३१; आणि अज्ञानपंकांत हें बुडालें असून ह्याचा उद्धार होणें अशक्य आहे असें पाहून स्वतःचा उद्धार झाल्याचें लक्षांत आणून तो ह्मणाला ३२ "अरेरे! पूर्वी आह्मीं राज्य केलें ही गोष्ट फारच वाईट झाली. काय करूं हो! योगापेक्षां उत्कृष्ट सुख नाहीं हें मला मागून समजलें" ३३. पुत्र ह्मणतोः—हे तात, मुक्तीकरितां आपण ह्या उत्कृष्ट योगाचें अवलंबन करा. ह्मणजे आपणाला तें ब्रह्म प्राप्त होईल व तें प्राप्त झाल्यावर आपणांला दुःख होणार नाहीं ३४. असें झाल्यास मी सुद्धां जाईन. यज्ञांशीं व जपाशीं मला काय कर्तव्य आहे! कृतकृत्य मनुष्याचें मन ब्रह्मज्ञानास पात्र होत असतें ३५. सारांश, मी आपल्याचपासून अनुज्ञा घेऊन द्वंद्व व परिग्रह ह्यांचा त्याग करीन आणि मुख्य ह्यारें एतदर्थ मी मुक्तीविषयीं यत्न करीन ३६. पक्षी ह्मणतातः—हे ब्रह्मन्,

मतिः। वानप्रस्थं समास्थाय चतुर्थाश्रममभ्यगात् ३८ तत्रात्मजं समासाद्य हित्वा बन्धं गुणादिकम्। प्राप सिद्धिं परां प्राज्ञस्तत्कालोपात्तसन्मतिः ३९ एतत्ते कथितं ब्रह्मन्यत्पृष्टा भवता वयम्। सविस्तरं यथावच्च किमन्यच्छ्रोतुमिच्छसि ४० यश्चैतच्छृणुयाद्विप्र पठेद्वा सुसमाहितः ४१ यदश्वमेधावभृथस्नातः प्राप्नोति वै फलम्। सकलं तदवाप्नोति श्रुत्वैतन्मुनिसत्तम ४२ एतत्संसारभ्रमणपरित्राणमनुत्तमम्। अलर्कात्रेयसंवादमशुभान्मुच्यते नरः ४३ [२६००]
इति श्रीमार्कण्डेयपुराणे पितापुत्रसंवादे जडोपाख्याने एकचत्वारिंशोऽध्यायः ॥ ४१ ॥

जैमिनिरुवाच ॥ सम्यगेतन्ममाख्यातं भवद्भिर्द्विजसत्तमाः। प्रवृत्तं च निवृत्तं च द्विविधं कर्म वैदिकम् १ अहो पितृप्रसादेन भवतां ज्ञानमीदृशम्। येन तिर्यक्त्वमप्येतत्प्राप्य मोहस्तिरस्कृतः २ धन्या भवन्तः संसिद्धौ प्रागवस्थास्थितं यतः। भवतां विषयोद्भूतैर्न मोहैश्चाल्यते मनः ३ दिष्ट्या भगवता तेन मार्कण्डेयेन धीमता। भवन्तो वै समाख्याताः सर्वसन्देहहृत्क्षमाः ४ संसारेऽस्मिन्मनुष्याणां भ्रमतामतिसङ्कटे। भवद्विधैः समं सङ्गो जायते नातपस्विनाम् ५ यदहं सङ्गमासाद्य भवद्भिर्ज्ञानदृष्टिभिः। न स्यां कृतार्थस्तन्नूनं न मेऽन्यत्र कृतार्थता ६ प्रवृत्ते च निवृत्ते च भवतां ज्ञानकर्मणि। मतिमस्तमलां मन्ये यथा नान्यस्य कस्यचित् ७

---

असें पित्याला सांगून व त्याची अनुज्ञा घेऊन कसलाही स्वीकार न करितां तो विवेकी चालता झाला ३७. त्याचप्रमाणें त्याचा पिताही महाविचारी असल्यामुळें क्रमानें वानप्रस्थाश्रम स्वीकारून नंतर चतुर्थाश्रमी झाला ३८. तेव्हां त्या आश्रमामध्यें पुत्राची गांठ पडतांक्षणीं ज्ञानप्राप्ति झाल्यावर गुणादि बंधनांचा त्याग होऊन त्या प्राज्ञ पित्याला उत्कृष्ट सिद्धि प्राप्त झाली ३९. हे ब्रह्मन्, आपण जें आह्मांला विचारिलें तें आपणांला इत्थंभूत सविस्तर कथन केलें आहे. आतां दुसरें काय श्रवण करण्याची आपली इच्छा आहे? ४०. हे मुनिश्रेष्ठा, हे विप्र, स्वस्थ मनानें हें श्रवण व पठण करणाऱ्याला अश्वमेधयागाच्या अवभृथस्नानाचें सर्व फल प्राप्त होतें ४१, ४२. ह्या संसारभ्रमणापासून रक्षण करणारा हा अलर्कदत्तात्रेयसंवाद ऐकिला असतां पुरुष पापापासून मुक्त होतो ४३. [२६००] ह्याप्रमाणें श्रीमार्कंडेयपुराणांतर्गत पितापुत्रसंवादांतील जडोपाख्यानाविषयीं एकेचाळिसावा अध्याय समाप्त झाला ॥४१॥

जैमिनि ह्मणतातः—हे पक्षिश्रेष्ठ, प्रवृत्त व निवृत्त असें हें द्विविध वैदिक कर्म आपण मला चांगलें कथन केलें १. अहो, पित्याच्या कृपेनें तुह्मांला अशाप्रकारचें ज्ञान प्राप्त झालें आहे व त्यामुळें तुह्मी मोहाचा त्याग केला आहे २. पूर्वजन्माचें स्मरण असलेलें तुमचें मन विषयजन्य मोहांमुळें चंचल न होतां मुक्तीकडे ज्याअर्थी वळत आहे त्याअर्थी तुह्मी धन्य आहांत ३. त्या विवेकी भगवान् मार्कंडेयमुनींनीं सर्वसंशयनाशक ह्मणून तुमचा निर्देश केला हें माझें भाग्य होय ४. ह्या अतिदुःखदायक संसारामध्यें भटकत असलेल्या मनुष्यांना तुमच्या सारख्याचा समागम तपश्चर्येशिवाय दुर्लभ होय ५. तुह्मां ज्ञानवानांचा समागम होऊनही जर मी कृतार्थ न होईन तर खरोखर मी कोठेंच कृतार्थ होणार नाहीं ६. प्रवृत्तिमार्गविषयक व निवृत्तिमार्गविषयक ज्ञान कर्मा-

यदि स्वल्पमहवती मयि बुद्धिर्द्विजोत्तमाः। भवतां तत्समाख्यातुमर्हतेदमशेषतः ८ कथमेतत्समुद्भूतं जगत्स्थावरजङ्गमम् । कथं च प्रलयं काले पुनर्यास्यति सत्तमाः ९ कथं च वंशा देवर्षिपितृभूतादिसम्भवाः। मन्वन्तराणि च कथं वंशानुचरितं च यत् १० यावत्यः सृष्टयश्चैव यावन्तः प्रलयास्तथा । यथाकल्पविभागश्च या च मन्वन्तरस्थितिः ११ यथा च क्षितिसंस्थानं यत्प्रमाणं च वै भुवः। यथास्थितिसमुद्रादिनिम्नगाः काननानि च १२ भूर्लोकादिश्च लोकानां गणः पातालसंश्रयः । गतिस्तथार्कसोमादिग्रहर्क्षज्योतिषामपि १३ श्रोतुमिच्छाम्यहं सर्वमेतदाभूतसंप्लवम्। उपसंहृते च यच्छेषं जगत्यस्मिन्भविष्यति १४ पक्षिण ऊचुः॥ प्रश्नभारोऽयमतुलो यस्त्वया मुनिसत्तम । पृष्टस्तं ते प्रवक्ष्यामस्तच्छृणुष्वेह जैमिने १५ मार्कण्डेयेन कथितं पुरा क्रौष्टुकये यथा । द्विजपुत्राय शान्ताय व्रतस्नाताय धीमते १६ मार्कण्डेयं महात्मानमुपासीनं द्विजोत्तमैः । क्रौष्टुकिः परिपप्रच्छ यदेतत्पृष्टवान्प्रभो १७ तस्य चाकथयत्प्रीत्या यन्मुनिर्भृगुनन्दनः। तत्ते प्रकथयिष्यामः शृणु त्वं द्विजसत्तम१८ प्रणिपत्य जगन्नाथं पद्मयोनिं पितामहम् । जगद्योनिं स्थितं सृष्टौ स्थितौ विष्णुस्वरूपिणम् । प्रलये चान्तकर्तारं रौद्रं रुद्रस्वरूपिणम् १९ मार्कण्डेय उवाच ॥ उत्पन्नमात्रस्य पुरा ब्रह्मणोऽव्यक्तजन्मनः। पुराणमेतद्वेदाश्च मुखेभ्योऽनुविनिःसृताः २० पुराणसंहिताश्चक्रुर्बहुलाः परमर्षयः । वेदानां प्रविभागश्च कृतस्तैस्तु सहस्रशः २१ धर्मज्ञानं च वैराग्यमैश्वर्यं च महात्मनः। तस्योपदेशेन विना सहसिद्धं चतुष्टयम् २२ वेदान्सप्तर्षयस्त-

---

संबंधानें तुमच्यासारखी कोणाचीही निर्मल मति नाहीं असें मला वाटतें ७. हे पक्षिश्रेष्ठ, माझ्यावर तुह्मांला जर अनुग्रह कर्तव्य असेल तर मला हें सर्व सांगा ८. हे सज्जनश्रेष्ठ, ह्या चराचर जगताची उत्पत्ति व नाश ९, देव, ऋषि, पितर, भूतें इत्यादिकांचे वंश, मन्वंतरें सदहू वंशांतील पुरुषांचें चरित्र १०, सृष्टि व प्रलय ह्यांचे प्रकार, कल्पविभाग, मन्वंतर स्थिति ११, भूमिसंस्थान, भूमीचें प्रमाण, समुद्र, नद्या, वनें, भूरादि१२लोक, पातालांतील प्राणिगण आणि सूर्य, चंद्र इत्यादि ग्रह, नक्षत्रें व तारका ह्यांची १३ गति हें सर्व प्रलयापर्यंत ऐकण्याची व प्रलयानंतर ह्या जगतात काय अवशिष्ट राहतें तें ऐकण्याची माझी इच्छा आहे १४. पक्षी ह्मणतात:— हे मुनिश्रेष्ठ जैमिने, हा तूं मोठाच अनुपम प्रश्न केला आहेस; त्याचें उत्तर आह्मी सांगतों तें ऐक १५. पूर्वी क्रौष्टुकिसंज्ञक, शांत, व्रतस्नात व बुद्धिमान् द्विजपुत्राला मार्कंडेयांनीं हें उत्तर सांगितलें आहे १६. हे प्रभो, द्विजश्रेष्ठांसह महात्मे मार्कंडेयमुनि बसले असतां, तूं विचारिलेलाच प्रश्न क्रौष्टुकीनें विचारिला १७. तेव्हां, हे द्विजश्रेष्ठ, त्या भृगुनंदन मुनींनीं जें उत्तर प्रेमानें त्याला सांगितलें तें—सृष्टि, स्थिति व प्रलय करण्याकरितां अनुक्रमें ब्रह्मा, विष्णु व महेश्वर ह्यांचें स्वरूप धारण करणाऱ्या जगदीशाला प्रणिपात करून—आह्मी सांगत आहों; तूं ऐक१८, १९. मार्कंडेय ह्मणतातः— पूर्वी अव्यक्तापासून जन्म पावणारा ब्रह्मदेव उत्पन्न होतांक्षणीं त्याच्या मुखापासून हें पुराण व वेद निघाले २०. अनेक महर्षींनीं पुराणसंहिता केल्या असून

स्माजगृहुस्तस्य मानसाः । पुराणं जगृहुश्चाद्या मुनयस्तस्य मानसाः २३ भृगोः सकाशा-
च्च्यवनस्तेनोक्तं च द्विजन्मनाम् । ऋषिभिश्चापि दक्षाय प्रोक्तमेतन्महात्मभिः २४ दक्षेण
चापि कथितमिदमासीत्तदा मम । तत्तुभ्यं कथयाम्यद्य कलिकल्मषनाशनम् २५ सर्वमे-
तन्महाभाग श्रूयतां मे समाधिना । यथाश्रुतं मया पूर्वं दक्षस्य गदतो मुने २६ प्रणिपत्य
जगद्योनिमजमव्ययमाश्रयम् । चराचरस्य जगतो धातारं परमं पदम् २७ ब्रह्माणमादि-
पुरुषमुत्पत्तिस्थितिसंयमे । यत्कारणमनौपम्यं यत्र सर्वं प्रतिष्ठितम् २८ तस्मै हिरण्यगर्भाय
लोकतन्त्राय धीमते । प्रणम्य सम्यग्वक्ष्यामि भूतवर्गमनुत्तमम् २९ महदाद्यं विशेषान्तं
सवैरूप्यं सलक्षणम् । प्रमाणैः पञ्चभिर्गम्यं स्रोतोभिः षड्भिरन्वितम् ३० पुरुषाधिष्ठितं
नित्यमनित्यमिव च स्थितम् । तच्छ्रूयतां महाभाग परमेण समाधिना ३१ प्रधानं कारणं
यत्तदव्यक्ताख्यं महर्षयः । यदाहुः प्रकृतिं सूक्ष्मां नित्यां सदसदात्मिकाम् ३२ ध्रुवमक्षय्य-
मजरममेयं नान्यसंश्रयम् । गन्धरूपरसैर्हीनं शब्दस्पर्शविवर्जितम् ३३ अनाद्यन्तं जगद्योनिं
त्रिगुणप्रभवाप्ययम् । असाम्प्रतमविज्ञेयं ब्रह्माग्रे समवर्तत ३४ प्रलयस्याद्य तेनेदं व्याप्त-
मासीदशेषतः । गुणसाम्यात्ततस्तस्मात्क्षेत्रज्ञाधिष्ठितान्मुने ३५ गुणभावात्सृज्यमानात्सर्ग-
काले ततः पुनः । प्रधानं तत्त्वमुद्भूतं महान्तं तत्समावृणोत् ३६ यथा बीजं त्वचा तद्वदव्यक्ते-

---

त्यांनीं वेदांचा सहस्रशः विभाग केलेला आहे २१. धर्म, ज्ञान, वैराग्य व ऐश्वर्य हें चतु-
ष्टय त्या महात्म्या ब्रह्मदेवाला उपदेशावांचून स्वाभाविकच प्राप्त झालेलें आहे २२.
सप्त ऋषि व आद्य मुनि हे त्याचे मानसपुत्र असून त्यांनीं त्याच्यापासून वेद व पुराण
ग्रहण केलें २३. भृगूपासून च्यवनाला हें प्राप्त झालें; त्यानें द्विजांना कथन केलें;
महात्म्या ऋषींनीं हें दक्षाला ऐकविलें २४ आणि दक्षानें हें मला कथन केलें. तें
कलिमलनाशक आज मी तुह्मांला कथन करितों २५. हे महाशय, एकाग्र अंतःकर-
णानें हें सर्व आपण ऐका. हे मुने, दक्षाच्या मुखांतून पूर्वी जसें मीं ऐकिलें आहे तसें
सांगतों २६. विश्वयोनि, अज, अव्यय, चराचर जगताचा आश्रय, धाता व परमपद
आणि उत्पत्ति, स्थिति व प्रलय ह्यांचें अनुपम कारण व सर्वाधारभूत जो आदिपुरुष
ब्रह्मा त्याला प्रणिपात करून २७,२८ ह्मणजे त्या जगदुत्पादक ज्ञानवान् हिरण्य-
गर्भाला नमस्कार करून उत्कृष्ट भूतवर्ग मी कथन करितों २९. याच प्रमाणांनीं सम-
जणारें, सहा स्रोतांनीं युक्त, रूप व लक्षण ह्यांनीं संपन्न व नित्यानित्यवत् स्थिति अस-
लेलें जें महदादि विशेषांत तें, हे महाशय, चित्त अगदीं एकाग्र करून ऐका ३०,
३१. अव्यक्तसंज्ञक जें प्रधान कारण त्याला महर्षि सदसद्रूप, नित्य व सूक्ष्मप्रकृति
ह्मणतात ३२. असो. ध्रुव, अक्षय्य, जरारहित, अतर्क्य, दुसऱ्याच्या आधारानें नस-
लेलें, शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध ह्यांनीं रहित ३३, अनादि, अनंत, विश्वयोनि,
तीन गुणांच्या उत्पत्तीचें व लयाचें कारण, लोकोत्तर व अज्ञेय असें . ब्रह्मच सृष्टीचे
पूर्वी होतें ३४. प्रलयानंतर त्यानें हें सर्व व्यापिलेलें होतें. हे मुने, नंतर त्याच्यापासून
ह्मणजे क्षेत्रज्ञाधिष्ठित गुणसाम्यापासून ३५ गुणभावाची सृष्टि सृष्टिकालीं होऊं

मावृतो महान्। सात्त्विको राजसश्चैव तामसश्च त्रिधोदितः ३७ ततस्तस्मादहङ्कारस्त्रिविधो वै व्यजायत। वैकारिकस्तैजसश्च भूतादिश्च स तामसः ३८ महता चावृतः सोऽपि यथा व्यक्तेन वै महान्। भूतादिस्तु विकुर्वाणः शब्दतन्मात्रकं ततः ३९ ससर्ज शब्दतन्मात्रादाकाशं शब्दलक्षणम्। आकाशं शब्दमात्रं तु भूतादिश्चावृणोत्ततः ४० स्पर्शतन्मात्रमेवेह जायते नात्र संशयः। बलवाञ्जायते वायुस्तस्य स्पर्शगुणो मतः ४१ वायुश्चापि विकुर्वाणो रूपमात्रं ससर्ज ह। ज्योतिरुत्पद्यते वायोस्तद्रूपगुणमुच्यते ४२ स्पर्शमात्रस्तु वै वायू रूपमात्रं समावृणोत्। ज्योतिश्चापि विकुर्वाणं रसमात्रं ससर्ज ह ४३ संभवन्ति ततो ह्यापश्चासन्वै ता रसात्मिकाः। रसमात्रं तु ता ह्यापो रूपमात्रं समावृणोत् ४४ आपश्चापि विकुर्वन्त्यो गन्धमात्रं ससर्जिरे। संघातो जायते तस्मात्तस्य गन्धो गुणो मतः ४५ तस्मिंस्तस्मिंस्तु तन्मात्रं तेन तन्मात्रता स्मृता। अविशेषवाचकत्वादविशेषास्ततश्च ते ४६ न शान्ता नापि घोरास्ते न मूढाश्चाविशेषतः। भूततन्मात्रसर्गोऽयमहङ्कारात्तु तामसात् ४७ वैकारिकादहंकारात्सत्त्वोद्रिक्तात्तु सात्त्विकात्। वैकारिकः स सर्गस्तु युगपत्संप्रवर्तते ४८ बुद्धीन्द्रियाणि पञ्चैव पञ्च कर्मेन्द्रियाणि च। तैजसानीन्द्रियाण्याहुर्देवा वैकारिका दश ४९ एकादशं मनस्तत्र देवा वैकारिकाः स्मृताः।

---

लागली असतां प्रधानतत्त्व प्रकट झालें व त्यानें महत्तत्त्व व्यापून टाकिलें ३६. त्वचेनें व्याप्त असलेल्या बीजाप्रमाणें अव्यक्तानें महत्तत्त्व व्यापिलें. सात्त्विक, राजस व तामस असा ३७ त्रिविध अहंकार त्यापासून उत्पन्न झाला. त्याला अनुक्रमें वैकारिक, तैजस व भूतादि असें ह्मणतात ३८. अव्यक्तानें ज्याप्रमाणें महत्तत्त्व व्यापिलेलें आहे त्याचप्रमाणें तो अहंकारही महत्तत्त्वानें व्यापिलेला आहे. भूतादि अहंकार विकारयुक्त होऊं लागला असतां त्याच्यापासून शब्दतन्मात्र उत्पन्न झालें ३९ आणि शब्दतन्मात्रापासून शब्दगुणसंपन्न आकाश उत्पन्न झालें. आकाशाला शब्दतन्मात्रानें व भूतादीनें व्यापिलें आहे ४०. त्यापासून स्पर्शतन्मात्र निःसंशय उत्पन्न होत असतें आणि त्या स्पर्शतन्मात्रापासून स्पर्शगुणसंपन्न बलवान् वायु उत्पन्न होत असतो ४१. वायु विकारयुक्त होऊं लागला असतां रूपतन्मात्र होतें; आणि वायुजन्य रूपतन्मात्रापासून रूपगुणसंपन्न तेज उत्पन्न होत असतें ४२. स्पर्शतन्मात्रानें वायूला व रूपतन्मात्राला व्यापिलेलें आहे. तेज विकारयुक्त होऊं लागलें असतां रसतन्मात्र उत्पन्न करितें ४३ व त्यापासून रसगुणसंपन्न उदक उत्पन्न होत असतें. रूपतन्मात्रानें रसतन्मात्र व तें उदक व्यापिलें आहे ४४. उदक विकारयुक्त होऊं लागलें असतां गंधतन्मात्र उत्पन्न झालें; त्याच्यापासून पृथ्वीरूप घनद्रव्य उत्पन्न झालें; गंध हा त्या द्रव्याचा गुण होय ४५. त्या त्या भूतांचे ठिकाणीं तन्मात्र असल्यामुळें तन्मात्रता आणि अविशेष वाचक असल्यामुळें अविशेष अशी संज्ञा त्यांना प्राप्त झालेली आहे ४६. तें अविशेष असल्यामुळें शांत नाहीं, घोर नाहीं व मूढही नाहीं. ही भूततन्मात्रसृष्टि तामस अहंकारापासून आहे ४७. सत्त्वगुणाचें आधिक्य असल्यामुळें सात्त्विक ह्मणजे जो वैकारिक अहंकार त्याच्यापासून वैकारिक सृष्टि बरोबर प्रवृत्त होत असते ४८. पांच ज्ञानेंद्रियें व पांच कर्मेंद्रियें

श्रोत्रं त्वक्चक्षुषी जिह्वा नासिका चैव पञ्चमी ५० शब्दादीनामवाप्त्यर्थं बुद्धियुक्तानि वक्ष्यते। पादौ पायुरुपस्थश्च हस्तौ वाक्पञ्चमी भवेत् ५१ गतिर्विसर्गो ह्यानन्दः शिल्पं वाक्यं च कर्म तत्। आकाशं शब्दमात्रं तु स्पर्शमात्रं समाविशत् ५२ द्विगुणो जायते वायुस्तस्य स्पर्शो गुणो मतः। रूपं तथैवाविशतः शब्दस्पर्शगुणावुभौ ५३ त्रिगुणस्तु ततश्चाग्निः स शब्दस्पर्शरूपवान्। शब्दः स्पर्शश्च रूपं च रसमात्रं समाविशन् ५४ तस्माच्चतुर्गुणा ह्यापो विज्ञेयास्ता रसात्मिकाः। शब्दः स्पर्शश्च रूपं च रसो गन्धं समाविशत् ५५ संहता गन्धमात्रेण आवृण्वंस्ते महीमिमाम्। तस्मात्पञ्चगुणा भूमिः स्थूला भूतेषु दृश्यते ५६ शान्ता घोराश्च मूढाश्च विशेषास्तेन ते स्मृताः। परस्परानुप्रवेशाद्धारयन्ति परस्परम् ५७ भूमेरन्तास्त्विमं सर्वं लोकालोकं घनावृतम्। विशेषाश्चेन्द्रियग्राह्या नियतत्वाच्च ते स्मृताः ५८ गुणं पूर्वस्य पूर्वस्य प्राप्नुवन्त्युत्तरोत्तरम्। नानावीर्याः पृथग्भूताः सप्तैते संहतिं विना ५९ नाशक्नुवन्प्रजाः स्रष्टुमसमागम्य कृत्स्नशः। समेत्यान्योन्यसंयोगमन्योन्याश्रयिणश्च ते ६० एकसंघातचिह्नाश्च संप्राप्यैकदमशेषतः। पुरुषाधिष्ठितत्वाच्च अव्यक्तानुग्रहेण च ६१ महदाद्या विशेषान्ता ह्यण्डमुत्पादयन्ति ते। जलबुद्बुदवत्तत्र क्रमाद्वै वृद्धिमागतम् ६२ भूतेभ्योऽण्डं महाबुद्धे बृहत्तदुदकेशयम्। प्राकृतेऽण्डे

हीं तैजस होत आणि हींच दहा वैकारिक देव होत ४९. मन हें अकरावें इंद्रिय आहे व देव वैकारिक आहेत. श्रोत्र, त्वचा, चक्षु, जिव्हा व नासिका हीं ५० शब्दादि विषयांचा उपभोग घेणारीं ज्ञानेंद्रियें होत. पाद, गुद, जननेंद्रिय, हात व वाणी ५१ हीं कर्मेंद्रियें असून गति, विसर्ग, आनंद, शिल्प व भाषण हे त्यांचे विषय होत. शब्दतन्मात्र आकाश, स्पर्शतन्मात्रामध्यें प्रविष्ट झालें असतां ५२ द्विगुण वायु उत्पन्न होतो, त्याचा स्पर्श हा गुण होय. त्याचप्रमाणें शब्द व स्पर्श हे दोन गुण रूपतन्मात्रामध्यें प्रविष्ट झाले असतां ५३ त्यापासून शब्द, स्पर्श व रूप ह्या तीन गुणांनीं युक्त असा अग्नि उत्पन्न होतो. शब्द, स्पर्श व रूप हीं रसतन्मात्रामध्यें प्रविष्ट झालीं असतां ५४ त्यापासून चतुर्गुण उदक उत्पन्न होतें; तें रसात्मक आहे. शब्द, स्पर्श, रूप व रस ह्यांचा गंधतन्मात्रामध्यें प्रवेश झाला असतां ५५ गंधतन्मात्राशीं तीं मिळून जातात आणि ही पृथ्वी व्याप्त करितात. ह्मणून भूतांचे ठिकाणीं भूमि पांच गुणांनीं युक्त व स्थूल दिसते ५६. शांत, घोर व मूढ असें भिन्नत्व असल्यामुळें त्यांना विशेष ह्मणतात. परस्परांमध्यें प्रवेश असल्यामुळें ते परस्परांना धारण करीत असतात ५७. भूमीमध्यें घनद्रव्यानें व्याप्त असलेल्या ह्या सर्व दृश्य व अदृश्य प्रदेशाला त्यांनीं व्यापिलें आहे. त्यांचें विशिष्ट इंद्रियांनीं नियमानें ग्रहण होत असल्यामुळें त्यांना विशेष ह्मणतात ५८. पुढल्या पुढल्या तत्त्वाला पूर्वीच्या पूर्वीच्या तत्त्वांचे गुण प्राप्त होत असतात. भिन्न भिन्न सामर्थ्यानें युक्त असलेल्या ह्या भिन्न भिन्न सात तत्त्वांना संघाताशिवाय ५९ ह्मणजे सर्वस्वी एकत्र झाल्याशिवाय प्रजा उत्पन्न करितां येईना. ह्यास्तव, अन्योन्यसंयुक्त व अन्योन्याश्रयी ६० असलेलीं तीं तत्त्वें सर्वस्वी एक होऊन संघातलक्षणांनीं युक्त झालीं. पुरुषाधिष्ठित असल्यामुळें व परमात्म्याच्या अनुग्रहामुळें ६१ मह-

विवृद्धः तन्क्षेत्रज्ञो ब्रह्मसंज्ञितः ६३ स वै शरीरी प्रथमः स वै पुरुष उच्यते। आदिकर्ता च भूतानां ब्रह्माग्रे समवर्तत ६४ तेन सर्वमिदं व्याप्तं त्रैलोक्यं स चराचरम्। मेरुस्तस्या-नुसंभूतो जरायुश्चापि पर्वताः ६५ समुद्रा गर्भसलिलं तस्याण्डस्य महात्मनः। तस्मिन्नण्डे जगत्सर्वं सदेवासुरमानुषम् ६६ द्वीपायद्रिसमुद्राश्च सज्योतिर्लोकसंग्रहः। जलानिलान-लाकाशैस्ततो भूतादिना बहिः ६७ वृतमण्डं दशगुणैरेकैकत्वेन तैः पुनः। महता तत्प्रमा-णेन सहैवानेन वेष्टितः ६८ महांस्तैः सहितः सर्वैरव्यक्तेन समावृतः। एभिरावरणैरण्डं सप्तभिः प्राकृतैर्वृतम् ६९ अन्योन्यमावृत्य च ता अष्टौ प्रकृतयः स्थिताः। एषा सा प्रकृतिर्नित्या तदन्तः पुरुषश्च सः ७० ब्रह्माख्यः कथितो यस्ते समासाच्छ्रूयतां पुनः। यथा मग्नो जले कश्चिदुन्मज्जञ्ज-लसम्भवम् ७१ वलयं क्षिपति ब्रह्मा स तथा प्रकृतिर्विभुः। अव्यक्तं क्षेत्रमुद्दिष्टं ब्रह्मा क्षेत्रज्ञ उच्यते ७२ एतत्समस्तं जानीयात्क्षेत्रक्षेत्रज्ञलक्षणम्। इत्येष प्राकृतः सर्गः क्षेत्रज्ञाधिष्ठितस्तु सः। अबुद्धिपूर्वः प्रथमः प्रादुर्भूतस्तडिद्यथा ७३ ( २६७३ ) इति श्रीमार्कण्डेयपुराणे ब्रह्मो-त्पत्तिर्नाम द्विचत्वारिंशोऽध्यायः ॥ ४२ ॥

क्रौष्टुकिरुवाच ॥ भगवंस्त्वण्डसंभूतिर्यथावत्कथिता मम। ब्रह्माण्डे ब्रह्मणो जन्म तथोक्तं महात्मनः १ एतदिच्छाम्यहं श्रोतुं त्वत्तो भृगुकुलोद्भव। यदा न सृष्टिर्भूतानामस्ति किं

---

दादि विशेषांत तत्त्वें पाण्याच्या बुडबुड्याप्रमाणें अंड उत्पन्न करितात व क्रमानें तें वृद्धिंगत होतें ६२. हे महाप्राज्ञ, भूतांपासून तें उदकांत राहणारें मोठें अंड उत्पन्न होतें व तो ब्रह्मसंज्ञक क्षेत्रज्ञ त्या प्राकृत अंडामध्यें वृद्धिंगत होतो ६३; तोच प्रथम शरीरी व तोच पुरुष होय. तो भूतांचा आद्यकर्ता ब्रह्मा प्रथम उत्पन्न होतो ६४. त्यानें हें सर्व चराचर त्रैलोक्य व्यापिलें आहे. त्याच्या नंतर मेरु, जरायु व पर्वत उत्पन्न झाले ६५. त्या महात्म्या अंडाचे समुद्र हें गर्भोदक होय. त्या अंडामध्यें देव, असुर व मानव ह्यांसह सर्व जगत् आहे ६६. आणि द्वीपें, पर्वत, समुद्र व नक्षत्रांसह लोकही आहेत. उदक, अग्नि, वायु, आकाश व भूतादि ह्या उत्तरोत्तर दश गुणित असलेल्या आवरणांनीं तें अंड व्याप्त झालेलें आहे ६७, ६८. भूतादि अहंकार दशगुणित महत्तत्त्वानें वेष्टि-लेला असून त्या उदकप्रभृति सर्व आवरणांसह असलेलें महत्तत्त्व दशगुणित अव्य-क्तानें व्यापिलें आहे. ह्या सात प्राकृत आवरणांनीं अंड व्याप्त आहे ६९. परस्पर व्यापून राहिलेल्या ह्या आठ प्रकृति होत. ही प्रकृति नित्य असून तुला सांगितलेला ब्रह्मसं-ज्ञक पुरुष तिच्यामध्यें असतो. आतां पुनरपि संक्षेपतः श्रवण कर. ज्याप्रमाणें उदकांत बुडी मारिलेला कोणी प्राणी उसळीनें वर येऊं लागला असतां उदकाचें कडें ७०, ७१ सभोंवतीं पसरतो त्याप्रमाणें प्रभु ब्रह्मदेव प्रकृति पसरतो. अव्यक्त हें क्षेत्र असून ब्रह्मा क्षेत्रज्ञ होय ७२. हें सर्व क्षेत्रक्षेत्रज्ञलक्षण जाणावें. हा प्राकृत सर्ग क्षेत्रज्ञानें अधिष्ठित आहे व विद्युल्लतेप्रमाणें हा अबुद्धिपूर्वक प्रथमच उत्पन्न झालेला आहे ७३. ह्याप्रमाणें श्रीमार्कंडेयपुराणांतील ब्रह्मोत्पत्तिनामक बेचाळिसावा अध्याय समाप्त झाला ॥ ४२ ॥

क्रौष्टुकि ह्मणतोः—हे भगवन्, अंडोत्पत्ति व अंडामध्यें महात्म्या ब्रह्मदेवाचा जन्म

नु न चास्ति वा । काले वै प्रलयास्यान्ते सर्वस्मिन्नुपसंहृते २ मार्कण्डेय उवाच ॥ यदा तु प्रकृतौ याति लयं विश्वमिदं जगत्। तदोच्यते प्राकृतोऽयं विद्वद्भिः प्रतिसंचरः ३ स्वात्मन्यवस्थितेऽव्यक्ते विकारे प्रतिसंहृते । प्रकृतिः पुरुषश्चैव साधर्म्येणावतिष्ठतः ४ तदा तमश्च सत्त्वं च समत्वेन गुणौ स्थितौ। अनुद्रिक्तावनूनौ च ओतप्रोतौ परस्परम् ५ तिलेषु वा यथा तैलं घृतं पयसि वा स्थितम्। तथा तमसि सत्त्वे च रजोऽप्यनुसृतं स्थितम् ६ उत्पत्तिर्ब्रह्मणो यावदायुर्वै द्विपरार्द्धकम् ।तावद्दिनं परेशस्य तत्समा संयमे निशा ७ (अष्टौ युगसहस्राणि अहोरात्रं प्रजापतेः । अनेनैव तु मानेन शतं ब्रह्मा स जीवति । पितामहशतेनैव विष्णोर्मानं विधीयते । निमेषार्धेन शंभोस्तु सहस्राणि चतुर्दश । विनश्यन्ति तथा विष्णोरसंख्याताः पितामहाः ) अहर्मुखे प्रबुद्धस्तु जगदादिरनादिमान् । सर्वहेतुरचिन्त्यात्मा परः कोऽप्यपरक्रियः ८ प्रकृतिं पुरुषं चैव प्रविश्याशु जगत्पतिः । क्षोभयामास योगेन परेण परमेश्वरः ९ यथा मदो नवस्त्रीणां यथा वा माधवानिलः । अनुप्रविष्टः क्षोभाय तथासौ योगमूर्तिमान् १० प्रधाने क्षोभ्यमाणे तु स देवो ब्रह्मसंज्ञितः । समुत्पन्नोऽण्डकोशस्थो यथा ते कथितं मया ११ स एव क्षोभकः पूर्वं स क्षोभ्यः प्रकृतेः पतिः । स संकोचविकाशाभ्यां प्रधानत्वेऽपि संस्थितः १२ उत्पन्नः स जगद्योनिरगुणोऽपि रजोगुणम् । भुञ्जन्प्रवर्तते सर्गे ब्रह्मत्वं समुपाश्रितः १३ ब्रह्मत्वे स प्रजाः सृष्ट्वा ततः सत्त्वातिरेकवान् । विष्णुत्वमेत्य धर्मेण कुरुते परिपालनम् १४ ततस्तमोगुणोद्रिक्तो

---

हीं आपण मला कथन केलीं आहेत १. परंतु, हे भृगुवंशज, प्रलयकालीं सर्व जगताचा संहार झाला असतां पुनः सृष्टि होण्यापूर्वी कांहीं असतें किंवा नसतें ? २. मार्कंडेय ह्मणतो:—जेव्हां प्रकृतीमध्यें हें सर्व जगत् लय पावतें तेव्हां त्या स्थितीला विद्वान् लोक प्राकृत प्रलय ह्मणतात ३. विकाराचा संहार होऊन अव्यक्त सुखरूपाचेच ठिकाणीं स्थित असतांना प्रकृति व पुरुष हींही साधर्म्यानेंच असतात ४. तेव्हां तम व सत्त्व हे गुण कमी अधिक न होता एकसारखेच परस्पर ओतप्रोत असतात ५. तिळांतील तेलाप्रमाणें किंवा दुधांतील तुपाप्रमाणे सत्त्वांत व तमांत रजोगुण स्थित होता; ही स्थिति ब्रह्मदेवाच्या उत्पत्तीपर्यंत असते ६. ब्रह्मदेवाचें आयुष्य दोन परार्धें आहे व त्यांत दिवस आणि रात्र हीं सारखीं आहेत. रात्र प्रलयकालीं असते ७. दिवसाचे आरंभीं जन्मरहित, सर्वोत्पादक व अचिंत्यस्वरूप असा परमेश्वर ब्रह्मदेव जागा होत असतो आणि तो जगदीश परमेश्वर प्रकृति व पुरुष ह्या उभयतांमध्यें सत्वर प्रविष्ट होऊन उत्कृष्ट योगानें त्यांना क्षुब्ध करीत असतो ८, ९. तरुणींच्या मदाप्रमाणें किंवा वैशाखांतील वायूप्रमाणें हा योगस्वरूप परमेश्वर क्षोभ करितां प्रविष्ट होत असतो १०. प्रधानतत्त्वांत क्षोभ होऊं लागला असतां तो अंडकोशस्थ ब्रह्मदेव उत्पन्न झाला हें मीं तुला कथन केलेंच आहे ११. तोच प्रकृतिपति अक्षोभ्य असून प्रथम क्षोभक आणि संकोच व विकास ह्यांच्या योगानें प्रधानतत्त्वामध्यें स्थित आहे १२. तो जगद्योनि उत्पन्न झाला असतां निर्गुण असूनही सृष्टिकालीं ब्रह्मत्व स्वीकारून रजोगुणाचें अवलंबन करीत असतो १३. ब्रह्मा ह्या नात्यानें तो

रुद्रत्वे चाखिलं जगत् । उपसंहृत्य वै शेते त्रैलोक्यं त्रिगुणोऽगुणः १५ यथा प्राग्व्यापकः क्षेत्री पालको लावकस्तथा । तथा स संज्ञामायाति ब्रह्मविष्णुहराभिकाम् १६ ब्रह्मत्वे सृजते लोकान्रुद्रत्वे संहरत्यपि । विष्णुत्वे चाप्युदासीनस्तिस्रोऽवस्थाः स्वयम्भुवः १७ रजो ब्रह्मा तमो रुद्रो विष्णुः सत्त्वं जगत्पतिः । एत एव त्रयो देवा एत एव त्रयो गुणाः १८ अन्योन्यमिथुना ह्येते अन्योन्याश्रयिणस्तथा । क्षणं वियोगो न ह्येषां न त्यजन्ति परस्परम् १९ एवं ब्रह्मा जगत्पूर्वो देवदेवश्चतुर्मुखः । रजोगुणं समाश्रित्य स्रष्टृत्वे स व्यवस्थितः २० हिरण्यगर्भो देवादिरनादिरुपचारतः । भूपद्मकर्णिकासंस्थो ब्रह्माग्रे समजायत २१ तस्य वर्षशतं त्वेकं परमायुर्महात्मनः । ब्राह्मेणैव हि मानेन तस्य संख्यां निबोध मे २२ निमेषैर्दशभिः काष्ठा तथा पञ्चभिरुच्यते । कलात्रिंशच्च वै काष्ठा मुहूर्त्तं त्रिंशदेव ताः २३ अहोरात्रं मुहूर्तानां नृणां त्रिंशत्तु वै स्मृतम् । अहोरात्रैश्च त्रिंशद्भिः पक्षौ द्वौ मास उच्यते २४ तैः षड्भिरयनं वर्षं द्वेऽयने दक्षिणोत्तरे । तद्देवानामहोरात्रं दिनं तत्रोत्तरायणम् २५ दिव्यैर्वर्षसहस्रैस्तु कृतत्रेतादिसंज्ञितम् । चतुर्युगं द्वादशभिस्तद्विभागं शृणुष्व मे २६ चत्वारि तु सहस्राणि वर्षाणां कृतमुच्यते । शतानि सन्ध्या चत्वारि सन्ध्यांशश्च तथाविधः २७ त्रेता त्रीणि सहस्राणि दिव्या-

---

प्रजा उत्पन्न करितो; नंतर सत्त्वाधिक्यानें युक्त होऊन तो विष्णु होतो आणि धर्मानें प्रजांचें परिपालन करितो १४. तदनंतर तमोगुणाधिक्यानें युक्त झाल्यावर रुद्र होऊन सर्व त्रैलोक्याचा संहार करितो आणि तो त्रिगुणरूप व निर्गुणात्मक परमेश्वर शयन करीत राहतो १५. ज्याप्रमाणें शेताच्या मालकाला प्रथम व्यापक नंतर पालक व नंतर लावक अशा संज्ञा प्राप्त होत असतात त्याचप्रमाणें ह्या परमेश्वराला ब्रह्मा, विष्णु व हर अशा संज्ञा प्राप्त होत असतात १६. तो ब्रह्म असतांना लोकसृष्टि करीत असतो; रुद्र असतांना संहार करीत असतो आणि विष्णु असतांना उदासीन असतो. स्वयंभु परमेश्वराच्या ह्या तीन अवस्था होत१७ रज, सत्त्व व तम हे अनुक्रमें ब्रह्मा, विष्णु व महेश्वर असे तीन देव असून हेच तीन गुण होत १८. हेच अन्योन्याश्रयी सर्वदां परस्पर संयुक्त असतात. हे परस्परांना क्षणभरही सोडीत नसल्यामुळें ह्यांचा वियोग क्षणभरही नाहीं १९. ह्याप्रमाणें जगताचे पूर्वी असलेला देवाधिदेव चतुर्मुख ब्रह्मा रजोगुणाचें अवलंबन करून सृष्टि करीत असतो. ह्याला हिरण्यगर्भ, देवादि व अनादि असें उपचारानें ह्मणत असतात २०. भूपद्माच्या कर्णिकेमध्यें स्थित असलेला ब्रह्मा प्रथम उत्पन्न झालेला आहे २१. शंभर वर्षे हें त्या महात्म्याचें पूर्ण आयुष्य होय. ब्राह्ममानानेंच त्याचें प्रमाण तूं माझ्यापासून ऐक २२. १९ निमेष=१ *काष्ठा*; ३० *कला*=१ *काष्ठा*; ३० *काष्ठा*=१ *मूहूर्त*; २३. ३० मूहूर्त=१ अहोरात्र; ३० अहोरात्रें=२ पक्ष किंवा १ मास २४. ६ मास=१ अयन; २ अयनें=१ वर्ष, मनुष्यांचें वर्ष हें देवांचें अहोरात्र असून उत्तरायण हा दिवस होय २५. *देवांच्या १२ हजार वर्षांमध्यें कृतत्रेतादि चार युगें होत असतात; त्यांचा विभाग* माझ्यापासून ऐक २६. ४००० वर्षे कृत आणि संध्या व संध्यांश प्रत्येकीं ४००

दानां शतत्रयम् । तस्य सन्ध्या समाख्याता सन्ध्यांशश्च तथाविधः २८ द्वापरं द्वे सहस्रे तु वर्षाणां द्वे शते तथा । तस्य सन्ध्या समाख्याता द्वे शताब्दे तदंशकः २९ कलिः सहस्रं दिव्यानामब्दानां द्विजसत्तम । सन्ध्या सन्ध्यांशकश्चैव शतको समुदाहृतौ ३० एषा द्वादशसाहस्री युगाख्या कविभिः कृता । एतत्सहस्रगुणितमहो ब्राह्ममुदाहृतम् ३१ ब्रह्मणो दिवसे ब्रह्मन्मनवः स्युश्चतुर्दश । भवन्ति भागशस्तेषां सहस्रं तद्विभज्यते ३२ देवाः सप्तर्षयः सेन्द्रा मनुस्तत्सूनवो नृपाः । मनुना सह सृज्यन्ते संह्रियन्ते च पूर्ववद् ३३ चतुर्युगानां संख्याता साधिका ह्येकसप्ततिः । मन्वन्तरं तस्य संख्यां मानुषाब्दैर्निबोध मे ३४ त्रिंशत्कोट्यस्तु संपूर्णाः संख्याताः संख्यया द्विज । सप्तषष्टिस्तथान्यानि नियुतानि च संख्यया ३५ विंशतिश्च सहस्राणि कालोऽयं साधिकं विना । एतन्मन्वन्तरं प्रोक्तं दिव्यैर्वर्षैर्निबोध मे ३६ अष्टौ वर्षसहस्राणि दिव्यया संख्यया युतम् । द्विपञ्चाशत्तथान्यानि सहस्राण्यधिकानि तु ३७ चतुर्दशगुणो ह्येष कालो ब्राह्ममहः स्मृतम् । तस्यान्ते प्रलयः प्रोक्तो ब्राह्मो नैमित्तिको बुधैः ३८ भूर्लोकोऽथ भुवर्लोकस्स्वर्लोकस्तन्निवासिनः । तदा विनाशमायान्ति महर्लोकश्च तिष्ठति ३९ तद्वासिनोऽपि तापेन जनलोकं प्रयान्ति वै । एकार्णवे च त्रैलोक्ये ब्रह्मा स्वपिति वै निशि ४० तत्प्रमाणैव सा रात्रिस्तदन्ते सृज्यते पुनः । एवं तु ब्रह्मणो वर्षमेकं वर्षशतं तु तत् ४१ शतं हि तस्य वर्षाणां परमित्यभिधीयते । पञ्चाशद्भिस्तथा वर्षैः परार्धमिति कीर्त्यते ४२ एकमस्य परार्धं तु व्यतीतं द्विजसत्तम । यस्यान्तेऽभून्महाकल्पः पाद्म इत्यभिविश्रुतः ४३ द्वितीयस्य परार्धस्य वर्तमानस्य वै द्विज । वाराह इति कल्पोऽयं प्रथमः परिकल्पितः ४४

---

वर्षे, २७.२ ००० दिव्य वर्षे त्रेता आणि संध्या व संध्यांश प्रत्येकीं ३०० वर्षे, २८; २००० वर्षे द्वापर आणि संध्या व संध्यांश प्रत्येकीं २०० वर्षे, २९; आणि, हे द्विजश्रेष्ठ १००० दिव्य वर्षे कलि आणि संध्या व संध्यांश प्रत्येकीं १०० वर्षे, ३०. पंडितांनीं ह्या बारा हजार वर्षांना युगसंज्ञा दिलेली आहे. हीं सहस्रगुणित युगें म्हणजे ब्रह्मदेवाचा दिवस ३१. हे ब्रह्मन्, ब्रह्मदेवाच्या दिवसांत चवदा मनु असतात आणि युगचतुष्टयांच्या हजार फेऱ्यांमध्यें त्यांचा काल विभागिला जातो ३२. देव, इंद्रासह सप्तर्षि, मनु व मनुपुत्र राजे ह्या सर्वांची उत्पत्ति व संहार हीं पूर्वीप्रमाणें होत असतात ३३. चार युगांचे ७१ फेरे म्हणजे मन्वंतर. मनुष्यवर्षांनीं त्याचें प्रमाण तूं ऐक ३४. हे द्विज, ३०, ६७,२०००० वर्षे म्हणजे एक मन्वंतर ३५, ३६. ८,४०००० दिव्य वर्षे हा ब्रह्मदेवाचा दिवस. त्याच्या शेवटीं नैमित्तिक ब्राह्म प्रलय होत असतो ३७,३८. भू, भुव व स्वर्ग ह्या लोकांत राहणारे त्या वेळीं नष्ट होतात आणि महर्लोक राहतो ३९; परंतु, तेथीलही रहिवासी तापामुळें जनलोकांत जातात आणि त्रैलोक्य ब्रह्मदेवाच्या रात्रींत जलमय होऊन गेलें असतां तो निजतो ४०. ब्रह्मदेवाची रात्र दिवसा इतकीच असते व ती संपल्यावर पुनरपि सृष्टि उत्पन्न होत असते. ह्या मानानेंच ब्रह्मदेवाचें वर्ष होय व अशीं शंभर वर्षे त्याचें आयुष्य ४१. त्याच्या शंभर वर्षांना पर व पन्नास वर्षांना परार्ध असें म्हणतात ४२. हे द्विजश्रेष्ठ, त्याचें एक

[२७१७] इति श्रीमार्कण्डेयपुराणे ब्रह्मायुष्प्रमाणकथनं नाम त्रिचत्वारिंशोऽध्यायः ॥४३॥

क्रौष्टुकिरुवाच ॥ यथा ससर्ज च ब्रह्मा भगवानादिकृत्प्रजाः । प्रजापतिः पतिर्देवस्तन्मे विस्तरतो वद १ मार्कण्डेय उवाच ॥ कथयाम्येष ते ब्रह्मा ससर्ज भगवान्यथा । लोककृच्छाश्वतः कृत्स्नं जगत्स्थावरजंगमम् २ पाद्मावसानसमये निशासुप्तोत्थितः प्रभुः । सत्त्वोद्रिक्तस्तदा ब्रह्मा शून्यं लोकमवैक्षत ३ इमं चोदाहरन्त्यत्र श्लोकं नारायणं प्रति । ब्रह्मस्वरूपिणं देवं जगतः प्रभवाप्ययम् ४ आपो नारा इति प्रोक्ता आपो वै नरसूनवः । तासु शेते स यस्माच्च तेन नारायणः स्मृतः ५ विबुद्धः सलिले तस्मिन्विज्ञायान्तर्गतां महीम् । अनुमानात्तदुद्धारं कर्तुकामस्तदा क्षितेः ६ अकरोत्स तनूरन्याः कल्पादिषु यथा पुरा । मत्स्यकूर्मादिकास्तद्वद्वाराहं वपुरास्थितः ७ वेदयज्ञमयं दिव्यं वेदयज्ञमयो विभुः । रूपं कृत्वा विवेशाप्सु सर्वगः सर्वसम्भवः ८ समुद्धृत्य च पातालान्मुमोच सलिले भुवम् । जनलोकस्थितैः सिद्धैश्चिन्त्यमानो जगत्पतिः ९ तस्योपरि जलौघस्य महती नौरिव स्थिता । विततत्वात्तु देहस्य न मही याति संप्लवम् १० ततः क्षितिं समीकृत्य पृथिव्यां सोऽसृजद्गिरीन् । प्राक्सर्गे दह्यमाने तु तदा संवर्तकाग्निना ११ तेनाग्निना विशीर्णास्ते पर्वता भुवि सर्वशः । शैला

---

परार्ध सपले आहे; त्याच्या शेवटी पाद्म ह्मणून महाकल्प झाला ४३. हे द्विज, चालू असलेल्या द्वितीय परार्धाचा वाराह हा प्रथम कल्प होय ४४. (२७१७) ह्याप्रमाणें श्रीमार्कंडेयपुराणांतील ब्रह्मदेवाचें आयुष्य कथन करण्याविषयीं त्रेचाळिसावा अध्याय समाप्त झाला ॥ ४३ ॥

क्रौष्टुकि ह्मणतोः—प्रजाधिपति भगवान् ब्रह्मदेवानें कशी सृष्टि केली हें आपण मला सविस्तर सांगा १. मार्कंडेय ह्मणतातः—हे विप्र, लोककर्त्या शाश्वत भगवान् ब्रह्मदेवानें सर्व चराचर जगत् कसें उत्पन्न केलें हेंही मी तुला सांगतो २. पद्म कल्पाच्या शेवटीं निद्रेंतून ब्रह्मदेव उठला आणि त्यावेळीं सत्त्वगुणाचें आधिक्य असलेल्या त्या ब्रह्मदेवाला लोक शून्य दृष्टीं पडला. जगताच्या उत्पत्तीचें व प्रलयाचें कारण जो ब्रह्मस्वरूप देव नारायण त्याच्या संबंधानें ३,४, " आप ह्मणजे नार; आणि आप ह्मणजे नरसूनु. त्यांचे ठिकाणीं शयन करीत असल्यामुळें त्याला नारायण ह्मणतात. " अशा अर्थाचा आपो नारा इति० स्मृतः हा श्लोक ह्मणत असतात ५. त्या उदकांत जागृत झालेल्या त्या देवानें पृथ्वी आंत गेल्याचें अनुमानानें जाणून तिचा उद्धार करण्याचें मनांत आणिलें ६. पूर्वी कल्पारंभाप्रमाणें त्यानें मत्स्य, कूर्म, इत्यादि तनु धारण करून वाराहरूपही धारण केलें ७. वेदयज्ञमय प्रभूनें वेदयज्ञमय दिव्य रूप धारण केलें आणि तो सर्वव्यापी व सर्वोत्पादक उदकामध्यें प्रविष्ट झाला ८. नंतर जनलोकांत असलेले सिद्ध ज्याचें चिंतन करीत आहेत अशा त्या जगदीशानें भूमि पातालांतून काढून उदकावर ठेविली असतां ९ त्या जलप्रवाहावर प्रचंड नौकेप्रमाणें राहिलेली ती भूमि देहाच्या विस्तृतपणामुळें बुडली नाहीं १०. नंतर पृथ्वी सारखी करून त्यानें पर्वत निर्माण केले. पूर्वीची सृष्टि संवर्तक अग्नीनें जळे

एकार्णवे मग्ना वायुनापस्तु संहताः १२ निरक्ता यत्र यत्रासंस्तत्र तत्राचलाभवन् । भूविभागं ततः कृत्वा सप्त द्वीपोपशोभितम् १३ भूराद्यांश्चतुरो लोकान्पूर्ववत्समकल्पयत् । सृष्टिं चिन्तयतस्तस्य कल्पादिषु यथा पुरा १४ अबुद्धिपूर्वकस्तस्मात्प्रादुर्भूतस्तमोमयः । तमोमोहो महामोहस्तामिस्रो ह्यन्धसंज्ञितः १५ अविद्या पञ्चपर्वैषा प्रादुर्भूता महात्मनः । पञ्चधावस्थितः सर्गो ध्यायतोऽप्रतिबोधवान् १६ बहिरन्तश्चाप्रकाशः संवृतात्मा नगात्मकः । मुख्या नगा यतश्चोक्ता मुख्यसर्गस्ततस्त्वयम् १७ तं दृष्ट्वाऽसाधकं सर्गममन्यदपरं पुनः । तस्याभिध्यायतः सर्गं तिर्यक्स्रोतो ह्यवर्तत १८ यस्मात्तिर्यक्प्रवृत्तिः स तिर्यक्स्रोतस्ततः स्मृतः । पश्वादयस्ते विख्यातास्तमःप्राया ह्यवेदिनः १९ उत्पथग्राहिणश्चैव तेऽज्ञाने ज्ञानमानिनः । अहंकृता अहंमाना अष्टाविंशद्विधात्मकाः २० अन्तःप्रकाशास्ते सर्वे आवृतास्तु परस्परम् । तमप्यसाधकं मत्वा ध्यायतोऽन्यस्ततोऽभवत् २१ ऊर्ध्वस्रोतस्तृतीयस्तु सात्त्विकोर्ध्वमवर्तत । ते सुखप्रीतिबहुला बहिरन्तस्त्वनावृताः २२ प्रकाशा बहिरन्तश्च ऊर्ध्वस्रोतःसमुद्भवाः । तुष्टात्मनस्तृतीयस्तु देवसर्गो हि स स्मृतः २३ तस्मिन्सर्गेऽभवत्प्रीतिर्निष्पन्ने ब्रह्मणस्तदा । ततोऽन्यं स तदा दध्यौ साधकं सर्गमुत्तमम् २४ तथाभिध्यायतस्तस्य सत्याभिध्यायिनस्ततः ।

लागली असतां ११ त्या अग्नीनें ते सर्व पर्वत भूमीवर ठिकऱ्या होऊन पडले आणि उदकांत बुडाले व उदकही वायूनें गोठून गेलें १२. हें उदक जेथें जेथें घट्ट होऊन वसलें तेथें तेथें पर्वत झाले. असो. नंतर सप्तद्वीपयुक्त असा भूविभाग करून १३ भूरादि चार लोक त्यानें पूर्वीप्रमाणें कल्पिले. पूर्वी कल्पारंभाप्रमाणें तो सृष्टीचें चिंतन करूं लागला असतां १४ अबुद्धिपूर्वक तमाचा प्रादुर्भाव त्याच्यापासून झाला. तम, मोह, महामोह, तामिस्र व अंधतामिस्र १५ अशी पंचपर्वरूप अविद्या त्या महात्म्यापासून प्रकट झाली; आणि तो चिंतन करूं लागला असतां ज्ञानरहित पांच प्रकारची सृष्टि उत्पन्न झाली १६. ती सृष्टि वृक्षात्मक असून अंतर्बाह्य प्रकाशरहित व विचार प्रकट करण्यास असमर्थ अशी होती. ह्यांत वृक्ष मुख्य असल्यामुळें हा मुख्य सर्ग होय १७. ती सृष्टि असाधक पाहून त्यानें दुसरी मनांत आणली व दुसरीचें चिंतन करीत असतांना तिर्यक्स्रोत ही सृष्टि प्रकट झाली १८. ज्याअर्थी तिची प्रवृत्ति तिर्यक् आहे त्याअर्थी तिर्यक्स्रोत ही संज्ञा तिला प्राप्त झाली. ते प्रायः तमोमय, अज्ञानी १९, उन्मार्गवर्ती, अज्ञानालाच ज्ञान समजणारे, अहंकारानें युक्त व अभिमानी असे अठ्ठावीस प्रकारचे पश्वादि प्राणी होत २०. ते सर्व अंतस्थ ज्ञानी असून परस्पर प्रच्छन्न असतात. परंतु, तीही सृष्टि उद्दिष्ट हेतु सिद्धीस नेणारी नाहीं असें वाटून तो पुनरपि चिंतन करूं लागला असतां त्याहून वेगळी अशी २१ तिसरी सात्त्विक ऊर्ध्वस्रोत सृष्टि प्रकट झाली. ह्या सर्गांतील प्राण्यांच्या ठिकाणीं सुख व प्रीति अधिक असून ते अंतर्बाह्य उघड २२ व अंतर्बाह्य ज्ञानयुक्त असतात. पाहून मनामध्यें संतुष्ट झालेल्या ब्रह्मदेवाचा हा तिसरा सर्ग देवसर्ग म्हणून प्रसिद्ध आहे २३. तो सर्ग उत्पन्न झाल्यावर ब्रह्मदेवाला आनंद झाला व आणखी एक उत्कृष्ट साधकसर्गाविषयीं तो चिंतन करूं लागला असतां

प्रादुर्बभौ तदाव्यक्तादर्वाक्स्रोतस्तु साधकः २५ यस्मादर्वाग्व्यवर्तन्त ततोऽर्वाक्स्रोतसस्तु ते। ते च प्रकाशबहुलास्तमोद्रिक्ता रजोधिकाः २६ तस्मात्ते दुःखबहुला भूयो भूयश्च कारिणः। प्रकाशा बहिरन्तश्च मनुष्याः साधकाश्च ते २७पञ्चमोऽनुग्रहः सर्गः स चतुर्धा व्यवस्थितः। विपर्ययेण सिद्ध्या च शान्त्या तुष्ट्या तथैव च २८निवृत्तं वर्तमानं च तेऽर्थं जानन्ति वै पुनः। भूतादिकानां भूतानां षष्ठः सर्गः स उच्यते२९ते परिग्राहिणः सर्वे संविभागरतास्तथा। चोदनाथाप्यशीलाश्च ज्ञेया भूतादिकाश्च ते ३०प्रथमो महतः सर्गो विज्ञेयो ब्रह्मणस्तु सः। तन्मात्राणां द्वितीयस्तु भूतसर्गः स उच्यते ३१ वैकारिकस्तृतीयस्तु सर्गश्चैन्द्रियकः स्मृतः। इत्येष प्राकृतः सर्गः संभूतो बुद्धिपूर्वकः ३२मुख्यः सर्गश्चतुर्थस्तु मुख्या वै स्थावराः स्मृताः। तिर्यक्स्रोतस्तु यः प्रोक्तस्तिर्यग्योन्यः स पञ्चमः ३३ तथोर्ध्वस्रोतसां षष्ठो देवसर्गस्तु स स्मृतः। ततोऽर्वाक्स्रोतसां सर्गः सप्तमः स तु मानुषः ३४ अष्टमोऽनुग्रहः सर्गः सात्त्विकस्तामसश्च सः। पञ्चैते वैकृताः सर्गाः प्राकृतास्तु त्रयः स्मृताः ३५ प्राकृतो वैकृतश्चैव कौमारो नवमः स्मृतः। इत्येते वै समाख्याता नव सर्गाः प्रजापतेः ३६ प्राकृता वैकृताश्चैव जगतो मूलहेतवः। सृजतो जगदीशस्य किमन्यच्छ्रोतुमिच्छसि ३७ [ २७६४ ] इति श्रीमार्कण्डेयपुराणे प्राकृतवैकृतसर्गवर्णनं नाम चतुश्चत्वारिंशोऽध्यायः ॥ ४४ ॥

क्रौष्टुकिरुवाच ॥ समासात्कथिता सृष्टिः सम्यग्भगवता मम। देवादीनां भवं ब्रह्मन्वि-

२४त्या सत्यचिंतक व अव्यक्त ब्रह्मदेवापासून साधक अर्वाक्स्रोत सर्ग प्रकट झाला२५. ह्यांचा व्यवहार ज्याअर्थी अर्वाक् असतो त्याअर्थी त्यांना अर्वाक्स्रोत असें ह्मणतात. त्यांच्यांत ज्ञानाचें आधिक्य असतें. तमोगुण अतिशय असतो व रजोगुणही अधिक असतो २६. ह्मणून ते साधक मानव वारंवार खटपटी करणारे, अंतर्बाह्य ज्ञानी आणि दुःखग्रस्त असतात २७. पांचवा अनुग्रह सर्ग. त्याचे प्रकार चार आहेत; विपर्यय, सिद्धि, शांति व तुष्टि २८. ह्यांतील प्राण्यांना भूत व वर्तमान समजतें. सहावा भूतादिकांचा सर्ग होय २९. ते भूतादिक सर्वही परिग्रह करणारे, विभागाविषयीं दक्ष, प्रेरक व शीलरहित असतात३०. पहिला महत्सर्ग; त्याला ब्रह्मसर्ग असें ह्मणतात. दुसरा तन्मात्रसर्ग; त्याला भूतसर्ग असें ह्मणतात ३१. तिसरा वैकारिक सर्ग; त्याला ऐंद्रियक ह्मणतात. हा अबुद्धिपूर्वक प्रकट झालेला प्राकृत सर्ग होय ३२. चवथा मुख्य सर्ग. मुख्य ह्मणजे स्थावर. पांचवा तिर्यक्स्रोत; ह्यांत तिर्यग्योनींतील प्राण्यांचा समावेश होतो ३३. सहावा उर्ध्वस्रोतसांचा सर्ग; हा देवसर्ग होय. नंतर अर्वाक्स्रोतसाचा सातवा सर्ग. हा मानुष सर्ग होय ३४. आठवा अनुग्रह सर्ग; हा सात्विक व तामस आहे. हे पांच वैकृत सर्ग असून पहिले तीन प्राकृत होत ३५. प्राकृत आणि वैकृत असा कौमार सर्ग नववा होय. हे ब्रह्मदेवाचे नऊ सर्ग सांगितले ३६. हे प्राकृत व वैकृत असून जगताचें कारण आहेत. आतां सृष्टि उत्पन्न करणाऱ्या जगदीशासंबंधानें आणखी काय ऐकण्याची तुझी इच्छा आहे ३७। (२७६४) ह्याप्रमाणें श्रीमार्कंडेयपुराणांतील प्राकृतवैकृतसर्गवर्णननामक चवेचाळिसावा अध्याय समाप्त झाला ॥ ४४ ॥

स्तरात्तु नवीहि मे १ मार्कण्डेय उवाच ॥ कुशलाकुशलैर्ब्रह्मन्भाविता पूर्वकर्मभिः । ख्यात्या तया ह्यनिर्मुक्ताः प्रलये ह्युपसंहृताः २ देवाद्याः स्थावरान्ताश्च प्रजा ब्रह्मंश्चतुर्विधाः । ब्रह्मणः कुर्वतः सृष्टिं जज्ञिरे मानसास्तदा ३ ततो देवासुरपितॄन्मानुषांश्च चतुष्टयम् । सिसृक्षुरम्भस्येतानि स्वमात्मानमयूयुजत् ४ युक्तात्मनस्तमोमात्रा उद्रिक्ताभूत्प्रजापतेः । सिसृक्षोर्जघनात्पूर्वमसुरा जज्ञिरे ततः ५ उत्ससर्ज ततस्तां तु तमोमात्रात्मिकां तनुम् । सापविद्धा तनुस्तेन सद्यो रात्रिरजायत ६ अन्यां तनुमुपादाय सिसृक्षुः प्रीतिमाप सः । सत्त्वोद्रेकास्ततो देवा मुखतस्तस्य जज्ञिरे ७ उत्ससर्ज च भूतेशस्तनुं तामप्यसौ विभुः । सा चापविद्धा दिवसं सत्त्वप्रायमजायत ८ सत्त्वमात्रात्मिकामेव ततोऽन्यां जगृहे तनुम् । पितृवन्मन्यमानस्य पितरस्तस्य जज्ञिरे ९ सृष्ट्वा पितॄनुत्ससर्ज तनुं तामपि स प्रभुः । सा चोत्सृष्टाभवत्सन्ध्या दिननक्तान्तरस्थिता १० रजोमात्रात्मिकामन्यां तनुं भेजेऽथ स प्रभुः । ततो मनुष्याः संभूता रजोमात्रसमुद्भवाः ११ सृष्ट्वा मनुष्यान्स विभुरुत्ससर्ज तनुं ततः । ज्योत्स्ना समभवत्सा च नक्तान्तेऽहर्मुखे च या १२ इत्येतास्तनवस्तस्य देवदेवस्य धीमतः । ख्याता राज्यहनी चैव सन्ध्या ज्योत्स्ना च वै द्विज १३ ज्योत्स्ना सन्ध्या तथैवाहः सत्त्वमात्रात्मकं त्रयम् । तमोमात्रात्मिका रात्रिः सा वै तस्मात्तमोधिका १४ तस्माद्देवा दिवा रात्रावसुरास्तु बला-

क्रौष्टुकि ह्मणतोः— हे विप्र, आपण सृष्टि संक्षेपतः सांगितली. आतां देवादिकांची उत्पत्ति मला आपण सविस्तर सांगा १. मार्कंडेय ह्मणतातः— हे विप्र, बऱ्या वाईट संचित कर्मांनीं युक्त असल्यामुळें मुक्त न झालेले असे जे प्रलयसमयीं लीन झालेले २ देवादिस्थावरांत चतुर्विध प्राणी ते, सृष्टिकर्त्या ब्रह्मदेवाच्या मनामध्यें उत्पन्न झाले ३. नंतर देव, असुर, पितर व मानव असे चार उत्पन्न करण्याचा उद्देश धरून उदकांत आपल्या मनामध्यें त्यानें त्यांचें चिंतन केलें ४. ब्रह्मदेव सृष्टीच्या उद्देशानें चिंतन करूं लागला असतां त्या ने तमोगुण उचंबळूं लागला व मागल्या भागापासून प्रथम असुर उत्पन्न झाले ५. तेव्हां ती तमोमय तनु त्यानें टाकून दिली व त्यानें टाकितांक्षणीं ती तनु रात्र बनली६. नंतर सृष्टीच्या उद्देशानें दुसरी तनु धारण करून तो प्रसन्न झाला असतां सत्त्वगुणाचें आधिक्य झाल्यामुळें त्याच्या मुखापासून देव उत्पन्न झाले ७. भूताधिपति ब्रह्मदेवानें त्याही तनूचा त्याग केला असतां तिच्यापासून प्रायः सत्त्वमय असा दिवस उत्पन्न झाला ८. नंतर केवल सत्त्वगुणमय अशी दुसरी तनु धारण करून तो पितृवत् मानूं लागला असतां त्याच्या पासून पितर उत्पन्न झाले ९. पितर उत्पन्न केल्यावर त्याही तनूचा त्या ब्रह्मदेवानें त्याग केला असतां ती सोडिलेली तनु दिवस व रात्र ह्यांच्या मधली संध्या झाली १०. नंतर त्या प्रभूनें रजोगुणमय दुसरी तनु धारण केली असतां त्याच्यापासून रजोगुणी मानव उत्पन्न झाले ११. मानव उत्पन्न केल्यानंतर त्याही तनूचा त्यानें त्याग केला असतां रात्रीचा शेवट आणि दिवसाचा आरंभ ह्यांच्या मधली ती तनु झाली १२. हे द्विज, रात्रि, दिवस, संध्या व ज्योत्स्ना ह्या त्या विचारी देवाधिदेवाच्या तनू होत १३. ज्योत्स्ना,

न्विताः। ज्योत्स्नागमे च मनुजाः सन्ध्यायां पितरस्तदा १५ भवन्ति बलिनोऽधृष्या विपक्षाणां न संशयः। तद्विपर्ययमासाद्य प्रयान्ति च विपर्ययम् १६ ज्योत्स्ना रात्र्यहनी सन्ध्या चत्वार्येतानि वै प्रभोः। ब्रह्मणस्तु शरीराणि त्रिगुणोपसृतानि तु १७ चत्वार्येतान्यथोत्पाद्य तनुमन्यां प्रजापतिः। रजस्तमोमयीं रात्रौ जगृहे क्षुत्तृडन्वितः १८ तदन्धकारे क्षुत्क्षामानसृजद्भगवानजः। विरूपाञ्श्मश्रुलानत्तुमारब्धास्ते च तां तनुम् १९ रक्षाम इति तेभ्योऽन्ये य ऊचुस्ते तु राक्षसाः। खादाम इति ये चोचुस्ते यक्षा यक्षणाद्द्विज २० तान्दृष्ट्वा ह्यप्रियेणास्य केशाः शीर्यन्त वेधसः। समारोहणहीनाश्च शिरसो ब्रह्मणस्तु ते २१ सर्पणात्तेऽभवन्सर्पा हीनत्वादहयः स्मृताः। सर्पान्दृष्ट्वा ततः क्रोधात्क्रोधात्मानो विनिर्ममे २२ वर्णेन कपिलेनोग्रास्ते भूताः पिशिताशनाः। ध्यायतो गां ततस्तस्य गन्धर्वा जज्ञिरे सुताः २३ जज्ञिरेऽपि ततो वाचं गन्धर्वास्तेन ते स्मृताः। अष्टास्वेतासु सृष्टासु देवयोनिषु स प्रभुः २४ ततः स्वदेहतोऽन्यानि वयांसि पशवोऽसृजत्। मुखतोऽजाः ससर्जाथ वक्षसश्चावयोऽसृजत् २५ गाश्चैवोदरतो ब्रह्मा पार्श्वाभ्यां च विनिर्ममे। पद्भ्यां चाश्वान्स मातङ्गान्रासभाञ्छशकान्मृगान् २६ उष्ट्रानश्वतरांश्चैव नानारूपाश्च जातयः। ओषध्यः फलमूलिन्यो रोमभ्यस्तस्य जज्ञिरे २७ एवं पश्वोषधीः सृष्ट्वा

---

संध्या व दिवस हीं तीन सत्त्वांशानें युक्त असून रात्रि तमोमात्रात्मिक आहे व त्यांत तमाचें आधिक्य आहे १४. तस्मात्, देव दिवसां, असुर रात्रीं, ज्योत्स्नासमयीं मनुष्य आणि संध्यासमयीं पितर बलाढ्य असतात १५ आणि ते बलाढ्य होऊन प्रतिपक्षांना निःसंशय अजिंक्य होतात. परंतु, कालवैपरीत्य प्राप्त झाल्यास ते प्रतिपक्षांकडून पराजित होतात; ( ह्मणजे प्रबल होण्याच्या वेळेहून अन्यवेळीं ते दुर्बळ व पराजित होतात ) १६. ज्योत्स्ना, रात्रि, दिवस आणि संध्या हीं चार प्रभु ब्रह्मदेवाचीं शरीरें त्रिगुणयुक्त आहेत १७. हीं चार उत्पन्न केल्यानंतर क्षुधित व तृषाक्रांत झालेल्या ब्रह्मदेवानें रजस्तमोमय असें दुसरें शरीर धारण केलें १८. त्या अंधकारामध्यें भगवान् ब्रह्मदेवानें क्षुधेनें कृश झालेले, विरूप व दाढीमिशांचे लोक उत्पन्न केले असतां ते लोक तें शरीर खाऊं लागले १९. रक्षण करूं असें जे त्यांहून दुसरे ह्मणाले ते राक्षस झाले आणि, हे द्विज, भक्षण करूं ह्मणाले ते यक्ष झाले २०. त्यांना अवलोकन करितांक्षणीं दुःख झाल्यामुळें विधात्या ब्रह्मदेवाच्या मस्तकाचे केस कायमचे गळून पडले २१. सर्पटण्यामुळें ते सर्प झाले आणि हीनत्वामुळें अहि ही संज्ञा त्यांना प्राप्त झाली. सर्प दृष्टीं पडतांक्षणीं क्रोध आल्यामुळें क्रोधात्मेच निर्माण झाले २२. ते कपिलवर्णी, उग्र व मांसभक्षक भूतगण होत. ब्रह्मदेव वाणीचें ध्यान करूं लागल्यामुळें गंधर्व उत्पन्न झाले २३. वाणीला अनुलक्षून ते उत्पन्न झाल्यामुळें गंधर्व ही संज्ञा त्यांना प्राप्त झाली २४. ह्या आठ देवयोनि उत्पन्न झाल्या असतां त्या प्रभूनें स्वदेहापासून अन्य पशुपक्षी उत्पन्न केले. मुखापासून शेळ्या, वक्षस्थलापासून मेंढ्या २५, उदर व बरगड्या ह्यापासून गाई आणि पायांपासून अश्व, गज, गर्दभ, ससा, मृग २६, उंट, खेचर व इतरही अनेक जातींचे पशु ब्रह्मदेवानें निर्माण केले.

ययज्ञाध्वरे विभुः। तस्मादादौ तु कल्पस्य त्रेतायुगमुखे तदा २८ गौरजः पुरुषो मेषो अश्वा-श्वतरगर्दभाः। एतान्ग्राम्यान्पशूनाहुरारण्यांश्च निबोध मे २९ श्वापदं द्विखुरं हस्ती वानराः पक्षिपञ्चमाः। औदकाः पशवः षष्ठाः सप्तमास्तु सरीसृपाः ३० गायत्री च ऋचं चैव त्रिवृत्साम रथन्तरम्। अग्निष्टोमं च यज्ञानां निर्ममे प्रथमान्मुखात् ३१ यजूंषि त्रैष्टुभं छन्दः स्तोमं पञ्चदशं तथा। बृहत्साम तथोक्थं च दक्षिणादसृजन्मुखात् ३२ सामानि जगतीछन्दः स्तोमं सप्तदशं तथा। वैरूपमतिरात्रं च निर्ममे पश्चिमान्मुखात् ३३ एकविंशमथर्वाणमप्तोर्यामाणमेव च। आनुष्टुभं स वैराजमुत्तरादसृजन्मुखात् ३४ विद्युतोऽशनिमेघांश्च रोहितेन्द्रधनूंषि च। वयांसि च ससर्जादौ कल्पस्य भगवान्विभुः ३५ उच्चावचानि भूतानि गात्रेभ्यस्तस्य जज्ञिरे। सृष्ट्वा चतुष्टयं पूर्वं देवासुरपितृन्प्रजाः ३६ ततोऽसृजत्स भूतानि स्थावराणि चराणि च। यक्षान्पिशाचान्गन्धर्वांस्तथैवाप्सरसां गणान् ३७ नरकिन्नररक्षांसि वयः पशुमृगोरगान्। अव्ययं च व्ययं चैव यदिदं स्थाणुजङ्गमम् ३८ तेषां ये यानि कर्माणि प्राक्सृष्टेः प्रतिपेदिरे। तान्येव प्रतिपद्यन्ते सृज्यमानाः पुनः पुनः ३९ हिंस्राहिंस्रे मृदुक्रूरे धर्माधर्मावृतानृते। तद्भाविताः प्रपद्यन्ते तस्मात्तत्तस्य रोचते ४० इन्द्रियार्थेषु भूतेषु शरीरेषु च स प्रभुः। नानात्वं विनियोगं च धातैव व्यदधात्स्वयम् ४१ नामरूपं च भूतानां कृत्यानां च प्रपञ्चनम्। वेद-

---

फलमूलयुक्त ओषधि त्याच्या रोमापासून उत्पन्न झाल्या २७. ह्याप्रमाणें पशु व ओषधि उत्पन्न केल्यानंतर ब्रह्मदेवानें कल्पारंभीं त्रेतायुग लागल्यावर यज्ञ केला. २८. गाय, शेळी, पुरुष, मेंढा, अश्व, खेचर व गर्दभ हे सात ग्राम्य पशु. आतां आरण्य पशु ऐक २९. श्वापद, द्विखुर, गज, वानर, पक्षी, जलपशु व सर्प ३०. गायत्रीछंद, ऋग्वेद, त्रिवृत्स्तोम, रथंतरसाम व अग्निष्टोम यज्ञ हीं त्यानें पूर्वमुखापासून उत्पन्न केलीं ३१. यजुर्वेद, त्रिष्टुप्छंद, पंचदशस्तोम व बृहत्साम हीं त्यानें दक्षिणमुखापासून उत्पन्न केलीं ३२ सामवेद, जगतीछंद, सप्तदशस्तोम, वैरूपसाम व अतिरात्रयज्ञ हीं त्यानें पश्चिममुखापासून उत्पन्न केलीं ३३; आणि एकविंशस्तोम, अथर्ववेद, आप्तोर्यामक्रतु, अनुष्टुप्छंद व वैराजसाम हीं त्यानें उत्तरमुखापासून निर्माण केलीं ३४. वीज, अशनि, मेघ, रोहित मासा इंद्रधनुष्य व पक्षी हीं भगवान् ब्रह्मदेवानें कल्पारंभींच निर्माण केलीं ३५; आणि लहान मोठीं भूतें त्याच्या अवयवांपासून उत्पन्न झालीं. देव, असुर, पितर व मानव असें हें चतुष्टय उत्पन्न केल्यानंतर ३६ त्यानें चराचर भूतें उत्पन्न केलीं. सारांश, यक्ष, पिशाच, गंधर्व, अप्सरांचे गण ३७, नर, किंनर, राक्षस, पक्षी, पशु, मृग, सर्प आणि इतरही दीर्घायु व अल्पायु चराचर प्राणी त्यानें निर्माण केले ३८. त्यांपैकीं सृष्टीच्या पूर्वी ज्या प्राण्यांचीं जीं कर्में होतीं ते प्राणी तींच कर्में वारंवार उत्पन्न झाल्यानंतर करूं लागले ३९. हिंस्र, अहिंस्र, मृदु, क्रूर, धर्म, अधर्म, पुण्य, पाप, सत्य व असत्य अशीं— आपआपल्या कर्मांच्या भावनेसह जे प्राणी उत्पन्न होत असतात— त्यांना तींच तींच कर्में रुचूं लागतात ४०. इंद्रियें, विषय, भूतें व शरीरें ह्यांचे ठिकाणीं भिन्नत्व आणि कर्मयोजना हीं स्वतः विधात्यानेंच ठरवून ठेविलीं

भास्तु प्राणिनः ७ अन्योन्यं इच्छयाविष्टा मैथुनायोपचक्रमुः । ततः प्रभृति कल्पेऽस्मिन्मिथुनानां हि सम्भवः ८ मासि मास्यार्तवं यत्तु न तदासीत्तु योषिताम् । तस्मात्तदा न सुषुवुः सेवितैरपि मैथुनैः ९ आयुषोन्ते प्रसूयन्ते मिथुनान्येव ताः सकृत् । ततः प्रभृति कल्पेऽस्मिन्मिथुनानां हि संभवः १० ध्यानेन मनसा तासां प्रजानां जायतेऽसकृत् । शब्दादिर्विषयः शुद्धः प्रत्येकं पञ्चलक्षणः ११ इत्येषा मानुषी सृष्टिर्या पूर्वं वै प्रजापतेः । तस्यान्ववायसम्भूता यैरिदं पूरितं जगत् १२ सरित्सरःसमुद्रांश्च सेवन्ते पर्वतानपि । तास्तदा ह्यल्पशीतोष्णा युगे तस्मिंश्चरन्ति वै १३ तृप्तिं स्वाभाविकीं प्राप्ता विषयेषु महामते । न तासां प्रतिघातोऽस्ति न द्वेषो नापि मत्सरः १४ पर्वतोदधिसेविन्यो ह्यनिकेतास्तु सर्वशः । ता वै निष्कामचारिण्यो नित्यं मुदितमानसाः १५ पिशाचोरगरक्षांसि तथा मत्सरिणो जनाः । पशवः पक्षिणश्चैव नक्रा मत्स्याः सरीसृपाः १६ अवारका ह्यण्डजा वा ते ह्यधर्मप्रसूतयः । न मूलफलपुष्पाणि नार्तवा वत्सराणि च १७ सर्वकालसुखः कालो नात्यर्थं घर्मशीतता । कालेन गच्छता तेषां पित्रा सिद्धिरजायत १८ ततश्च तेषां पूर्वाह्णे मध्याह्ने च वितृप्तता । पुनस्तथेच्छतां तृप्तिरनायासेन साभवत् १९

ठिकाणीं तमोगुणाचें आधिक्य असल्यामुळें तें सर्वही मनाचे हलके व दरिद्री निपजलें. नंतर स्त्री व पुरुष असे बरोबरच उत्पन्न झालेले ते प्राणी आनंदित होऊं लागले ७; आणि मदनानें व्याकुल झाल्यामुळें परस्परांशीं मैथुन करूं लागले. तेव्हांपासून ह्या कल्पामध्यें स्त्रीपुरुषांचा समागम होऊं लागला ८. प्रत्येक महिन्यास जें रजोदर्शन स्त्रियांना सांप्रत होत असतें तें पूर्वी होत नसे; ह्यास्तव, विषयोपभोगानेंही त्या प्रसूत होत नसत ९. आयुष्याचे शेवटीं त्या स्त्रियांना एकटांच जोडपीं होत असत. तेव्हांपासून ह्या कल्पामध्यें स्त्रीपुरुषांचा समागम विशेष होऊं लागला १०. त्या प्रजाजनांनीं मनामध्यें वारंवार चिंतन केलें असतां शब्दादि शुद्ध पांच विषय उत्पन्न होत असत ११. ही ब्रह्मदेवाची प्राचीन मानुषी सृष्टि. ह्या सृष्टींतील अपत्यपरंपरेनें हें जगत् भरलें आहे १२. त्या युगांतील प्रजा—नद्या, सरोवरें, समुद्र व पर्वत ह्यांचें—अवलंबन करून रहात असत व त्यांना शीतोष्णसंबंधीं पीडा विशेष होत नसे १३. हे महामते, विषयासंबंधानें त्यांना स्वाभाविक तृप्ति प्राप्त होत असे; आणि त्यांना अडथळा येत नसल्यामुळें त्यांच्यांत द्वेष अथवा मत्सर नसे १४. पर्वत व समुद्र ह्यांचाच आश्रय करून असलेल्या गृहरहित प्रजा कसलीही वासना मनांत न धरितां नित्य आनंदित मनानें रहात असत १५. पिशाच, उरग, राक्षस, मत्सरी लोक, पशु, पक्षी, नक्र, मत्स्य, सर्प १६, जलचर व अंडज हे प्राणी अधर्मापासून उत्पन्न झालेले आहेत; त्यांना मुळें, फळें व पुष्पें ह्यांची अपेक्षा नसे; आणि ऋतु व संवत्सर ह्यांचीही आवश्यकता नसे १७. उष्णता अथवा शैत्य विशेष न होतां त्यांना सर्व काळीं सुख होत असे. अशा स्थितींत कांहीं काळ लोटल्यानंतर त्यांना पित्याच्या अनुग्रहामुळें सर्व कांहीं प्राप्त होत असे १८. पूर्वाह्ण, मध्यान्ह इत्यादि कोणत्याही वेळीं त्यांना कसलीही इच्छा झाल्यास ती अनायासानें तृप्त होत

इच्छतां च तथायासो मनसः समजायत । अपां सौक्ष्म्यं ततस्तासां सिद्धिर्नाम्ना रसोल्लास २० स्समजायत चैवान्या सर्वकामप्रदायिनी । असंस्कार्यैः शरीरैश्च प्रजास्ताः स्थिरयौवनाः २१ तासां विना तु संकल्पं जायन्ते मिथुनाः प्रजाः । समं जन्म च रूपं च म्रियन्ते चैव ताः समम् २२ अनिच्छाद्वेषसंयुक्ता वर्तन्ते तु परस्परम् । तुल्यरूपायुषः सर्वा अधमोत्तमतां विना २३ चत्वारि तु सहस्राणि वर्षाणां मानुषाणि तु । आयुष्प्रमाणं जीवन्ति न च क्लेशाद्विपत्तयः २४ क्वचित्क्वचित्पुनः साभूत्क्षितिर्भाग्येन सर्वशः । कालेन गच्छता नाशमुपयान्ति यथा प्रजाः २५ तथा ताः क्रमशो नाशं जग्मुः सर्वत्र सिद्धयः । तासु सर्वासु नष्टासु नभसः प्रच्युता रसाः २६ पयसः कल्पवृक्षास्ते संभूता गृहसंस्थिताः । सर्वे प्रत्युपभोगाश्च तासां तेभ्यः प्रजायते २७ वर्तयन्ति स्म तेभ्यस्तास्त्रेतायुगमुखे सदा । ततः कालेन वै रागस्तासामाकस्मिकोऽभवत् २८ मासि मास्यार्तवोत्पत्त्या गर्भोत्पत्तिः पुनः पुनः । रागोत्पत्त्या ततस्तासां वृक्षास्ते गृहसंस्थिताः २९ प्रणेशुरपरे चासंभवंश्चतुःशाखा महीरुहाः । वस्त्राणि च प्रसूयन्ते फलेष्वाभरणानि च ३० तेष्वेव जायते तेषां गन्धवर्णरसान्वितम् । अमाक्षिकं महावीर्यं पुटके पुटके मधु ३१ तेन ता वर्तयन्ति स्म मुखे त्रेतायुगस्य वै । ततः

असे १९. पुढें ते प्रजाजन वासना धरूं लागले असतां त्यांच्या मनाला कष्ट होऊं लागले. रस हें जें उदकाचें सूक्ष्म रूप त्याच्यापासून त्यांना रसविषयक सिद्धि होत असे २० व इतरही विषयांच्या उपयोगासंबंधानें त्यांच्या इच्छा परिपूर्ण होत असत. शरीरें संस्काररहित असूनही त्या प्रजांचें यौवन स्थिर असे २१. संकल्पाशिवाय त्यांना स्त्रीपुरुषयुग्मरूप अपत्यें होत असत. त्यांची उत्पत्ति, रूप व मरण हीं सारखींच असत २२. त्या प्रजा परस्परांविषयीं इच्छा व द्वेष बाळगीत नसत; उत्कृष्ट व निकृष्ट हा प्रकार त्यांच्यामध्यें नसे आणि रूप व आयुष्य ह्यांसंबंधानेंही त्यांचें साम्य असे २३. मनुष्यांच्या मानानें चार हजार वर्षें त्यांना आयुष्य असे व तोंपर्यंत त्या प्रजा जिवंत रहात असत. त्यांना क्लेशामुळें विपत्ति प्राप्त होत नसे २४. नंतर कांहीं काळ लोटला असतां हवें तें पीक देणारी पृथ्वी भाग्यामुळेंच कांहीं कांहीं ठिकाणीं दृष्टीं पडूं लागली व प्रजाही कालगतीमुळें नाश पावूं लागली २५. तेव्हां सर्व ठिकाणीं हळूं हळूं सिद्धिही नष्ट होऊं लागल्या आणि त्या सर्व सिद्धि नष्ट झाल्यानंतर (प्रजाजनांच्या पोषणाकरितां) आकाशापासून उदकाची वृष्टि होऊं लागली २६. तेव्हां त्या उदकापासून घरोघर कल्पवृक्ष उत्पन्न होऊं लागले व त्या कल्पवृक्षांपासुन त्यांना सर्व प्रकारचे भोग मिळूं लागले २७. त्रेतायुगाचे आरंभीं प्रजा त्या कल्पवृक्षावर अवलंबून असत. नंतर कांहीं काळ लोटल्यावर त्यांना निष्कारण विषयवासना होऊं लागली २८; आणि प्रत्येक महिन्यास रजोदर्शन होऊं लागून वारंवार गर्भधारणा होऊं लागली. परंतु, निष्कारण विषयवासना प्रजाजनांना उत्पन्न होऊं लागल्यामुळें ते घरांत असलेले कल्पवृक्ष २९ नाहींसे झाले; आणि चार शाखांनीं युक्त असे दुसरे वृक्ष उत्पन्न झाले. त्या वृक्षापासून वस्त्रें, फळें व भूषणें प्राप्त होत असत ३०

दष्टभागेन प्रोच्यते ४५ प्राकारपरिखाहीनं पुरं खर्वटमुच्यते। शाखानगरकं चान्यन्मन्त्रिसामन्तभुक्तिमत् ४६ तथा शूद्रजनप्रायाः स्वसमृद्धकृषीवलाः। क्षेत्रोपभोग्यभूमध्ये वसतिर्ग्रामसंज्ञिता ४७ अन्यस्मान्नगरादेर्या कार्यमुद्दिश्य मानवैः। क्रियते वसतिः सा वै विज्ञेया वसतिर्नरैः ४८ दुष्टप्रायो विना क्षेत्रैः परभूमिचरो बली। ग्राम एव द्रमीसंज्ञो राजवल्लभसंश्रयः ४९ शकटारूढभाण्डैश्च गोपालैर्विपणं विना। गोसमूहैस्तथा घोषो यत्रेच्छाभूमिकेतनः ५० त एवं नगरादींस्तु कृत्वा वासार्थमात्मनः। निकेतनानि द्वन्द्वानां चक्रुर्थोपशमाय वै ५१ गृहाकारा यथा पूर्वं तेषामासन्महीरुहाः। तथा संस्मृत्य तत्सर्वं चक्रुर्वेश्मानि ताः प्रजाः ५२ वृक्षस्यैवं गताः शाखास्तथैवं चापरा गताः। नताश्चैवोन्नताश्चैव तद्वच्छाखाः प्रचक्रिरे ५३ याः शाखाः कल्पवृक्षाणां पूर्वमासन्द्विजोत्तम। ता एव शाखा गेहानां शालात्वं तेन तासु तत् ५४ कृत्वा द्वन्द्वोपघातं ते वार्तोपायमचिन्तयन्। नष्टेषु मधुना सार्धं कल्पवृक्षेष्वशेषतः ५५ विषादव्याकुलास्ता वै प्रजास्तृष्णाक्षुधार्दिताः। ततः प्रादुर्बभौ तासां सिद्धिस्त्रेतामुखे तदा ५६ वार्तास्वसाधिता त्वन्या वृष्टिस्तासां निकामतः। तासां वृष्ट्युदकानीह यानि निम्नगतानि वै ५७ वृष्ट्यावरुद्धैरभवन्स्रोतःखातानि

खेट असतें; त्याच्या चतुर्थांश खरवट असते आणि द्रोणीमुख अष्टमांश असतें ४५. कोट व खंदक ह्यांनीं रहित जें पुर तें खरवट होय; मांडलिक व मंत्री ह्यांच्या गांवांना शाखानगर असें ह्मणतात ४६. स्वतःच्या सामर्थ्यानें समृद्ध झालेले शेतकरी व शूद्रतुल्य लोक ज्या ठिकाणीं शेतांत घरें बांधून रहात असतात त्याला गांव असें ह्मणतात ४७. अन्य नगरादिकांतून कांहीं कार्याकरितां आलेले लोक जेथें वास्तव्य करितात त्याला वसति असें ह्मणतात ४८. राजाला प्रिय असलेले लोक ज्यांत रहातात, ज्यांतील लोक प्रायः दुष्ट असतात आणि शेतें नसतांनाही ज्यांतील बलाढ्य लोक दुसऱ्यांच्या जमिनींतील पीक घेत असत त्या गांवाला द्रमी असें ह्मणतात ४९. गाड्यावर भांडेंकुंडें घालून ज्या ठिकाणीं गोपाल गाईंच्या कळपासह हव्या त्या जमिनीवर वास्तव्य करीत असतात व ज्या ठिकाणीं बाजार नसतो त्याला घोष असें ह्मणतात ५०. ह्याप्रमाणें नगरादिकांची व्यवस्था करून त्यांनीं शितोष्णादिकांचा ताप होऊं नये एतदर्थ स्वतःच्या राहण्याकरितां घरें तयार केलीं ५१. पूर्वी ज्याप्रमाणें वृक्ष गृहाकार बनलेले होते त्याप्रमाणें स्मरणठेवून त्यांनीं घरें बांधिलीं ५२. पूर्वी वृक्षाच्या कांहीं शाखा अशा गेलेल्या असत; कांहीं तशा गेलेल्या असत; कांहीं नमलेल्या असत व कांहीं उंच असत. तेव्हां त्यांनीं तशाच शाखा बनविल्या ५३. हे द्विजश्रेष्ठ, ज्या पूर्वी कल्पवृक्षाच्या शाखा होत्या त्याच घराचे विभाग झाल्या व त्यांना पाकशाला, अग्निशाला इत्यादि संज्ञा प्राप्त झाल्या ५४. ह्याप्रमाणें शीतोष्णादिकांपासून होणाऱ्या पीडेचा परिहार केल्यावर जीविकेचा उपाय ते प्रजाजन मनांत आणूं लागले. मधासह सर्व कल्पवृक्ष नष्ट झाले असतां ५५ क्षुधा व तृषा ह्यांनीं व्याकुळ झालेल्या त्या प्रजा खिन्न झाल्या आणि तेव्हां ह्मणजे त्रेतायुगाचे आरंभीं उपजीविका साधणार

कास्तथावेणुयवाश्च ये । ग्राम्यारण्याः स्मृता ह्येता ओषध्यश्च चतुर्दश ७२ यदा प्रसृष्टा ओषध्यो न प्ररोहन्ति ताः पुनः । ततः स तासां वृत्त्यर्थं वार्तोपायं चकार ह ७३ ब्रह्मा स्वयम्भूर्भगवान्हस्तसिद्धिं च कर्मजाम् । ततः प्रभृत्यथौषध्यः कृष्टपच्यास्तु जज्ञिरे ७४ संसिद्धायां तु वार्तायां ततस्तासां स्वयं प्रभुः । मर्यादां स्थापयामास यथान्यायं यथागुणम् ७५ वर्णानामाश्रमाणां च धर्मान्धर्मभृतां वर। लोकानां सर्ववर्णानां सम्यग्धर्मार्थपालिनाम् ७६ प्राजापत्यं ब्राह्मणानां स्मृतं स्थानं क्रियावताम् । स्थानमैन्द्रं क्षत्रियाणां संग्रामेष्वपलायिनाम् ७७ वैश्यानां मारुतं स्थानं स्वधर्ममनुवर्तताम् । गान्धर्वं शूद्रजातीनां परिचर्यानुवर्तिनाम् ७८ अष्टाशीति सहस्राणामृषीणामूर्ध्वरेतसाम् । स्मृतं तेषां तु यत्स्थानं तदेव गुरुवासिनाम् ७९ सप्तर्षीणां तु यत्स्थानं स्मृतं तद्वै वनौकसाम् । प्राजापत्यं गृहस्थानां न्यासिनां ब्रह्मणः क्षयम् । योगिनाममृतं स्थानमिति वै स्थानकल्पना ८० ( २८७९ ) इति श्रीमार्कण्डेयपुराणे सृष्टिप्रकरणे षट्चत्वारिंशोऽध्यायः ॥ ४६ ॥

मार्कण्डेय उवाच ॥ ततोऽभिध्यायतस्तस्य जज्ञिरे मानसीः प्रजाः । तच्छरीरसमुत्पन्नैः कार्यैस्तैः कारणैः सह १ क्षेत्रज्ञाः समवर्तन्त गात्रेभ्यस्तस्य धीमतः । ते सर्वे समवर्तन्त ये मया प्रागुदाहृताः २ देवाद्याः स्थावरान्ताश्च त्रैगुण्यविषयाः स्मृताः । एवं भूतानि सृष्टानि स्थावराणि चराणि च ३ यदास्य ताः प्रजाः सर्वा न व्यवर्धन्त धीमतः । अथान्यान्मानसान्पुत्रान्सदृशानात्मनोऽसृजत् ४ भृगुं पुलस्त्यं पुलहं क्रतुमङ्गिरसं तथा । मरीचिं दक्षमत्रिं च

---

व वेणुयव ह्या ग्राम्य व वन्य मिळून चवदा ओषधि होत ७२. जेव्हां उत्पन्न केलेल्या ह्या ओषधि आपोआप उगवेनाशा झाल्या तेव्हां स्वयंभु भगवान् ब्रह्मदेवानें त्यांच्या वृद्धीकारितां कर्मजन्य हस्तसिद्धि हा उपाय प्रकट केला व तेव्हांपसून नांगरिल्यानंतर धान्यें होऊं लागलीं ७३, ७४. ह्याप्रमाणें जीविकेचा उपाय सिद्ध झाला असतां ब्रह्मदेवानें गुणानुरूप मर्यादा त्या प्रजाजनामध्यें यथान्याय स्थापिली ७५. हे महाधर्मनिष्ठ, धर्म व अर्थ परिपालन करणाऱ्या सर्ववर्णरूप लोकांना वर्णाश्रमधर्म त्यानें नेमून दिले ७६. कर्मनिष्ठ ब्राह्मणांना प्राजापत्य लोक संग्रामामध्यें पलायन न करणाऱ्या लोकांना इंद्रलोक ७७, स्वधर्मनिष्ठ वैश्यांना मारुत लोक, आणि द्विजशुश्रूषा करून राहणाऱ्या शूद्रांना गांधर्व लोक हीं फलें त्यानें ठरविलीं ७८. ऐशी हजार उर्ध्वरेते ऋषि व आजन्म गुरुगृहीं राहणारे ब्रह्मचारी ह्यांना सारखेंच स्थान प्राप्त होत असतें ७९ आणि सप्तर्षींना व वानप्रस्थांना एकच स्थान प्राप्त होत असतें; गृहस्थांना प्राजापत्य लोक, संन्याशांना ब्रह्मलोक आणि योग्यांना मोक्ष हीं स्थानांची व्यवस्था होय ८०. (२८७९) ह्याप्रमाणें श्रीमार्कंडेयपुराणांतर्गत सृष्टिप्रकरणांतील शेहेचाळिसावा अध्याय समाप्त झाला ४६॥

मार्कंडेय म्हणतातः—नंतर ब्रह्मदेव चिंतन करूं लागला असतां त्याच्या शरीरापासून उत्पन्न झालेल्या कार्यकारणांसह मानसी प्रजा उत्पन्न झाल्या १. त्या विचारी ब्रह्मदेवाच्या अवयवांपासून मीं पूर्वी सांगितलेले क्षेत्रज्ञ प्रकट झाले २. ते त्रिगुणात्मक देवादिस्थावरांत प्राणी होत. ह्याप्रमाणें चराचर भूतें उत्पन्न झालीं ३. जेव्हां त्या विवेकी

वसिष्ठं चैव मानसम् ८ नव ब्रह्मण इत्येते पुराणे निश्चयं गताः । ततोऽसृजत्पुनर्ब्रह्मा रुद्रं क्रोधात्मसम्भवम् ६ सङ्कल्पं चैव धर्मं च पूर्वेषामपि पूर्वजम् । सनन्दनादयो ये च पूर्वं सृष्टाः स्वयंभुवा ७ न ते लोकेषु सज्जन्तो निरपेक्षाः समाहिताः । सर्वे तेऽनागतज्ञाना वीतरागा विमत्सराः ८ तेष्वेवं निरपेक्षेषु लोकसृष्टौ महात्मनः । ब्रह्मणोऽभून्महाक्रोधस्तत्रोत्पन्नोऽर्कसन्निभः ९ अर्द्धनारीनरवपुः पुरुषोऽतिशरीरवान् । विभजात्मानमित्युक्त्वा स तदान्तर्दधे ततः १० सचोक्तो वै पृथक्स्त्रीत्वं पुरुषत्वं तथाकरोत् । बिभेद पुरुषत्वं च दशधा चैकधा तु सः ११ सौम्यासौम्यैस्तथा शान्तैः पुंस्त्वं स्त्रीत्वं च स प्रभुः । बिभेद बहुधा देवः पुरुषैरमितैः सितैः १२ ततो ब्रह्मात्मसंभूतं पूर्वं स्वायंभुवं प्रभुः। आत्मनः सदृशं कृत्वा प्रजापाल्ये मनुं द्विज १३ शतरूपां च तां नारीं तपोनिर्धूतकल्मषाम् । स्वायंभुवो मनुर्देवः पत्नीत्वे जगृहे विभुः १४ तस्माच्च पुरुषात्पुत्रौ शतरूपा व्यजायत । प्रियव्रतोत्तानपादौ प्रख्यातावात्मकर्मभिः १५ कन्ये द्वे च तयाकूतिं प्रसूतिं च ततः पिता । ददौ प्रसूतिं दक्षाय तथाकूतिं रुचेः पुरा १६ प्रजापतिः स जग्राह तयोर्यज्ञः सदक्षिणः । पुत्रो जज्ञे महाभाग दम्पतीर्मिथुनं ततः १७ यज्ञस्य दक्षिणायां तु पुत्रा द्वादश जज्ञिरे । यामा इति समाख्याता देवाः स्वायंभुवेऽन्तरे १८ तस्य पुत्रास्तु यज्ञस्य दक्षिणायां सुभास्वराः । प्रसूत्यां च

ब्रह्मदेवाच्या त्या प्रजा वृद्धिंगत होईनात तेव्हां आत्मतुल्य इतर मानसपुत्र त्यानें उत्पन्न केले ४. भृगु, पुलस्त्य, पुलह, क्रतु, अंगिरा, मरीचि, दक्ष, अत्रि व वसिष्ठ ५ हे पुराणप्रसिद्ध नऊ ब्रह्मदेवाचे मानसपुत्र होत. नंतर ब्रह्मदेवानें पुनरपि क्रोधापासून रुद्र उत्पन्न केला ६; आणि प्राचीनांचाही पूर्वज असा धर्म संकल्पासह उत्पन्न केला. ब्रह्मदेवानें जे पूर्वी सनंदनादि मुनि उत्पन्न केले होते ७ ते विषयासक्त न होतां निरपेक्ष, शांत, भविष्यज्ञानी, रागहीन व मत्सरशून्य बनले ८. ह्याप्रमाणें ते लोक सृष्टीविषयीं निरपेक्ष झाले असतां महात्म्या ब्रह्मदेवाला मोठा क्रोध आला; त्यापासून सूर्यतुल्यतेजस्वी ९ आणि अर्धनारीनरदेहधारी अतिधिप्पाड पुरुष उत्पन्न झाला; आणि विभक्त हो, असें त्याला बोलून तो ब्रह्मदेव गुप्त झाला १०. ब्रह्मदेवानें असें सांगतांक्षणीं त्यानें स्त्रीत्व व पुरुषत्व भिन्न भिन्न केलें. त्यानें पुरुषत्वाचे अकरा विभाग केले ११. सारांश, सौम्य, क्रूर, शांत इत्यादि गुणांनीं युक्त असें पुंस्त्व व स्त्रीत्व त्या देवानें अनेक प्रकारांनीं विभागिलें व त्यांतच असंख्य क्रूर पुरुष त्यानें निर्माण केले १२. नंतर, हे द्विज, प्रभु ब्रह्मदेवानें पूर्वी स्वायंभुव मनु, आत्मतुल्य उत्पन्न करून प्रजारक्षणाकडे त्याची योजना केली १३. तेव्हां तपानें निष्पाप झालेली ती स्त्री शतरूपा प्रभु स्वायंभुव मनुराजानें पत्नी केली १४; व त्या पासून शतरूपेला स्वकर्मविख्यात प्रियव्रत व उत्तानपाद असे दोन पुत्र झाले; आणि आकूति व प्रसूति अशा दोन कन्या झाल्या. पित्यानें प्रसूति दक्षाला व आकूति रुचीला पूर्वी दिली १६. त्या प्रजापितनें ती स्वीकारिली व त्यापासून, हे महाशय, यज्ञ व दक्षिणा असें जोडपें उत्पन्न झालें १७. यज्ञाला दक्षिणेचे ठिकाणीं याम म्हणून स्वायंभुव मन्वंतरांत प्रसिद्ध अस-

तथा दक्षश्रतसो विंशतिस्तथा १९ ससर्ज कन्यास्तासां च सम्यङ्नामानि मे शृणु । श्रद्धा लक्ष्मीर्धृतिस्तुष्टिः पुष्टिर्मेधा क्रिया तथा २० बुद्धिर्लज्जा वपुः शान्तिः सिद्धिः कीर्तिस्त्रयोदशी। पत्न्यर्थं प्रतिजग्राह धर्मो दाक्षायणीः प्रभुः२१ ताभ्यः शिष्टा यवीयस्य एकादश सुलोचनाः। ख्यातिः सत्य च सम्भूतिः स्मृतिः प्रीतिस्तथा क्षमा २२ सन्ततिश्चानसूया च ऊर्जा स्वाहा स्वधा तथा। भृगुर्भवो मरीचिश्च तथा चैवाङ्गिरा मुनिः२३ पुलस्त्यः पुलहश्चैव क्रतुश्च ऋषयस्तथा । वसिष्ठोऽत्रिस्तथा वह्निः पितरश्च यथाक्रमम् २४ ख्यात्याद्या जगृहुः कन्या मुनयो मुनिसत्तमाः। श्रद्धाकामं श्रीश्च दर्पं नियमं धृतिरात्मजम् २५ सन्तोषं च तथा तुष्टिर्लोभं पुष्टिरजायत। मेधाश्रुतं क्रियादण्डं नयं विनयमेव च २६ बोधं बुद्धिस्तथा लज्जा विनयं वपुरात्मजम् । व्यवसायं प्रजज्ञे वै क्षेमं शान्तिरसूयत २७ सुखं सिद्धिर्यशः कीर्तिरित्येते धर्मयोनयः। कामादतिमुदं हर्षं धर्मपौत्रमसूयत २८ हिंसा भार्या त्वधर्मस्य तस्यां जज्ञे तथानृतम् । कन्या च निर्ऋतिस्तस्यां सुतौ द्वौ नरकं भयम् २९ माया च वेदना चैव मिथुनं त्वयमेतयोः। तयोर्जज्ञेऽथ वै माया मृत्युं भूतापहारिणम् ३० वेदनात्मसुतं चापि दुःखं जज्ञेऽथ रौरवात्। मृत्योर्व्याधिजराशोकतृष्णाक्रोधाश्च जज्ञिरे ३१ दुःखोद्भवाः स्मृता ह्येते सर्वे चाधर्मलक्षणाः। नैषां भार्यास्ति पुत्रो वा सर्वे ते ह्यूर्ध्वरेतसः ३२ निर्ऋतिश्च तथा चान्या मृत्योर्भार्याभवन्मुने। अलक्ष्मीर्नाम तस्यां च मृत्योः पुत्राश्चतुर्दश ३३ अलक्ष्मीपुत्रका

---

लेले देव हे बारा पुत्र झाले १८. दक्षिणेचे ठिकाणीं यज्ञाला झालेले ते पुत्र महातेजस्वी आहेत. प्रसूतीच्या ठिकाणीं दक्षाला वीस १९ कन्या झाल्या; त्यांची नांवें तूं माझ्यापासून नीट ऐक.. श्रद्धा, लक्ष्मी, धृति, तुष्टि, पुष्टि मेधा, क्रिया२०,बुद्धि, लज्जा, वपु, शांति, सिद्धि व कीर्ति ह्या तेरा दक्षकन्या प्रभु धर्मानें भार्या वरिल्या २१. त्यांहून कनिष्ठ ज्या अकरा सुंदरी कन्या त्या ख्याति, सती, संभूति, स्मृति, प्रीति, क्षमा २२, संतति, अनसूया, ऊर्जा, स्वाहा व स्वधा ह्या होत. भृगु, भव, मरीचि, अंगिरामुनि २३, पुलस्त्य, पुलह, क्रतु, वसिष्ठ, अत्रि, वह्नि व पितर ह्यांनीं, हे मुनिश्रेष्ठ, ख्यातिप्रभृति कन्या स्वीकारिल्या २४. श्रद्धेला काम, लक्ष्मीला दर्प, धृतीला नियम २४,२५, तुष्टीला संतोष, पुष्टीला लोभ, मेधेला श्रुत आणि क्रियेला दंड, नय व विनय २६, बुद्धीला बोध, लज्जेला विनय, वपूला व्यवसाय, शांतीला क्षेम २७, सिद्धीला सुख व कीर्तिला यश पुत्र झाला, हे पुत्र धर्मस्थानरूप आहेत. कामापासून हर्ष हा धर्मपौत्र झाला. २८. अधर्माची भार्या हिंसा; तिला अमृत हा पुत्र झाला, निर्ऋति ही कन्या झाली व त्या कन्येला नरक व भय हे दोन पुत्र झाले २९. माया व वेदना ह्या त्यांच्या नायका होत. मयेला भूतनाशक मृत्यु हा पुत्र झाला ३० आणि वेदनेला रौरवापासून दुःख हा पुत्र झाला. मृत्यूपासून व्याधि, जरा, तृष्णा, शोक व क्रोध हे उत्पन्न झाले ३१. हे सर्वही दुःखमूलक असून अधर्मरूप होत. हे सर्वही ऊर्ध्वरेते असल्यामुळें ह्यांना भार्या अथवा पुत्र नाहीं ३२. हे मुने, निर्ऋति व अलक्ष्मी ह्या दोन मृत्यूच्या भार्या. पैकीं दुसरीचे ठिकाणीं मृत्यूला चवदा पुत्र झाले ३३. हे अलक्ष्मी-

शुद्रक्या दृष्टमेव च। यथोपघातवत्किंचिद्द्रव्यं पेयमथापि या ४७ एतानि तव पुष्ट्यर्थमन्यच्चापि ददामि ते। अश्रद्धया हुतं दत्तमस्नातैर्यदवज्ञया ४८ यच्चाम्बुपूर्वकं छिन्नमनारम्भीकृतमेव च। स्वतुमाविष्कृतं यत्तु दत्तं चैवातिविस्मयात् ४९ दुष्टं क्रुद्धार्तदत्तं च यक्ष्मन्प्राप्स्यसि तत्फलम्। यच्च पौनर्भवः किंचित्करोत्यामुष्मिकं क्रमम् ५० यच्च पौनर्भवा योषित्तद्यक्ष्म तव तृप्तये। कन्याशुल्कोपधानाय समुपास्ते धनक्रियाः ५१ तथैव यक्ष्म पुष्ट्यर्थमसच्छास्त्रक्रियाश्च याः। यथार्थनिष्टैतौ किंचिदधीतं यच्च सत्यतः ५२ तत्सर्वं तव कामांश्च ददामि तव सिद्धये। गुर्विण्यभिगमे सन्ध्या नित्यकार्यव्यतिक्रमे ५३ असच्छास्त्रक्रियालापदूषितेषु च दुःसह। तवाभिभवसामर्थ्यं भविष्यति सदा नृषु ५४ पंक्तिभेदे वृथापाके पाकभेदे तथा कृते। नित्यं च गेहकलहे भविता वसतिस्तव ५५ अपोष्यमाणे च तथा भृत्यगोवाहनादिके। असन्ध्याभ्युक्षितागारे काले त्वत्तो भयं नृणाम् ५६ नक्षत्रग्रहपीडासु त्रिविधोत्पातदर्शने। अशान्तिकपरान्यक्ष्मन्नरानभिभविष्यसि ५७ वृथोपवासिनो मर्त्या द्यूतस्त्रीषु सदा रताः। त्वद्भाषणोपकर्तारो बैडालव्रतिकाश्च ये ५८ अब्रह्मचारिणाधीतमिज्या चाविदुषा कृता। तपोवने ग्राम्यभुजां तथैवानिर्जितात्मनाम् ५९ ब्राह्मणक्षत्रियविशां शूद्राणां च स्वकर्मतः। परि-

आसनावर ठेविलेलें, विदिशेस मुख करून भक्षिलेलें, संध्यासमयीं सेवन केलेलें, नृत्यवाद्यध्वनींनीं युक्त ४६, रजस्वलेनें स्पृष्ट, भुक्त व दुष्ट आणि इतरही प्रकारानें दूषित झालेलें अन्नपान ४७ मी तुला पुष्टीकरितां देतों व इतरही अर्पण करितों. अश्रद्धेनें, पारोशानें व अवज्ञेनें हवन केलेलें व दिलेलें ४८, पूर्वीं उदक दिल्याशिवाय वर ठेविलेलें, स्वतःच्या मालकीचें न केलेलें, टाकण्याकरितां बाहेर ठेविलेलें, अति विस्मयानें दिलेलें ४९, दोषयुक्त आणि क्रुद्ध अथवा आर्त होऊन दिलेलें जें अन्न त्याचें फल, हे यक्ष्म्या, तुला प्राप्त होईल. पुनरूढा स्त्रीचा पुत्र व ती स्त्री ह्यांचें परलोकार्थ कर्म, हे यक्ष्म्या, तुझ्या तृप्तीला कारण होईल. कन्येचें द्रव्य घेऊन होणारा दानधर्म व सच्छास्त्राला सोडून होणारीं कर्में, हे यक्ष्म्या, तुझ्या पुष्टीला कारण होतील. द्रव्यप्राप्तीकरितां आणि असत्यमार्गानें केलेलें अध्ययन ५०,५१,५२ हें सर्व मीं तुला तृप्त्यर्थ अर्पण करून तुझे मनोरथ पूर्ण करीन. हे दुःसहा, गर्भिणीशीं गमन करणारा, संध्यवंदनादि नित्यकर्में न करणारा ५३ आणि सच्छास्त्राला सोडून असलेल्या कर्मांनीं दूषित अशा लोकांच्या ठिकाणीं तुझें विजयसामर्थ्य राहील ५४. पंक्तिभेद, निष्कारण पाक, पाकभेद आणि गृहकलह ह्या ठिकाणीं तुझें वास्तव्य होईल ५५. ज्यांतील भृत्य, गाई, वाहनें इत्यादिकांचें नीट पोषण होत नाहीं व संध्यासमयीं जेथें सडासंमार्जन होत नाहीं अशा घरामध्यें पुरुषांना तुझ्यापासून भय प्राप्त होईल ५६. नक्षत्रपीडा, ग्रहपीडा आणि तीन प्रकारचे उत्पात झाल्यास शांति न करणाऱ्या लोकांना तूं पछाडशील ५७. व्यर्थ अपघात करणारे, द्यूत व स्त्रिया ह्यांविषयीं सर्वदा तत्पर व दांभिक लोक तुझ्याच भाषणाला अनुकूल होत ५८. ब्रह्मचर्य नसतांना केलेलें अध्ययन, अविद्वानानें केलेला याग, ग्राम्य आहार करून किंवा मनोनि-

—

च्युतानां या चेष्टा परलोकार्थमीप्सताम् ६० तस्याश्च यत्फलं सर्वं तत्ते यक्ष्मन्भविष्यति । अन्यच्च ते प्रयच्छामि पुष्ट्यर्थं संनिबोध तत् ६१ भवतो वैश्वदेवान्ते नामोच्चारणपूर्वकम् । एतत्तवेति दास्यन्ति भवतो बलिमूर्जितम् ६२ यः संस्कृताशी विधिवच्छुचिरन्तस्तथा बहिः । अलोलुपो जितश्वासस्तद्गेहमपवर्जय ६३ पूज्यन्ते हव्यकव्याभ्यां देवताः पितरस्तथा । जामयोऽतिथयश्चापि तद्गेहं यक्ष्म वर्जय ६४ यत्र मैत्री गृहे बालवृद्धयोषित्सु च । तथास्वजनवर्गेषु गृहं तच्चापि वर्जय ६५ योषितोऽभिरता यत्र न बहिर्गमनोत्सुकाः । लज्जान्विताः सदा गेहं यक्ष्म तत्परिवर्जय ६६ वयःसम्बन्धयोग्यानि शयनान्यशनानि च । यत्र गेहे त्वया यक्ष्म तद्वर्ज्यं वचनान्मम ६७ यत्र कारुणिका नित्यं साधुकर्मण्यवस्थिताः । सामान्योपस्करैस्तुष्टास्त्यजेथा यक्ष्म तद्गृहम् ६८ यत्रासनस्थास्तिष्ठन्ति गुरुवृद्धद्विजातिषु । न तिष्ठन्ति गृहं तच्च वर्ज्यं यक्ष्म त्वया सदा ६९ वृक्षगुल्मादिभिर्द्वारं न विद्धं यस्य वेश्मनः । मर्मभेदो न वा पुंसस्तच्छ्रेयो भवनं न ते ७० देवतापितृभृत्यानामतिथीनां च वर्तनम् । यस्यान्नशिष्टेनान्नेन पुंसस्तस्य गृहं त्यज ७१ सत्यवाक्यान्क्षमाशीलानहिंसाञ्चाननुतापिनः । प्रदानीनृष्यान्यक्ष्म त्यजेथाश्चानसूयकान् ७२ भर्तृशुश्रूषणे युक्तामसत्स्त्रीसङ्गवर्जिताम् । कुटुम्ब-

ग्रह न करून तपोवनांत राहणाऱ्यांनीं ५९ केलेलीं कर्मे व चारी वर्णांनीं स्वकर्मभ्रष्ट होऊन परलोकबुद्धीनें केलेलीं कर्मे ६० ह्यांचें फल, हे यक्ष्म्या, सर्व तुला प्राप्त होईल. ह्याशिवाय जें मी पुष्टीकरितां तुला देणार आहें तें ऐक ६१. वैश्वदेवाचे शेवटीं तुझ्या नांवाचा उच्चार करून व हें तुझें असें ह्मणून लोक तुला चांगला बलि देतील ६२. यथाविधि संस्कृत अन्न सेवन करणारा, अंतर्बाह्य शुद्ध आणि श्वास ताब्यांत ठेवणारा जो पुरुष त्याचें घर तूं वर्ज्य कर ६३. ज्या घरांत हव्यकव्यांनीं देवपितरांचें पूजन होत असतें आणि स्नुषा व अतिथि ह्यांचा आदर होत असतो तें घर, हे यक्ष्म्या, तूं वर्ज्य कर ६४. ज्या घरांत बाल, वृद्ध, स्त्रिया, पुरुष व स्वजनवर्ग ह्यांच्यांत मित्रभाव आहे तेंही घर तूं वर्ज्य कर ६५. ज्या घरांतील स्त्रिया बाहेर जाण्याविषयीं कधींही उत्सुक न होतां घरांतच रहात असतात व लज्जायुक्त असतात तेंही घर तूं वर्ज्य कर ६६. वय व संबंध ह्यांना अनुरूप अशीं शयनें व भोजनें ज्या घरांत असतील तेंही घर, हे यक्ष्म्या, माझ्या वचनावरून तूं वर्ज्य कर ६७. हे यक्ष्म्या, ज्या घरांतील पुरुष सर्वदा दयाळु, सत्कर्मनिष्ठ आणि सामान्य भांड्याकुंड्यावर संतुष्ट असतात तेंही घर तूं वर्ज्य कर ६८. गुरु, वृद्ध व द्विज उभे असतांना ज्या घरांतील लोक बसत नाहींत तेंही घर, हे यक्ष्म्या, तूं सर्वदा वर्ज्य कर ६९. वृक्ष, गुल्म इत्यादिकांनीं ज्याचें द्वार विद्ध झालेलें नाहीं; आणि ज्यांतील पुरुषांचा मर्मभेद होत नाहीं तें घर तुला यशस्वी होणार नाहीं ७०. देव, पितर, भृत्य व अतिथि ह्यांची तृप्ति होऊन अवशिष्ट राहिलेल्या अन्नावर जो पुरुष रहात असतो त्याचें घर तूं वर्ज्य कर ७१. हे यक्ष्म्या, सत्यवचनी, क्षमाशील, अहिंस्र, निर्मत्सर व दानधर्म करून पश्चात्ताप न पावणारे पुरुष, तूं वर्ज्य कर ७२. पतिसेवेविषयीं तत्पर, वाईट स्त्रीचा समागम न करणारी आणि कुटुंब व पति ह्यांनीं

भर्तृशेषान्नपुष्टां च त्यज योषितम् ७३ यजनाध्ययनाभ्यासदानासक्तमतिं सदा । याज-
नाध्यापनादानकृतवृत्तिं द्विजं त्यज ७४ दानाध्ययनयज्ञेषु सदोद्युक्तं च दुःसह । क्षत्रियं
त्यज सच्छुल्कशस्त्राजीवात्तवेतनम् ७५ त्रिभिः पूर्वगुणैर्युक्तं पाशुपाल्यवणिज्ययोः । कृषे-
श्चाप्तवृत्तिं च त्यज वैश्यमकल्मषम् ७६ दानेज्याद्विजशुश्रूषातत्परं यक्ष्म संत्यज । शूद्रं च
ब्राह्मणादीनां शुश्रूषावृत्तिपोषकम् ७७ श्रुतिस्मृत्यविरोधेन कृतवृत्तिर्गृहे गृही । यत्र तत्र च
तत्पत्नी तस्यैवानुगतात्मिका ७८ यत्र पुत्रो गुरोः पूजां देवानां च तथा पितुः । पत्नी च
भर्तुः कुरुते तत्रालक्ष्मीभयं कुतः ७९ सदावलिप्तं सन्ध्यासु गृहमम्बुसमुक्षितम् । कृतपुष्पबलि
यक्ष्म न त्वं शक्नोषि वीक्षितुम् ८० भास्करादृष्टशयनानि नित्याग्निसलिलानि च । सूर्यालो-
कदीपानि लक्ष्म्या गेहानि भाजनम् ८१ यत्रोक्षा चन्दनं वीणा आदर्शो मधुसर्पिषी । विप्रा-
ज्यताम्रपात्राणि तद्गृहं न तवाश्रयः ८२ यत्र कण्टकिनो वृक्षा यत्र निष्पाववल्लरी । भार्या पुन-
र्भूर्वल्मीकस्तद्यक्ष्म तव मन्दिरम् ८३ यस्मिन्गृहे नराः पञ्च स्त्रीत्रयं तावतीश्च गाः । अन्ध-
कारेन्धनाग्निश्च तद्गृहं वसतिस्तव ८४ एकच्छागं द्विबालेयं त्रिगवं पञ्चमाहिषम् । षडश्वं
सप्तमातङ्गं गृहं यक्ष्माशु शोषय ८५ कुद्दालदात्रपिटकं तद्वत्स्थाल्यादिभाजनम् । यत्र तत्रैव

---

सेवन करून अवशिष्ट राहिलेल्या अन्नानें पुष्ट झालेली स्त्री तूं सोड ७३. यजन, अध्ययन व दान ह्यांविषयीं आसक्त आणि याजन, अध्यापन व प्रतिग्रह ह्यांवर उपजीविका करणाऱ्या पुरुषाला तूं सोड ७४. दानाध्ययनयज्ञांविषयीं सर्वदा उद्युक्त, योग्य कर व शस्त्रानें मिळविलेलें ह्यांवर उपजीविका करणारा क्षत्रिय तूं सोड ७५. यज्ञ, दान व अध्ययन करणारा आणि पशुरक्षण, पशुपालन, व्यापार व शेतकी ह्यांवर उपजीविका करणारा निष्पाप वैश्य तूं सोड ७६. दान, यजन व द्विजसेवा ह्यांविषयीं तत्पर आणि द्विजसेवेवर उदरपोषण करणाऱ्या शूद्राला तूं सोड ७७. श्रुति व स्मृति ह्यांच्या अनुरोधानें ज्या घरांत मालकाचें वर्तन असतें, ज्या घरांत यजमानपत्नी त्याच्याच मतानें वागणारी असते ७८, ज्याठिकाणीं पुत्र, गुरूचें, देवांचें व पित्याचें पूजन करीत असतो आणि स्त्री पतीचें पूजन करीत असते तेथें अलक्ष्मीचें भय कोठून ! ७९. हे यक्ष्म्या, संधिसमयीं ज्या घरांत सारवण घातलेलें असतें व सडा टाकलेला असतो आणि ज्या घरांत पुष्पबलि दिलेला असतो तें घर पाहण्यासही तूं समर्थ नाहींस ८०. ज्यांतील शय्यांवर सूर्याचा प्रकाश पडत नाहीं, जेथें अग्नि व उदक हीं नित्य असतात आणि ज्या घरांत ऊन पडून दीप लागत असतात तीं घरें लक्ष्मीनिवास होत ८१. ज्यांत खोंड, चंदन, वीणा, आरसा, मध, तूप, आज्य व ताम्रपात्रें असतात तें घर तुझें स्थान नव्हे ८२. हे यक्ष्म्या, कंटकयुक्त वृक्ष, पावट्यांचा वेल, पुनर्विवाहित स्त्री व वारूळ जेथें असेल तें घर तुझें ८३. ज्या घरांत पांच पुरुष, तीन स्त्रिया, तीन गाई व अंधकारामध्यें इंधनांचा उजेड हीं असतील तें घर तुझें वसतिस्थान होय ८४. हे यक्ष्म्या, एक बोकड, दोन गर्दभ, तीन गाई, पांच म्हशी, सहा अश्व व सात गज असतील तें घर तूं सत्वर शोषून

क्षितानि तत्र दधुः प्रतिश्रयम् ८६ मुशलोलूखले स्त्रीणामास्या तद्वदुदुम्बरे । अवस्करे मन्त्रणं च यक्ष्म तदुपकृत्तव ८७ लंघ्यन्ते यत्र धान्यानि पक्वापक्वानि वेश्मनि । तद्वच्छस्त्राणि तत्र त्वं यथेष्टं चर दुःसह ८८ स्थालीपिधाने यत्राग्निर्दत्तो दर्वीमुखेन वा । गृहे तत्र हि रिष्टानामशेषाणां समाश्रयः ८९ मानुषास्थिगृहे यत्र दिवारात्रं मृतस्थितिः । तत्र यक्ष्म तवावासस्तथान्येषां च रक्षसाम् ९० अदत्त्वा भुञ्जते ये वै बन्धोः पिण्डं तथोदकम् । सपिण्डान्सोदकांश्चैव तत्काले तानरान्भज ९१ यत्र पद्ममहापद्मौ सुरभिर्मोदकाशिनी । वृषभैरावतौ यत्र कल्प्यन्ते तद्गृहं त्यज ९२ अशस्त्रा देवता यत्र सशस्त्राश्चाहवं विना । कल्प्यन्ते मनुजैरर्च्यास्तत्परित्यज मन्दिरम् ९३ पौरजानपदैर्यत्र प्राक्प्रसिद्धमहोत्सवाः । क्रियन्ते पूर्ववद्गेहे न त्वं तत्र गृहे चर ९४ शूर्पवातघटाम्भोभिः स्नानं वस्त्राम्बुविप्रुषैः । नखाग्रसलिलैश्चैव तान्याहि हतलक्षणान् ९५ देशाचारान्समर्यादाञ्ज्ञातिधर्मं जपं होमं मङ्गलं देवतेष्टिम् । सम्यक्शौचं विधिवल्लोकवादान्पुंसस्त्वया कुर्वतो माऽस्तु सङ्गः ९६ मार्कण्डेय उवाच ॥ इत्युक्त्वा दुःसहं ब्रह्मा तत्रैवान्तरधीयत । चकार शासनं सोऽपि तथा पंकजजन्मनः ९७ ( २९७६ ) इति श्रीमार्कण्डेयपुराणे यक्ष्मानुशासनं नाम सप्तचत्वारिंशोऽध्यायः ॥ ४७ ॥

मार्कण्डेय उवाच ॥ दुःसहस्याभवद्भार्या निर्माष्टिर्नाम नामतः । जाता कलेस्तु भार्या-

---

टीका ८५. कुदळी, कोयते, पाट्या व भांडींकुंडीं हीं ज्या घरांत इकडे तिकडे पडलेलीं असतात तें घर तुझें वास्तव्य होय ८६. उखळ मुसळ, व उंबरठा ह्यांचे संनिध स्त्रियांची बैठक आणि उकिरड्यासंनिध भाषण हीं, हे यक्ष्मा, तुझ्या फायद्याचीं आहेत ८७. हे दुःसहा, जेथें पक्व व अपक्व धान्यें आणि शस्त्रें ओलांडिलीं जातात तेथें तूं यथेष्ट संचार कर ८८. ज्या घरांत झाकणानें अथवा पळीनें अग्नि दिला जातो तें घर सर्व विपत्तींचें निवासस्थान होय ८९. हे यक्ष्मा, ज्या घरांत मनुष्याचें हाड राहील आणि दिवसा व रात्रीं शव पडून राहील तें तुझें व इतर राक्षसांचें निवासस्थान होय ९०. बंधूला पिंड अथवा उदक न देतां जे सपिंड व सोदक भोजन करीत असतात त्यांना तूं तत्क्षणीं पछाड ९१. ज्या घरांत पद्म व महापद्म हे खजिने, मोदक भक्षण करणारी गाय, वृषभ व ऐरावत काढिले जातात तें घर तूं सोड ९२. अशस्त्र देवता युद्धावांचून जेथें सशस्त्र कल्पून पूजिल्या जातात तें घर तूं सोड ९३. ज्या घरांत पूर्वीप्रमाणें परंपरागत महोत्सव लोक करीत असतात त्या घरांत तूं संचार करूं नकोस ९४. सुपाचा वारा, घागरींतून पाणी, वस्त्राचे शिंतोडे आणि नखाचें अग्रावरून पडलेलें उदक ह्यांच्या योगानें ज्या घरांत स्नान केलें जातें त्या लक्षणहीन घरांचा तूं आश्रय कर ९५. देशाचार, मर्यादा, ज्ञातिधर्म, जप, होम, मंगल, देवतार्चन आणि यथाविधि शौचकर्म न सोडणाऱ्या व लोकापवादाचें भय बाळगणाऱ्या पुरुषांशीं तूं संबंध ठेवूं नकोस ९६. मार्कंडेय म्हणतातः—असें दुःसहाला सांगून ब्रह्मदेव तेथेंच गुप्त झाले व तोहि त्यांच्या आज्ञेप्रमाणें वागूं लागला ९७. (२९७६) ह्याप्रमाणें श्रीमार्कंडेयपुराणांतर्गत यक्ष्मानुशासननामक सत्तेचाळिसावा अध्याय समाप्त झाला ॥४७॥

यामृतौ चाण्डालदर्शनात् १ तयोरपत्यान्यभवञ्जगद्व्यापीनि षोडश । अष्टौ कुमाराः कन्याश्च तथाष्टावतिभीषणाः २ दन्ताकृष्टिस्तथोक्तिश्च परिवर्तस्तथापरः । अङ्गध्रुक्छकुनिश्चैव गण्ड-प्रान्तरतिस्तथा ३ गर्भहा सस्यहा चान्यः कुमारास्तनयास्तयोः । कन्याश्चान्यास्तथैवाष्टौ तासां नामानि मे शृणु ४ नियोजिका वै प्रथमा तथैवान्या विरोधिनी । स्वयंहारकरी चैव भ्रामणी ऋतुहारिका ५ स्मृतिबीजहरे चान्ये तयोः कन्ये सुदारुणे । विद्वेषण्यष्टमी नाम कन्या लोकभ-यावहा ६ एतासां कर्म वक्ष्यामि दोषप्रशमनं च यत् । अष्टानां च कुमाराणां श्रूयतां द्विजसत्तम ७ दन्ताकृष्टिः प्रसूतानां बालानां दशनस्थितः । करोति दन्तसंघर्षं चिकीर्षुर्दुःसहागमम् ८ तस्योपशमनं कार्यं सुप्तस्य सितसर्षपैः । शयनस्योपरि क्षिप्तैर्मांडपैर्दशनोपरि ९ सौवर्च-लौषधिस्नानात्तथा सच्छास्त्रकीर्तनात् । उष्ट्रकण्टकगङ्गास्थिश्च क्षौमवस्त्रविधारणात् १० तिष्ठस्त्वन्यः कुमारस्तु तथास्त्वित्यसकृद्ब्रुवन् । शुभाशुभे नृणां युङ्क्ते तथोक्तिस्तत्र नान्यथा ११ तस्मादंदुष्टं मङ्गल्यं वक्तव्यं पण्डितैः सदा । दुष्टे श्रुते तथैवोक्ते कीर्तनीयो जनार्दनः १२ चराचरगुरुर्ब्रह्मा यो यस्य कुलदेवता । अन्यगर्भे परान्गच्छन्सदैव परिवर्तयन् १३ रतिमा-प्नोति वाक्यं च विवक्षोरन्यदेव यत् । परिवर्तकसंज्ञोऽयं तस्यापि सितसर्षपैः १४ रक्षोघ्न-मन्त्रजप्यैश्च रक्षां कुर्वीत तत्त्ववित् । अन्यथानिलवन्नृणामङ्गेषु स्फुरणोदितम् १५ शुभाशुभं

---

मार्कंडेय ह्मणतातः—दुःसहाची भार्या निर्माष्टि ही ऋतुकालीं चांडालदर्शनामुळें कलीपासून त्याच्या भार्येचे ठिकाणीं झालेली कन्या होय १. दुःसह व निर्माष्टि ह्यांना जगद्व्यापक व अति भयंकर सोळा मुलें झालीं; आठ पुत्र व आठ कन्या २. दंताकृष्टि, तथोक्ति, परिवर्त, अंगध्रुक, शकुनि, गंडप्रांतरति ३, गर्भहा व सस्यहा हे त्यांचे आठ पुत्र होत. त्याचप्रमाणें त्यांच्या ज्या आठ कन्या त्यांचीं नांवें माझ्यापासून ऐक ४. नियोजिका, विरोधिनी, स्वयंहारिका, भ्रामणी, ऋतुहारिका ५, स्मृतिहारिका, बीज-हारिका आणि विद्वेषणी. ह्या शेवटल्या तिघींपैकीं पहिल्या दोन अतिभयंकर असून शेवटली ही जगताला भय उत्पन्न करणारी आहे ६. हे द्विजश्रेष्ठ, ह्यांचें व कुमारांचें कर्म आणि त्यांचा परिहार मी सांगतों; तूं ऐक ७. दंताकृष्टि हा उपजलेल्या बालांच्या दांतांवर राहून भयंकर फळ देण्याच्या उद्देशानें त्यांना दांत खाऊं लावितो ८. बालक निजलें असतां त्याच्या शय्येवर व दांतांवर पांढऱ्या मोहऱ्या टाकून ९ पादेलोण व सुंठ ह्यांचें स्नान घालून सच्छास्त्राचें कीर्तन करून आणि उंटाचें हाडूक, कांटे, गंगा व रेशमीवस्त्र धारण करून त्या दंताकृष्टीचा परिहार करावा १०. दुसरा कुमार जो तथोक्ति तो 'तथास्तु तथास्तु' असें एकसारखें ह्मणत असतो आणि लोकांना शुभाशुभ फल उत्पन्न करितो. तथास्तु हें त्याचें ह्मणणें खोटें होत नाहीं ११. तस्मात्, विचारी लोकांनीं सर्वदा दोषरहित व शुभ भाषण करावें; आणि अमंगळ श्रवण केल्यास किंवा उच्चारिल्यास चराचर गुरु ब्रह्मा, विष्णु व कुळदेवता ह्यांचें नांव घ्यावें. दुसऱ्याच्या गर्भाशयामध्यें जाऊन गर्भाची उलथापालथ करण्यांतच १२, १३ आनंद मान-णारा आणि जें उद्दिष्ट असेल त्याहून भलतेंच तोंडांतून वदविणारा हा परिवर्तक

समाचष्टे कुमारस्तस्याङ्गताडनम्। काकादिपक्षिसंस्थोऽन्यः श्वादेरंगगतोऽपि वा १६ शुभाशुभं च शकुनिः कुमारोऽन्यो ब्रवीति वै। तत्रापि दुष्टे व्याक्षेपः प्रारम्भत्याग एव च १७ शुभे तूर्णतरं कार्यमिति प्राह प्रजापतिः। गण्डान्तेषु स्थितश्चान्यो मुहूर्तार्द्धं द्विजोत्तम १८ सर्वारम्भान्कुमारोऽत्ति शमं तस्य निशामय। विप्रोक्त्या देवतास्तुत्या मूलोत्खातेन च द्विज १९ गोमूत्रसर्षपस्नानैस्तद्वद्ग्रहपूजनैः। पुनश्च धर्मोदितपक्षकरणैः शास्त्रदर्शनैः २० अवज्ञया जन्मनश्च प्रशमं याति गण्डवान्। गर्भे स्त्रीणां तथाऽन्यस्तु कललाशी सुदारुणः २१ तस्य रक्षा सदा कार्या नित्यं शौचनिषेवणात्। प्रसिद्धमन्त्रलिखनाच्छस्तमाल्यादिधारणात् २२ विशुद्धगेहावसनादनायासाच वै द्विज। तथैव सस्यहा चान्यः सस्यर्द्धिमुपहन्ति यः २३ तस्यापि रक्षां कुर्वीत जीर्णोपानद्विधारणात्। तथापसव्यगमनाच्चण्डालस्य प्रवेशनात् २४ बहिर्बलिप्रदानाच सोमाम्बुपरिकीर्तनात्। परदारपरद्रव्यहरणादिषु मानवान् २५ नियोजयति चैवान्यान्कन्या सा च नियोजिका। तस्याः पवित्रपठनात्क्रोधलोभादिवर्जनात् २६ नियोजयति मामेष विरोधाच विवर्जनात्। आकुष्टोऽन्येन मन्येत ताडितो वा नियोजिका २७ नियोजय-

होय. त्याच्यापासून पांढऱ्या मोहऱ्या १४ आणि राक्षोघ्नमंत्राचा जप ह्यांच्या योगानें तत्त्ववेत्त्यानें रक्षण करावें. चवथा कुमार मनुष्यांच्या शरीरावयवांचे ठिकाणीं वायूप्रमाणें स्फुरण उत्पन्न करून शुभाशुभ सुचवीत असतो; त्याचा परिहार दर्भानीं शरीरताडण हा होय. काकादि पक्षी किंवा श्वानादि प्राणी ह्यांच्या शरीरामध्यें प्रवेश करून १५,१६ शकुनिनामक कुमार शुभाशुभ कथन करीत असतो. त्याचा अमंगळ शब्द झाल्यास कार्यांत व्याक्षेप येणार असल्यामुळें मनांत आणिलेलें काम करूं नये १७; आणि शुभ शब्द झाल्यास मनांत आणिलेलें कार्य फारच सत्वर करावें, असें ब्रह्मदेवाचें ह्मणणें आहे. गंडांतांचे ठिकाणीं, हे द्विजश्रेष्ठ, घटिकाभर राहून १८ सहावा कुमार आरंभिलेल्या सर्व कार्यांचा विघात करीत असतो; त्याचा परिहार विप्रोक्ति, देवतास्तुति, मूलोत्खात १९, गोमूत्र आणि मोहऱ्या ह्यांचीं स्नानें, अशुभ ग्रहांचें पूजन, धर्मशास्त्रांत निर्दिष्ट असलेल्या कर्मांचें अनुष्ठान, शास्त्रदर्शन २० आणि जन्माची अवज्ञा ह्यांच्या योगानें त्याचा परिहार होतो. स्त्रियांच्या गर्भाशयांत राहून कललभक्षण करणारा सातवा कुमार अति भयंकर होय २१. त्याचा परिहार—निरंतर शुचिर्भूत असणें, प्रसिद्ध मंत्र लिहून धारण करणें, प्रशस्त पुष्पें वगैरे धारण करणें २२, शुद्ध घरांत वास्तव्य आणि अनायास—ह्यांच्या योगानें होतो. हे द्विज, सस्यहा हा आठवा कुमार. हा धान्यसमृद्धि नाहींशी करीत असतो २३. जुनें खेटर बांधणें, डावी घालून जाणें, चंडाळाचा प्रवेश २४, बाह्य बलिप्रदान आणि चंद्र व उदक ह्यांचें कीर्तन, ह्यांच्यामुळें त्याचा परिहार होतो. परस्त्री व परद्रव्य हरण करणें हीं व अशाच प्रकारचीं कृत्यें मानवांकडून २५ नियोजिका कन्या घडवून आणीत असते. पवित्र ग्रंथाचें पठण—आणि क्रोधलोभादिप्रसंगीं "ही मला प्रवृत्त करीत आहे" अशी भावना धरून ते क्रोधलोभादिक वर्ज्य केल्यानें तिचा परिहार

स्येनमिति न गच्छेत्तद्वशं बुधः। परदारादिसंसर्गे चित्तमात्मानमेव च २८ नियोजयत्यत्र सा मामिति प्राज्ञो विचिन्तयेत्। विरोधं कुरुते चान्या दम्पत्योः प्रीयमाणयोः २९ बन्धूनां सुहृदां पित्रोः पुत्रैः सावर्णिकैश्च या। विरोधिनी सा तद्रक्षां कुर्वीत बलिकर्मणा ३० तथाति वादसहनाच्छास्त्राचारनिषेवणात्। धान्यं खलाद्गृहाद्दोग्ध्रात्पयः सर्पिस्तथा परा ३१ समृद्धिमृद्धिमद्द्रव्यादपहन्ति च कन्यका। सा स्वयंहारिकेत्युक्ता सदान्तर्धानतत्परा ३२ महानसादर्द्धसिद्धमन्नागारस्थितं तथा। परिविष्यमाणं च सदा सार्द्धं भुङ्क्ते च भुञ्जता ३३ उच्छेषणं मनुष्याणां हरत्यन्नं च दुर्हरा। कर्मान्तागारशालाभ्यः सिद्धिं हरति द्विज ३४ गोस्त्रीस्तनेभ्यश्च पयः क्षीरहारी सदैव सा। दध्नो घृतं तिलात्तैलं सुरागारात्तथा सुराम् ३५ रागं कुसुम्भकादीनां कार्पासात्सूत्रमेव च। सा स्वयंहारिका नाम हरत्यविरतं द्विज ३६ कुर्याच्छिखण्डिनोद्वन्द्वं रक्षार्थं कृत्रिमां स्त्रियम्। रक्षार्थेन गृहे लेख्या वर्ज्यां चोच्छिष्टवत् तथा ३७ होमाग्निदेवताधूपभस्मना च परिष्क्रिया। कार्या क्षीरादिभाण्डानामेवं तद्रक्षणं स्मृतम् ३८ उद्वेगं जनयत्यन्या एकस्थाननिवासिनः। पुरुषस्य तु या प्रोक्ता भ्रामणी सा तु कन्यका ३९ तस्याथ रक्षां कुर्वीत विक्षिप्तैः सितसर्षपैः। आसने शयने चोर्व्यां यत्रास्ते स तु मानवः ४० चिन्तयेच्च नरः पापामामेषा दुष्टचेतना। भ्रामयत्यसकृत्कल्प्यं भुवः सूक्तं समा-

होतो. दुसऱ्यानें निंदा अथवा ताडण केल्यास ही नियोजिका त्याच्या कडून तसें करवीत आहे, असें समजून विचारी पुरुषानें तिच्या अधीन होऊं नये. परदारादि संसर्गाचा प्रसंग आल्यास ही माझें चित्त तिकडे वळवीत आहे, असें विवेकी पुरुषानें मनांत आणून त्या कर्मापासून परावृत्त व्हावें. भार्या व पति परस्पर प्रेम करीत असल्यास त्यांमध्ये २६,२७,२८,२९ बंधूंत, सुहृदांत, मातापितर व पुत्र ह्यांच्यांत आणि स्वजनांत जी विरोध उत्पन्न करिते ती विरोधिनी. बलिदान, निंदा सहन करणें व शास्त्रविहित आचारानें वागणें ह्यांनीं तिचा परिहार होतो. खळ्यांतून धान्य व घरांतून आणि गोठ्यांतून दूध, तूप ३०,३१ आणि विपुल द्रव्यांतून पुष्कळ द्रव्य जी हरण करिते व जी सर्वदा गुप्त रहाते ती स्वयंहारिका होय ३२. ती स्वयंपाकघरांतून अर्धवट शिजलेलें, मुदपाकांत असलेले, व वाढलें जात असलेले अन्न हरण करिते भोजन करणाऱ्याबरोबर ती भोजन करिते ३३. मनुष्यांचें उच्छिष्ट हरण करिते. धान्याच्या कोठारापासून हे द्विज, ती धान्य हरण करिते ३४. गायी व स्त्रिया ह्यांच्या स्तनांपासून ती दूध हरण करिते; दह्यापासून तूप, तिळांपासून तेल, मद्यगृहापासून मद्य ३५, कुसुंभकादिकांपासून रंग व कापसापासून सूत ती स्वयंहारिका सर्वदा हरण करीत असते ३६. तिच्यापासून रक्षण होण्याकरितां मयूरपक्ष्यांचें युद्ध व स्त्री अशीं चित्रें काढावीं. उच्छिष्ट वर्ज्य करावें ३७. होम, अग्नि व देवाचा धूप ह्यांच्या भस्मानें दूध वगैरे ठेवण्याचीं भांडीं घांसावीं ३८. एके ठिकाणीं राहणाऱ्या पुरुषाला जी उद्वेग उत्पन्न करिते ती भ्रामणी होय ३९. बैठक, शय्या व जेथें तो मनुष्य असतो त्या भूमीवर पांढऱ्या मोहऱ्या टाकून तिचा परिहार करावा

धिना ४१ स्त्रीणां पुष्पं हरत्यन्या प्रवृत्तं सा तु कन्यका। तथा प्रवृत्तं सा ज्ञेया दुःसहा ऋतुहारिका ४२ कुर्वीत तीर्थदेवौकश्चैत्यपर्वतसानुषु । नदीसङ्गमखातेषु स्नपनं तत्प्रशान्तये ४३ मन्त्रविद्भूततत्त्वज्ञः पर्वसूषसि च द्विज। चिकित्साज्ञश्च वै वैद्यः संप्रदुन्दर्वरौषधैः ४४ स्मृतिमपहरत्यन्या नृणां सा स्मृतिहारिका। विविक्तदेशसेवित्वात्तस्याश्चोपशमो भवेत् ४५ बीजापहारिणी चान्या स्त्रीपुंसोरतिभीषणा । मेध्यान्नभोजनैः स्नानैस्तस्याश्चोपशमो भवेत् ४६ दारुणा सा दुराचारा सदैव कुरुते भयम् । तत्प्रशान्त्यै प्रकुर्वीत द्विजानामर्चनं शुभम् ४७ अष्टमी द्वेषणी नाम कन्या लोकभयावहा। या करोति जनद्विष्टं नरं नारीमथापि वा ४८ मधुक्षीरघृताक्तांस्तु शान्त्यर्थं होमयेत्तिलान्। कुर्वीत मित्रविन्दां च तथेष्टिं तत्प्रशान्तये ४९ एतेषां तु कुमाराणां कन्यानां द्विजसत्तम। अष्टात्रिंशदपत्यानि तथा नामानि मे शृणु ५० दन्ताकृष्टेरभूत्कन्या विजल्पा कलहा तथा। अवज्ञानृतदुष्टोक्तिर्विजल्पा तत्प्रशान्तये ५१ तामेव चिन्तयेत्प्राज्ञः प्रयतश्च गृही भवेत्। कलहा कलहं गेहे करोत्यनिरतं नृणाम् ५२ कुटुम्बनाशहेतुः सा तत्प्रशान्तिं निशामय। दूर्वाङ्कुरान्मधुघृतक्षीराक्तान्बलिकर्मणि ५३ विक्षिपेज्जुहुयाच्चैवानले मित्रं च कीर्तयेत्। भूतानां मातृभिः सार्धं बालकानां तु शान्तये ५४ विद्यानां

---

४०; आणि ही दुष्ट कन्या मला फिरवीत आहे अशी भावना धरून एकाग्रमनानें भूमिसूक्ताचा वारंवार जप करावा ४१. स्त्रियांचा प्रकट अथवा अप्रकट ऋतु जी हरण करिते ती दुःसहकन्या ऋतुहारिका होय ४२. तिचा परिहार होण्याकरितां, तीर्थ, देवालय, प्रसिद्ध वृक्ष, पर्वतशिखरें, नद्यांचा संगम व सरोवरें ह्यांच्या ठिकाणीं स्नान करावें ४३. भूततत्त्ववेत्त्या व मंत्रवेत्त्या पुरुषानें, हे द्विज, पर्वसमयीं व उषःकालीं हें स्नान करावें आणि चिकित्साशास्त्र जाणणाऱ्या वैद्यानेंही उदकांत श्रेष्ठ औषधि घालून स्नान घालावें ४४. लोकांचें स्मरण नष्ट करणारी जी कन्या ती स्मृतिहारिका होय ४५. एकांतस्थलाचें सेवन केल्यानें तिचा परिहार होतो. स्त्रीपुरुषांचें बीज हरण करणारी जी अति भयंकर कन्या ती बीजापहारिणी होय. पवित्रान्न सेवन व स्नान ह्यांच्या योगानें तिचा परिहार होतो ४६. ती दारुण व दुराचारी कन्या दारुण भय उत्पन्न करीत असते. ह्यास्तव, तिच्या शांतीकरितां शुभावह द्विजार्चन करावें ४७. द्वेषणी ह्मणून जी जगताला भय उत्पन्न करणारी आठवी कन्या ती पुरुषाला अथवा स्त्रीला लोकविद्विष्ट करीत असते ४८. तिच्या परिहाराकरितां मध, दूध व तूप चोपडलेल्या तिळांचें हवन करावें आणि मित्रविंदा इष्टि करावी ४९. हे द्विजश्रेष्ठ, ह्या कुमारांचीं व कन्यांचीं जीं अडतीस अपत्यें त्यांचीं नांवें तूं माझ्यापासून ऐक ५०. दंताकृष्टीला विजल्पा व कलहा अशा दोन कन्या झाल्या. विजल्पा ही अवज्ञायुक्त, अनृत व दुष्ट भाषण करीत असते. तिच्या परिहाराकरितां ५१ विचारी गृहस्थाश्रमी पुरुषानें जितेंद्रिय राहून तिचें चिंतन करावें. कलहा एकसारखी घरांतील मनुष्यांबरोबर कलह करीत असते ५२ व कुटुंबनाशाला कारण होत असते. मध, तूप व घृत ह्यांत बुचकळलेल्या दूर्वांकुरांनीं युक्त असें बलिदान व हवन केल्यानें

तपसां चैव संयमस्य यमस्य च। कृष्यां वाणिज्यलाभे च शान्तिं कुर्वन्तु मे सदा ५५ पूजिताश्च यथान्यायं तुष्टिं गच्छन्तु सर्वशः। कुष्माण्डा यातुधानाश्च ये चान्ये गणसंज्ञिताः ५६ महादेवप्रसादेन महेश्वरमतेन च। सर्वे एते नृणां नित्यं तुष्टिमाशु व्रजन्तु ते ५७ तुष्टाः सर्वे निरस्यन्तु दुष्कृतं दुरनुष्ठितम्। महापातकजं सर्वं यथान्यद्विघ्नकारणम् ५८ तेषामेव प्रसादेन विघ्नां नश्यन्तु सर्वशः। उद्वाहेषु च सर्वेषु वृद्धिकर्मसु चैव हि ५९ पुण्यानुष्ठानयोगेषु गुरुदेवार्चनेषु च। जपयज्ञविधानेषु यात्रासु च चतुर्दिशम् ६० शरीरारोग्यभोग्येषु सुखदानधनेषु च। वृद्धबालातुरेष्वेव शान्तिं कुर्वन्तु मे सदा६१ सोमाम्बुपौ तथाम्भोभिः सविता चानिलानलौ। तथोक्तेः कलिजिह्वोऽभूत्पुत्रस्तालनिकेतनः ६२ स येषां रसमासंस्थस्तान-साधून्विवादयेत्। परिवर्तसुतौ द्वौ तु विरूपविकृतौ द्विज ६३ तौ तु वृक्षादिपरिखाप्राकाराम्भोधिसंश्रयौ। गुर्विण्याः परिवर्तन्तौ कुरुतः पादपादिषु ६४ क्रौष्टुके परिवर्तः स्याद्गर्भस्यान्योदरात्ततः। न वृक्षं चैव नैवाद्रिं न प्राकारं महोदधिम् ६५ परिखां वासमाक्रामेदवलागर्भधारिणी। अङ्गध्रुकतनयं लेभे पिशुनं नाम नामतः ६६ सोऽस्थिमज्जागतः पुंसां बलमत्त्यजितात्मनाम्। श्येनकाककपोतांश्च गृध्रोलूकौ च वै सुतान् ६७ अवाप शकुनिः पश्च जगृहुस्तान्सुरासुराः। श्येनं जग्राह मृत्युश्च काकं कालो गृहीतवान्६८ उलूकं निर्ऋतिश्चैव

---

तिची शांति होते. नंतर अग्नि व सूर्य ह्यांचें स्तवन करावें आणि पुढील श्लोकांनीं बालकांना आरोग्य प्राप्त होण्याकरितां मातृगणासह भूतांची प्रार्थना करावी ५३,५४. विद्या, तप, मनोनिग्रह, यम, कृषि व व्यापार ह्यांचा लाभ मला होऊन देवतांनीं शांति करावी ५५. कूश्मांड, यातुधान व इतरही भूतगण ह्यांचें यथान्याय पूजन झाल्यामुळें हे सर्व संतुष्ट होवोत ५६. महादेवाच्या प्रसादानें व संमतीनें ते हे सर्व भूतगण लोकांवर सर्वदा सत्वर संतुष्ट होवोत ५७. हे भूतगण संतुष्ट होऊन दुष्कृत, अनुष्ठानदोष आणि महापातकजन्य असें अन्यही सर्व विघ्नकारण ह्यांचे निरसन करोत ५८. त्यांच्याच प्रसादानें सर्व विघ्नें नाहींशीं होवोत. विवाह, सर्व वृद्धिकर्में ५९, पुण्यकर्मानुष्ठान, गुरुपूजन, देवार्चन, जपविधान, यज्ञानुष्ठान, चार दिशांप्रत गमन ६०, शरीरारोग्य, उपभोग्य पदार्थ, सुख, दान व धन ह्यांच्यासंबंधानें वृद्ध, बाल व आतुर ह्यांचे ठिकाणीं त्या भूतगणांनीं शांति करावी ६१ आणि त्याचप्रमाणें सोम, वरुण, सूर्य, वायु, अग्नि व उदक ह्यांनीं शांति करावी. तथोक्तीचा पुत्र तालवृक्षनिवासी कलिजिव्ह हा होय ६२. तो ज्यांच्या जिभेवर असतो त्या दुर्जनांना तो भाडखोर करितो. हे द्विज, विरूप व विकृत हे दोन परिवर्ताचे पुत्र होत ६३. ते वृक्ष, पर्वत, खंदक, प्राकार व समुद्र ह्यांच्या आश्रयाला राहून वृक्षादिकांचे संनिध गर्भिणी स्त्री जाऊ लागली असतां तिला पछाडितात ६४. हे क्रौष्टुके, त्यामुळें गर्भाचें उदरापासून परिवर्तन होतें. ह्यास्तव, वृक्ष, पर्वत, प्राकार, सागर ६५, किंवा खंदक गर्भिणी स्त्रीनें ओलांडूं नये. अंगध्रुकाला पिशुन म्हणून पुत्र झाला ६६. तो इंद्रियाधीन पुरुषांच्या अस्थींमध्ये व मज्जेचे ठिकाणीं राहून त्यांचें बल भक्षण करीत असतो. श्येन, काक, कपोत, गृध्र व उलूक

उलूकमतिभयावहम् । गृध्रं व्याधिस्तदीशोऽथ कपोतं च स्वयं यमः ६९ एतेषामेव चैवोक्ता मूलाः पापोत्पादने । तस्माच्छ्येनादयो यस्य निलीयेयुः शिरस्यथ ७० तेनात्मरक्षणार्थं शान्तिं कुर्याद्द्विजोत्तम । गेहे प्रसूतिरेतेषां तद्वल्लीडनिवेशनम् ७१ नरस्तं वर्जयेद्गेहं कपोताक्रान्तमस्तकम् । श्येनः कपोतो गृध्रश्च काकोलूकौ गृहे द्विज ७२ प्रविष्टः कथयेदन्तं वसतां तत्र वेश्मनि । ईदृक्परित्यजेद्गेहं शान्तिं कुर्याच्च पण्डितः ७३ स्वप्नेऽपि हि कपोतस्य दर्शनं न प्रशस्यते । षडपत्यानि कथ्यन्ते गण्डप्रान्तरतेस्तथा ७४ स्त्रीणां रजस्यवस्थानं तेषां कालांश्च मे शृणु । चत्वार्यहानि पूर्वाणि तथैवान्यत्त्रयोदशम् ७५ एकादशं तथैवान्यदपत्यं तस्य वै दिने । अन्यद्दिनाभिगमने श्राद्धदाने तथापरे ७६ पर्वस्वथान्यत्तस्मात्तु वर्ज्यान्येतानि पण्डितैः । गर्भहन्तुः सुतो निघ्नो मोहनी चापि कन्यका ७७ प्रविश्य गर्भमध्येको भुक्त्वा मोहयतेऽपरा । जायन्ते मोहनात्तस्याः सर्पमण्डूककच्छपाः ७८ सरीसृपाणि चान्यानि पुरीषमथ वा पुनः । षण्मासाद्गुर्विणीमांसमभुवानामसंयताम् ७९ वृक्षच्छायाश्रयां रात्रावथ वात्रिचतुष्पथे । श्मशानकटभूमिष्ठामुत्तरीयविवर्जिताम् ८० रुदमाना निशीथेऽथ आविशेतामिमौ स्त्रियम् । सस्यहन्तुस्तथैवैकः क्षुद्रको नाम नामतः ८१ सस्यर्द्धिं स सदा हन्ति लब्ध्वा रन्ध्रं शृणुष्व तत् । अमङ्गल्यदिनारम्भे सुतृप्तो वपते च यः ८२ क्षेत्रेष्वनुप्रवेशं वै करो-

६७, असे पांच पुत्र शकुनीला झाले व ते देवदैत्यांनीं स्वीकारिले. मृत्यूनें श्येन; कालानें काक ६८; निर्ऋतीनें अति भयंकर उलूक, व्याधीनें गृध्र व ईश यमानें कपोत स्वीकारिला ६९. भूतगण ह्यांच्याच द्वारानें मनुष्यांना दुःख देत असतात. तस्मात्, ज्याच्या मस्तकीं श्येनादि पक्षी बसतील ७० त्यानें आत्मरक्षणार्थ, हे द्विजोत्तम, शांति करावी. घरांत त्यांची संतति किंवा कोठें असल्यास ७१ किंवा अढ्यावर कबूतर बसल्यास पुरुषानें तें घर वर्ज्य करावें. हे द्विज, श्येन, कपोत, गृध्र, काक व उलूक घरांत ७२ प्रविष्ट झाल्यास त्या घरांत राहणाऱ्यांचा ते नाश सुचवीत असतात. तस्मात्, विचारी पुरुषानें त्या घराचा त्याग करून शांति करावी ७३. स्वप्नामध्येंही कबूतर दृष्टीं पडणें प्रशस्त नाहीं. गंडप्रांतरतीचीं सहा अपत्यें आहेत ७४; व तीं स्त्रियांच्या रजानें ठिकाणीं रहात असतात. पहिले चार दिवस, तेरावा दिवस ७५, अकरावा दिवस, दिवसा, श्राद्धदिवस ७६ आणि पर्वदिवस ह्या सहा काळांत हीं असतात. तस्मात्, विचारी लोकांनीं हे काल स्त्रीगमनाला वर्ज्य करावे. गर्भघातक्याचा पुत्र निघ्न व कन्या मोहनी ७७ आंत प्रवेश करून पुत्र गर्भ खात असतो आणि कन्या गर्भ खाऊन मोह उत्पन्न करीत असते. तिच्या मोहामुळें सर्प, मंडूक, कूर्म ७८, सरपटणारे इतर प्राणी, किंवा पुरीष गर्भाच्या ऐवजीं उत्पन्न होत असतें. ह्यास्तव, सहा महिन्यांपासून जी गर्भिणी स्त्री मांसभक्षण करीत असते, जी जितेंद्रिय रहात नाहीं ७९, रात्रीं वृक्षछायेचा, तिकटण्याचा अथवा चौपाटीचा जी आश्रय करिते; श्मशानभूमींत अथवा गवताळ जमिनींत जी बसते, जिच्या अंगावर पांघरूण नसतें ८०; किंवा मध्यरात्रसमयीं जी रुदन करिते त्या स्त्रीचे ठिकाणीं तीं बहिणभावंडें प्रवेश करितात.

सस्तोपसंगिषु ८३ अमंगल्यदिनारम्भे मंगलानां च वर्जयेत्। तस्मात्कल्पः सुप्रशस्ते दि-
म्यर्च्य निशाकरम् ८४ कुर्यादारम्भमृष्टिं च हृष्टस्तुष्टः सहायवान्। नियोजिकेति या कन्
दुःसहस्य मयोदिता ८५ जातं प्रचोदिकासंज्ञं तस्याः कन्याचतुष्टयम्। मत्तोन्मत्तप्रमत्तार
नरानारीस्तु ताः सदा ८६ समाविशन्ति नाशाय चोदयन्तीह दारुणम्। अधर्मं धर्मरूपे
कामं चाकामरूपिणम् ८७ अनर्थं चार्थरूपेण मोक्षं चामोक्षरूपिणम्। दुर्विनीतान्विनाशे
दर्शयन्ति पृथङ्नरान् ८८ अंशत्याभिः प्रविष्टाभिः पुरुषार्थात्पृथङ्नराः। तासां प्रवेशश्च गृ
सन्ध्यावेलेषु सुदुस्तरे ८९ धात्रे विधात्रे च बलिर्यत्र काले न दीयते। सुजलं पिबतां वापि संगि
भिर्जलबिन्दुभिः ९० नरनारीषु संक्रान्तिस्तासामाशु भिजायते। विरोधिन्यास्त्रयः पुत्राश्चो
दको ग्राहकस्तथा ९१ तमःप्रच्छादकश्चान्यस्तत्स्वरूपं शृणुष्व मे। प्रदीपतैलसंसर्गदूषिते
कंपिते खले ९२ मुसलोलूखले यत्र पादुके चासने स्त्रियः। शूर्पदात्रादिकं यत्र पदाक्रान्तं तथास
नम् ९३ यत्रोपलिप्तेनाभ्यर्च्य विहारः क्रियते गृहे। दर्वीमुखेन यत्राग्निराहृतोऽन्यत्र नीयते ९४
विरोधिनी सुतास्तत्र विजृम्भन्ते प्रचोदिताः। एको जिह्वागतः पुंसां स्त्रीणां चालीकसत्यवान्
९५ चोदको नाम स प्रोक्तः पैशुन्यं कुरुते गृहे। अवधानगतश्चान्यः श्रवणयोऽतिदुर्मतिः ९६

सस्यघातकाचा एक पुत्र क्षुद्रक ८१ संधि साधून धान्यसंमृद्धि कशी नाहींशी करिते
तें ऐक. अशुभ दिवशीं जो पेरतो ८२ त्याच्या क्षेत्रामध्यें तो प्रवेश करितो ८३.
ह्यास्तव, अशुभदिवशीं मंगल वर्ज्य करावें; आणि समर्थ, हृष्ट, संतुष्ट व साहाय्ययुक्त
पुरुषानें प्रशस्त दिवशीं चंद्राचें पूजन करून नांगरण्याला व पेरण्याला आरंभ करावा.
नियोजिका ह्मणून मीं जी दुःसहाची कन्या सांगितली ८४,८५ तिला प्रचोदिका नांवा-
च्या चार कन्या झाल्या. त्या मत्त, उन्मत्त व प्रमत्त स्त्रीपुरुषांचे ठिकाणीं सर्वदा ८६
प्रवेश करीत असतात व नाशाची त्यांना प्रेरणा करितात. अधर्म धर्मरूपानें, काम
अकामरूपानें ८७, अनर्थ अर्थरूपानें, मोक्ष अमोक्षरूपानें व अशौच शौचरूपानें
त्या अविनयी पुरुषांना भासवीत असतात ८८; आणि त्या प्रविष्ट झाल्यामुळें पुरुष
पुरुषार्थापासून भ्रष्ट होतात. घरामध्यें त्यांचा प्रवेश संध्याकाळीं होत असतो; आणि
दुबेरउठ्यावरही त्या असतात ८९. धात्याला व विधात्याला बलिदान न केल्यास त्या
तत्क्षणीं प्रवेश करितात. अन्नोदक सेवन करीत असतांना शरीराला चिकटणाऱ्या
उच्छिष्ट जलबिंदूंबरोबर ९० त्यांचा स्त्रीपुरुषांचे ठिकाणीं सत्वर प्रवेश होत असतो.
विरोधिनीचे पुत्र तीन; चोदक, ग्राहक ९१ व तमःप्रच्छादक. त्यांचें स्वरूप माझ्या-
पासून ऐक. दिपुतैलाच्या संसर्गानें, खलें दूषित झाल्यास किंवा त्याचें उल्लंघन झाल्यास
९२ व त्याचप्रमाणें उखळ, मुसळ, पादुका, स्त्रीचें आसन दूषित अथवा उल्लंघित
झाल्यास, सूप, विळी, आसन इत्यादिकांना पाय लागल्यास ९३, सारविल्यानंतर
रांगोळी घातल्याशिवाय घरांतून संचार झाल्यास आणि पळीच्या टवळ्यानें अग्नि
दुसरीकडे नेला गेल्यास ९४ विरोधिनीचे पुत्र प्रेरणा झाल्यामुळें तेथें अम्मल बस-
वितात. स्त्रीपुरुषांच्या जिभेवर राहून सत्यासत्ययुक्त ९५ असा चोदक घरांत चहाड्या

करोति ग्रहणं तेषां वचसां ग्राहकस्तु सः । आक्रम्यान्यो मनो नृणां तमसाच्छाद्य दुर्मतिः ९७ क्रोधं जनयते यस्तु तमःप्रच्छादकस्तु सः । स्वयंहारस्य तु चौर्येण जनितं तनयत्रयम् ९८ सर्वहार्यर्धहारी च वीर्यहारी तथैव च । अनाचान्तगृहेष्वेते मन्दाचारगृहेषु च ९९ अप्रक्षालितपादेषु प्रविशन्ति महानसम् । खलेषु गोष्ठेषु च वै दोहो येषु गृहेषु वै १०० तेषु सर्वे यथान्यायं विहरन्ति रमन्ति च । भ्रामण्यास्तनयस्त्वेकः काकजंघ इति स्मृतः १०१ तेनाविष्टो रतिं सर्वां नैव प्राप्नोति वै मुने । भुञ्जन्यो गायते मैत्रे गायते, हसते च यः २ सन्ध्यामैथुनिनं चैव नरमाविशति द्विज । कन्यात्रयं प्रसूता सा या कन्या ऋतुहारिणी ३ एका कुचहरा कन्या अन्या व्यञ्जनहारिका । तृतीया तु समाख्याता कन्यका जातहारिणी ४ यस्या न क्रियते सर्वः सम्यग्वैवाहिको विधिः । कालातीतोऽथ वा तस्या हरत्येका कुचद्वयम् ५ सम्यक्श्राद्धमदत्त्वा च तथानभ्यर्च्य मातृकाः । विवाहितायाः कन्याया हरति व्यञ्जनं तथा ६ अन्यस्त्वशून्ये च तथा विधूपे सूतिकागृहे । अदीपशस्त्रमुसले भूतिसर्षपवर्जिते ७ अनुप्रविश्य सा जातमपहृत्यात्मसंभवम् । क्षणप्रसविनी बालं तत्रैवोत्सृजते द्विज ८ सा जातहारिणी नाम सुघोरा पिशिताशना । तस्मात्संरक्षणं कार्यं यत्नतः सूतिकागृहे ९ स्मृतिं चाप्रयतानां च शून्यागारनिषेवणात् । अपहन्ति सुतस्तस्याः प्रचण्डो नाम नामतः ११ पौत्रेभ्यस्तस्य संभूता लोकाः शतसहस्रशः । चण्डालयोनयश्चाष्टौ दण्डपाशातिभीषणाः ११ क्षुधाविष्टास्ततो

सुरू करितो. दुसरा अति दुष्ट पुत्र अवधान व श्रवणेंद्रिय ह्यांचे ठिकाणीं असतो ९६ व स्त्रीपुरुषांचीं भाषणें तो ग्रहण करीत असतो. हा ग्राहक होय. लोकांच्या मनांत प्रविष्ट होऊन व तें तमानें आच्छादित करून जो दुष्ट ९७ क्रोध उत्पन्न करितो, तो तमःप्रच्छादक होय. स्वयंहारीला चौर्यामुळें तीन पुत्र झाले ९८. सर्वहारी, अर्धहारी व वीर्यहारी. आचमनरहित व आचारशून्य घरांत हे विहार करीत असतात ९९. पाय धुतल्याशिवाय ज्या स्वयंपाकघरांत लोक शिरत असतात त्या स्वयंपाकघरांत, खळ्यांत, गोठ्यांत व ज्या घरांत दोहन केलें जातें त्या घरांत १०० ते सर्व यथेष्ट संचार करून रममाण होत असतात. भ्रामणीचा पुत्र काकजंघ १०१. त्यानें झपाटलेल्या कोणालाही, हे मुने, सुख होत नाहीं. जो जेवतांना गातो, हंसतो २ व संध्यासमयीं मैथुन करितो त्याचे ठिकाणीं हे द्विज, तो प्रवेश करीत असतो. ऋतुहारिणीला तीन कन्या झाल्या ३; कुचहरा, व्यंजनहारिका व जातहारिणी ४. जिचा विवाहविधि सर्व नीट होत नाहीं किंवा त्याला कालातिक्रमण होतें तिचे स्तन पहिली हरण करिते ५; मातृकापूजन व नांदीश्राद्ध नीट न होतां जिचा विवाह झालेला असेल तिचें स्त्रीचिन्ह दुसरी हरण करिते ६; आणि अग्नि, उदक, धूप, दीप, शस्त्र, मुसळ व मोहऱ्या ह्यांनीं रहित असलेल्या सूतिकागृहांत ७ प्रविष्ट होऊन निपजलेलें मूल जी हरण करिते व तत्क्षणीं प्रसूत होऊन, हे द्विज, जी स्वतःचें बालक तेथें टाकिते ८ ती अतिघोर व मांसभक्षक जातहारिणी होय. तस्मात्, सूतिकागृहामध्यें यत्नानें बालकाचें रक्षण करावें ९. शून्य गृहांत वास्तव्य केल्यामुळें जी अशुद्धलोकांची स्मृति हरण करीत असते त्या

